चित्रें





॥ श्रीराम ॥

# गेल्या अठ्ठावीस वर्षांत झालेलें श्री रामदासी संशोधन

### प्रथम खंड

---

## प्रस्तावना

विवेकबळें गुप्त जाला । आपेंआप मावळला ।
दिसतो परी देखिला । नाहीं च कोणी ॥ ५६८

तरी त्याचें अंतरंग आपणास कळावें, असा आपला हट्ट आहे. दृश्य पदार्थ त्या निर्मळा । स्पर्शला च नाहीं ॥ हें जरी खरें तरी त्यांनीं आमचें कोड पुरवावें, असा आपला आग्रह आहे व तसें ते पुरवितील असा आमचा विश्वास आहे. श्री रामदास आणि रामदासी मासिकाच्या विनंतिपत्रकांत "तुम्हां आम्हां सर्वांस श्रीसमर्थस्वरूपाची ओळख पटावी, असा या मासिकाचा प्रयत्न असतो" असें मासिकाचें धोरण नमूद केलेलें असतें. तें धोरण सारखें डोळ्यांपुढें ठेवून आम्ही वागत आलों, म्हणजे आम्ही आमच्याकडून शक्य तो प्रयत्न करीत आलों, एवढें च आम्ही सांगू शकतों. तो प्रयत्न कितपत यशस्वी झाला, हें आमच्यापेक्षां वाचक च जास्त बरोबर ठरवू शकतील. तिऱ्हाईत या नात्यानें वाचकांच्या ठिकाणीं जी न्यायनिष्ठुरता असणार तितकी ती आमच्यामध्यें नसणार, हें उघड आहे. आपलेपणाच्या भावनेनें आमच्या दृष्टीला थोडें फार अधिक आलेलें असण्याचा संभव फार आहे. तथापि आम्ही अगदीं च आंधळे बनलों असू, असें वाटत नाहीं ओळख पटावी असा प्रयत्न केला, किंचित् जास्त ओळख पटली हि असेल, पण संपूर्ण सद्गुरुस्वरूपसाक्षात्कार होण्यापासून आपण किती तरी दूर आहोंत, याची आम्हांस पूर्ण जाणीव आहे. त्या दिशेनें गेल्या अठ्ठावीस

### तीस वर्षांत काहीं प्रगति

झाली, एवढें खरें. शके १८२७ च्या पूर्वी लोकांना विरक्तें उपाधी करावी ।

या ऐवजीं विरक्तें उपाधी न करावी । , हें दासबोधीं असें बोलिलें । याच्या ऐवजीं देहास घोधी असें बोलिलें । अशा च येथूनतेथून विपर्यस्त व अर्थाचा अनर्थ केलेला दासबोध वाचावा लागत असे ! सुमारें तीस वर्षांपूर्वी बुडाला औरंग्या पापी । म्लेंचसंव्हार जाहला ॥ , शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें येत्न होतसे ॥ , अत्यन्त साक्षपी व्हावें । न व्हावें आळसी कदा ॥, धीर धरा धीर धरा तकवा । हडबडूं गडबडूं नका ॥, यत्न तो देव जाणावा ॥ , महंती सुखाची नाहीं । येथें दुःख उदंड हि ॥, परंतु येकवचनी देव येक । सुंदर मठ, रामदास फोडी हांका, अस्मानी सुलतानी इत्यादि शेंकडों स्फूर्तिदायक आणि श्रीसमर्थस्वरूप प्रकट करणारीं प्रकरणें आणि हजारों वचनें कोणाच्या वाचण्यांत होतीं ? श्रेष्ठांचें भक्तिरहस्य, दिनकरांचा स्वानुभवदिनकर, गिरिधरांचें समर्थप्रतापादि बेचाळीस ग्रन्थ, मेरुस्वामींचा रामसोहळा, आत्मारामांचा दासविश्रामधाम, वेणाबाईचें सीतास्वयंवर, इत्यादि अप्रतिम ग्रन्थ तीस वर्षांपूर्वी कोठें होते ? तीस वर्षांपूर्वी श्रीसमर्थांचें हस्ताक्षर कोणी पाहिलें होतें, श्रीसमर्थस्तवनपर शेंकडों पदपदांतरें कोणाच्या अवलोकनांत होतीं, श्रीकल्याणस्वामींची हि कविता आहे, हें कोणी ऐकिलें होतें ? त्यांच्या भव्य मूर्तीचें दर्शन कोणास घडलें होतें ? या तीस वर्षांत बरी च प्रगति झाली, असें मानलें, तरी अंतिम ध्येय गांठण्याच्या मानानें ती कांहीं च नाहीं, हें मनांत आलें म्हणजे खेद होतो ! आतां

## श्रीसमर्थचरित्र केव्हां लिहिणार

म्हणून कित्येक जण मोघम विचारणा करीत असतात, तर कित्येक जण घाई करीत असतात. ही घाई कां, तें कळण्यांत येणें कठीण नाहीं. एका गृहस्थानें तर एक वर्षांत चरित्र लिहाल तर छापण्याचा सारा खर्च आपण करूं म्हणून प्रेमानें आमिष हि दाखवून पाहिलें. आपण श्रीसमर्थचरित्र लिहावें, असें आम्हांस वाटत नसेल काय ? पण कसें लिहावें ? अंतर्यामा पूर्ण ओळखीवांचून एकाद्याचें चरित्र कसें लिहावें ? श्रीसमर्थचरित्राचीं अनेक अंगें आहेत : कांहीं उघड आहेत आणि कांहीं गुप्त ( Sealed ) आहेत. उघड आहेत तीं इतकीं उघड आहेत कीं, तीं ठाऊक नाहींत असा महाराष्ट्रांत कोणी च सांपडावयाचा नाहीं. बाराव्या वर्षी लग्नांतून पळाले, पुढें

बारा वर्षे एका जागीं राहून पुरश्चरण केलें, पुढें बारा वर्षें तीर्थाटणाच्या निमित्तानें सारा देश पायीं तुडविला,नंतर बारा त्रिक छत्तीस वर्षे उदंड त्याप केला, सह्याद्रि पालथा घातला, ठिकठिकाणीं मठ स्थापिले, अगणित शिष्यसमुदाय केले, त्यांस परोपरीनें बोध केला, खनाळात जाऊन राहिले, अंतरीं अनेक कल्पना केल्या, ईश्वरावर भार घातला, अवघे चि सुखी असावे अशी वासना धरून विश्वाच्या कल्याणाची चिंता वाहिली, अनेक चमत्कार केले, नाना सामर्थ्यें धाडविलीं, श्रीशिवरायावर कृपा केली, आपल्या पश्चात् हि मार्गदर्शक होतील असे अनेक ग्रन्थ निर्माण करून ठेविले आणि शेवटीं श्रीशिवराय गेल्यावर सुमारें एक वर्ष एकांतांत काढून असेरीस, येत्या माघ वद्य ९ स २५२ वर्षे होतील, सज्जनगडावर देह ठेवून चालते झाले ! यांत महाराष्ट्रास ठाऊक नाहीं, अशी कोणती गोष्ट आहे कीं, ती आपण सांगितली तर च महाराष्ट्रास कळणार आहे. श्रीसमर्थचरित्राचा जो गुप्त भाग आहे, तो अजून मला तरी गुप्त च आहे. माझा च जेथें प्रवेश होऊं शकला नाहीं, तेथील हकिकत मी इतरांस काय सांगूं ? तात्पर्य, श्रीसमर्थांनीं कृपा केल्यावांचून, त्यांच्या हृदयाचा ठाव लागल्यावांचून, त्यांचें अंतरंग कळल्यावाचून त्यांचें चरित्र लिहिणें अकालिक होईल, अशी भीति वाटते. त्या प्रयत्नांत आपण असावें, कृपा झाली ठीक, न झाली तरी त्या प्रयत्नात असतां देह पडला तरी ठीक !

त्या दिशेनें आजापर्यंत झालेल्या

## प्रयत्नाचें दृश्य फळ

म्हणजे श्रीरामदासी संशोधनाचे हे दोन खंड होत. सभेनें आजवर केलेल्या संग्रहाचें स्वरूप महाराष्ट्रास केव्हां तरी सादर करणें अवश्य होतें. प्रस्तुत खंडांत एकंदर ५३६ बाडांचा परामर्ष घेण्यांत आला आहे. टांकळी, डोमगांव, सडवळे, पांथरी, चाफळखोरें, भालगांव, इंदुर अशीं प्रमुख ठिकाणें या खंडांत आलीं व बीड, शिरगांव, एकेहाळी, कारंजें, निजामच्या राज्यांतील दीडशें कोसांचा टापू, तंजावरप्रांत इत्यादि महत्त्वाचीं ठिकाणें पुढील खंडासाठीं उरलीं आहेत. तो खंड तयार झाल्यावर एकंदर संग्रहाविषयीं साकल्यानें कांहीं बोलतां येईल. तथापि या खंडानें सुद्धां श्रीसमर्थांविषयीं कांहीं थोड्या थोडक्या गोष्टी प्रथम च उजेडांत आणल्या आहेत, असें नव्हे. खुद्द श्रीसमर्थांचीं किती तरी नवीन पदें, अष्टकें, मानें, गाणीं, प्रकरणें नव्यानें ऐकावयास मिळत आहेत. कमी अधिक महत्त्वाच्या केक बाबी पुढें येत

आहेत. पुन्हां यासंबंधें पहावयाचें नाहीं म्हटलें तरी पांच पन्नास नवीन गोष्टी सहज सांगतां येतील. त्यांत हि पुढील

## दहा बारा प्रसंग

विशेष लक्षांत राहिले आहेत :

( १ ) चित्रराम म्हणजे उद्धव हा उलगडा झाला, उद्धव आणि दिवाकर यांच्या चरित्रावर नवीन प्रकाश पडला, उद्धवांची तळमळ प्रत्ययास आली, श्रीसमर्थांच्या शिष्यवर्गांत उद्धवांचें स्थान किती वरचें आहे तें कळलें. पूर्वी उद्धवाचें अवघें एक अष्टक ठाऊक होतें, तेथें आतां त्यांची किती तरी सरस अशी कविता वाचावयास मिळत आहे. पृष्ठें ४३ ते ५८ वाचकांच्या अवश्य वाचण्यांत यावीं.

( २ ) श्रीसमर्थ इंदुरास गेले होते, तेव्हां आवर्तण पडलें होतें, ब्राह्मण अनुष्ठान करीत होते, तेव्हां श्रीसमर्थांनीं मारुतीला अभिषेक करण्यास सांगितलें, इत्यादि जो कथाभाग चरित्रांत वगैरे श्रीचरित्रग्रंथांत आढळतो, त्यास नवीन प्रत्यंतर मिळत आहे. त्या प्रसंगीं उद्धव हि श्रीसमर्थांबरोबर असावेत, असें त्यांच्या मेघाच्या श्लोकांवरून दिसतें. बाडांक ४५५ पहावें.

> त्वरित चि घन वर्षो मेघ सो प्रतिवर्षी ।
> अतुक चि न चुकावा नेम वर्षानवर्षी ।
> उदर चि मज तो वा आणिले ये चि वर्षी ।
> पतितपण लजावें सूर्ते मेघासि वर्षी ॥

( ३ ) त्या च बाडांत श्रीसमर्थकृत जें दशक दिलें आहे, तें पाठ करून रोज श्रीसमर्थांपुढें म्हणावें. पहिल्या आठ श्लोकांत आपल्या च मनाची स्थिति वर्णिली आहे. हे शब्द लेखणींतून उतरले, पण ते बरोबर पडले नाहींत. ते बरोबर असते तर आणखी काय पाहिजे होतें ! पहिल्या आठ श्लोकांत वर्णिल्या प्रमाणें ततोतंत मनाची स्थिति व्हावी, असें तें वाक्य हवें होतें. तशी स्थिति यावी, तशी तळमळ लागावी, चैन पडेनाशी व्हावें, दुःखावेगानें प्राण डोळ्यांवर यावे की काय अशी अवस्था व्हावी, म्हणजे नवव्या आणि दहाव्या श्लोकांत वर्णिलेला प्रत्यय आल्यावांचून रहाणार नाहीं, असें म्हणावयास पाहिजे होतें.

ही स्वप्नसाक्षात्काराची हकिकत कोणत्या हि चरित्रग्रन्थांत आढळत-नाहीं. ती या श्लोकदशकांत आपणांस प्रत्यक्ष श्रीसमर्थांच्या मुखांतून ऐकावयास मिळत आहे, हें आपलें केवढें भाग्य !

अनाथा दिनाची समर्थांसि चिंता । खरें बोलला राम आनंददाता ।
अकस्मात स्वप्नीं समाधान केलें । समर्थें दिनालागि आनंदवीलें ॥ ९

दिनाचा सदा सर्वदा भार वाही । न पाहे मनीं अदर अन्याय कांहीं ।
क्षमा सर्व केलें मला येश दिल्हें । म्हणे दास हें प्रत्यया सत्य आलें ॥ १०

(४) या संग्रहांत ऐतिहासिक महत्त्वाचे उल्लेख कांहीं थोडे थोडके आढळतील असें नव्हे. द्वितीय खंडांत तर कागदपत्रांत ते प्रसंग फार येणार आहेत. टाकळीमठांतील संग्रहाच्या टांचणाला सुरवात करण्यापूर्वी उद्धवांचा श्रीशिवरायावर जो श्लोक दिला आहे तो सर्वांच्या पाठांत असावा. आला राजा मही्चा हा जो श्रीरामावर श्रीसमर्थांचा श्लोक आहे, त्यावरून श्रीशिवराय गेल्यावर उद्धवांना हा श्लोक सुचला, हें उघड आहे :

गेला भोक्ता गडांचा हयगजपतिचा आणि त्या भूरतींचा ।
द्वारांचा सज्जनांचा ऋषिजनमुनिचा आणि त्या देवतांचा ।
भक्तांचा पंडितांचा चतुर सुमतिचा साधव्या भाविकांचा ।
नाना विद्याकवींचा कुशल जगतिचा बोलक्यां नेमकांचा ॥

(५) या श्लोकावरून त्या दोन चार श्लोकांची आठवण होते. हें जसें श्रीशिवरायाचें वर्णन झालें, तसें त्याचे सापत्न बंधु व्यंकोजी राजे यांचें वर्णन ३५८ व्या बाडांकांत एका सुभाषितात आढळतें :

सूर्याला शनि विष होय शंकराला । व्यासाला सुत धृतराष्ट्र अंध जाला ।
ऐसा हा सुत अगुणी गुणाद्भुताला । येकोजी नरपति शाह भोसल्याला ॥

(६) आणि तें गागाभट्टावरील सुभाषित. बाडांक ४७० त तें आहे. त्यांत इतिहास आहे, करमणूक आहे, विनोद आहे, तत्कालीन लोकमताच्या एका अंगाचा पडसाद आहे :

बहुश्रुत हो न्यायनीतीसि जागा । जनीं अटवीता असे भट्ट गागा ।
कदा ही तुम्ही त्यासि मीळों नका हो । स्वधर्मे चि जें बोलिलें तें करा हो ॥

(७) उद्धवांचा भानजी गोसावी वगैरे मंडळी वरील बाड ४८२ व्या बाडांतील एक दोन श्लोकावरून दिसत येत आहे. भानभट्ट सोनभट्ट दोघे

भट्ट नष्ट हे ॥ व चंद्रभान आणि पान या द्वयासि सांगणे ॥ तो बाडांक काढून पहा. या मानजी गोसाव्याचा संबंध श्रीसांप्रदायिक कागद-पत्राच्या पहिल्या खंडांत पुष्कळ आला आहे. पण हे सोनभट्ट आणि चंद्रभान आणि चंद्रपान कोण, कळत नाहीं. किती थोडी कागदपत्रें उपलब्ध होऊन प्रकाशात आलीं आहेत, हें यावरून कळतें.

( ८ ) बाड २५६ त श्रीसमर्थ आणि श्रीतुकाराममहाराज यांच्या भेटीचा जो प्रसंग वर्णिला आहे, तो हि नवीन आहे, असें वाटतें.

( ९ ) बाड ३७७ त रामरंगाची जी हकिकत आली आहे, ती सारी नवीन आहे. पालीचे रंगनाथ यांना च आपण रामरंग समजून चाललों होतों. हें बाड उपलब्ध न होतें तर ती चुकी वज्रलेप झाली असती. रंगनाथ आणि रामरंग या दोन व्यक्ती होत. रामरंग हे रंगनाथाचे शिष्य होत. कागदपत्रांतील दिवाकराचें ओवीबद्ध २८४ लेखांकाचें पत्र तें या रामरंगांना होय.

( १० ) हनुमंतस्वामीकृत म्हणून प्रसिद्ध असलेली श्रीसमर्थांची बखर खरोखर लिहिली कोणी व तिची विश्वसनीयता किती, याविषयीं बरोबर कल्पना होण्यास २५, २६, ३९६ आणि ४०६ या बाडांकाचा विशेष उपयोग होईल, असें वाटतें.

( ११ ) तत्कालीन समाजात श्रीसमर्थांनीं कोणती राष्ट्रीय कामगिरी बजाविली याविषयीं आता कोणास शंका उरू नये. समर्थांनीं एकदा पैठणास मेलेली घार उठविली होती, अशी गोष्ट बखरींत दिल्ली आहे. ती कोणी मानावी, कोणी मानूं नये. मला हि ठाऊक नाहीं, त्यांनीं मृत घार जिवंत केली होती कीं नाहीं, पण मला हें ठाऊक आहे कीं, त्यांनीं मेलेलें राष्ट्र मात्र जिवंत केलें. त्रेतायुगांत अहिल्या शिळा राघवें मुक्त केली । आणि समुद्रीं शिळा राघवें तारियेल्या । आणि या युगात तीनशें वर्षांपूर्वी सारे लोक पाषाणवत् जडमूढ होऊन निस्तेज पडले असता श्रीसमर्थांनीं त्यांच्यात चैतन्य उत्पन्न करून त्यांना तारले. असें मी म्हणत नाहीं, अशी साक्ष उद्धवांनीं च देऊन ठेवली आहे. उद्धवाचा तो अभंग मला फार महत्त्वाचा वाटतो. श्र्यांचा राजकारणांतील भाग च दडक गुप्तपणाचा होता, राजकारण बहुत करावें । परंतु कळों च नेदावें ॥ ही त्यांची शिकवण होती, त्यांची भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूप ॥ त्यांच्या कर्तृत्वाविषयीं

उद्धवांनीं काढलेले हे सद्धोद्गार मला बहुमोल वाटतात. हे उद्धवांचे शब्द आहेत, ते या च शब्दांनीं सांगतात कीं, लोक पाषाणवत् कर्तव्यमूढ होऊन अचेतन पडले होते, त्यांच्यांत श्रीसमर्थांनीं चैतन्य भरलें, आणि याला प्रमाण काय म्हणून विचाराल तर स्वतःचा च दाखला देऊन सांगतात कीं मी मूळचा पाषाण, त्या माझ्या ठिकाणीं जी पावनता दिसते ती श्रीसमर्थांची कृपा होय. वाचकांनीं पंचेचाळिसावा बाडांक मुळांत काढून पहावा.

पतितपावनाचे दास। ते हि पावन करिती जगास।
ऐसी हे प्रचित मनास। बहुतांच्या आली॥

( १२ ) श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, खंड पहिला, लेखांक ४८ यांत श्री शंभु छत्रपति सज्जनगडच्या मुद्राधारियास आज्ञा करितांना म्हणतात कीं श्रीसमर्थांनीं अवतार पूर्ण करण्याच्या अगोदर च आज्ञा केली होती कीं, सज्जनगडीं चिताऱ्यानीं श्रीहनुमंताचें देवालय बांधावें. या संबंधांत विशेष खुलासा उद्धवस्वामींच्या कवितेंत आढळतो, कारण श्रीसमर्थांनीं उद्धवांस जें जें मनींचें मनोगत तें तें सांगितलें होतें. त्या खुलाशाच्या ओंव्या अशा:

करी देवा स्वामीस्थापनेचें स्थळ। मारुती सबळ कीजे तेथें॥ १६
कीजे परमीरस सांगितला तैसा। भयानक ऐसा दाखवावा॥ १७
दाखवावा जेणें ध्यान भरे चित्तीं। स्वामी संचरती मनामध्यें॥ १८
मनामध्यें ध्यान आठवें स्वामीचें। सांग पूजनाचें नित्य घडे॥ १९

पण याप्रमाणें पुढें गोष्टी घडून आल्या नाहींत. श्रीसमर्थचरित्रांतील ही माहिती अगदीं नवीन आहे. त्यांची ही शेवटची इच्छा पूर्ण करण्यांत आली नाहीं, याचें मनाला कसेंसें च वाटतें! ती इच्छा शब्दशः पूर्ण होणें जरी आतां शक्य उरलें नाहीं, तरी त्यांनीं सांगितलेल्या ध्यानाची मारुतीची मूर्ति समाधीच्या मागील बाजूच्या ओवरींत स्थापन होणें शक्य आहे. पूर्ण होई तों सांप्रदायिकांनीं ही गोष्ट अखंड चित्तांत बाळगावी.

श्रीसमर्थ, श्रीसमर्थसंप्रदाय व श्रीसमर्थसांप्रदायिक यांच्या विषयीं याप्रमाणें या संशोधनांत

## शेंकडों नवीन बाबी

पुढें आल्या आहेत व येत आहेत. त्याशिवाय कित्येक अज्ञात सत्पुरुषांचा

आणि त्याच्या ग्रन्थाचा या संशोधनवृत्तावरून प्रथम च परिचय होत आहे. तसें च पूर्वी ज्ञात असलेल्या सत्पुरुषाचे कित्येक अज्ञात ग्रन्थ व स्फुट प्रकरणें पहिल्यानें च ऐकण्यात येत आहेत. या शिवाय या संग्रहात एक विशेष गोष्ट अशी आहे कीं, कित्येक जुन्या ग्रन्थाच्या शुद्ध व जुन्या प्रती त्यात आहेत. उदाहरणार्थ, ३९४ इतकी एकनाथी भागवताची उपलब्ध अशी जुनी प्रत महाराष्ट्रात दुसरी नाहीं. यापुढे कोणा हि संतकवीच्या काव्याची संपूर्ण आणि शुद्ध प्रत काढावयाची झाल्यास या संग्रहाकडे वळल्यावाचून तसें करणें जवळ जवळ अशक्य होईल, असें म्हटलें तरी चालेल. अशुद्ध पाठातरामुळें अर्थाचा अनर्थ कसा होतो याची, वाचकाची करमणूक करीत नजरेत भरणारी अशी दोन ठळक उदाहरणें वाडाक २०७ व ३५८ यात वाचकास पहावयास मिळतील. असा हा बहुविध, बहुमोल संग्रह आहे. पण

## या संग्रहाचें मुख्य वैशिष्ट्य

म्हणजे तो श्रीसमर्थसांप्रदायिक आहे, हें होय. या संग्रहात मुख्यत. श्रीसमर्थ आणि त्याचा संप्रदाय हीं पहावयास मिळतात. श्रीसमर्थांनीं स्थापन केलेल्या मठाचें स्वरूप, त्या मठातील विविध संग्रह, मठपतींचा त्याग, त्यांची परंपरा इत्यादि गोष्टींचा बोध या संशोधनावरून होणार आहे. संग्रहाचें हें वैशिष्ट्य कायम राहून

## त्याचें संरक्षण

कसें करावें, त्याची वाढ कशी व्हावी, तो सर्वांच्या उपयोगीं कसा पडावा, ही विवचना आम्हास लागली आहे. महाराष्ट्रातील दुसऱ्या कोणत्या हि एखाद्या संस्थेच्या हवाली हा संग्रह करावा, खुद्द धुळ्यास च आता राजवाडे–संशोधन–मंदिर झालें आहे, त्यात हा हि संग्रह ठेवावा, असें कोणी सुचवील. पण हा संग्रह दुसऱ्या कोणत्या हि संग्रहात मिसळला, म्हणजे त्याचें जें श्रीरामदासी वैशिष्ट्य आहे, तें राहणार नाहीं, अशी भीति वाटते. शिवाय आम्हास हें ठाऊक आहे कीं, राजवाडेसंशोधन-मंदिर हें स्वत ऱ्या च संग्रहाला आज च अपुरें पडत आहे. पण दुसऱ्या कोणत्या हि विचारापेक्षा, या संग्रहाचें जें मुख्य स्वतंत्र श्रीरामदासी स्वरूप तें कायम राहिलें पाहिजे, हा विचार आमच्या मनात प्रबल आहे. हें श्रीरामदासी कार्य आहे व तें तसें च श्रीरामदासी रहावें आणि होत जावें, अशी आमची इच्छा आहे. रामदासी कार्याचें संशोधन करण्याची आवश्यकता

किती आहे याची कल्पना महाराष्ट्रांत पूर्ण आहे. श्री क्षेत्र चांब येथें श्रीसमर्थांच्या जन्मस्थानीं त्या जागेचें स्मारक म्हणून बृहन्महाराष्ट्रानें सहज चाळीस पन्नास हजार रुपये खर्चून जसें भव्य आणि सुंदर श्रीसमर्थमंदिर उभारलें आणि त्यांत १८५४ च्या चैत्र शुद्ध ९ स अपूर्व समारंभ करून श्रीसमर्थमूर्तीची स्थापना केली, तद्वत् धुळें येथें अवघे दहा पांच हजार रुपये खर्चून

## श्रीसमर्थवाग्देवतामंदिर

उभारावें व त्यांत श्रीसमर्थ, श्रीज्ञानदेव, श्रीएकनाथ, श्रीतुकाराम, आदिकरून असंख्य सत्पुरुषांच्या या संग्रहरूपी वाग्देवतेची स्थापना व्हावी, अशी आमची प्रबल इच्छा आहे. या ग्रन्थाचा पुढील खंड तयार होतो तों हें शारदामंदिर पूर्ण होऊन त्यांत हा संग्रह सुरक्षित जाऊन बसावा आणि—सहज मनात येतें—अशा त्या मंदिरांत वाग्देवतेच्या सानिध्यांत बसून, श्रीसमर्थांनीं कृपा केली तर श्रीसमर्थांचें चरित्र लेखणीतून कागदावर उतरावें !

धुळें
१८५५ कार्तिक शुद्ध १ } शंकर श्रीकृष्ण देव

ता. क. अशस्या प्रकारच्या संदर्भग्रन्थाला सूचीची अत्यन्त जरूरी असते. किंबहुना सूचीवांचून असला ग्रन्थ नुसता पडून राहण्याची भीति असते. सूचीला चष्मा च मानतात. तो डोळ्यावर असला म्हणजे आपणांस हवें तें नेमकें ग्रन्थांत पहावयास सांपडतें. सूची करण्याचें काम नेहमीं च किचकट आणि श्रमाचें असतें. त्यांत अशा शेंकडों बाडांच्या वर्णनात्मक ग्रन्थाची सूची करण्याला तर विशेष च श्रम पडणार. परतु अशी ही सूची आम्हांस आयती तयार करून मिळाल्यामुळें आमचे किती तरी श्रम वांचले. ती जरा विस्तृत झालेली दिसते, पण ती जितकी व्यापक असेल तितकी जास्त उपकारक च होते.



# श्रीसद्गुरुस्तवन

## पद

सुखरूप जालों स्वामी तुमचिया पादसेवे ।
कल्याण माझें जालें रंगलों सोहंभावे ॥ ध्रु० ॥

चित्त हे वृत्ती माझी चैतन्यीं मुराली ।
संतोषें स्वात्मसुखें अनुभवकिल्ली दिल्ही ।
निर्विकल्प वास जाला अनुभव बोल बोली ।
विश्व हें नाहीं अवघें विराम स्वरूपीं पाही ॥ १ ॥

पावलों धावलों देवा तुमचिया सेवाबळें ।
वेदांतश्रुति ज्यासी निर्विकल्प बोलवी बोलें ।
तें मी स्वयंभ जालों हे शब्द हि मावळले ।
मीतूपण अवघें स्वामी गिळुनि उगले ठेले ॥ २ ॥

रामावीण वृत्ती माझी आणिक न जाये कोठें ।
जिकडे पाहे तिकडे श्रीराम माझा भेटे ।
कल्याण म्हणे सकळ द्वैतपण तई आटे ।
रामदासस्वामी जई आनंदघन भेटे ॥ ३॥



## ❁ श्रीसद्गुरुसमर्थ ❁



त्वरें सीघ्र उठोनि येगीं चलावें। समर्थी प्रभूलागिं भेटीसि यावें।
तरी सर्व ही सौख्य पावाल येगीं। तुम्हा सूचना रे चला सर्व येगीं

श्री

# रामदास आणि रामदासी

भाग अठ्ठाविसावा

## गेल्या अठ्ठावीस वर्षांत झालेलें श्रीरामदासी संशोधन

॥ श्रीराम ॥

× × × ॥ × × × ॥ × × × ॥ × × × ॥ × × × ॥

### वृत्त लिहिण्याचा हेतु

आपण आवचितें मरोन जावें । मग संशोधन कोणें करावें ।
याकारणें संशोधनास लावावें । बहुत लोक ॥

असें, भजनाच्या जागीं संशोधन शब्द योजून, कांहींसें विनोदानें, गेल्या मार्चांत पुण्यास झालेल्या एका व्याख्यानांत म्हटलें होतें. गेल्या अठ्ठावीस वर्षांत झालेलें श्रीरामदासी संशोधन एकवार सविस्तर महाराष्ट्रास सादर करावें, असें कधींचें मनांत आहे. हेतु हा कीं, आजपर्यंत कोठकोठें संशोधन झालें, कोठें व्हावयाचें राहिलें, जेथें झालें तेथें काय मिळालें व काय मिळावयाचें राहिलें, संशोधन होत असतां अडचणी व अनुभव काय काय आले, हें सर्व कळून पुढिलांचा मार्ग विशद व्हावा, त्या अडचणी त्यांना टाळतां याव्या, अनुभवाचा फायदा व्हावा, झालें नाहीं तेथें त्यांच्या कडून संशोधन व्हावें व जेथें अपुरें राहिलें असेल तेथें तें पूर्ण व्हावें. आजपर्यंत जें मिळालें तें सर्व प्रकाशित होणें–निदान लवकर प्रकाशित होणें शक्य वाटत नाहीं, तेव्हां जें मिळालें आहे त्यांत आहे तरी काय, याची स्थूल कल्पना वाचकांस करून यावी, म्हणून हि एक हेतु आहे. असे अनेक हेतु मनांत योजून हें संशोधनवृत्त लिहिण्यास प्रवृत्त होत आहे.

पण तसें करतांना मनाला थोडेंसें संकट वाटतें. वृत्त लिहितांना वारंवार प्रथम पुरुषाचा उपयोग करणें अपरिहार्य होईल किंवा इष्ट वाटेल. हेतु व मुळीं हा कीं, आपणांस आलेल्या अडचणी व आलेले अनुभव दुसऱ्यास कळावे व त्यास त्या अडचणी टाळतां याव्या व अनुभवांचा फायदा घेतां यावा. तेव्हां स्वतःविषयीं बोलणें सर्वस्वीं टाळतां येणें शक्य नव्हे. फक्त एक भीति वाटते: *मूर्खलक्षणांपैकीं एक प्रमुख लक्षण आपणांस चिकटेल कीं काय,* तसें इतरांस वाटेल कीं काय ? चिकटेल कीं काय, याचा विचार लिहिणारानें करावयाचा आहे व तो तसा करील, पण इतरांस काय वाटेल, याची भीति नाहींशी होत नाहीं. पण परवा पुण्यास आलेला अनुभव पाहतां ही हि भीति अस्थानीं होय असें वाटतें. पुण्या इतके चिकित्सक लोक–लहान आणि मोठे, स्त्रिया आणि पुरुष–दुनियेंत दुसरीकडे कोठें आहेत? ज्या गोष्टी निकट मित्रमंडळीशिवाय अन्यत्र कोठें बोलूं नयेत, असा सामान्य नियम आहे, अशा कांहीं गोष्टी पुण्याच्या सभेंत सांगितल्या असता त्या जर श्रोत्यांनीं आपलेपणानें ऐकल्या, तर महाराष्ट्र-वाचक हि मजकडे त्या च कृपादृष्टीनें पाहणार नाहींत, असें मानण्याला काय आधार आहे ? तेव्हा महाराष्ट्रवाचकांच्या औदार्यावर पूर्ण विश्वास टाकून हें संशोधनवृत्त निर्भय वृत्तीनें लिहून काढण्याचें ठरविलें आहे.

संशोधन हें एक शास्त्र आहे, त्याचें एक शास्त्र बनूं शकेल. त्यावर अजून कोणी स्वतंत्र ग्रन्थ लिहिल्याचें ठाऊक नाहीं. श्री. बेंद्रे यांचा ' साधन-चिकित्सा ' हा ग्रन्थ धार्दीसा या कोटींतील आहे. संशोधनाचे बाबतींत हि पुष्कळांचे अनुभव विचारांत घेता कांहीं कांहीं बाबी सिद्धान्तवत् प्रस्थापित करता येतील. इतिहासाचार्य राजवाडे, ते आज असते तर शास्त्ररचनेच्या कामीं त्यांच्या विविध अनुभवाचा फार उपयोग झाला असता. हल्लीं हि जे संशोधक आहेत त्यांनीं हि एकत्र जमून विचारविनिमय केला पाहिजे. तोंवर प्रत्येकानें आपणास आलेले अनुभव व त्यावरून बसविलेले सिद्धान्त नमूद करून ठेवणें आवश्यक वाटतें.

कोणता अनुभव कोठें, कोणाच्या बाबतींत आला हें सांगण्याची इच्छा नाहीं व जरूरी हि नाहीं. महत्त्व अनुभवाचें आहे. व्यक्ति किंवा स्थल कोणतें हि कां असेना ? व्यक्ति आणि स्थल हीं बहुधा विसरून केवळ अनुभव तेवढा च पहावयाचा असें ठरविल्यामुळें तें काम ग्रन्थारंभीं च करण्याचें योजिलें आहे; म्हणजे मग पुढें ठिकठिकाणीं झालेलें संशोधन नमूद करतांना व्यत्यय

नको. कांहीं कांहीं अनुभव मोठे विचित्र आले, ते वाचकांस बोधप्रद तसें च मनोरंजक वाटतील, असें जाणून ते सविस्तर सांगण्याचा विचार आहे. वाचकांस कचित् कोठें पाल्हाळ वाटेल पण त्याबद्दल त्यांनीं क्षमा करावी.

## पहिला सिद्धान्त

(१) एका प्रसिद्ध ठिकाणीं श्रीसमर्थांचे एक शिष्य रहात होते. त्यांच्या पासून आजतागाईत पुत्रपरंपरेनें त्यांची वस्ती त्या च ठिकाणीं आहे. मनानें असें घेतलें होतें कीं, या घराण्यांत श्रीसमर्थकालीन कागदपत्रांचा संग्रह असावा. लोक हि तसें सांगत. संशोधनाला आरंभ केल्यापासून त्या घराण्यांतील पुरुषांचा मला परिचय झाला होता. आरंभीं आरंभीं उन्हाळ्याच्या दरसुटींत त्या गांवीं जाण्याचा माझा क्रम असे. त्या गांवीं गेलों म्हणजे त्यांच्या कडे हि जात असे. त्या घराण्यांतील प्रमुख पुढारी वृद्ध झाले होते. त्यांना एकुलता एक तरुण मुलगा असे. गेलों म्हणजे वडील आदरानें वागवीत. मुलगा बहुधा जवळपास असे. वडील असतांना मुलाशीं बोलण्याचा कधीं च प्रसंग आला नव्हता. वडिलांना भेटत असे व त्यांच्याशीं बोलत असे. मी त्यांना म्हणावें, "तुमचें घराणें म्हणजे श्रीसमर्थांच्या निकटवर्ती शिष्याचें घराणें, आजपर्यंत तुमच्या घराण्यांत अखंड पुत्रपरंपरा चालत आली आहे, तेव्हां आपल्या घराण्यांत श्रीसमर्थकालीन कागदपत्रांचा कांहीं तरी संग्रह जरूर असावा व तो पहावयास मिळावा, अशी फार इच्छा आहे." त्यांनीं म्हणावें, "छे हो, संग्रह असता तर तो दाखविला नसता काय, तुम्ही काय घेऊन का जात होतां, त्यांत झाला च असता तर आमचा च फायदा होणार होता, आमच्या च पूर्वजांची हकिकत कळली, तुमचा काय फायदा आहे, पण काय करावें, दुर्दैव आमचें, पोटासाठीं दहा ठिकाणीं हिंडावें लागलें, पूर्वी कांहीं असल्यास कोणास ठाऊक पण माझ्या पहाण्यांत कांहीं नाहीं," वगैरे. क्रमानें अशीं चार पांच वर्षे लोटलीं, परिचय वाढत चालला, पण कागदपत्रांचा थांग लागेना. दर वर्षी मी जावें आणि दीनपणें कागदपत्रांची याचना करावी आणि त्यांनीं हि केविलवाणे होऊन नाहीं म्हणावें. शेवटीं शेवटीं तर ते म्हणत, "तुम्ही दर वर्षी येतां, कागद मागतां आणि आम्हांस नाहीं म्हणावें लागतें, याची आतां आम्हांस लाज वाटूं लागली आहे. घराणें जुनें व महत्वाचें खरें व कागद हि असावयास पाहिजे होते, पण नाहींत हें हि खरें, अशा थोर पूर्वजांचे म्हणविण्याची हि आम्हांस लाज वाटूं लागली आहे." हें ते इतक्या कळकळीनें म्हणत कीं,

संशोधनाचे बाबतींत कोणावर सहसा विश्वास न टाकणारा मी, त्या मला हि वाटूं लागलें कीं, नसावेत यांच्या जवळ कागद. दर वर्षाच्या क्रमाप्रमाणें पुढच्या वर्षी त्या गांवीं गेलों. दरम्यान ते वृद्ध गृहस्थ निवर्तले होते. मुलाकडे समाचारास गेलों. मुलगा दारांत च उभा होता. आम्हांस दुरून येतांना पाहून मुलगा घरांत चालता झाला. मला वाटलें, वडील निदान, या, बसा म्हणत, मुलाला तितकें हि अगत्य दिसत नाहीं कीं काय ! तसा च आत गेलों व कचेरींत जाऊन बसलों. दोन चार मिनिटांत आंतून तो मुलगा आला, त्याच्या हातांत एक लहानसें मळकें गांठोडें होतें, तें गांठोडें इतकें काळेकुट्ट होतें व त्याला दिलेली गांठ इतकी मजबूत बसलेली होती कीं, ती गांठ जी एकदां केव्हां तरी हीं दोनशें वर्षांमागें दिली गेली असेल ती पुन्हां कोणी सोडली च नव्हती कीं काय न कळे. त्या प्रसंगाचे माझ्या मनावर इतके दृढ संस्कार झालेले आहेत कीं, त्या वेळच्या अगदीं बारीक बारीक गोष्टी हि माझ्या चक्षुपुढें आज साजरा आहेत. हातांत तें गांठोडें घेऊन तो मुलगा आला, मजपुढें उभा राहिला आणि मला म्हणाला, “ तुम्ही वडिलांकडे दरवर्षी येत होतां, कागद मागत होतां, वडील नाहीं म्हणत होते, अर्थात् या गांठोड्यांत त्यांच्या जीवाचा कलिजा असावा, तो गांठोड्याची गांठ न सोडतां मी तुमचे हवालीं करतों. ” मी थक्क झालों, मनातल्या मनांत उपकाराचें स्मरण करीत गांठोडें घेऊन आलों, एकांतांत त्या गांठोड्याची गांठ सोडली, साठ सत्तर तत्कालीन कागदपत्रें त्यांत आढळलीं, श्रीसमर्थांचें स्मरण झालें, सारें महाराष्ट्र आठवलें. आनंद ओसरून, भानावर येऊन

संशोधनकार्यांतील पहिला सिद्धान्त बांधला कीं,

वृद्ध माणसाच्या शब्दावर केव्हां हि विश्वास ठेवूं नये.

## दुसरा सिद्धान्त

( २ ) दर वर्षी हातावाया घालावें, तळमळावें, नाना परीनें विनवावें, तरी त्या वृद्धाला दया आली नाहीं ! हीं म्हातारीं माणसें मोठीं कठोण असतात. त्यांना संशोधनकार्याचें कौतुक वाटत नसतें, असें नाहीं. आपण एकाद्याकडे गेलों असतां, सारे शिष्टाचार ते पाळतील, या, बसा, म्हणतील. आपण जवळ बसावें आणि बोलण्यास आरंभ करावा, “ असें असें संशोधन करीत असतो, श्रीसमर्थांचे मठ पहात असतो, तत्कालीन दप्तरांतील

कागदपत्रें तपाशीत असतो, श्रीसमर्थांचे व त्यांच्या शिष्यप्रशिष्यांचे ग्रन्थ मिळवून ते यथावकाश प्रकाशित करीत असतो, श्रीसमर्थांची चरित्रें मिळतील तितकीं मिळवीत असतो, श्रीशिवछत्रपति हे तरी श्रीसांप्रदायिक च, त्यांच्या हि दुर्मिळ कागदपत्रांच्या दर्शनाची अपेक्षा असते, त्यांची आणि श्रीसमर्थांची भेट केव्हां झाली यावद्दल कांहीं मतलबी पाखंड्यांनीं नवीन वाद उपस्थित केला आहे, त्यावर प्रकाश पाडणारीं कागदपत्रें शोधींत असतो, " वगैरे वगैरे, एक ना दोन, हजारो गोष्टी सांगत असता ते मोठ्या प्रेमानें ऐकत असतात व कौतुकानें मान डोलवीत असतात, पण मापुढचें वाक्य उचारीत असतां, तें पूर्ण होण्यापूर्वी च, त्या वाक्याचें धोरण लक्षांत घेऊन कौतुकानें डोलणारी ती मान नकार दर्शविण्यासारखी किंचित् झुकूं लागते. " म्हणून आपल्याकडे आलों आहे, आपलें घराणें पुरातन आहे, श्रीशिवकालीन आहे, तेव्हां आपल्याकडचे कागदपत्र पाहण्याची संधी मिळावी, " हें शेवटचें वाक्य पूर्ण उच्चारून होता च " आमच्या पाशीं कांहीं नाहीं, असतें तर दाखविलें च कां, दिलें असतें, ठेवून काय करावयाचें होतें, राष्ट्राच्या उपयोगीं तरी पडलें असतें, " इत्यादि अघळपघळ पण बहुधा शब्दशः खोटें उत्तर ठरलेलें असतें. असे अनेक ठिकाणीं अनुभव आल्यामुळें वृद्ध माणसानें होमरदां नाहीं म्हटलें तरी तें म्हणणें खरें मानावयाचें नाहीं व प्रयत्न सोडावयाचा नाहीं, हें जसें मी ठरविलें, त्या च बरोबर

> दुसरा सिद्धान्त असा ठरविला कीं, वृद्ध
> माणसांच्या तरुण मुलांकडून प्रेमानें आणि
> विश्वासानें मदत झाल्यावांचून राहणार नाहीं.

तरुणांचीं अंतःकरणें प्रेमळ असतात, कोरी पाटी असावी तशीं तीं निर्मळ, स्वच्छ असतात, त्यांवर उमटवूं म्हणाल ते संस्कार उमटले जातील.

## तिसरा सिद्धान्त

> ( ३ ) संशोधनकार्यांत केव्हां च निराश
> होऊं नये, हा तिसरा सिद्धान्त होय.

उद्धवस्वामी हे श्रीसमर्थांचे पहिले शिष्य होत. त्यांचे मठ दोन : एक नाशकामधल टांकळीस व दुसरा मोगलाईंत हैद्राबादेच्या अलिकडे इंदुरबोधन येथें. हें इंदुरबोधन ठिकाण फार रम्य आहे. त्या मुलखांत सर्वत्र विपुल पाणी आहे,

त्यामुळें वनश्री सर्वकाळ चित्ताला प्रसन्नता आणते. त्या ठिकाणाचें स्मरण होऊन हीं दोन वाक्यें लिहिलीं व पुढे पुढें चालवावें, पण इंदुरबोधनजवळील सारंगपुरच्या डोंगरांत जें मन गेलें आहे तें तिकडून लवकर परतण्याचा संभव नाहीं. त्याच्या मर्जीप्रमाणें त्यास तिकडे रमूं द्यावें. शक्य असेल त्या सर्व सांप्रदायिकांनीं सारंगपुरच्या मारुतीच्या दर्शनास जाऊन आलें पाहिजे. इंदुरबोधनगांवांतील मठापासून मारुतीचें स्थान कोस दीड कोस आहे. गांवांतील मठ हि फार भव्य आणि रम्य आहे. इतके व्यवस्थित मठ फार थोडे आहेत. मठपति आत्माराम बुवा म्हणून वृद्ध गृहस्थ होते. चोवीस पंचवीस वर्षे झालीं या गोष्टीला. आमच्या येण्याचा हेतु मठपतींना विदित केला व विनंति केली. कुलुप लावलेल्या एका खोलीकडे बोट दाखवून ते म्हणाले, " त्या खोलीभर रद्दी पडली आहे, सगळी घेऊन जा, आहे काय तींत, सारा केरकचरा आणि धुराळा, विनाकारण श्रम होतील, नाकातोंडांत माती जाईल, दुसरा तर कांहीं फायदा व्हावयाचा नाहीं. " आम्ही म्हटलें, " फार आभारी आहोंत, आम्हांस पाहूं द्या, कांहीं असलें तर घेऊं, नाहीं पेक्षां कांहीं नाहीं एवढें तरी आमचें समाधान होईल, नाकातोंडांत माती जाण्याचें कांहीं आम्हांस वाटत नाहीं. " त्यांनीं कुलुप काढून खोली आमच्या हवाली केली. आम्ही चौघे पांच जण होतो. झटकून सारे रुमाल बाहेर काढले आणि आम्ही कामास जुपलों. खुद्द उद्धवस्वामींच्या वेळेपासूनचीं बाडें त्यांत होतीं. आम्ही चव्वेचाळीस बाडें निवडून काढलीं आणि उपरण्यांत तीं सारीं बांधलीं. त्यांचें एक मलें मोठें थोरलें उंच गांठोडें झालें. दुसरे दिवशीं तेथून जावयास निघालों. बुवांना विचारिलें, गांठोडें पाहून त्यांची दृष्टि फांकली आणि बुद्धि बदलली. बुवा म्हणाले, हे घेऊन नका जाऊं, काय पहावयाचें तें येथें पहा. आम्ही म्हटलें, " हें कसें शक्य आहे, येथें काय पहा, वाचावें लागेल, ताडून पहावें लागेल, उतरावें लागेल, सहज चार सहा महिन्यांचें काम आहे. " त्यांत काय आहे, घेऊन जा सर्व, असें आरंभीं म्हणणारे बुवा निश्चयपूर्वक म्हणूं लागले कीं, यांतलें मठाबाहेर कांहीं एक जावयाचें नाहीं, मग तुम्ही रहा अगर जा. मठांतल्या सार्‍या माया गोळा झाल्या. त्या हि म्हणूं लागल्या, नेणार कसे, कुठले कोण आले आणि मठांतील कागद घेऊन जाणार कसे! तेथील एका वकिलामार्फत मठांत आधीं प्रवेश केला होता. त्यांचे कडे जाऊन त्यांना समजावून सांगितलें. ' बरें, मी बुवांना सांगतो ' म्हणून ते मठापर्यंत आमच्या बरोबर आले. तें प्रचंड गांठोडें

पाहून त्यांची हि बुद्धि पालटली. नेऊं नका, येथें च पहा, असें ते हि म्हणूं लागले. काय करावें, मोठा प्रश्न पडला. निघण्याच्या ऐन वेळेला हा घोटाळा. " बरें आहे, " बुवांस म्हटलें, " हें गांठोडें आज आह्मांस मिळावें असें श्रीसमर्थांच्या च मनांत दिसत नाहीं. या बाया आल्या, त्या हि नेऊं नका ह्मणूं लागल्या. वकीलसाहेबांचा आह्मांस मोठा भरंवसा होता पण ते हि तसें च ह्मणूं लागले, तेव्हां श्रीसमर्थांची च मर्जी नाहीं, असें म्हटलें पाहिजे, " असें म्हणून बुवांस सांगितलें, " ठीक आहे बुवासाहेब, आतां आमच्यावर एक कृपा करा, आम्ही या गांठोड्यास दिलेली गांठ कृपा करून सोडूं नका, हें गांठोडें आम्ही असें च त्या खोलींत ठेवतो, पण आम्ही आपणांस सांगून ठेवतों कीं, केव्हां तरी आम्ही आपलें प्रेम आणि विश्वास संपादून हें गांठोडें घेऊन जाऊं. " असें ह्मणून गांठोड्याची गांठ आणखी घट्ट आंवळून, त्यावरोवर मन हि घट्ट करून आपल्या हातानें गाठोडें उचलून खोलींत नेऊन ठेवलें, मनानें नमस्कार केला, रामाचें दर्शन घेतलें, बुवांच्या पायावर मस्तक ठेवलें, सर्व बायांचा निरोप घेतला, पत्र वगैरे पाठवीत जा ह्मणून वकिलांस विनंति केली आणि मठाबाहेर पडलों. ही गोष्ट शके १८२७ च्या मार्गशीर्षांतील.

त्यावर जवळ जवळ दोन वर्षे लोटलीं. वाईट असें वाटूं लागलें कीं, एवढीं बाडें निघालीं, पण त्यांत काय आहे, हें हि आपण पुरतें पाहिलें नाहीं! दोन लेखक तयार केले आणि असें योजिलें कीं, त्यांना घेऊन इंदुरबोधनाथ जावें, पांच सात दिवसांत सर्व बाडें चाळून उतरून घ्यावयाच्या भागावर तांबड्या पेनसिलीनें खुणा करून द्याव्या आणि मी परत यावें आणि लेखकांनीं मागें राहून तो सर्व भाग उतरून आणावा. वकीलसाहेब आणि बुवासाहेब यांच्यांशीं पत्रव्यवहार करून वरील योजनेस त्यांची संमति मिळविली. दहा पंधरा दिवसांनीं जावयाचा दिवस निश्चित केला. प्लेगाच्या धामधुमीचे दिवस होते, निदान मोगलाईंत तपासणी आणि क्वारंटाईन वगैरेंचा त्रास होता, ह्मणून सेकंड क्लासचीं तिकीटें काढलीं होतीं. मठांत गेलों तों समजलें कीं, महायात्रेला जाण्याचा बुवांचा एकाएकीं विचार होऊन पांच सहा दिवसांमागें ते महायात्रेला निघून गेले. वकिलांना भेटलों. खोलीला कुलुप होतें, किल्ली बुवासाहेबांजवळ राहिली असें आम्हांस कळविण्यांत आलें. साहजिक वाईट वाटलें आणि या खेपेस तें गांठोडें नुसतें नजरेनें हि पहावयास न मिळतां गेलों तसें तिघे परत आलों. १८२९ च्या कार्तिकांतील ही गोष्ट.

दुसरीकडे लक्ष घेघलें म्हणा, मनाला निराशा आली होती म्हणा, प्रयत्न केल्याचांचून आणखी एक वर्ष लोटलें. १८३० च्या वैशाखांत चाफळास गेलों होतों व चाफळमठाची राज्याभिषेक ५ काल्युक्ताक्षी नाम संवत्सराची मुख्य असल सनद के. श्री. बापुसाहेब महाराज यांचे पासून घेऊन धुळ्यास तिचा फोटो वगैरे घेण्यासाठीं आणली होती. ती मूळ सनद टपालानें परत न पाठवितां समक्ष नेऊन द्यावी, असें ठरलें होतें. पौषांत श्री. बापुसाहेब महाराज श्रीक्षेत्र जांब येथें आले होते व सनद घेऊन जांबेस येण्याविषयीं त्यांचें पत्र आलें. त्याप्रमाणें जांबेस गेलों. महाराज हैद्राबादेस कामानिमित्य जाऊन जांबेस आले होते. मार्गांत इंदुरबोधन येथें हि त्यांचा मुक्काम झाला होता. महाराजांनीं सांगितलें, इंदुरबोधनास गेलों होतों, आत्मारामबुवांनीं मोठा समारंभ केला, आपली पालखींतून मिरवणूक काढली, पूजा केली व मठ आह्मांस अर्पण केला. आत्माराम बुवा आतां अगदीं थकले आहेत, तरी त्या मठाचा कारभार पाहण्यास, किंबहुना मठपति होऊन मठ सांभाळण्यास कोणी तरुण निष्ठावंत मुलगा आढळण्यांत असला तर सुचवा. श्री महाराजांस ह्मटलें, महाराज, हकिकत ऐकून आनंद झाला, मुलगा सुचवीन, पण इंदुरबोधनचा मठ आतां आपला झाला ह्मणता, तर मग आपल्या मठांत माझें गांठोडें अडकून पडलें आहे, तें माझें मला द्या. महाराजांस पूर्वीची सर्व हकिकत सांगितली. त्यांना हि आनंद झाला. आत्मारामबुवांना त्यांनीं पत्र दिलें व आपल्या घरी माझ्या बरोबर फारकून देऊन मला इंदुरबोधनास पाठविलें. गेलों, आत्मारामबुवा भेटले, त्यांच्या चरणीं मस्तक ठेविलें, त्यांना महाराजांचें पत्र दिलें, तें प्रथम त्यांनीं मस्तकीं धारण केलें, मग वाचलें, तुह्मी तुमचा शब्द खरा केला, असें प्रेमानें ह्मटलें, खोली उघडून गांठोडें दाखविलें आणि घेऊन जा हें तुमचें गाठोडें असें ते ह्मणाले. मी दिलेली गांठ तशी च होती. माझें गांठोडें मला मिळालें आणि मी मनांत ह्मटलें, काय ह्मटलें तें ह्मटलें! तात्पर्य संशोधनकार्यांत केव्हां हि निराश होण्याचें कारण नाहीं, या च जन्मांत सर्व हेतु सफल झाले पाहिजेत, असा तरी हट्ट कां, कोणत्या तरी जन्मांत ते सफल झाल्यावांचून मात्र गत्यन्तर नसतें.

## चौथा सिद्धांत

(४) कांहीं कांहीं अनुभव अगदीं किरकोळ आहेत, पण त्यांत हि विचार करण्यासारखा भाग आहे. एक सामान्य सिद्धांत असा कीं,

संशोधनकार्यांत कोणावर हि
जेवण्याचा भार सहसा घालूं नये

विश्वास ठेवण्यास जरा चमत्कारिक वाटेल, पण एक विचित्र अनुभव असा आहे कीं, आलेल्या पाहुण्यांना जेवावयाचें नाहीं, या आनंदाच्या भरांत कोणी कोणी आपल्या जवळचे कागद दाखवितात व घेऊन हि जाऊं देतात. एकदां आम्ही चौघे जण अगदीं ऐन दुपारचे बारा वाजण्याच्या सुमारास एका मठांत जाऊन पोंचलों. मठांतील मंडळी आंतल्या बाजूस भोजनास बसली होती. त्यांनीं आम्हांस पाहिलें. आम्ही सभामंडपांत जाऊन बसलों व आपसांत बोलूं लागलों. आम्हांस सारी चिंता कागदपत्रें मिळविण्याची. सभामंडपाच्या एका कोपऱ्यांत एक मोठी पेटी होती. आमच्यापैकीं एकानें सहज म्हटलें, त्या पेटींत कागदपत्रांचा संग्रह आहे. थोड्या वेळानें भोजन उरकून मठपति व इतर मंडळी सभामंडपांत बैठकीवर येऊन बसली. आम्ही त्यांच्याशीं बोलण्यास एकदम आरंभ केला, 'आमचीं जेवणें झालीं आहेत, तेव्हां आम्हांस फक्त मठांतील कागदपत्रांचा संग्रह पहावयाचा आहे व लागलीच पुढील गांवीं जावयाचें आहे.' मठपतींना बरें वाटलें, त्यांना हि नंतर बहुधा वामकुक्षि वगैरे करावयाची असेल. त्यांनीं किल्ली दिली व ती पेटी पहा म्हणून नेमकी ती च पेटी दाखविली. आम्ही चौघे उठलों, कुलुप काढून पेटींत दहा पाच रुमाल होते ते सर्व चाळले, उपयुक्त बाडें निवडून काढलीं, तीं उपरण्यांत बांधलीं, देवापुढें भेट ठेवली, बुवांना नमस्कार केला व गाडी जुंपून पुढील गांवच्या मार्गाला लागलों. बुवा एक हि शब्द बोलले नाहींत. हें असें कसें झालें, याचें आम्ही आश्चर्य करीत राहिलों. निदान तुम्ही कोठले कोण व हीं बाडें कां नेता, कोठें नेता व केव्हां परत करणार, एवढें तरी बुवांनीं व इतरांनीं आम्हांस विचारावयास पाहिजे होतें, असें आम्हांस वाटलें. दुपारचे ऐन बारा वाजतां येऊन हि यांनीं आपणांस जेवण्याचा त्रास दिला नाहीं, केवळ या आनंदापुढें हे हीं बाडें नेत आहेत याचें बुवांना तितकेंसें संकट वाटलें नसावें, अशी या प्रसंगाविषयीं माझी उपपत्ति आहे. समाजाची स्थिति इतकी

हलाखीची झाली आहे, यांत शंका नाहीं. हा अनुभव नमूद करतांना मनाला वाईट वाटतें. मठांतील मंडळींच्या वर्तनाचा अन्य रीतीनें आम्हांस उलगडा करतां आला नाहीं. या प्रसंगीं मजबरोबर तात्यासाहेब भट, गोपाळराव गोगटे व आप्पासाहेब रणदिवे होते. तो दिवस आठवला म्हणजे अजून आम्हांस आश्चर्य वाटतें. आम्ही केलेलें निदान योग्य असेल तर निदान नगरसोलापूरच्या दुष्काळी भागांत हिंडतांना कोणावर जेवण्याचा भार टाकूं नये, हें खरें.

माझी कल्पना बहुधा बरोबर असेल. दुसऱ्या एका ठिकाणीं किंचित् या च नमुन्याचा अनुभव आला. त्या वेळीं फक्त आप्पासाहेब रणदिवे बरोबर होते. तेथें हि असें च दुपारचे बारा वाजतां पोंचलों. गांवांत कागद दुसरी-कडचे मिळवावयाचे होते व उतावळपास म्हणून एका गृहस्थाकडे गेलों. ते गृहस्थ आणि त्याचें कुटुंब एवढीं च दोन माणसें घरांत होतीं. अर्थात् दोघां पुरता च स्वयंपाक झालेला असणार. घर हि लहान होतें. गृहस्थ जेवावयास बसले होते व कुटुंब वाढीत होतें. पूर्वी फारसा संबंध आला नव्हता, तरी त्या गृहस्थाची दहा पांच वर्षे पुण्यास गेलीं होतीं व परस्परांस परस्परांची माहिती होती. त्या ओळखीवर च आम्ही त्यांच्याकडे गेलों होतों. दोन चार मिनिटें गृहस्थ कांहीं नीट बोलेनात. मला ओशाळल्यासारखें झालें. लोकांना आपण असें पेंचांत पाडतों, याचें आतांस हि फार वाईट वाटलें. तीं दोन चार मिनिटें जाऊं देऊन मी त्यांना म्हटलें, हें पहा, आतां असें करावयाचें, आमचीं जेवणें झालीं आहेत, तुमचें आटोपतां च आपण अमुक अमुक ठिकाणीं कागद पहावयास जाऊं, मिळतील ते कागद मिळवूं, आम्हांस लागलीं च परत जावयाचें आहे. हें माझें आश्वासन ऐकतां च बरें वाटून 'एका गांवचे' या नात्यानें ते मजपाशीं विचारपूस करूं लागले. त्यांचें जेवण उरकलें, कागद मिळ-वावयाचे होते त्या घरीं ते आम्हांस घेऊन गेले, आपला शब्द खर्चून त्यांनीं आम्हांस कागद मिळवून दिले आणि ते कागद घेऊन व त्यांना नमस्कार करून आम्ही गांवाबाहेर पडलों. गरिबीमुळें अशी वेळ यावी, हें समाजाचें दुर्दैव होय. अशा निकृष्ट काळांत हि जे अतिथिधर्म जाणतात आणि पाळतात, ते धन्य होत.

## पांचवा सिद्धांत

(५) भोजनाचा विषय चालला आहे म्हणून दुसऱ्या एका मठांत

आलेला विचित्र अनुभव आठवतो, तो हि सांगण्यासारखा आहे. या हि प्रसंगीं तात्यासाहेब भट, गोपाळराव गोगटे व आप्पासाहेब रणदिवे बरोबर होते. गांवाबाहेर एक प्रशस्त विहीर लागली. अकरा वाजले होते, तेव्हां विहीरीवर स्नानें करूं, फराळ करूं आणि मग गांवांत जाऊं असें गोपाळरावांनीं सुचविलें, पण पर ठिकाणीं उशीर होईल म्हणून न थांबतां सर्व च गांवांत शिरलों. आम्ही मठाशीं पोंचतों तों मठपति काकबलि टाकून अतिथींची च आकांक्षा करीत होते. आम्हांस पाहून ते म्हणाले, अगदीं वेळेवर आलांत, तयारी आहे, चलावें. आम्ही म्हटलें, आमचीं स्नानें व्हावयाचीं आहेत, तीं करून येतों च. त्या च विहीरीवर स्नानास गेलों आणि त्वरा करून परत मठांत आलों. ओलीं धोतरें वाळत टाकलीं व सोवळें मांडें काढून बोलावण्याची वाट पहात सभामंडपांत बसलों. अगदीं वेळेवर आलांत म्हणून म्हणाले आणि अजून कसें कोणी च बोलावण्यास येईना, याचें आश्चर्य वाटूं लागलें. तसें च बसून राहिलों. थोड्या वेळानें, काकबलि टाकावयास आलेले च गृहस्थ एका हातांत तांब्यापंचपात्री घेऊन व दुसरा हात पोटावरून फिरवीत सभामंडपांत आले. आमच्याशीं ते बोलले तर नाहींत च, पण आमच्या कडे त्यांनीं नुसतें पाहिलें हि नाहीं. आले तसें त्यांनीं एका खांबाशीं तांब्या ठेवला, उपरणें पसरलें आणि त्यावर आपण हि पसरून घोरूं लागले. आम्ही चौघे नुसते एकमेकांकडे पहात राहिलों. पोटांत फार अन्न गेलें होतें म्हणून त्यांना झोंप लागली आणि पोटांत कांहीं नव्हतें म्हणून आम्हांस हि ग्लानि आली. तीन चार वाजतां ते उठले. त्यांच्यापाशीं आम्ही कागदपत्रांची गोष्ट काढली, तेव्हां मठांत कागद होते पण ते मागें च जळाले, आतां कांहीं नाहीं, असें ते म्हणाले आणि मनुष्यस्वभावाचा विचार करीत आम्ही गांव सोडलें. त्या च विहीरीशीं आलों, आलेला विचित्र अनुभव पाहून सर्वांस एकदम हंसूं आलें, गोपाळराव शहाणे ठरले आणि आपल्या विनोदी स्वभावाप्रमाणें त्यांनीं संशोधनकार्यांत पांचवा नियम घालून दिला कीं,

गांवाबाहेर आधीं च फराळ करावा
मग ग्रामीं खुशाल प्रवेश करावा.

आमचा फराळ त्या दिवशीं आधीं न होतां नंतर झाला, एवढा च फरक पडला; असो.

हा अगदीं च विचित्र अनुभव आला खरा. सदरहु मठपति पुण्यांतील कै. डॉ. शंकरराव चोभे यांचे संबंधी होते, असें समजलें. वडील बंधूंचे सहा-

त्यांपैकी म्हणून शंकररावांची व माझी चांगली ओळख होती. त्यांना हकिकत सांगितली. त्यांनी पत्र दिलें. तें घेऊन दुसऱ्या वर्षी पुन्हां त्या गांवीं गेलों. खुद्द त्यांच्यांचें पत्र बरोबर असल्यावर मग काय कमी पडणार ! त्या दिवशीं पुरणपोळीचें जेवण मिळालें व वर दक्षिणा म्हणून कागदपत्रें पहावयास मिळालीं. मागल्या वर्षाची गुवांना आठवण होती च. मी गोष्ट हि काढली नाहीं, पण त्यांचें च मन त्यांना खाऊं लागलें. ते कांहीं तरी म्हणाले, येथें एका घराचीं तीन घरें झालीं आहेत, तीं आळीपाळीनें मठाचा कारभार पहातात, तेव्हां एखादे वेळीं असें होतें, कोणी पाहुणा आल्यास एकाला वाटतें दुसऱ्याकडे त्याची सोय झाली असेल व दुसऱ्याला वाटतें तिसऱ्याकडे झाली असेल आणि मी मनांत म्हटलें, मधल्यामध्यें दोन्ही घरचा पाहुणा उपाशी राहतो, एवढें खरें.

## सहावा सिद्धांत

( ६ ) संशोधकानें या सर्व बाबतींत एक सामान्य नियम पाळावा, तो असा :

> स्वतःची किती हि गैरसोय झाली किंवा स्वतःस किती हि त्रास पडला तरी संशोधकानें सर्व कांहीं सोसावें, पण शक्य तोंवर आपल्यासाठीं दुसऱ्याची गैरसोय करूं नये किंवा दुसऱ्यास त्रास देऊं नये.

माझें तर मत असें झालें आहे कीं, स्वतःची किती हि गैरसोय झाली किंवा स्वतःला किती हि त्रास पडला तरी निष्ठावंत संशोधकानें ती गैरसोय अशी किंवा तो त्रास असा मानूं च नये. इतराला जी गैरसोय वाटेल ती त्याला गैरसोय अशी वाटतां कामा नये. इतराला जो त्रास वाटेल त्यांत याला आनंद वाटला पाहिजे. याचें ठळक उदाहरण म्हणजे श्रीदासविश्रामधामाच्या प्रस्तावनेंतील श्रीधरपंतांचें. येथेहाळींच्या चार महिन्यांच्या मुक्कामांत त्यांचे हाल झाले, पण त्यांचे त्यांना भान हि नव्हतें. खाण्यापिण्याची अमाळ झाली, पण रामाच्या प्रसादापुढें ती जाणवेल तेव्हां ना ! या सर्वांचा भौतिक शरीरावर परिणाम होवो आणि तो होणार च, पण मन संतुष्ट असावें. कोणे दिवशीं भोजनासि पक्कान्न, कोणे दिवशीं खाया न मिळे अन्न, तरी दोन्हीं त्याला सारखीं च वाटलीं पाहिजेत. इतकी मानसिक तयारी होवो वा न होवो, पण आपण आपली गैरसोय सोसावी, त्रास सोसावा, त्यासाठीं दुसऱ्यास

केव्हां हि संकटांत पाडूं नये, हें उत्तम. यांचीं कैकडों उदाहरणें असणार. त्रास सोसण्याची तयारी असली म्हणजे त्रास होत हि नाहीं. त्रास वाटेनासा होतो किंवा त्रासाचें निवारण होतें. आदल्या दिवशीं रानांत पाण्याच्या आश्रयानें एका आम्रवृक्षाच्या छायेखालीं स्वयंपाक होऊन वावळ येऊन अन्नांत माती जात च आहे व तशा स्थितींत भोजन होत आहे, तों दुसऱ्या च दिवशीं वस्ती केज येथें श्रीमंत देसाई साहेब यांच्या हवाशीर बंगल्यांत व एक रुका रागांत एक एक पान, मागें पाट पुढें पाट, पाटावर सुंदर केळीचें पान, प्रत्येक पानापुढें चांदीच्या सात सात वाट्या, रांगोळ्या, उदवत्त्या, वगैरे, वगैरे, अशा पेशवाई थाटांत भोजन ! किंवा एकदां दौलताबाद येथें बाजारांत तिसरा प्रहरीं डाळें, चुरमुरे, पोहे विकत घेत असतां रस्त्यानें जाणाऱ्या लमाण्या एका मिरवणुकींतील प्रमुखानें आग्रहानें ओळखून आपल्या घरीं घेऊन जाऊन आग्रहानें जिलबीचें जेवण घालावें, हा केवळ योगायोग होय.

## सातवा सिद्धांत

(७) द्रव्येण सर्वे वशाः हें जाणून
क्वचित् द्रव्य हि खर्च करण्याची
संशोधकाची तयारी असावी.

देवदर्शन आणि पैसा यांचा अर्थाअर्थी संबंध नसतो. पण पैशानें व्यावहारिक कामें होतात. आरंभीं आरंभीं माझी वहिवाट अशी असे कीं, एकाद्या नवीन मठांत गेल्यावर तेथून निघतांना देवापुढें जें ठेवावयाचें असेल तें ठेवावें. पण पुढें अनुभवानें असें ठरविलें कीं, जातो क्षणीं च जें ठेवावयाचें असेल तें ठेवणें जास्त श्रेयस्कर होय. जग हें असें आहे किंवा काळ हा असा आला आहे, त्याला इलाज नाहीं. प्रेम, विश्वास, कार्याचें महत्त्व हीं जेथें पंगु ठरतात, तेथें पुष्कळदां द्रव्यानें काम होतें. अशीं कामें करून घेण्याचे प्रसंग अनेक आले. त्यांपैकीं एकादा सांगितला म्हणजे पुरें.

श्री समर्थांची जन्मभूमि जांब गांव हें आंबड परगण्यांत आहे. आंबड हें पुरातन ठिकाण आहे. तेथें जवळ च डोंगरांत अंबाबाईचें देऊळ असून देवी अहल्याबाईच्या सर्वव्यापी दानधर्माची साक्ष त्या देवालयांत हि आहे. आंबडच्या देशपांड्यांचें घराणें श्रीसमर्थांचें संबंधी होतें, असें ऐकून ठाऊक

होतें. म्हणून संशोधनार्थ आंबडास प्रथम १८२९ च्या चैत्रांत गेलों होतों. आंबडास मारुतीचा किंवा स्वामींचा मठ म्हणून एक मठ प्रसिद्ध आहे. मठांत पोथ्यापुस्तकांचा बराच संग्रह असल्याचें कळलें होतें. मोठ्या प्रयासानें संग्रह पहावयास मिळाला. त्यांत एक अपूर्व वस्तु आढळली, ती पंचरत्नी गीता होय. या गीतेची अपूर्वता अशी कीं, तींत सुमारें शंभर पाऊणशें अप्रतिम चित्रें आहेत. इतर चित्रें तर आहेत च, पण गीतेच्या दहाव्या अध्यायांत ज्या भगवंताच्या विभूति सांगितल्या आहेत, त्या प्रत्येक विभूतीचें चित्र दिलें आहे. मासानां मार्गशीर्षोऽहम् म्हणजे मार्गशीर्ष महिन्यांत जो सृष्टीचा देखावा दृष्टीस पडतो त्याचें चित्र रेखाटलें आहे. चित्रकलेचें मला कांहीं च गम्य नाहीं पण आमचे मित्र तात्यासाहेब भट यांना ती दृष्टि परंपरेनें आलेली आहे. त्यांचें म्हणणें मला मान्य आहे. ते म्हणतात, हीं चित्रें अपूर्व आहेत व गुणज्ञ मनुष्य या एकएका चित्राची किती तरी किंमत करील. ती पोथी कांहीं काळ मिळावी, म्हणून मागून पाहिली, पण मिळूं शकली नाहीं. सर्व संग्रह एका बळदांत होता व जड अंतःकरणानें ती पोथी तशी च त्या बळदांत ठेविली. त्यानंतर पुन्हां एकदां १८३४ च्या चैत्रांत आंबडास गेलों होतों, तेव्हां हि कार्य झालें नाहीं. तिसऱ्यांदा १८४४ च्या पौषांत गेलों. रात्रीचें जाऊन पोचलों. मठपति अत्यंत वृद्ध झाले होते. कारभार पुतण्या पहात होता, पण त्यास पोथ्यापुस्तकांची तितकीशी आस्था नव्हती. पुतण्याचे कोणी एक शास्त्री नावलग त्यांचे कडे पाहुणे आलेले होते. आमच्या मार्गांत त्यांचें कदाचित् विघ्न येईल, असें मनांत येऊन गेलें. ती पंचरत्नी गीता एकवार पहावयास मिळावी व चित्रांचे फोटो घेण्यापुरती कांहीं काळ मजजवळ राहूं द्यावी, अशी गोष्ट पुतण्याजवळ काढली. शास्त्रीबुवा जवळ च बसले होते. पुतण्या म्हणाला, " आमच्या पूर्वजांना उद्योग नव्हता, त्यांनीं आमच्या मोंयती हा त्रास करून ठेवला, आम्ही साफ दाखवीत नाहीं, आम्हांस खाण्याची भ्रांत पडली आहे, दिव्याला नाहीं तेल आणि यांना पोथी दाखवा ! " शास्त्रीबुवा म्हणाले, " आम्ही आतांपर्यंत कांहीं बोललों नाहीं, तुम्ही यांतले किडे असाल तर आम्हांला हि थोडें समजतें, आम्ही च ही पोथी व ज्योतिषाचे इतर ग्रन्थ व्यंकटेशसमाचारांत किंवा प्रो. भानु यांच्या मार्फत छापविणार आहोंत, आपण मला ओळखत नसाल, पण मी पुळ्यास आलों होतों, परंतु आपली भेट प्रत्यक्ष झाली नव्हती. " " ठीक आहे " मी म्हटलें, " कोणीकडून तरी अशी अपूर्व वस्तु

जगापुढें यावी, तुम्ही छापविणार आहांत तर उत्तम च आहे." कांहीं वेळ गेला आणि शास्त्रीबुवा घरांत उठून गेले. मी पुतण्यास म्हटलें, "शास्त्रीबुवांची कल्पना योग्य आहे, पोथी एकाद्या प्रकाशकामार्फत छापवून घ्याल तर तुम्हांस दों दोनशें रुपये सहज मिळतील." यावर पुतण्या एकदम म्हणाला "कोण खोळंबले आहे ते दोनशें रुपये द्यावयास, ते दोनशें म्हणजे कांहीं थोडे नाहींत, देता तुम्ही दोनशें रुपये, द्या, आतां दिवा लावतों आणि पोथी काढून देतों." हें ऐकून मला आनंद झाला, पोथी मिळणार असें कळून आलें. "शंभर रुपये देतों" म्हटलें. "तें कां आतां, दीडशें द्या, कमी घेणार नाहीं," असें पुतण्या म्हणाला. मी बरें म्हटलें. आंतून वृद्ध चुलते पुतण्यास म्हणाले, "नको रे देऊं पोथी, पैशाला काय करतोस!" पुतण्यानें त्यांना उत्तर दिलें "पोथीला काय करावयाचें आहे, हे दीडशें रुपये देतात" आणि मला म्हटलें "देतो दो तुम्हांस पोथी, मी कोणाचें ऐकत नाहीं, पण मी एकदां शास्त्रीबुवांना विचारून येतो, बाकी मी त्यांचें हि ऐकणार नाहीं." पुतण्या आंत गेला आणि कांहीं वेळानें त्यानें बाहेर येऊन दिवा च लावला. आम्हांस शास्त्रीबुवांचें दर्शन पुन्हां घडलें नाहीं. पुतण्यानें बळद उघडून दिलें. त्यांतून आम्ही पोथी शोधून काढली. पोथी उशाशीं घेऊन निजलों. पहाटेस उठून पुतण्यास जालना येथें घेऊन आलों, एका परिचित मारवाड्याकडून उसनवार घेऊन त्यास दीडशें रुपये दिले, त्याची पावती घेतली आणि मनांत आणल्यापासून पंधरा वर्षांनीं पोथीचा मालक झालों.

## आठवा सिद्धांत

(८) संशोधकानें मिळेल तें घ्यावें, अगदीं
रद्दी कोणी पुढें आणून टाकली तरी
तींतून हि त्यानें थोडी निवडून घ्यावी.

एक तर, अगदीं निरुपयोगी असें कांहीं नसतें, शिवाय, जें आज एकाला निरुपयोगी म्हणून वाटेल, तें कदाचित् उद्यां दुसऱ्याला निराळ्या दृष्टीनें उपयोगीं पडेल. उदाहरणार्थ, वरंद येथें देशमुखांच्या फडांल कागदपत्रें चाळीत असतां कोणा महाराजांच्या वंशावळीच्या हकिकतीचे कांहीं कागद आढळले. ते काय करावयाचे म्हणून मी प्रथम ते बाजूस

वारिले. पण पुन्हां मनांत आलें, देशमुखांच्या कागदांत महारांच्या वंशावळी कां आल्या ? म्हणून ते वाचून पाहूं लागलों, तों ते अत्यन्त महत्त्वाचे वाटले. श्रीशिवसमर्थभेटीच्या काळाचें जें मी एक सबल भौगोलिक प्रमाण देत असतो, त्यांतील एक दुवा सिद्ध करण्याला हीं महारांचीं कुळकटें चळकट पुरावा होत आहेत. आपली कुलकथा सांगणारे हे महार स्वच्छ सांगत आहेत कीं, आपले वडिल शिवतर खोऱ्यांत चंद्रराव मोरे आला त्यावेळीं त्याच्या बरोबर आले, चंद्रराव प्रथम खालीं गावांत रहात होता, मग घेरावचे माचीस त्यानें वाड्याचें काम लावलें, त्याच्या पदरीं आमचे वडिल घोड्याच्या चाकरीवर होते. श्रीशिवछत्रपतींच्या मार्गांत चंद्ररावाचा एक मोठा कांटा होता. चंद्ररावाला एक तर अंकित तरी करून घ्यावयास पाहिजे होतें किंवा तो कांटा उपटून तरी टाकावयास पाहिजे होता. त्या खटपटींत महाराज कैक वर्षे होते. त्या च खोऱ्यांत चंद्ररावाच्या वाड्यापासून एका हांकेवर एका घळींत श्रीसमर्थ १५७६ पासून १५८६ पर्यंत जाऊन येऊन होते. ही गोष्ट निंदक मान्य करून चुकले आहेत. श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाची जन्मभूमि म्हणजे ही शिवतरची घळ होय. त्या घळींत १५८१ त दासबोधाच्या पहिल्या सात किंवा आठ दशकांची रचना झालेली आहे; असो. आज हा विस्तार येथें नको. येथें आपणांस आज इतकें च पहावयाचें आहे कीं, श्रीसमर्थांच्या घळीपासून जवळ असलेला जो चंद्ररावाचा घरटा म्हणून दाखविण्यांत येतो, तो त्याचा च होय, ही गोष्ट निरुपयोगी म्हणून एकदां टाकून दिलेल्या कागदांवरून सिद्ध होत आहे. तेव्हां सकृद्दर्शनीं कोणता च कागद संशोधकानें निरर्थक म्हणून मानू नये. तावत् निरर्थक वाटला तरी त्यानें त्याचा संग्रह करावा. दुसऱ्याला किंवा त्याला च कालांतरानें निराळी दृष्टि प्राप्त होऊन त्या कागदाची उपयुक्तता भासूं लागेल. तात्पर्य, संशोधकानें जें जें मिळेल त्याचा संग्रह करीत असावें. अगदीं च कोणी 'पुढें निघळ रद्दी आणून टाकली, तरी त्यानें वेंचून दि चार कागद निवडून घ्यावें. त्यांत हि एक हेतु असतो. पहिल्या च भेटींत कोणत्या हि ठिकाणचे सर्व च कागद सहसा पहावयास मिळत नाहींत. तेव्हां संशोधकानें हे चार कागद आपल्या बरोबर अभ्यासाठीं न्यावे कीं, दुसऱ्या खेपेस ते परत केले म्हणजे विश्वास उत्पन्न होऊन आणखी कागद पाहण्याला आणि मिळण्याला मार्ग मोकळा होतो.

१८५२ ज्येष्ठ व. १२

## नववा सिद्धांत

### (९) मिळालेलीं कागदपत्रें वगैरे कबूल केल्याप्रमाणें परत करण्याची वेळ सहसा टळूं देऊं नये.

संशोधकानें हा नियम पाळणें अत्यन्त आवश्यक आहे. त्यानें तो नियम एकाद्या धार्मिक बंधनाप्रमाणें पाळला पाहिजे. एकानें न पाळला, दुसऱ्यानें न पाळला, दहा जणांनीं तसें च केलें म्हणजे तें सर्वांना च नडतें. लोक आपल्या जवळचीं कागदपत्रें संशोधकांना देण्यास बहुधा नाखुष असतात, याचीं जीं अनेक कारणें आहेत, त्यांत एक मुख्य कारण हें असतें कीं, दिलेले कागद परत येतील, असा त्यांना भरंवसा वाटत नसतो! दुसरीं हि अनेक कारणें असतात. चमत्कारिक दिसतें तर खरें च, जागच्या जागीं कणगींत पावसाचें पाणी गळून सर्व कागदांचा रेंदा होऊन ते नाहींसे झाले तरी पतकरलें, पण ते कोणास द्यावयास नकोत, अशी प्रवृत्ति प्रायः सर्वत्र आढळते. कागद कुजूं देतील पण कोणास देणार नाहींत, फार त्यांची अडगळ वाटली तर नदींत नेऊन सोडतील पण कोणाच्या हवालीं करणार नाहींत. अशा गोष्टी प्रत्यक्ष घडलेल्या मला माहीत आहेत. जुन्या मौल्यवान् हस्तलिखित पोथ्या चुलींत घालून स्नानाचें पाणी तापविल्याचीं उदाहरणें ऐकलीं आहेत, ठाऊक आहेत! लोकांची ही अशी प्रवृत्ति कां असावी? कागद न दाखविण्याला कित्येक वेळां तर अगदीं क्षुल्लक कारण असतें. कागद पहावयास आलेला गृहस्थ किती त्रास आणि खर्च सोसून आला आहे याची कल्पना हि मनाला शिवूं न देतां माळावरून किंवा दळदातून कागद काढण्यात आपणांस थोडासा त्रास होईल व कागदांचा तो सारा पसारा सर्वत्र व्हास्यानें आपली थोडीशी गैरसोय होईल, असल्या क्षुल्लक कारणानें कागद दाखविण्याचा कोणी कोणी कंटाळा करतात. बहुतेक ठिकाणीं भाऊबंदकी असते, भाऊबंदकीचीं भांडणें चालू असतात, किंवा चालणार असतात, तेव्हां न जाणों, आपल्या विरुद्ध उपयोगांत येईल, असें कांहीं या कागदांतून निष्पन्न झालें आणि तें नेमकें यांनीं जाऊन प्रतिपक्षास सांगितलें तर काय करणार? कागदांत काय असेल आणि काय नसेल, कोणी सांगावें, तेव्हां ते न च दाखविणें पुष्कळांना श्रेयस्कर वाटतें. पण या सर्वांत प्रबळ कारण म्हणजे दिलेले कागद हटकून परत येतील असा ते देणारास विश्वास वाटत नसतो. कागद देण्याचा प्रश्न नंतरचा, पण पुष्कळ जण कागद दाखविण्यास हि राजी नसतात तें अद्यासाठीं कीं, यांना

एकदा कागद दाखविले म्हणजे हे ते मागणार व आपणांस नाहीं म्हणावें लागणार, त्यापेक्षां आधीं च आपणांपाशीं कागद नाहींत च असें म्हणून मोकळे होणें बरें, असें कित्येकांस वाटत असतें. पद्धतवार मागितलेले कागद पद्धतवार मिळाल्यानंतर ते तेथल्या तेथें पाहून उतरून घेणें हें च संशोधकास योग्य होय. त्यानें जास्त आशेंत पडूं नये. कांहीं दिवसांच्या बोलीनें मिळालेले कागद मुदतींत परत करण्यास संशोधकानें अत्यन्त जपलें पाहिजे.

माझ्या हातून नेहमीं च याप्रमाणें वर्तन झालें, असें मात्र नव्हे, याचें मला दुःख होतें. पुष्कळदां मुदत टळण्याची वेळ आली म्हणजे पत्रें पाठवून मी मुदत वाढवून घेत असे. पुष्कळ वेळां असें हि होई कीं, कागदपत्रें देणाराच्या ठिकाणीं दरम्यानच्या काळांत मजविषयीं पूर्ण विश्वास आणि कार्याविषयीं पूर्ण अनुकूलता उत्पन्न होऊन ते मुदतीच्या बंधनांतून मला मुक्त करीत असत. पण कांहीं वेळां तरी, सतत ठिकाणच्या पायपायामुळें मला सर्वांच्या च वेळा संभाळणें अशक्य होई व माझ्या हातून मुदती टळत. आजवर असा अपराध माझ्या कडून ज्याचा ज्याचा घडला त्यांची त्यांची मी या ठिकाणीं जाहीरपणें क्षमा मागतों. मुदती वाढवून घेतल्या आहेत अशा अनेक ठिकाणचे कागद अजून परत करावयाचे आहेत व आशा आहे कीं, आतां वर्ष दोन वर्षांच्या अवधींत सर्वांच्या शब्दांतून मोकळा होईन.

## दहावा सिद्धांत

( १० ) एका ठिकाणीं एक मोठा विचित्र अनुभव आला. त्या गांवीं एक श्रीशिवकालीन घराणें होतें. त्याचीं एका घराचीं दोन घरें झालीं होतीं. दोन्ही घरांत श्रीशिवकालीन कागदपत्रें असल्याचें ठाऊक झालें होतें. पैकीं एका घरीं गेलों. मालकाला येण्याचा हेतु सविस्तर निवेदन केला. त्यांना तो पटला व त्यांनीं कागदपत्रांचे रुमाल पुढें आणून टाकले. ते सर्व चाळून त्यांतून ऐतिहासिक महत्त्वाचे दोन तीनशें कागद वेगळे काढून एका रुमालांत बांधले. त्या कागदांत पांच पन्नवीस कागद प्रत्यक्ष श्रीशिवकालीन, कांहीं राजारामकालीन व बाकीचे नंतरचे होते. सर्व कागद महत्त्वाचे होते व चार महिन्यानीं परत करण्याच्या बोलीनें ते त्यांनीं आमच्या हवालीं केले. ते घेऊन घराबाहेर पडलों आणि मनांत विचार आला, दुसऱ्या हि घरीं जावें, त्यांच्या कडचे कागद व हे कागद मूळचे एका च घराण्यांतील होत, तेव्हां सर्व कागदांची संगति लागण्यास त्यांच्या हि कडचे कागद मिळणें अवश्य होय. मिळा-

लेल्या कागदांबद्दल मनाला सानंद निश्चितता वाटली व मिळवावयाच्या कागदाबद्दल साधक विवेचना सुरू झाली. दुसऱ्या घरी गेलों. आपल्या जवळचे कागद दाखविण्याची त्या घरच्या मालकाला बुद्धि व्हावी म्हणून, पहिल्या घरचे हे कागद आणले आहेत, आपल्या हि जवळचे कागद मिळाले म्हणजे ऐतिहासिक प्रसंगांची जुळणी बरी होईल, वगैरे गोष्टी समजावून सांगितल्या. आमचा सर्व भिक्षुकी पाल्हाळ शांतपणें ऐकून ते निश्चयपूर्वक म्हणाले ' असं, हे कागद त्यांच्या कडून आणले काय, चला, आपण पुन्हां एकदां त्यांच्याकडे जाऊं व मग आमच्या कडचे कागद पाहूं. ' आम्हांस किंचित् शंका आली, पण त्यांच्या घरोबर पुन्हां पहिल्या घरीं जाण्याचें टाळणें बरें दिसलें नव्हतें व कदाचित् शक्य हि नव्हतें. आम्ही गेलों. हे दुसऱ्या घरचे गृहस्थ पहिल्या घरच्या गृहस्थापेक्षां वयानें तर मोठे होते च, पण नात्याच्या अधिकारानें हि मोठे असावेत. जातां च हे त्यास म्हणाले, ' तुला कांहीं समजतें, घे आपले कागद त्यांच्या पासून मागून परत. ' धाकट्या घरच्या गृहस्थाचें त्यांच्या पुढें कांहीं चाललें नाहीं. आम्ही पुष्कळ सांगून पाहिलें, पण त्याचा त्यांच्यावर यत्किंचित् हि परिणाम झाला नाहीं. हे थोरल्या घरचे गृहस्थ पूर्ण वनलेले होते. कागदपत्रांच्या बाबतींत वृद्ध माणसांबद्दल माझा जो सिद्धांत त्यावर या वृद्ध गृहस्थांनीं शिक्का मोर्तब करून तो कायम केला. दुसऱ्याचें मन वळविण्याची आमची सारी शक्ति त्यांच्या पुढें पंगु ठरली. आम्ही कष्टी झालों. निदान इतकी विनंति तरी मान्य होईल, अशी आशा वाटून मी शेवटीं म्हटलें, 'बरें, इलाज नाहीं, येथें च एक दोन दिवस राहून कांहीं कागदांच्या नकला करून घेतों.' ' मुळीं च नाहीं ' असें त्यांच्याकडून ठाम उत्तर मिळालें. मन उद्विग्न झालें. नजरेनें पाहिलेले आणि हातीं आलेले अधिकालीन कागद नुसतें वाचावयास हि न मिळतां परत करावे लागले याचें मनस्वी दुःख वाटलें. हताश होऊन कागद परत दिले आणि दहावा सिद्धांत ठरविला कीं,

> एकाद्या गांवीं एकाद्या कडे महत्त्वाचे कागद मिळाले,
> म्हणजे निदान त्या खेपेस जास्त आशेंत न पडतां
> तत्काळ गांवाबाहेर पडावें, पाणी पिण्यापुरतें
> सुद्धां त्या गांवीं त्यापुढें थांबूं नये !

त्या च गांवीं पुन्हा कालांतरानें गेलों होतों, तेव्हां ते थोरले गृहस्थ ह्यात नव्हते. धाकट्या घरच्या गृहस्थांना भेटलों. त्यांनीं पुन्हां कागदांचे

रुमाल आणून पुढें ठेवले, पण दुर्दैवाची गोष्ट की दप्तरांत कागद अस्ताव्यस्त होऊन पूर्वी जे निवडले होते त्यांतले फार च थोडे कागद शिल्लक राहिले होते!

## अकरावा सिद्धांत

(११) संशोधक हे अधाशी असतात. त्यांना कितीहि मिळालें तरी त्यांचें पोट भरत नाहीं. स्वाभाविक आहे. ते केवळ ज्ञानाचे उपाशी आहेत. तथापि लोकांत अशा अधाशीपणा करून चालत नाहीं. फार आशा केली म्हणजे जास्त तर मिळत नाहीं च, पण हातचें हि जातें, हें आपण पाहिलें च आहे. तेव्हां संशोधकांनीं फार अधाशीपणा न करितां बहुत जाणितां घ्यावें। बुद्धी येक ॥ इंदुरबोधन-मठांतील बाडांचें पहिल्या च खेपेस एक मोठें गांठोडें न बांधतां दहा पांच च बाडें तात्पुरतीं निवडलीं असतीं तर तीं कदाचित् तत्काळ मिळालीं असतीं व मग बाकीचीं हि कालांतरानें मिळालीं असतीं. पण मी अधाशीपणा केला आणि कांहीं काळ तरी सर्व च बाडांना अंतरलों. तथापि या बाबतींत कोणता हि एक नियम बांधून देणें कठीण आहे. बीड मठांतील संग्रह दोन तीन वेळां मिळून मिळवावा लागला, तरी अजून राहिला च आहे, तो च तंजावर येथील भोंसीरामबावांच्या मठांतील विपुल संग्रह, जेवढा होता तेवढा सर्व एकदम च मिळाला. बीड येथें पहिल्यांदा गेलों त्या वेळचा प्रसंग माझ्या स्मरणांत कायमचा आहे. मठपतींनीं पुढें आणून टाकलेले रुमाल सोडून पहात असतां श्रीसमर्थप्रताप ग्रंथ नजरेस पडला! त्या वेळीं मनाची स्थिति कशी झाली म्हणून काय सांगावी! बरोबर न्यावयाच्या ग्रन्थांत श्रीसमर्थप्रताप ठेवला आणि पुढें रुमाल सोडीत होतों आणि पहात होतों, पण निवडून बाजूस ठेवलेल्या प्रतापांत चित्त इतकें गढलें होतें कीं, पुढें बाडें चाळीत होतों, पण डोळे असून कांहीं दिसत नव्हतें, शुद्धीवर असून कांहीं समजत नव्हतें. स्वर्गीय सुख याहून कांहीं निराळें असेल काय! तरी पण एक खबरदारी घ्यावयाची असते. संशोधन चालू असतां वाटणारा आनंद व्यक्त करावयाचा नसतो. मालक बहुधा जवळ च बसलेले असतात व आपल्या बरोबर ते हि कागदपत्रें चाळावयास लागतात. आपल्या आनंदाचें कारण अमुक ग्रन्थ किंवा अमुक पत्र आहे असें त्यांच्या ध्यानात आलें, तर नेमका तो च ग्रन्थ किंवा पत्र पहावयास घ्यावयाचें व नेऊं न द्यावयाचें! वास्तविक ती सारी संपत्ति त्यांची च असते व पूर्वी जन्मांत त्यांनीं ती कधीं पाहिलेली नसते, पण

आपण पहावयास बसलों असतां त्यांना पहात बसावेंसें वाटतें व अशा वेळीं मधून मधून कांहीं तरी कागद त्यांच्या हातीं देऊन त्यांना गुंतवून ठेवावें लागतें. तें असो, पण याप्रमाणें त्या खेपेस मठांतील सर्व संग्रह पाहून हि न पाहिल्यासारखा च होता. ही गोष्ट १८२९ च्या चैत्रांतील होय. म्हणून पुन्हां १८३१ च्या वैशाखांत बीडास गेलों होतों. इतका विपुल संग्रह होता कीं तो सर्व मिळेल असें वाटेना, म्हणून मागण्याचें धैर्य हि होईना. कांहीं निवडला व बाकी राहूं दिला तो तसाच अजून राहिला आहे. त्यांत एक शके १५४४दुंदुभिनाम संवत्सरांतील वाल्मीकीय आदिकांडाची प्रत होती.ती मिळवावी अशी इच्छा झाली म्हणून ती पुढें श्री. केशवबुवा ऊर्फ श्रीसमर्थदास यांनीं मिळवून मजकडे पाठविली. तात्पर्य संशोधनकार्यांतील एक सिद्धान्त असा कीं,

• संशोधकानें फार अधाशासारखें हि करूं नये, पण मिळण्याचा संभव असतां कांहीं टाकूं हि नये, वर प्रसंग पाहून वागावें.

## बारावा सिद्धान्त

( १२ ) कवीला काव्य करतांना–कल्पना जुळवितांना किंवा योग्य शब्द हुडकतांना–जे श्रम होतात, त्यांत च एक प्रकारचा जसा विलक्षण आनंद असतो, तद्वत् संशोधकाला संशोधनाप्रीत्यर्थ जे कष्ट होत असतात, त्यांत हि खरोखर स्वर्गीय सुख असतें. कवीचा आनंद जसा कवीला च कळतो, तद्वत् संशोधनसुखाचे भोक्ते संशोधक च होत. इतर ऐहिक व्यवहाराप्रमाणें संशोधन हा व्यवहार नव्हे. तें एक पवित्र कार्य आहे, आत्मोन्नतीचें एक साधन आहे. म्हणून संशोधन करीत असतां सदा सर्वदा देव धनीच आहे। याचा क्षणभर हि विसर पडूं देऊं नये. संशोधनकार्यांत अपहारबुद्धि आचारांत तर नसावी च, पण विचारांत हि नसावी. उदाहरणार्थ डोमगांवची हकिकत सांगतों. डोमगांव इतके दुसऱ्या कोणत्या हि गांवाचे मजवर उपकार झालेले नाहींत. डोमगांवच्या प्रत्येक घराचा मी ऋणी आहे. मठपतींच्या एका घराचीं कालपरत्वें अनेक घरें झालीं आहेत. त्यांपैकीं दत्तात्रयमहाराजांचें एक घर होय. दत्तात्रयमहाराजांचे वडील दासमहाराज म्हणून या संप्रदायांत पांच पन्नास वर्षांमागें एक विख्यात पुरुष होऊन गेले होते. मी त्यांना पाहिलें नव्हतें. घरांत दत्तात्रय महाराज व त्यांच्या मातुःश्री असत. उभयतां सात्त्विक वृत्तीचे होते. दुसऱ्या खेपेस डोमगांवीं गेलों तेव्हां दत्तात्रयमहाराजांकडील कागदपत्रें पाहावयास मिळालीं होतीं. आम्हांस फराळाचें कुलूप काढून देऊन ते कोठें परगांवीं निघून गेले. सायंकाळीं परत येणार असतील, अशी माझी कल्पना झाली.

घरांत मातुःश्री होत्या, पण त्या आपल्या कामांत होत्या. दप्तरें पाहून झालीं, कागद निवडून काढले, पण दत्तात्रयमहाराजांचा कोठें ठिकाणा होता ? मातुःश्रींना विचारतां त्या म्हणाल्या, महाराज दोन चार दिवस येणार नाहींत. आम्ही कागद नेऊं कां, म्हणून त्यांस विचारलें. 'मी कसें सांगूं, त्यांस येऊं द्या ' असें त्या म्हणाल्या. त्यांचें म्हणणें बरोबर होतें. कोणी युक्तिवाद केला, ' निवडलेल्या कागदांत श्रीकल्याणमहाराजांसंबंधानें जे चार पांच कागद आहेत आणि त्यांतल्या त्यांत हि कल्याणमहाराजांना रामचंद्र नीळकंठांचें जें बाळबोध, अस्सल, गोड पत्र आहे ( श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, द्वितीय खंड, लेखांक ४२७ ) तें पत्र, अशीं हीं चार पांच पत्रें खिशांत घालून जाण्याला काय हरकत आहे ? पुन्हां आपण केव्हां येतो आणि नाहीं. इतक्या विश्वासानें कागद आपल्यापुढें टाकून महाराज गेले, त्यांनीं नाहीं थोडें च म्हटलें असतें !' हा युक्तिवाद क्षणभर हि टिकला नाहीं. इतका विश्वास टाकला म्हणून तर नाहीं च नाहीं, पण एरव्हीं हि यांतला एक कपटा सुद्धां त्यांच्या परवानगीवांचून नेतां येत नाहीं. तसा तो नेणें महत्पाप होईल ! संशोधन हा आत्मोन्नतीचा मार्ग आहे हें जाणून तो मार्ग आक्रमीत असता

संशोधकानें लोभमूलक पापापासून दूर सरावें, अत्यन्त प्रामाणिकपणानें वागावें, काय वाटेल तें होवो, संग्रह मिळो वा न मिळो, त्यानें प्राणांतीं हि अपहारबुद्धीला मनांत थारा देऊं नये.

एका फडक्यांत ते कागद बांधले व तें छोटें दप्तर दारावरील कोनाड्यांत ठेवून दिलें. आम्हांस पाहिजे असलेले कागद निवडून, रुमालांत बांधून, वरील कोनाड्यांत ठेवले आहेत, ते तसे च असूं द्या, पुढील खेपेस येऊं तेव्हां बुवासाहेबांना विचारून घेऊन जाऊं, असें मातुश्रींना सांगून व नमस्कार करून आम्ही बाहेर पडलों. डोमगांव हें माझें माहेरघर होय. कागद मिळण्याला मुळीं च पंचाईत नव्हती. पुढें गेलों, ते कागद आणले आणि सांप्रदायिक कागदपत्रांच्या द्वितीय खंडांत छापले हि.

## तेरावा सिद्धांत

( १३ ) सर्वगुणसंपन्न संशोधकाच्या ठिकाणीं आणखी दोन चार गुण अवश्य असावयास पाहिजेत. आपल्या महाराष्ट्रांत संशोधन करावयाचें म्हणजे नुसतें श्रीशिवकालीन मोडी वाचतां येऊन उपयोगी नाहीं. शकी त्या वेळची

मोडी लिपी सुद्धां थोडी कठीण च असते व अभ्यासावांचून ती सर्वांना च वाचवत येईल, असें नाहीं. तेव्हां संशोधकाला शिवकालीन मोडी लिपीचा व्यासंग पाहिजे च, पण शिवाय त्यास फारशी आणि संस्कृत या दोन भाषा चांगल्या अवगत असल्या पाहिजेत. मुसलमानी अमलांतील अक्षरशः कोट्यवधी फारशी कागद बृहन्महाराष्ट्रांत सर्वत्र विखुरलेले आहेत. त्यांतले आतांपर्यंत लक्षावधी कागद आपल्या अनास्थेमुळें नाहींसे झाले व जे शिल्लक आहेत ते हि, कोणी संशोधक आपल्या वाट्याला येईल काय, कां जगापुढें येण्यापूर्वी च इतर कागदांप्रमाणें आपली हि गति होणार, या चिंतेंत पडले आहेत. मराठी कागदपत्रांचें थोडें फार संशोधन होत आहे, पण अवघ्या फारशी कागद तशी च वाट पहात राहिले आहेत. एकाद्या ठिकाणीं संशोधक गेला आणि मालक प्रसन्न होऊन त्यानें याच्यापुढें घरांतील सर्व कागद आणून टाकले आणि याला जर फारशी येत नसेल, तर हा मराठी कागद तेवढे गोळा करणार व फारशी कागदांचा त्याग करणार आणि त्या दोन्ही कागदांचा परस्परांशीं संबंध असला, तर हा, न कळत, एकाद्या साद्यन्त वृत्तांताचे तुकडे पाडणार, कारण नसतां स्वतः अंधारांत पडणार व वाचकांस पाडणार. त्या कागदांची परस्परांत गुंतागुंत नसली आणि फारशी कागद स्वतंत्र असले तरी पुढें पंच पक्वान्नाचें ताट असून हि हा स्वतः अर्धपोटी उपाशी राहणार व वाचकांस ठेवणार. हें संशोधन निव्वळ अर्धवट होय व आपल्या महाराष्ट्रांत आतांपर्यंत शिवकालीन व शिवपूर्वकालीन जें संशोधन झालें आहे तें बहुशः असें अर्धवट झालें आहे व जें हल्लीं चालू आहे तें हि तसा च अर्धवट पद्धतीनें चालू आहे. मला फारशी येत नाहीं व ही अडचण मला सर्वत्र भासली. लक्षावधी फारशी कागद पुढें येऊन बाजूस सरले. त्यांत काय इतिहास भरला होता, तो परमेश्वरास ठाऊक! हें श्रीसमर्थांनीं म्हटल्याप्रमाणें झालें! सभोंवतीं सर्वत्र संपत्ति असावी, बसला आहे त्या जागीं खालीं जमिनींत पुरलेली असावी, माथ्यावर तुळवट आहे त्यांत असावी, शेजारीं खांबांत असावी पण ठाऊक नसल्यामुळें चौफेर संपत्तीमध्यें बसलेला असून हि पोट कसें भरावें या विवंचनेंत एकाद्यानें पडावें, तद्वत् इतिहासाचीं साधनें सभोंवार पसरलेलीं असतां केवळ त्या भाषेचें ज्ञान नसल्यामुळें मला शिवकालीन इतिहास कसा कळेल ही याला चिंता लागलेली असावी. हें आपण कोणा तिऱ्हाइतास सांगत नाहीं आहोंत, आपसांत च बोलत आहोंत, म्हणून म्हणतों ही स्थिति अभिमानी महाराष्ट्राला निःसंशय कमीपणा आणणारी आहे. यापुढील तरुण संशोधकांनीं फारशीचा अभ्यास

जरूर करून संशोधनाला पूर्णत्व आणलें पाहिजे.

तसें च संशोधकाला संस्कृत चांगलें अवगत असावें. संशोधकाला च कां, महाराष्ट्रांतील प्रत्येकाला संस्कृत आलें पाहिजे. ती देववाणी आहे, आपले धर्मग्रन्थ त्या भाषेंत आहेत, आमच्या तत्त्वज्ञानाचा उगम त्या भाषेपासून आहे, त्या भाषेंत परमेश्वराचें स्वरूप आहे. सर्व च भाषा देवाच्या असल्या तरी संस्कृतांत परमेश्वर उत्तान रूपानें भरलेला दिसतो. संशोधनदौऱ्यांत संस्कृतांत असलेलीं ताम्रपत्रें, शिलालेख वगैरे आढळतात, तीं वाचतां येण्याला संस्कृताचें उत्तम ज्ञान असणें आवश्यक होय.

म्हणून तेरावा सिद्धान्त असा कीं,

संशोधकाला नुसतें श्रीशिवकालीन मोडी लिपीचें ज्ञान असून भागत नाहीं, तर त्यास फारशी व संस्कृत या दोन भाषांचें चांगलें ज्ञान असणें अगत्याचें आहे.

## चौदावा सिद्धान्त

(१४) आपल्या हातून जें संशोधन व्हावयाचें तें पूर्ण व्हावें, अर्धवट राहूं नये, म्हणून फारशी व संस्कृत या दोन भाषा जशा संशोधकाला आल्या पाहिजेत, त्याप्रमाणें

संशोधकास निरनिराळ्या काळांतील प्राचीन लिपींचा परिचय असावयास पाहिजे.

बृहन्महाराष्ट्रांत पुष्कळ ठिकाणीं प्राचीन शिलालेख आहेत व क्वचित् कोठें ताम्रपत्रें हि आढळतात. हे लेख बहुधा संस्कृतांत असतात, फक्त कालपरत्वें त्यांची लिपी भिन्न असते. एकदा आम्ही मोगलाईंत दोनशें मैलांवर प्रवास बैलगाडीनें केला होता, तेव्हां मार्गांत किती तरी शहरें लागलीं कीं जेथें शिलालेख होते. खुद्द वेरुळाच्या लेण्यांत काय थोडे शिलालेख पडलेले आहेत! शिलालेख आढळावा, पण तो वाचतां येत नसल्यामुळें तो तसा च टाकून पुढें जावें लागावें हें केवढें पाप! त्या शिलालेखाचा व ते ज्यांनीं कोरून ठेवले त्यांचा हा केवढा अपमान! हें पाप व हा अपमान जाणून बुजून घडत नाहीं, घडतें खरें, पण तसें घडण्याचें कारण केवळ लिपीचें अज्ञान होय. संशोधकाला असलें अज्ञान शोभत नाहीं. विस्तार करणें नको, पण सर्वगुण-संपन्नता अशी येण्यास प्राचीन लिपींचें ज्ञान असणें अवश्य आहे. अशी सर्व-गुणसंपन्नता कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांच्या ठिकाणीं होती, म्हणून महाराष्ट्रानें त्यांस इतिहासाचार्य ही पदवी अर्पण केली.

## पंधरावा सिद्धान्त

( १५ ) पूर्णत्वाच्या दृष्टीनें आपण संशोधनाचा विचार करीत आहोंत म्हणून पंधरावा सिद्धांत नमूद करण्यास हरकत नाहीं कीं,

संशोधनाच्या दौऱ्यांत संशोधकाबरोबर फोटो घेण्याचें सामान असल्यास फार च उत्तम.

कोठें कोठें जुने कागद नुसते पहावयास तर कोठें फार तर उतरून घेण्यास मिळतात. अशा वेळीं फोटो घेण्याचें सामान बरोबर असल्यास जुन्या कागदपत्रांचे, पोथ्यांचे वगैरे फोटो घेण्यास सांपडतें. पण कागदपत्रें, पोथ्या वगैरे बरोबर नेण्यास मिळूं तरी शकतात, तसें सृष्टीचे निरनिराळे रम्य देखावे, प्रचंड देवालयें, साधुसंतादिकांच्या समाधी, देवाच्या मनोहर मूर्ति, विशाळ घळी, शिलालेख यांचें नसतें. म्हणून फोटोचें सामान बरोबर असलें म्हणजे अशा सर्व पवित्र स्थळांचे आणि वस्तूंचे फोटो घेता येतात. संशोधनाच्या पूर्णत्वाच्या दृष्टीनें पुष्कळ वेळां असे फोटो घेण्याची अनुकूलता असणें इष्ट आणि उपयुक्त असतें. आमच्या संशोधनदौऱ्यांत कांहीं वेळा हें सामान आमच्या बरोबर असे व त्याचा आम्हास फार उपयोग होत असे. एका दूरच्या ठिकाणीं या सामानाचा आम्हांस अकल्पित असा उपयोग झाला. मठांतील कारभारी व त्यांच्या घरांतील आणि मठांतील सर्व माणसें यांचा आम्हांस फोटो घेतां आला, पण म्हणून तेवढी च आमच्या तर्फे शिफारस होऊन विशेष आढेवेढे घेतल्याशिवाय आम्हास मठांतील संग्रह पहावयास मिळाला. हा उपयोग गौण असला तरी तो फलदायी झाला, पण तेवढ्यासाठीं म्हणून कांहीं फोटोचें सामान बरोबर घ्यावयाचें नसतें.

## सोळावा सिद्धान्त

( १६ ) श्रीसमर्थांनीं अद्भुत प्रताप केले, तपश्चर्या बहुत केले, नाना लीला केल्या, नाना ग्रंथांचें शोधन केलें, जनास बहुविध उपदेश केला, लोकांचीं मनें आकर्षून घेतलीं, लोकसंग्रह केला, भरतखंडभर पर्यटणें केलीं, तीर्थक्षेत्रें पावन केलीं, गुप्त आणि प्रकट सामर्थ्यें दाखविलीं. या सर्वांचें आज आपणांस संशोधन करावयाचें आहे. श्रीरामदासी संशोधनाचे हेतु दोन : एक, श्रीसांप्रदायिक कागदपत्रें, पोथ्या, पुस्तकें मिळविणें व दुसरा, श्रीसमर्थांची कृपा संपादन करणें. हे दोन्ही हेतु साधावे म्हणून मठांचें व ऐतिहासिक पवित्र स्थानांचें

जेथें संशोधन करावयाचें, तद्वत् श्रीसमर्थस्थानें हि पाहिलीं पाहिजेत. श्रीसमर्थ कोठें आढळतील आणि केव्हा कृपा करतील याचा नियम नाहीं, याकरितां त्यांना सर्वत्र शोधलें पाहिजे. ते जेथें जेथें राहिले असतील तेथें तेथें, त्याचा शोध घेतला पाहिजे ते कोठें राहत, हें गिरिधरानीं तीन ओव्यात सांगितलें आहे

गिरिकंदरीं समर्थआसनें । दरीं दर्कुटीं मचकशयनें ।
कडेकपारीं धावती जनें । वैभवअर्चनें करावया ॥ स. प्र ३४
वैभवें सांडोनि दुर्गम वनीं । गिरिगुहावरीं तरतळ उष्ण शयनीं ।
कोंदडपाणी स्वयें पीतांबरें छाया करूनि । नाना फळीं जीवनीं सान्निध्यें ॥ ३५
घटीण स्थळीं अगत्य राहणें । सिंहव्याघ्रेसीं हरिहरेसीं साहणें ।
निरालय कड्यावरी धोम्रध्वजा लावणें । माहात्म्य दावणें सद्योसी ॥ ३६

अशा अवघड स्थळीं श्रीसमर्थांना धुंडावयाचें आहे. कष्टाचें काम आहे. एकंदर संशोधनकार्य च प्राय दगदगीचें असतें. त्यात

कडे कपारें दरे दर्कुटें । पाहों जातां भय चि वाटे ॥

अशीं भयानक स्थळें ओलांडावीं लागतात, उन्हातान्हात हिंडावें लागतें, थंडी-वाऱ्यात पडावें लागतें, खाण्यापिण्याचे हाल होतात. अन्न आहे आहे, नाहीं नाहीं, असे प्रसंग येतात. वेळीं अवेळीं प्रवास करावा लागतो. त्यात आनंद एक कागदपत्राच्या प्राप्तीचा व पवित्र स्थळाच्या दर्शनाचा. कागदपत्रें मिळालीं व स्थळें पहावयास सांपडलीं म्हणजे सर्व श्रमाचा परिहार होतो. कोसरापासून पाचाडपर्यंत सज्जनगडा एवढा एक टप्पा आहे व पाचाडपासून वर वाड्यापर्यंत जी चढण आहे ती, न जाणों, तीन सज्जनगडा एवढी येईल. पण असे चार सज्जनगड चढून जाऊन श्रीशिवरायाच्या वाड्यांत शिरून त्याच्या सिंहासनापुढें बसून १५९६ चा ज्येष्ठ शुद्ध १२ चा दिवस आठवला म्हणजे चढून यतांना झालेल्या श्रमाची, त्या वेळीं, कोणास तरी आठवण होते काय ? दगदग करण्याला आणि सोसण्याला मनाची पुष्कळ मदत होते, हें जरी खरें असलें, तरी शरीरास श्रम व्हावयाचे ते होतात च. अशाकाऱ्या हि ठिकाणीं ते श्रम सोसण्याचा धारिष्ट त्याची तीव्र इच्छा उत्पन्न करू शकेल, पण श्रम नाहींसे करू शकणार नाहीं. शरीरास त्रास होणार च. आग्रहास एखदा एक योग असा आला होता कीं, रोज च एक एक गड असे

लागोपाठ चार दिवस चार गड चढावे लागले आणि ते हि उन्हाळ्यात मलईं दुपारचे भर बारा वाजतां ! पण आतां ती शक्ति शरीरात कोठें आहे ? म्हणून परम साधण्यासाठीं ज्याप्रमाणें

तारुणीं च उठाउठी ।

केली पाहिजे, त्या च प्रमाणें संशोधनकार्य हि तरुणपणांत च जेवढें होईल तेवढें पदरांत पाडून घेतलें पाहिजे. २५ ते ४५ या वयात जेवढें संशोधन होईल, तेवढें पुढें होऊं शकणार नाहीं. म्हणून सोळावा सिद्धान्त असा कीं :

संशोधकानें आपल्या तरुण वयांत

होईल तेवढें संशोधन उरकून घ्यावें.

मी मागें वळून माझ्या आयुष्यातील त्या काळाकडे नजर फेकली म्हणजे खजील होतो. झालें त्याहून किती तरी जास्त संशोधन व्हावयास पाहिजे होतें. पण आतां काय त्याचें ? आता त्याचें इतकें च कीं, म्हणून हल्लींच्या तरुणांनीं माझें ऐकलें पाहिजे. थोड्या वेळानें हे सिद्धान्त संपले म्हणजे तरुणांनीं काय ऐकावयाचे तें सांगतों.

## सतरावा सिद्धान्त

( १७ ) ऐतिहासिक घराण्यात संशोधन करतांना हा प्रश्न तितकासा उत्पन्न होत नाहीं, पण मठांचें संशोधन करतांना ही सावधगिरी बाळगली पाहिजे. मठ म्हणून आपण पुष्कळ कल्पना केल्या असतात, परंतु प्रत्यक्ष वस्तुस्थिति त्या कल्पनांप्रमाणें आढळली नाहीं, म्हणजे अशावेध माणसाचे मनावर विपरीत परिणाम होण्याचा संभव असतो. काळ बदलला आहे, तशी माणसें हि बदलली आहेत. आपण आपल्या पूर्वजांना जितके शोभूं तितके च विद्यमान मठपति आपल्या पूर्वजांना, मूळ मठसंस्थापकांना शोभतात. आपण मात्र कसे हि असावे, कसे हि वागावे, पण मठपतीबद्दल मात्र निराळी अपेक्षा करावयाची, हा कोठला न्याय ? सर्व च बाजूंनी जेथे समाजाची अवनति झाली आहे, तेथें तीतून मठपति तरी कसे सुटणार ? बहुतेक मठातून आपसात किंवा इतराबरोबर भाडणतंटे सुरू असतात. एका मठांत गेलों असता, मी वकील आहे हें मठपतींना समजतांच त्यांनीं माझ्यापुढें प्रथम समन्स टाकून सल्ला विचारण्यास सुरवात केली. तो सल्ला झाल्यावर मग कागदपत्राची गोष्ट. काहीं मठातील पुरुष माला गेहे

अपवाद आहेत, नाहींत असें नाहीं. पण बहुतेक ठिकाणची परिस्थिति असमाधानकारक असते. यासाठीं संशोधकास माझा इषारा असा आहे कीं,

विद्यमान माणसांकडे न पाहतां संशोधकानें
मूळ पुरुषाकडे पहावें, त्यांच्या चरणावरून
त्यानें आपली दृष्टि ढळूं देऊं नये.

आद्य संस्थापकाच्या चरित्राकडे अचल लक्ष जडलेलें असलें ह्मणजे नंतरची स्थिति पाहून मनाला उद्विग्नता येण्याचें कारण रहात नाहीं.

## अठरावा सिद्धान्त

( १८ ) असे आणखी अनेक सिद्धान्त सांगतां येतील. या वेळीं प्रमुखपणानें मनांत आले ते नमूद करून ठेविले. या सर्व सिद्धान्तांचा सिद्धान्त, मुख्य सिद्धान्त, किंबहुना या सर्व सिद्धान्तांना व्यापून उरणारा शेवटचा सिद्धान्त असा कीं,

श्रीसमर्थचरणीं संशोधकाची पूर्ण निष्ठा असावी,
त्या चरणांचा त्यास सारखा निदिध्यास लागलेला
असावा, श्रीसमर्थांना त्यानें आपल्या हृदयांत
कायमचे सांठवून ठेवावें, आपलीं सर्व
संशोधनकार्यें त्यांच्या चरणीं अर्पण करावीं.

इतके तुम्ही हिंडतां त्या तुमच्या पाहण्यांत असा रामदासी पुरुष कोठें आला कां, असा प्रश्न पुष्कळ जण विचारीत असतात. त्यांचें उत्तर येथें देतों. इतर कोणाला हि कमी न लेखतां, ज्याच्या त्याच्या गुणाबद्दल, कर्तृत्वाबद्दल प्रत्येकाचें कौतुक करून हि, मला असें ह्मणतां येतें कीं, असा पुरुष मी एक च पाहिला, तो आमचे श्रीधरपंत होत. त्यांची मी करीन तितकी स्तुति थोडी च होईल. त्यांचें अल्प चरित्र दासविश्रामधामाच्या प्रस्तावनेंत सांगितलें च आहे. श्रीधरपंतांना दुसरा ध्यास नव्हता. अशी वृत्ती प्रत्येक संशोधकाची असावी. ती कशी असावी, हें श्रीसमर्थांचे एक श्रेष्ठ शिष्य, स्वानुभवदिनकराचे कर्ते तिसगांवमठपति, श्रीदिनकर यांनीं पांच प्रेमळ ओव्यांत सुंदर रीतीनें सांगितलें आहे :

तेणें घाटे मुखीं रामदास घ्यावे । जिव्हे रामदास उच्चारावे ।
निजकरीं रामदास पूजावे । अनंतां उपचारीं ॥ ११-५-१०९

नेत्रीं रामदास पाहावे । कानीं रामदासचरित्र ऐकावें ।
रामदासपदींचें जिघ्रावें । निर्माल्य घ्राणें ॥ ११०

घोटीं रामदासपदीं सुंयन । पदांगुष्ठ चोखावे चुरचुरून ।
रामदासांपुढें करावें नर्तन । निजपदीं सहजस्थितीं ॥ १११

मस्तकीं रामदास वंदावे । हृदईं रामदास आलिंगावे ।
कडकडूनि सर्वांगेसीं भेटावें । रामदासीं सहजस्थितीं ॥ ११२

निजहृदईं रामदास सांठवावे । स्कंधीं रामदास बैसवावे ।
पाठीसीं रामदास घालावे । याम सव्ये सहजस्थितीं ॥ ११३

तात्पर्य, श्रीरामदासी संशोधकानें श्रीसमर्थांना सोडून क्षणभर हि राहूं नये.

आपलें संशोधन ही श्रीसमर्थांची सेवा होय, अशी संशोधकांची भावना असावी. तें संशोधनाचें फळ त्यांच्या चरणीं अर्पण करून आपण मोकळे व्हावयाचें असतें. म्हणून संशोधकाचें मन कष्टी होण्याला कांहीं च कारण नसावें. त्यानें आपली समाधानवृत्ति केव्हां च डळमळूं देऊं नये. श्रीसमर्थांच्या इच्छेनें जेवढें संशोधन होईल तेवढें च खरें. जें मिळावयाचें असेल तें मिळेल. कांहीं न मिळालें म्हणून त्यांची जबाबदारी आपणावर घेऊन कष्टी होण्याचें कारण च काय ! पुष्कळदां असें होतें, अनेक श्रमसायास करून आपण एकाद्या ठिकाणीं जावें आणि तेथें कांहीं च मिळूं नये किंवा कांहीं च नसावें. अशा वेळीं क्षणभर मनाचा निरुत्साह होणें साहजिक आहे, पण त्यावर माझें म्हणणें असें असतें कीं, झालेले श्रम वाया गेले, असें कधीं च म्हणतां येणार नाहीं. आपलें ईप्सित साध्य होण्याला इतकी किंमत द्यावी च लागणार असेल, तर आपणास केव्हां हि विनाकारण त्रास झाला, असें कसें म्हणतां येईल ! जितके कष्ट झाले तितके पदरांत पडले, तितक्या मानानें आपण आपल्या साध्याजवळ गेलों, असें मानलें पाहिजे. श्रीसमर्थांच्या मनांत असेल तसें होईल. संशोधकानें श्रीसमर्थांच्या इच्छेप्रमाणें वर्तावें, ते करितील तें मानावें, म्हणजे मग सहज च त्यांना आपली करुणा येऊन ते आपणांवर कृपा करितील. श्रीसमर्थप्रतापकारांनीं सर्व संशोधकांना आश्वासन देऊन ठेवलें आहे कीं,

समर्थ सद्गुरु पूर्णभावें सेविती । त्यांचे सर्व हि मनोरथ पुरती ।
सर्व कामना परिपूर्ण होती । सद्गुरुसमर्थप्रतापें ॥

किंवा खुद्द श्रीसमर्थांचा रघुनाथभटाच्या निमित्तानें अखिल महाराष्ट्राला, सर्व संशोधकांना व श्रीसमर्थसेवकांना आशीर्वाद आहे कीं,

" तुमचें मन मजवरी बहुत आहे ते तुमचे आवडीच्या
गुणें कल्याण होईल ऐसें नेमस्त चिन्ह दिसतें । "

अशा रीतीनें श्रीसमर्थांच्या चरणीं मस्तक ठेवून व त्यांचा आशीर्वाद मिळवून पाच, दहा, पधरा, वीस, शमर, पाऊणशें, पन्नास, पचवीस

## निष्ठावंत तरुण रामदासी संशोधक

एकत्र जमून, विशिष्ट योजना ठरवून श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारादि कार्यें निमूटपणें अव्याहत चालवितील तर त्यांच्या हातून राष्ट्राची, राष्ट्रधर्माची, वाङ्मयाची अपूर्व सेवा घडून श्रीसमर्थांची कृपादृष्टि महाराष्ट्राकडे पुनरपि वळल्यावांचून राहणार नाहीं, असा विश्वास वाटतो. प्रपंचाचा लकडा पाठीमागें नसला तर उत्तम च, पण प्रपंच चालवून हि हीं कार्यें करतां येतील. संघटना पाहिजे. इतके सुशिक्षित तरुण, आचारविचारवंत उत्साही सांप्रदायिक, पुण्य संकल्प करून व प्रतिज्ञापूर्वक श्रीसमर्थांच्या कायद्यांना अनुसरून संघटित होऊन कामास लागतील तर ते महाराष्ट्रसमाजावर आपलें पारमार्थिक राज्य स्थापन करितील, यांत संशय नाहीं. असा तरुण रामदासी निरहंकार, निस्पृह, निर्लोभ असावा.

सद्गुरुकृपेचेनि बळें । अपरोक्षज्ञानाचेनि उमाळें ।
मायेसहित ब्रह्मांड सगळें । दृष्टीस न ये ॥

इतकी निस्सीम निस्पृहता त्याच्या ठिकाणीं असावी.

लागतां सद्गुरुवचनपथें । जालें ब्रह्मांड पालथें ।
तरी ज्याच्या शुद्ध भावार्थें । पालट न धरिजे ॥

इतका श्रीसमर्थचरणीं त्याचा निस्सीम भाव असावा. श्रीसमर्थांपासून तो निराळा नसावा. श्रीसमर्थांच्या वैभवा वेगळें त्याचें वैभव नसावें. त्याचा निराळा लौकिक नसावा, त्याचें सुखें अस्तित्व हि निराळें नसावें. श्रीसमर्थ-चरणीं तो विरघळून गेलेला असावा. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, पाचव्या

दुसऱ्या विषयाच्या समासांत सत्शिष्याचीं जीं लक्षणें दिलेलीं आहेत, त्या लक्षणांनीं तो युक्त असावा.

महाराष्ट्रांतील धर्मनिष्ठ तरुणांना हें कार्य केव्हां तरी करावें लागणार च आहे, मग त्याचा आरंभ आतां होवो किंवा कालांतरानें होवो. कार्याचें क्षेत्र विस्तृत आहे. पांच पंचवीस तरुण दहा वीस वर्षें खपतील तेव्हां कार्याची थोड्यांत भरण्यासारखी उभारणी होईल. विद्यमान काळांत त्यांच्या हातून एवढी मोठी कामगिरी व्हावी कीं, त्यांचा अंमल गत आणि भावी काळावर निर्बंध चालावा. समाजेलतेची कोणती च बाब त्यांच्या भेदक नजरेंतून सुटण्याचें कारण नाहीं. हा संप्रदाय अखाडव्यापक आहे. विद्यमान काळाकडे तर त्यानें पाहिलें च पाहिजे, पण भूत आणि भविष्य काळ हि त्याच्या नजरेंतून निसटूं शकत नाहीं. त्याचा विशेष भर आपल्या संकल्पाप्रमाणें परमेश्वरावतारी श्रीशिवछत्रपतींनीं स्थापिलेल्या देवब्राह्मणांच्या राज्यावर असणार, हें उघड आहे. अशा स्वरूपाच्या संप्रदायाची सेवा करणारा

## श्रीरामदासांकित सेवकसंघ

निर्माण व्हावा, अशी इच्छा आहे. मजसारख्या एकट्या दुकट्या दुर्बळाचें हें काम नव्हे. महाराष्ट्रांतील जाणत्या तरुणांनीं तें मनावर घेतलें पाहिजे. त्यांनीं पाळावयाचे आचारविचाराचे नियम तयार आहेत. ते सारे दासबोधांत दिलेले आहेत. ते त्रिकालाबाधित आहेत. संप्रदायसेवकांनीं निरपवाद रीतीनें पाळावयाचे १००१ नियम दासबोधांतून कोणाला हि उतरून काढून, त्यांची विषयवारी कावर्णी येईल. श्रीमत् ग्रन्थराज दासबोध हा आपला कायद्यांचा ग्रन्थ होय. तो मस्तकीं धारण करून त्यांतील विचारांशीं एकजीव होऊन कार्य करणारे आचारवान् राष्ट्रधर्मसेवक निर्माण झाले पाहिजेत. तसे असतील हि. त्यांचा संघ बनला पाहिजे. त्यांनीं प्रांत आणि कार्य यांची आपआपल्या अधिकाराप्रमाणें विभागणी करून घेतली पाहिजे. त्यांनीं निरिच्छ होऊन काम करावें, स्वतःच्या मनाशीं रमावें, स्वप्नांत हि द्वेष वाढूं देऊं नयेत. हे नुसते माझ्या मनांतील तरंग होत. त्यांची मनांत इतकी गर्दी होत आहे कीं, ते मला धड व्यक्त हि करतां येत नाहींत. एक विचारतरंग उठतो, तो मी

नमूद करूं जावों, तों दुसरा तरंग उठून तो पहिल्यास दडपून आपण पुढें होतो. त्यामुळें मला माझे सर्व विचार व्यक्त करतां आले नाहींत. जे विचार मनांत येतात त्यांत हि थोडे स्पष्ट व बहुतेक अस्पष्ट असतात. तशांत त्यांच्यांत ही गर्दी. त्यामुळें जे कागदावर उतरले जात आहेत, ते माझे मला च समजेनासे होतात. कांहीं हरकत नाहीं. नकल्यांचे ते नुसते विचार आहेत. श्रीसमर्थांच्या कृपेनें प्रत्यक्ष काम करतांना कार्यकर्त्यांना आपोआप जे विचार सुचत जातील ते च खरे. माझी इच्छा इतकी च कीं, कोणीकडून तरी, केव्हां तरी, श्रीसमर्थांची कृपादृष्टि पुनरपि महाराष्ट्राकडे वळावी.

श्रीरामदासांकित निष्ठावंत तरुण श्रीसमर्थसेवकांचा जो भावी संघ निर्माण व्हावयाचा आहे, त्यास मी आतांपर्यंत झालेल्या

## श्रीरामदासी संशोधनाचा विस्तृत अहवाल

सादर करीत आहे. आतांपर्यंत फार थोडें संशोधन झालें, बहुतेक उरलें आहे. हा संपूर्ण अहवाल किंवा गेल्या अठावीस वर्षांत झालेल्या संशोधनाचें हें वृत्त सादर करतांना खाजगी गोष्टी कोणत्या सांगाव्या आणि कोणत्या सांगूं नयेत, याचें मला वारंवार कोडें पडणार व माझें मन थबकणार, असें दिसतें. आरंभाला च कोडें पडलें आहे कीं, श्रीरामदासी संशोधनाकडे चित्त कसें वळलें, हें बोलावें कां न बोलावें. कोणास विचारावें ? लोकमान्य असते तर त्यांना विचारलें असतें. पण ते च प्रत्यक्ष कशास पाहिजेत आणि ते कां आपल्या सर्वांच्या जन्मास पुरले असते ? ते स्वतः कसें वागले, हें सर्व जगापुढें आहे. ते स्वच्छ सांगते कीं, खाजगी गोष्टी मुळीं च बोलूं नयेत आणि लिहूं तर नयेत च. महाराजांना विचारावें, तर तें हि रहस्य असून आज अशक्य झालें आहे. तेव्हां ते काय सांगते हें हि त्यांच्या चरित्रावरून च ताडलें पाहिजे. ते तेव्हा च सांगते कीं, सर्व कांहीं सांगावें, चोरून कांहीं च ठेवूं नये, मग कोणी बरें म्हणोत, वाईट म्हणोत. ळाळाजींना विचारता आलें असतें तर, त्यांनी सांगितलें असतें कीं, सारासार विचार पाहून जरूर तेवढें सर्व बोलावें. अशा स्थितींत लोकमान्यादिकांची परवानगी घेऊन ळाळाजींच्या मध्यम मार्गानें जावें, असें मीं ठरविलें आहे.

धुळें— १८५२ कार्तिक शु. २

## संशोधनास आरंभ

काही भाग ओलांडून व श्री रामदासी संशोधनाकडे चित्त कसें वळलें, अशा प्रश्न जवळचे आणि दूरचे करीत असतात, त्यांचें

काही येक भाग्य होतें पूर्वजांचें ।
पापीयासी कैंचें रामनाम ॥

एवढें च मोघम उत्तर देऊन संशोधनास आरंभ कोठून कसा झाला या मुक्कामावर थोडा वेळ थांबून वाचकांस आज एकदम संशोधनक्षेत्रात च प्रवेश करण्याचें ठरविलें आहे.

विद्यार्थीदशेंत उत्तरोत्तर नेहमीं दोन ग्रन्थ असत (१) कै विष्णुशास्त्री चिपळुणकर यांची निबंधमाला व (२) शके १८१२ त माडगावकर यांनीं छापलेल्या श्रीरामदास स्वामींच्या समग्र ग्रन्थांचें पुस्तक. पुत्र, पति, बंधु, मित्र, शत्रु, राजा इत्यादि कोणत्या हि नात्यानें श्रीरामाकडे पाहिलें म्हणजे सकौतुक निरतिशय आनंद व्हावा व

सौंदर्ये वा गुणे वा रघुपतिसदृशो नास्ति देवो द्वितीय. ।

हें सुभाषित प्रिय वाटावें. श्रीरामचरित्र आवडावें व तें आवडावें म्हणून श्रीरामाच्या अनन्य दासाचें चरित्र आवडावें व वाटावें कीं,

अहं रामस्य दासा ये तेषां दासस्य किंकर ।
यदि स्याम् सफलं जन्म मम भूयान्न संशय ॥

अशा स्थितींत उद्धवसुतकृत व आत्मारामबोवाकृत श्रीसमर्थांचीं चरित्रें वाचावयास मिळालीं. सन १८९०।९१ चे सुमारास बाबाजी अनंत तेंडुलकर, 'श्रीहरिवरदा' छापखान्याचे मालक, हे 'श्रीसमर्थरामदासचरित्र व समग्र ग्रंथ' या नावाचें मासिक काढीत असत त्या मासिकांत हीं दोन चरित्रें आलीं होतीं. १८२३ च्या माघांत त्या मासिकाचे पहिले दहा अंक मला एका गृहस्थाकडून वाचावयास मिळाले होते पहिल्या सहा अंकात उद्धवसुतकृत श्रीसमर्थचरित्र संपूर्ण होतें व पुढच्या चार अंकांत आत्मारामबोवाकृत चरित्र अपूर्ण होतें. १८२४ च्या वैशाखापर्यंत हे दहा अंक मजजवळ होते. ते चार महिने या दोन चरित्रांच्या संगतींत गेले. त्यांच्या संगतींत असतां च १८२४ चैत्र वद्य ६ (२९-४-१९०२) रोजीं प्रथम चाफळास गेलों व

तेथें श्रीरामाचें दर्शन झालें. त्यापाठोपाठ दुसऱ्या दिवशीं रामघळीचें दर्शन आणि कुबडीतीर्थाचें स्नान घडलें, तिसऱ्या दिवशीं चवतेश्वरास गेलों, चवथ्या दिवशीं श्रीसज्जनगडावर श्रीसमर्थसमाधीपाशीं यथावयास मिळालें आणि पाचव्या दिवशीं जरंड्याच्या मारुतीपाशीं होतों. आठवत नाहीं अशा वयात या ठिकाणापैकीं कांहीं ठिकाणीं नेला गेलों होतों, पण आठवणींत असा हा प्रथम च गेलों. या बहुतेक ठिकाणाचें वर्णन पूर्वीं विविध विषयात व प्रस्तावनात येऊन गेलें आहे व पुढ्हा पुढें हि प्रसंगोपात्त येईल. बाकी त्यात आता जगाला नवीन असें कळावयाचें काय उरलें आहे! त्या त्या ठिकाणीं दर्शनार्थ जाणाऱ्याच्या भावनेंत च काय नवीनपणा उत्पन्न होऊं शकत असेल तेवढा च खरा. त्या भावनाचा साक्षी ज्याचा तो! असो.

आत्मारामयोवाकृत चरित्र अपुरें च होतें. तीं दोन्हीं चरित्रें बाजारात कोठें मिळू शकलीं नाहींत. त्या वेळीं श्री. तात्यासाहेब केळकर यांचे वडील बंधु कै. नारायणराव चिंतामण केळकर, हे धुळ्यास इंग्रजी शाळेंत शिक्षक होते व निर्णयसागर चालवीत असलेल्या काव्यसंग्रहाचे संपादक होते. त्यांनीं मला वरील दोन चरित्रें व शके १७९२ त छापलेला महिपतिकृत संतविजय ग्रन्थ, असे तीन श्रीसमर्थांच्या चरित्राचे ग्रन्थ त्या च वर्षाच्या आश्विनात मुंबईस मिळवून मागवून दिले. या च सुमारास कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांचा श्रीसमर्थांवरील निबंध ग्रन्थमालेंत आला. त्या निबंधात त्यांनीं श्रीसमर्थांच्या ग्रन्थापैकीं तोंपर्यंत प्रसिद्ध न झालेल्या प्रकरणाची यादी देऊन आपणांस दोनशें वर्षांमागची दासबोधाची एक पोथी मिळाली आहे, असें जाहीर केलें. आज जरी ग्रन्थराजाच्या अनेक जुन्या प्रती उपलब्ध आहेत किंवा त्याचा पत्ता लागलेला आहे, तरी त्या वेळीं मिळालेल्या एका प्रतीची च अपूर्वता यावयाची, अशी संशोधनाची स्थिति होती. कै. राजवाडे त्या वेळीं कै. बाळासाहेब मिरजकर यांच्या निमित्तानें बहुधा कोल्हापुरास असत. दासबोधाची सदरहु पोथी व श्रीसमर्थांचीं इतर प्रकरणें आमच्या हवालीं केल्यास आपण त्याचें प्रकाशन करूं, अशी विनति सत्कार्योत्तेजक सभेनें पत्रद्वारें कै. राजवाडे यास केली व ती त्यांनीं मान्य केली. ती पोथी व तो संग्रह मिळविण्यासाठीं कोल्हापुरास गेलों व १८२५ वैशाख शु. १२ ( १।५।०२ ) रोजीं सदरहु पोथी व संग्रह कै. राजवाडे यांनीं आमच्या स्वाधीन केला. हा संग्रह मूळचा कोठील, याची राजवाड्यांना हि कल्पना नव्हती. त्या संग्रहाविषयीं ते आपल्या निबंधात

म्हणतात : " नारायणबोवा कापनईकर हा नांवाचे एक तरुण व चिकित्सक रामदासी कोल्हापुरांत होते. ते गेल्या वर्षी वारले. त्यांनीं दासांच्या वंशा व ग्रन्थांचा संग्रह केलेला आहे. पैकीं एक दासबोधाची पोथी गुरुपरंपरेनें त्यांजपाशीं आली. ही पोथी समर्थांच्या हयातींतील आहे असें कळतें. अर्थात ही पोथी दोनशें वर्षांची आहे. इतर हि दुसरे ग्रंथ त्यांजपाशीं होते. ते त्यांचे शिष्य रा. घेवडे यांनीं माझ्या स्वाधीन केले."

श्री रामदासी संशोधनाचे बाबतींत सर्व बाजूंनीं महाराष्ट्रानें केलेली आजची प्रगति पाहिली, म्हणजे त्या वेळीं आपण आपल्या अज्ञानाचें जें प्रदर्शन करीत असूं, त्याचें आज स्मरण झालें म्हणजे हंसूं येतें. गिरिधर कोण, त्यांची परंपरा कशी, त्यांचा मठ कोठें, त्यांचे ग्रन्थ कोणकोणते, या गोष्टी महाराष्ट्राच्या आज पूर्ण परिचयांतल्या झाल्या आहेत. गिरिधरांच्या समर्थप्रतापाला तर महाराष्ट्रानें आज हृदयांत कायमचें स्थान दिलें आहे व त्याची विविध चर्चा चालविली आहे. पण अगदीं आरंभींचें या बाबतींतील आपलें अज्ञान पाहून मात्र जी आज करमणूक होत आहे, ती वाचकांची हि करून देण्याला कांहीं हरकत नाहीं. अठ्ठावीस वर्षांपूर्वीची स्थिति आणि आजची प्रगति यांची तारतम्यानें कल्पना होण्याला हें एक उदाहरण पुरेसें होईल. १८२५ च्या वैशाखांत राजवाड्यांचा जो छोटा संग्रह कोल्हापुराहून धुळ्यास आला, -सहा महिने धुळ्यास त्याचें निरीक्षण झालें आणि कार्तिकाच वद्य ६ ( १०-११-०३ ) च्या केसरीच्या अंकांत सत्कार्योत्तेजक सभेच्या चिटणीसानीं पत्र पाठवून महाराष्ट्राचे-आहीर विनंति केली. त्या विनंतिपत्रांत चिटणीस गंभीरपणानें म्हणतातः "समर्थकालीन रामदासी पंथापैकीं कांहीं कांहीं साधुसंतांचीं काव्यें आम्हांस प्रकाशनार्थ रा. राजवाडे यांजकडून मिळालीं आहेत. त्यांत ' वेणिस्वामी ' आणि ' गिरिधरस्वामी ' यांचीं च प्रकरणें पुष्कळ आहेत. हे वेणिस्वामी आणि गिरधरस्वामी कोण याची शंका घेण्यास फारसें कारण नाहीं; कारण समर्थांच्या शिष्यवर्गांत स्त्रियांपैकीं वेणुबाई हा तर प्रसिद्ध आहेत व 'गिरिबाई म्हणून एक शिष्यीण होती असें दिसतें. देवदासकृत जी संतमालिका कांहीं महिन्यांपूर्वी ग्रन्थमालेंत रा. राजवाडे यांनीं प्रसिद्ध केली तींत पुढील ओवी आहे—

स्त्रियामाजी देखिलि ताई। तैसी च वेणा बहिणाबाई।
रामदासांकित गिरिबाई। तुकिया पाया विनटली॥

ह्यावरून तर वेणिस्वामी आणि गिरिधरस्वामी हे कोण याबद्दल शंका घेण्यास जागा उरत नाहीं; परंतु ह्या दोघींनीं आपल्या स्वतःचा उल्लेख सर्वत्र पुल्लिंगी केला असल्यामुळें व कोठें च स्त्रीलिंगी केला नसल्यामुळें केसरीद्वारा शोध केलेला बरा, असें वाटून हें पत्र लिहीत आहे. ... वेणी आणि गिरिधर म्हणजे वेणुबाई आणि गिरिधरबाई ह्या च किंवा दुसरे कोणी, याचा उलगडा कोणी हि खाजगी पत्र पाठवून अथवा केसरीच्या मार्फत करावा, अशी मी आतुरतेनें परंतु नम्रपणें विनंती करितों. " अशा रीतीनें सभेच्या विद्वान् चिटणीसांनीं तर श्रीसमर्थप्रतापकार गिरिधर यांना गिरिबाई बनविले-च, पण नंतर सुमारें महिन्यानें कोणा चिकित्सकानें केसरींत च पत्र पाठवून-महाराष्ट्राच्या वतीनें चिटणीसांच्या ठरावावर आपला शिक्का मोर्तब केला होता, असें मला चांगलें स्मरतें. गिरिधराचा मठ कोठें पंजाबांत किंवा बंगाल्यांत नव्हता. निजामच्या राज्यांतील मराठवाड्यापैकीं एका प्रमुख जिल्ह्याच्या ठिकाणीं, बीड येथें, गिरिधरांचे दोन पुरातन मठ आहेत, त्या वेळीं निजामच्या मुलुखांत केसरीचा अप्रतिहत संचार होता, हल्लीं सारखी त्यास अकारण बंदी नव्हती, फार काय पण जवळच्या मिरजेच्या वेणुबाईच्या मठाची परंपरा पुढें गिरिधरांपासून च चालत आलेली आहे, तरी सुद्धां कोणास च कांहीं स्वतःची हि माहीती नव्हती किंवा पर्वा नव्हती, आणि पुण्याच्या केसरींत येचाळीस ग्रन्थांचे कर्ते गिरिधर यांची गिरिबाई म्हणून पुराल संभावना होत होती ! त्या वेळच्या संशोधनाची अशी कौतुकास्पद वाल्यावस्था होती. गिरिबाईचे पुन्हां गिरिधर केव्हां झाले, तें पुढें क्रमांत पाहू.

कै. राजवाडे यांजकडून जो ग्रन्थ मिळाला, तो मूळचा गिरिधरांच्या बीड मठांतील होय. बीडमठाची हकिकत सांगतांना या संग्रहाचें सविस्तर विवेचन पुढें करूं. ग्रन्थराजाची ही पोथी बहुधा गिरिधरांच्या हातची आहे. ऐकण्यांत किंवा वाचण्यांत होतें कीं, डोमगांव म्हणून एक गांव आहे, तेथें कल्याणांचा मठ असून त्या मठांत ग्रन्थराजाची कल्याणांच्या हातची मूळ अस्सल प्रत आहे. दासबोध छापावयाचा च तर तो इतर कोणत्या हि प्रतीवरून छापविण्यापेक्षां अस्सल प्रतीवरून च छापला गेला तर फार बरें, असें मनांत आलें. पण डोमगांव कोठें आहे, हें कोणास ठाऊक होतें ? डोमगांव कोठें आहे हें आज सर्वांना ठाऊक झालें आहे, तेथें जाऊन दासबोधाच्या मूळ पूर्वाद्ध प्रतीचें व श्रीसमर्थांनीं पाठून दिलेल्या दिव्य

किल्याचें शेंकडों जण आतां दर्शन घेऊन आले आहेत व अलिकडे तर डोमगावची पालखी गडावर उत्सवाला येऊं लागली आहे, पण त्या वेळीं हें कल्याणाचें डोमगांव आहे कोठें हें च प्रथम कळेना. गुरुगुर्यांकडे कोठें तरी आहे, असें सागत, म्हणून टपालानें एक पत्र पाठविलें, पण ' पत्ता लागत नाहीं ' म्हणून तें पत्र फिरत फिरत अखेरीस मुंबईहून धुळ्यास परत आलें. शेवटीं डोमगाव कोठें आहे याचा शोध चाफळास लागला आणि डोमगावमठपतींना चाफळसंस्थानाधिपतींचें पत्र घेऊन १८२५ च्या मार्गशीर्ष-पौषांत डोमगांवीं जाण्याचें ठरविलें. डोमगावीं जाण्यापूर्वी, आधीं श्रीसमर्थांनीं बारा वर्षे पुरश्चरण केलें ती तपोभूमि पहावी व त्याचे पहिले शिष्य उद्धव-स्वामी यांच्या करितां त्यानीं स्थापिलेल्या मारुतीचें दर्शन घ्यावें आणि मग पुढें जावें, असें मनानें घेतलें आणि म्हणून प्रथम पंचवटीजवळच्या टांकळी गांवीं मार्गशीर्ष वद्य १२ ला गेलों. नाशकापासून टाकळी सुमारें दीड कोस पडेल. बाहेरचे यात्रेकरू लोक नाशकास श्रीरामाच्या दर्शनासाठीं गेले, तर त्यातले पाच जण काहीं टाकळीस मारुतीच्या दर्शनास जात नाहींत. ठाऊक च नसतें. पण आता यापुढें असें न व्हावें. श्रीरामचरित्रात पंचवटीचें जें माहात्म्य तें च श्रीसमर्थचरित्रात टाकळीचें होय. म्हणून पंचवटीस श्रीरामाच्या दर्शनासाठीं जाणाऱ्या कोणी हि जवळ च एकवार टांकळीस जाऊन ती पवित्र भूमि पाहिल्याखेरीज नाशिकक्षेत्र सोडूं नये, अशी विनंति आहे.

वाचकांसह टाकळीमठात प्रवेश करण्यापूर्वी, आजपर्यंत माझ्या पाहण्यांत जे मठ आले, त्यांवरून एकंदर मठाविषयीं माझ्या ज्या सामान्य कल्पना झाल्या आहेत, त्या वाचकांस आधीं सादर करतो, आणि मग आपण टाकळी-मठांत जाऊं, डोमगांवीं जाऊं आणि पुढें जाऊं. माझ्या या कल्पनाना, कोणत्या हि बाबतींत आणि कोणत्या हि मठात अपवाद मुळीं च आढळला नाहीं, असें मात्र नव्हे. अलिकडे ज्या मठांत तरुण मंडळी आहेत, अशा मठांत कोठें कोठें जागृतीचीं चिन्हें दिसतात. पण तीं मी टिकाऊ मानीत नाहीं. कारण तरुण मोठे होत चालले म्हणजे ते अखेरीस वृद्धांच्या च मार्गाला लागलेले अनेक पाहिले आहेत, त्यामुळें हल्लीं एकाद दुसऱ्या मठांत दिसत असलेल्या जागृतीचा विश्वास धरवत नाहीं. तथापि असले अपवादात्मक मठ सोडले तरी

## एकंदर मठांची सर्वसामान्य स्थिति

बहुधा पंचविध स्वरूपाची आढळते. त्या स्वरूपाचें आविष्करण आज मोकळ्या मनानें करावें, असें ठरविलें आहे. इतक्या मोकळेपणानें मी पूर्वी कधीं बोललों नाहीं; पण केव्हां तरी बोललें च पाहिजे, एरव्हीं सुधारणेचा मार्ग च खुंटतो. तें पंचविध स्वरूप असें:

( १ ) श्रीसमर्थांनीं हा संप्रदाय प्रवर्तित कां केला, त्याचीं लक्षणें कोणतीं, त्याचें वैशिष्ट्य कशांत आहे, याविषयींची जाणीव सर्वत्र बुजलेली दिसते. नुसती जिज्ञासा हि कोणाच्या ठिकाणीं उरलेली दिसत नाहीं. तिन्हाईत कोणी त्यांच्या ठिकाणीं तशी जिज्ञासा जागृत करूं म्हणेल, तर तें हि शक्य नाहीं. आपण श्रीसमर्थांचे म्हणवितो, त्यांच्या नांवावर भिक्षा मागतो, त्यांच्या पुण्याईनें इनाम जमिनींचा उपभोग घेतो व चरितार्थ चालवितो, तर संप्रदायाच्या बाबतींत आपलें कांहीं कर्तव्य असलें पाहिजे, याची नुसती कल्पना हि कोणाच्या मनांत येत नाहीं. सर्वत्र सारखी अनास्था आढळते.

( २ ) आपण सांप्रदायिक आहोंत, याचा अर्थ भिक्षेवर चरितार्थ चालविण्याचा आपणांस हक्क आहे, एवढा च बहुधा केला जातो. इतर जसे पोटाचे धंदे आहेत, त्यांतला च हा एक धंदा आहे, अशी समजूत झालेली आढळते. पोटासाठीं कोणी वकिली करतो, कोणी नोकरी करतो, कोणी दुकानदारी करतो आणि हा हक्कानें भिक्षा मागतो. चरितार्था-पलिकडे या भिक्षेचा कांहीं अर्थ आहे, ही भिक्षा सामान्य नव्हे, तिच्या योगानें आपणांवर फार मोठी जबाबदारी येऊन पडते, याची कल्पना च नसते. अर्थात् मठपति होणें हा एक चरितार्थाचा च धंदा होऊन बसल्या-मुळें इतर धंद्याप्रमाणें या हि धंद्यांत भाऊबंदकीचीं भांडणें बहुधा सर्व मठांतून एक तर पूर्वीं झालेलीं आहेत, किंवा हल्लीं सुरू आहेत, किंवा सुरू होण्याच्या तयारींत आहेत.

( ३ ) चरितार्था व्यतिरिक्त कोठल्या हि मठांत देशस्थितीची चाळणा नाहीं, सार्वजनिक कर्तव्याची विवंचना नाहीं, किंवा कोणती हि महत्त्वाकांक्षा नाहीं. चरितार्थाशिवाय कोणापुढें निराळें ध्येय उरलें नाहीं. संप्रदायाचें जें ध्येय होतें त्यावरून दृष्टि ढळलेली आहे. ध्येय नाहीं, नियम नाहीं, बंधन नाहीं, नित्य क्रम नाहीं.

(४) नाहीं म्हणायाला बहुतेक ठिकाणीं उपासनेची बाह्य अंगें पाळण्यांत येतात. त्यावरून एकादा च दिवस जाऊन पाहणाऱ्या नवख्या मनुष्याचा निराळा ग्रह होण्याचा संभव असतो. जास्त दिवस राहून पाहिल्यास त्याच्या हि लक्षांत आल्यावांचून रहात नाहीं कीं, आपण जी पहात आहों ती निर्जीव यंत्राप्रमाणें नुसती क्रिया चाललेली असते. तींत प्राण उरलेला नसतो. प्राण असता तर तळमळ असती, तळमळ असती तर हालचाल असती आणि हालचाल असती तर ती हालचाल करणारावर, पाहणारावर, शेजाऱ्यावर, समाजावर, राष्ट्रावर परिणाम घडलेला दिसला च असता. सर्वत्र सामसूम झालेली आहे.

(५) या सर्वांचा जो परिणाम व्हावयाचा तो च झालेला आहे. मठांतील पोथ्या, पुस्तकें, कागदपत्रें यांची वाताहत झाली आहे. ही वाताहत निरनिराळ्या ठिकाणीं कसकशी झाली याची कहाणी ऐकली म्हणजे जीव कासावीस होतो, आतडें तुटूं लागतात, मुखातून शिव शिव शब्द बाहेर पडतात !

तरी देखील बहुतेक मठात पोथ्यापुस्तकांचा व कागदपत्रांचा इतका गळांठा अद्यापपर्यंत उरलेला असावा, हें च आश्चर्य, ही च श्रीसमर्थांची कृपा, हा च त्याचा अनुग्रह होय. ज्यांनीं ज्यांनीं आजपर्यंत इतका तरी संग्रह राखून ठेवला त्यांची धन्य होय. महाराष्ट्रावर हे त्यांचे उपकार होत. नांवें ठेवणें सोपें आहे, नांवें ठेवणारांपैकीं कोणी हि आज त्यांच्या जागीं असते, तरी कांहीं निराळा प्रकार घडला नसता. अडीचशें तीनशें वर्षांचा लोटलेला काळ व त्या कालांत समाजावर आलेलीं अनेक घोर संकटें आणि राष्ट्रांत घडलेल्या क्रान्त्या यांचा विचार केला म्हणजे आज इतकी तरी ग्रंथसंपत्ति आपल्या दृष्टीस पडूं शकली, याची धन्यता वाटते. शनिवारच्या वाड्याची बाहेरची भिंत व आंतील अवशिष्ट भाग पाहून जशी पेशव्यांच्या वैभवाची अटकळ होते किंवा रायगडावरील श्रीशिवछत्रपतींच्या वाड्याचे व इतर ते भव्य आणि भयाण अवशिष्ट भाग पाहिले म्हणजे जसा १५९६ च्या आनंद संवत्सराचा ज्येष्ठ शु. १३ चा दिवस आठवतो व त्या दिवशींच्या गडावरील गडबडी-चें चित्र डोळ्यापुढें उभें राहतें, तद्वत् प्रत्येक मठात आज उरलेला गळांठा पाहून श्रीसमर्थकालीं हे मठ म्हणजे

केवढालीं प्रचंड विद्यापीठें

होतीं, याची कल्पना होते. येथून पुढें आपणास प्रत्येक मठाचा परिचय करून

घ्यावयाचा आहे, तेव्हां प्रत्येक मठांतील गळांठा आपण पाहूं च. पण गिरिधर-महाराजांच्या एकट्या श्रीसमर्थप्रतापावरून हि आपलें वरील विधान सिद्ध होत आहे. प्रतापाच्या दहाव्या आणि अकराव्या समासांत गिरिधरांनीं श्रीसमर्थांच्या महंतशिष्यांचीं नांवें दिलीं आहेत व सोळाव्या आणि सतराव्या समासांत अनेक ग्रन्थकारांचा व महापुरुषांचा उल्लेख आला आहे. हे चारी समास संशोधकांना फार महत्त्वाचे आहेत. त्यांतल्या त्यांत सोळाव्या आणि सतराव्या समासांची रचना फार मोहक आहे. या सान्या सत्पुरुषांची पंगत बसली आहे व प्रत्येकाच्या पात्रांत त्याच्या आवडीचा पदार्थ वाढलेला आहे, अशी कल्पना करून प्रत्येकाचा नामनिर्देश करतांना प्रत्येकाच्या ग्रन्थांतील आणि चरित्रांतील वैशिष्ट्य गिरिधरांनीं मोठ्या खुबीदार रीतीनें दर्शविलें आहे. याचा काय अर्थ होतो ? याचा हा च अर्थ कीं, या सर्व सत्पुरुषांचे ग्रन्थ गिरिधरांच्या मठांत होते, ते त्यांनीं अभ्यासिले होते, त्यांचें सार निवडिलें होतें. एरव्हीं हे दोन समास इतक्या मार्मिकपणानें त्यांस लिहितां च आले नसते. गिरिधरांच्या मठाप्रमाणें सर्व च मठांत पूर्वी होऊन गेलेल्या सत्पुरुषांच्या ग्रन्थांचा संग्रह केलेला असे. दासविश्रामधामकर्ते आत्माराम महाराज यांचा येकेहाळी येथील मठ पाहून हा च अनुभव आपणांस आला. स्वानुभवदिनकर ग्रन्थाचे कर्ते दिनकर यांचा तिसगांव येथील मठ पाहून हा च सिद्धान्त आपण काढला. अशी हीं श्रीसमर्थांचीं श्रीसमर्थविद्यालयें किंवा विद्यापीठें त्या वेळीं सर्व देशभर शेंकडो पसरलेलीं होतीं. त्या विद्यापीठांची आजची स्थिति पाहून त्यांचें तत्कालीन वैभव आपणांस जाणावयाचें आहे.

१ योजना अशी आहे कीं, प्रथम प्रत्येक ठिकाणाचें त्रोटक वर्णन द्यावें, त्याचा इतिहास सांगावा, परंपरा असल्यास ती पहावी, कांहीं अवांतर माहिती मिळाल्यास ती द्यावी आणि मठांत व इतरत्र उपलब्ध झालेली सर्व ग्रन्थादि संपत्ति वाचकांपुढें ठेवावी. या ग्रन्थादिकांना जो अनुक्रमांक द्यावयाचा तो, दुसरा मठ किंवा स्थळ लागलें तरी, सारखा च पुढें पुढें चालू ठेवावयाचा. हेतु हा कीं, यापुढें कोणता हि ग्रंथ किंवा ग्रंथांतील कोणता हि भाग कोणाला केव्हा हि पहावासा वाटला तर पट्कन ग्रन्थ काढून देण्यास सुलभ जावें. अशा पद्धतीनें क्रमाक्रमानें आपणांस यापुढें सारे मठ आणि ऐतिहासिक स्थळें पहावयाचीं आहेत. त्या क्रमांत प्रथम टांकळीचा मठ येतो.

१ . . . १८५६ ज्येष्ठ शु. ६

## श्रीसमर्थांची तपोभूमि

टांकळी ही श्रीसमर्थांची तपोभूमि होय. प्राणिमात्रास मायाजाळीं गुंतविणारा पाश तोडून श्रीनारायण जे जांबेहून निसटले ते गोदावरीच्या कांठाकांठानें पंचवटीस आले. तेथें श्रीरामाचें दर्शन घेऊन जवळ च असलेल्या टांकळी गांवीं ते बारा वर्षे पुरश्चरणास राहिले. ठिकाण रम्य आहे. तें परम पावन पंचवटीपासून कोस दीड कोसावर आहे. तेथून तपोवन हि दूर नाहीं. खुद्द टांकळी हें खेडें नंदिनी ऊर्फ नासर्डी या लहानशा नदीच्या कांठीं आहे. तेथून नंदिनीचा व गोदावरीचा संगम अगदीं जवळ आहे त्या च संगमावर श्रीसमर्थांनीं पुरश्चरण केलें. श्रीसमर्थांनीं जेथें तपाचरण केलें त्या स्थानाच्या पवित्रपणाविषयीं काय सांगावें ! स्थळ निवांत आहे. एकांतप्रिय माणसाचें चित्त रमावें, असें आहे. पंचवटी, तपोवन, गोदावरी, संगम यांचें सांनिध्य, नितांत एकांत व जिकडे पाहावें तिकडे अंतश्चक्षूंना दिसणारीं श्रीरामचंद्रांचीं उमटलेलीं पाउलें, इतक्या गोष्टींची अनुकूलता असल्यावर अशा ठिकाणीं आयासावांचून चित्त एकाग्र व्हावें, हें स्वाभाविक होय !

## बारा वर्षे पुरश्चरण

अशा या पवित्र आणि रमणीय ठिकाणीं वयाच्या बाराव्या वर्षापासून तों चोविसाव्या वर्षापर्यंत बारा वर्षे श्रीसमर्थांनीं आपल्याशीं क्रमिलीं. श्रीसमर्थांचें सारें च चरित्र अद्भुत होय. आपल्या उपास्य देवताच्या जन्मतिथीला बरोबर त्या च घटकेला दुसऱ्या कोणाचा जन्म झाला आहे ? वयाच्या बाराव्या वर्षी दुसरा कोण सावध झाला आहे ? अशा अल्प वयांत सावध होऊन ऐन लग्नसमारंभांतून दुसरा कोण निसटला आहे ? दुसऱ्या कोणी इतक्या लहानपणीं बारा वर्षे एका ठिकाणीं राहून पुरश्चरण केलें आहे ? १५३० त श्रीसमर्थांचा जन्म. १५४२ पासून १५५४ पर्यंत त्यांनीं टांकळीस राहून पुरश्चरण केलें. त्याचा नित्यक्रम असा असे : पहाटेस उठावयाचें, शरीरधर्म सारून संगमावर अकरा बारा वाजेपर्यंत पुरश्चरण करावयाचें, नंतर पंचवटीस जाऊन माधुकरी मागावयाची, ती श्रीरामाला अर्पण करावयाची, नंतर प्रसाद म्हणून ती ग्रहण करावयाची. त्या काळीं नाशिक क्षेत्र हें विद्वानांचें माहेरघर होतें. पंचवटीच्या हल्लींच्या रामोपासकांवरून त्या काळच्या रामोपासकांची आपण कल्पना करूं तर चुकूं. त्या काळचे रामोपासक, रामाचे पुजारी जास्त भाविक, जास्त

निष्ठावंत, जास्त व्युत्पन्न असावेत. अशा विद्वानांच्या आणि उपासकांच्या संगतींत श्रीसमर्थांची तिसरा प्रहरची वेळ बहुधा जात असावी. लहानपणीं खुद्द जांबेस जो विद्याभ्यास झाला असेल, त्यानंतर पंचवटी क्षेत्रांत अशांच्या सहवासांत त्यांच्या ज्ञानांत भर पडली असावी.

## उद्धवांची जन्मकथा

या च अवधींत एके दिवशीं श्रीसमर्थ संगमावर ध्यानस्थ बसले असतां

अन्नपूर्णाबाई उद्धवमाता ।
गिरिधर महंताची कांता ॥

सती जाण्यासाठीं संगमावर आल्या. त्यांनीं दुरून त्या बाल योगिराजाला पाहिलें. ती तेजस्वी नयनमनोहर बालमूर्ति पाहून मातेच्या साहजिक मनांत आलें कीं, अशा पुण्यपुरुषाला शेवटचा नमस्कार करावा आणि सती जावें. त्यांनीं जवळ जाऊन नमस्कार केला आणि समर्थांनीं, न पाहतां, आशीर्वाद दिला, अष्टपुत्रा सौभाग्यवती भव! ही गोष्ट व पुढें काय झालें तें सर्व वाचकांस ठाऊक च आहे. समर्थांनीं गंगोदक सिंचिलें आणि झोंपेंतून मनुष्यानें जागे व्हावें त्याप्रमाणें गिरिधरमहंत उठले. आपणांस पहिला पुत्र होईल तो आपण श्रीसमर्थचरणीं अर्पण करूं असा त्या दंपतीनें संकल्प केला. तो पहिला पुत्र म्हणजे उद्धवस्वामी होत. या कथेला अस्सल कागदपत्राचा किंवा तत्कालीन चरित्राचा किंवा प्रकरणाचा अजून आधार मिळालेला नाहीं, पण इतकें निर्विवाद आहे कीं, उद्धवस्वामींचा बाळपणापासून श्रीसमर्थांनीं अंगिकार केला होता. १५५४ त श्रीसमर्थ तीर्थाटणास निघाले असतां त्यांनीं उद्धवबाळासाठीं टांकळीस मारुतीची स्थापना करून दिली. तो श्रीसमर्थस्थापित पहिला मारुती होय आणि उद्धव हे श्रीसमर्थांचे पहिले शिष्य होत.

टांकळीचा मठ हा उद्धवांचा मठ होय. उद्धवांचे मठ दोन, एक हा टांकळीचा व दुसरा इंदुरबोधनचा. या दोन्ही मठांची हकिकत व मठांतील संप्रदायाचा किंचित् परिचय पूर्वी श्रीसांप्रदायिक विविध विषयांत येऊन गेला आहे. (प्रथम खंड, विषयांक २४, २८, ३१, ३२, ३३, ३६, ३८, ४१, ५४, ५६, व द्वितीय खंड, विषयांक ५८, ८३ पहा.) श्रीसमर्थांच्या पश्चात्

## दिवाकर आणि उद्धव

यांच्यांत कलह सुरू झाला व तो पुढें बरीं च वर्षे टिकला, असें श्री रामदासी ग्रन्थमालेंतील नववा भाग, श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, यावरून निदर्शनास आलें. दिवाकरांचें म्हणणें कीं, चाफळमठाचा पारपत्याधिकार आपण चालवावा, अशी श्रीसमर्थांनीं अनेक वेळां अनेकांच्या समक्ष आपली इच्छा प्रकट केली होती व त्याप्रमाणें तो अधिकार आपण चालविणार आणि उद्धवांचें म्हणणें कीं, श्रीसमर्थांनीं शेवटीं आपणांस मठांत राहण्याविषयीं आज्ञा केली, ती काय उगी च पारपत्याधिकारावांचून च असेल काय? त्या कागदपत्रांच्या भागांत जीं पत्रें आलीं आहेत, तीं बहुतेक दिवाकरांकडील असल्यामुळें त्या कागदपत्रांत उद्धवांची बाजु साकल्यानें आली असण्याचा संभव कमी आहे. पण आज त्या वादावर उद्धवांच्या तर्फे नवीन प्रकाश पडेल, अशी माहिती देण्याचा योग आला आहे. मला हि ही माहिती पूर्वी झाली नव्हती किंवा सुचली नव्हती.

श्रीसमर्थप्रताप ग्रन्थ किंवा दिवाकरांकडील कागदपत्रें उपलब्ध होण्या-पूर्वी टाकळीमठांतील संग्रह हातीं आला होता व त्या च वेळीं मी तो एकदां चाळून त्याचें टांचण केलें होतें. त्या संग्रहांत कोठें कोठें कोणा शिवरामांची कविता होती, पण हे शिवराम कोण याची कल्पना झाली नव्हती. 'हे शिव-राम कोण असावे, श्रीसमर्थांच्या सारखी च त्यांची तळमळ दिसते, त्यांची कविता फार ठसक्याची आहे, त्यांच्यावर लोक बाळंटें आणीत' इत्यादि शेरे टांचणांत मी ठिकठिकाणीं मारून ठेवले आहेत. शेरे मारले, पण शिवराम कोण याचा कांहीं मला उलगडा झाला नव्हता. इंदुरबोधन मठांतील संग्रहांत हि शिवरामांची कांहीं कविता आढळली. त्या कवितेच्या आधारें 'श्रीसमर्थांचे शिवराम' म्हणून विविध विषयांत अनुक्रमांक ८२ चें एक टिपण हि लिहिलें, तरी पण शिवराम कोण याचा कांहीं मला निर्णय करतां आला नव्हता. पण हें संशोधनवृत्त लिहिण्याचे हेतूनें दोन महिन्यांपूर्वी टांकळी-मठांतील संग्रह पुन्हां बारकाईनें वाचावयास घेतला असतां मला असें स्वच्छ दिसून आलें कीं, हे शिवराम दुसरे तिसरे कोणी नसून

## शिवराम म्हणजे उद्धव च

होत. इंदुरबोधनमठांतील संग्रहावरून ही गोष्ट लक्षांत येत नाहीं, पण टांकळी-

उभें राहणें सांगणें दुख कोणा ।
जगज्जीवना होतसे सीण नाना ॥ २

बहु जाचणी सोसणी सोसवेना ।
किती दीस अवधी ते ही कळेना ।
करुणाघना थोर निष्ठूर होसी ।
बहु आमुचा अंत कां पाहवोसी ॥ ३

जनें बोलवी पट्ट हा मागताहे ।

---

जनामाजि देईलसा कोण आहे ।
तुझें तां दिल्हें काय लोकां कळेना ।
कळेसें करावें जना सर्व हीना ॥ ४

जनाचे मना शब्द हे खोंचवाती ।
बहुतापरी वाउगें जाचिताती ।
नसे येथ दाता तथा पट्ट घेता ।
तुझा तूं चि आहेसि देवा समर्था ॥ ५

महीमंडळीं नृपती होत जाती ।
तयां काढणें स्थापणें न्यायनीती ।
जगज्जाळ जंजाळ हें चालवीसी ।
भ्रमें बोलती लोक नाना अपेसी ॥ ६

समस्तांसि तूं येकला पट्टदाता ।
जनामाजि देईलसा कोण आतां ।
वृथा बोलती पट्ट देऊं न आम्ही ।
भ्रमें बोलती सर्व हि गर्वउर्मी ॥ ७

जनाचें दिल्हें राहतें दीस कीती ।
पहावें मनामाजि वर्ची प्रचीती ।
हरीचें दिल्हेलें चिरायु चि होतें ।
जनाचें दिल्हें सीघ्र नासोनि जातें ॥ ८

मला तों नसे वासना कासयाची ।
परी हे जनाची वृथा शब्द ची ची ।

टिकेचा धणी तूं चि आहेसि देवा ।
पहासी किती चूकवीं सर्व गोवा ॥ ९

बहु पाडिला पेंच चांडाळ लोकीं ।
पुन्हा ही तयां ऊमळेना च सेकीं ।
बहु बोल बोलोनि नासोनि गेले ।
पुढें नासलें काम कोण्हा न तोडे ॥ १०

जयाचें तयाला चि तोळेल अंतीं ।
मनीं जाणती भक्त सर्वं प्रचीती ।
भुगोळासि अंत्राळ निर्माण केलें ।
जयाचें तयानें चि सर्वं धरीलें ॥ ११

तसें तूं तुझें सर्व ही चालवीसी ।
निमित्यें देहेधारकां लावितोसी ।
कळेना तुझें काय कर्णे समर्था ।
वगी वाटते मानसीं व्यर्थ चिंता ॥ १२

देहेधारकें बापुडीं काय रंकें ।
तयां बूडवीलें देहेबुद्धिपंकें ।
तुझा पार कोणासि कांहीं कळेना ।
बहुसाल निर्वूजलों बोलवेना ॥ १३

उदासीन हें सर्वदा वाटताहे ।
युगासारिखा दीन पोटीं न माये ।
बहु वेळ तां पाळिलें सर्व भक्तां ।
न ये बोलतां अंतरींची अवस्था ॥ १४

मला नावडे श्लाघ्यता मान कांहीं ।
घनें संपदेवीण ही चाड नाहीं ।
दुखें दाटती आंतडीं तुटताती ।
जळें लोटतीं लोचनीं दीनराती ॥ १५

त्वरें पावणें धांवणें देवराया ।
भ्रमें बाधितों सर्व व्याकूळ काया

दिनानाथ तां दीनचिंता करावी।
प्रभु आमची वासना पूरवावी ॥ १६

समर्थस्थळीं पूर्ण देवाल्य व्हावें।
भिमाचे प्रतिष्ठेसि तेथें घडावें।
घडेवा बहु भक्तिचा थोर व्हावा।
जनालागि आधार कांहीं असावा ॥१७

प्रभु राहिला पाहिला जेथजेथें।
स्थळें गाजली थोर तीर्थें च तेथें।
तथें हें कळायासि पुढें असावें।
नसे तेधवां स्थान कैसें कळावें ॥ १८

बहु पावली सर्व सीता दयाळें।
परी कां असें जाहलें कोण काळें।
बहुसाल विघ्नें असीं कां उदेलीं।
म्हणोनी हरी आमुची शांति जाली ॥ १९

बहु आमुचे फार अन्याय जाले।
म्हणोनी असे कष्ट तां दाखवीले।
कळे काय तुझे मनींचें कळेना।
बहु कष्टतों दुःख चिंता टळेना ॥ २०

तुला वीसरू कां पतिला दिनाचा।
जगज्जनका साक्ष तूं अंतरींचा।
असे ब्रीद तां काय टाकूनि दिल्हें।
बहु आमुचें पाप कैसें उदेलें ॥ २१

तुम्हावीण आधार आम्हासि नाहीं।
तुझें तां चि सांभाळणें सर्व कांहीं।
सुबुद्धी मला लावणें देवराया।
कुबुद्धी नको ऐक ही राघवा या ॥ २२

बहु जाहले फार अन्याय पोटीं।
तुवां पावले सर्व कोट्यानकोटी।

प्रभु काय वर्तणें त्या यासि व्हावें।
पुढें बोलवेना मुखें येक भावें ॥ २३

क्षमेचा क्षमासिंधु तूं सौख्यदाता।
तुला आमुची सर्वदा सर्व चिंता।
परी अंध अज्ञान आम्ही न जाणों।
कसी भक्ति ते ही करूं अल्प नेणों ॥ २४

प्रभु <u>शिवरामासि</u> आधार द्यावा।
बहु पाहतां जाहला फार गोवा।
तुसें तां चि अंझाळ वारूनि न्यावें।
मिठें अंतरीं ध्यातसों नित्य भावें ॥ २५

पूर्वी कागदपत्रें मिळालीं नव्हतीं, श्रीसमर्थप्रताप ग्रंथ उपलब्ध झाला नव्हता, तेव्हां या श्लोकांचा उमज पडणें शक्य नव्हतें. आतां या श्लोकांतील तांचणी, सोसणी, खोंचणी, पट्टाची हकीकत, उद्धवांची त्यागवृत्ति, त्यांची तळमळ, श्रीसमर्थांवरील त्यांची निस्सीम निष्ठा, लोकांनीं त्यांना पाडलेला पेंच, तो उकलण्याच्या श्रीसमर्थांच्या सामर्थ्याविषयीं त्यांचा पूर्ण विश्वास, इत्यादि गोष्टींचा उलगडा होऊन शिवराम म्हणजे च उद्धव, हें मनाला पूर्णपणें पटतें. प्रतापाच्या दहाव्या समासांतील पंधराव्या ओवींत

उद्धव नामा पट्टाभिमानी। पूर्व पश्चिम गोदातीर अवनी।
उत्कट यात्रा चालवी जनीं। श्रीगुरुचरण मर्यादे ॥ १०–१५

असा उद्धवांचा उल्लेख आलेला असून हि पुढें ६९ व्या ओवींत

शिवराम नामा समर्थसंगें। कितेक दिवस अंतरंगें।
पुढें पुढें जगदोद्धारणप्रसंगें। तेलंगणप्रांतें आज्ञापिला ॥ १०–६९

असा पुन्हां शिवरामांचा निराळा उल्लेख केलेला पाहून शंका वाटेल, पण १५ व्या ओवींत उद्धवांचा निर्देश करून हि ४५ व्या ओवींत

उद्धव बाळकासी समर्थे ऊर्ध्वपादें धरिलें।
प्रपंची होसी परमार्थी होसी पुसिलें।
वैराग्यदीक्षेंत बाळपणीं कर्णी उपदेशिलें।
सत्पात्र केलें भूमंडळीं ॥ १०-४५

जशी उद्धवांची गोष्ट प्रतापकारांनीं पुढं काढली आहे, त्याप्रमाणें आणखी तिसऱ्यांदा ६९ च्या ओवींत त्यांना च पुढें तेलंगणप्रांतांत म्हणजे इंदुरबोधनकडे पाठविण्यांत आलें, असें सांगितलें आहे, फक्त त्या ठिकाणीं उद्धवाच्या ऐवजीं शिवराम नांवाचा उपयोग केला आहे, इतका च फरक. तथापि, कोणाला तसें वाटत असल्यास, ६९ च्या ओवींतील शिवराम आणखी कोणी निराळे असतील, असें फार तर मानावें, पण या २५ श्लोकात्मक प्रकरणांतील शिवराम म्हणजे उद्धव च होत, याविषयीं शंका घेण्यास जागा आहे, असें वाटत नाहीं.

या प्रकरणांतील श्लोक ४, ५ आणि विशेषतः ६ या तीन श्लोकांकडे वाचकांनीं मुद्दाम लक्ष पुरवावें, अशी माझी विनंति आहे. मजपेक्षां वाचक त्यांतून जास्त अर्थ काढूं शकतील. त्यांत उद्धव म्हणतात, मी पट्ट मागतो असें लोक म्हणतात, पण मला पट्ट देण्याचें लोकांचें काय सामर्थ्य आहे, ते पट्ट देणार कोण आणि मी घेणार कोण, समर्था, तुम्ही पट्ट दिला तो यांना ठाऊक नाहीं, तो त्यांना ठाऊक होईल असें करा, अज्ञानानें लोक मला लावून खोचून बोलत आहेत, महाराज, आपणांशिवाय पट्ट देण्याचें सामर्थ्य कोणांत आहे, त्यांपैकीं तीला अनुसरून राजाना हि गादीवर स्थापणें किंवा तेथून काढणें हा आपला अधिकार, जगांतील घडामोडी आपल्या आज्ञेनुसार चालत आहेत, परंतु हे अपयशी लोक अभिष्टाप्रमाणें काहीं तरी वरळत आहेत.

## श्रीसमर्थमंदिर

या प्रकरणांतील श्लोक १७ आणि १८ हे मला माझ्यापुरते फार आवडले. त्या श्लोकांतील श्रीसमर्थांचें स्थळ म्हणजे हल्लीं समाधी ज्या जागीं आहे, तें ठिकाण होय. त्या स्थानीं बिल्व आणि तुलसीकाष्ठानें श्रीसमर्थांच्या देहाचें दहन झालें होतें. दहनानंतर त्या ठिकाणीं श्रीहनुमंताची स्थापना व्हावी, अशी श्रीसमर्थांची आज्ञा होती. श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, लेखांक ४८, यांत त्या आज्ञेचा उल्लेख खुद्द श्री राजा शंभु छत्रपति स्वामी यांच्या मुखानें झाला आहे व उद्धवांनीं हि आणखी दुसऱ्या एका प्रकरणांत स्पष्ट केला आहे. तें प्रकरण थोड्या च वेळांत आपण पाहूं. घडघा म्हणजे घोष. श्री क्षेत्र जांब येथें श्रीसमर्थांच्या जन्मस्थानीं जें श्रीसमर्थमंदिराचें काम चालू आहे त्या कामीं उपयोगी पडण्याप्रमाणें उद्धवांचे हे दोन श्लोक वाचून

मला फार आनंद झाला. दहनभूमीची जागा पुढें मागें सर्वांना कळावी, म्हणून त्या जागीं स्मरणार्थ देवालय असावें, अशी चिंता प्रत्यक्ष त्या काळीं उद्धवाना वाटली, तर श्रीसमर्थांच्या जन्मस्थानाचा विसर पडूं नये म्हणून त्या जागीं श्रीसमर्थांचें मंदिर असावें, अशी चिंता श्रीसमर्थजन्मानंतर ३२३ वर्षांनीं महाराष्ट्रास वाटावी, हें अगदीं स्वाभाविक होय. प्रभु रामचंद्र वनवासाला निघाल्यानंतर जेथें जेथें ते राहिले किंवा जेथें जेथें त्याना कोणी पाहिलें किंवा भेटले तीं तीं ठिकाणें अशीं श्रीरामचरित्रात प्रख्यात झालीं आणि तीर्थक्षेत्रें होऊन जगाला या क्षणापर्यंत पावन करतीं झालीं आणि पुढें यावचंद्रदिवाकरौ पावन करीत राहतील, तद्वत् पुढील पिढ्याना हें श्रीसमर्थांचें जन्मस्थान कळावें म्हणून तेथें मंदिर असावें, एरव्हीं

नसे सेथवां स्थान कैसें कळावें ॥

दहा वीस वर्षांमागें कोणी एकानें श्रीसमर्थचरित्र लिहिलेलें आमच्या पाहण्यात आलें होतें, त्यात ' सातारा जिल्ह्यात जावगावीं ' श्रीसमर्थांचा जन्म झाला, असें बिनदिक्कत म्हटलें होतें. पण दहा वीस वर्षांमागची तरी गोष्ट कशास पाहिजे ? आज दोन वर्षे जांबगाव आणि तेथील श्रीसमर्थमंदिर बृहन्महाराष्ट्रात सारखें गाजत असता सुमारे दोन चार महिन्यामागें एका प्रख्यात सर्वमान्य विद्वान् गृहस्थानें श्रीसमर्थांविषयीं एक सुंदर विवेचनात्मक निबंध लिहून त्यात ' नाशकाजवळ गोदातीरीं जांबगावीं ' श्रीसमर्थांचा जन्म झाला असें विधान बेलाशक केलें आहे ! अशी जेथें आज स्थिति आहे तेथें कालांतरानें एकादा पंडित जांबगाव नाशकेच्यात नेऊन ठेवणार च नाहीं, अशी कोणी हमी घ्यावी ? म्हणून त्या पवित्र जन्मस्थानीं श्रीसमर्थांचें स्मारकमंदिर असावें.

## उद्धवांची आणखी थोडी ओळख

उद्धवाच्या अंतःकरणाशीं एकरूप होऊन वरील व पुढील प्रकरणातील प्रत्येक श्लोकाचा विचार केला पाहिजे. उद्धवावर श्रीसमर्थांचा फार लोभ होता व लहानपणापासून त्याच्यावर त्याची माया असे. त्याच्यावर श्रीसमर्थांचा पूर्ण विश्वास होता, मात्र याची कल्पना इतराना तितकीशी नव्हती. श्रीसमर्थांच्या निर्याणाचे वेळीं उद्धवस्वामी जवळ होते, तेव्हां चाफळमठाची व्यवस्था पाहण्याविषयीं श्रीसमर्थांनीं त्यांना आज्ञा केली होती च आणखी जें काहीं सांगावयाचें होतें तें त्यानीं उद्धवाना सांगितलें होतें. ही गोष्ट एक एका दोघाना माहीत होती. उद्धव स्वतः सांगत आहेत :

मी तो येकांतीं येकांतीं तुझा आहे सखा ।
कांहीं नव्हे चि नव्हे चि नव्हे चि पारिखा ।
लोकां दीसतो दीसतो भिन्न भिन्न लेखा ।
गुप्त प्रचीती प्रचीती प्रचीती पारखा ॥ १

सत्य जाणावें जाणावें जाणावें उत्तर ।
राहा उगे चि उगे चि उगे निरोत्तर ।
लोक नेणती नेणती नेणती इतर ।
चुकों नका रे नका रे बहु खबर्दार ॥ ध्रु० ॥

स्वामी समर्थें समर्थें फार केली दया ।
बाळपणाचीं पासुनी सेवकाची माया ।
बहु धरिली धरिली धरिली हे छाया ।
फळों न दिल्ही न दिल्ही न दिल्ही लोकां या ॥ २

बहु निंदक निंदक येक येकां फार ।
देखों शकेना शकेना करिती संव्हार ।
मौन्य धरिला धरिला धरिला विचार ।
अंतर्यामीं च यामीं च केला फारखार ॥ ३

किती धुंडिती धुंडिती पुसोनी पहाती ।
ठाईं ठाईंचे ठाईंचे चाकाटोनि जाती ।
कैसी स्वामीनें केली हे अगमे चि स्थिती ।
सर्व थकीत थकीत थकीत पाहाती ॥ ४

येक दोघे ते दोघे ते काईंसें जाणती ।
पुढें पुढें समजतां फळेल प्रचीती ।
किती येक येकंदर विस्तार नेणती ।
रंग राखावा राखावा राखावा म्हणती ॥ ५

परी गल्हाटा गल्हाटा होईल चि फार ।
धामधुमेनें धुमेनें करितील जेर ।
कोण्ही कोण्हाचें कोण्हाचें नाईके उत्तर ।
पुढें समर्थ समर्थ काढितील नीरे[1] ॥ ६

---

1 परिणाम, निकाल

शिवरामाला रामाला न्याहाल धि केलें ।
जें जें मनींचें मनींचें तें तें सांगीतलें ।
सर्व संकेतें संकेतें वेगें सुणाविलें ।
पुढें सुझतां सुझतां सपूर्ण चि जालें ॥ ७

परंतु श्रीसमर्थांच्या पश्चात् राजदरबारी निराळें च मासविलें गेल्यामुळें उद्धवांना फार त्रास पोंचला. लोकांनीं त्याच्यावर नाना तऱ्हेचीं बालंटें आणलीं. लोकांचीं अनन्वित बोलणीं त्यांना ऐकून घ्यावीं लागलीं. पुढील दोन उताऱ्यांत त्यांच्या अंतःकरणाची तळमळ चांगली प्रतिबिंबित झाली आहे.

( १ )

गांजिलें सर्व हि लोकीं । आतां मी काय रे करूं ।
तुजवीण सखा नाहीं । स्वामिराया दयानिधी ॥ १
चहूंकडूनि आभाळें । द्वेषाचीं रचिलीं बळें ॥ तुज० ॥ २
कोण्ही च न दिसे माझें । सर्व बोझें च जाहलें ॥ तुज० ॥ ३
अविद्या धरिली लोकीं । सुविद्या सांडिली बळें ॥ तुज० ॥ ४
लुब्ध हे लोक हेमाला । फार मछर मांडिला ॥ तुज० ॥ ५
आर्यीं च आमुचा झाडा । सर्वस्व घेतला तुवां ॥ ,, ॥ ६
आनर्थ मांडिला लोकीं । गुप्त केलें म्हणौनियां ॥ ,, ॥ ७
दाविती स्वार्थ देवाचा । लुटालुटी च मांडिली ॥ ,, ॥ ८
( पुढील ९ ते २४ श्लोक असलेलीं दोन पानें गहाळ )
तुझा वियोग जाहाला । पुढें कांहीं सुचेचिनां ।
काये कैसें किजे आतां । स्वामिराया दयानिधी ॥ २५
मायेबापा दीनबंधु । देवराया रघोत्तमा ।
तुजसी भीनें मी न्हाीं । स्वामिराया दयानिधी ॥ २६

( २ )

न्याय गेला न्याय गेला न्याय गेला अन्याय जाला ॥ ४
वालटें रे वालटें रे वालटें येवी वालटें रे ॥ ५
बुडवीलें बुडवीलें बुडवीलें सत्य बुडवीलें ॥ ६
ही च तक्रार पुढील २५ ओव्यांत आली आहे. हें असें कां झालें,

१ उप पदवीला घडविलेला, कुरैंतला २ 'न' वाचावा का 'त' वाचावा अशी शंका येते.

याचें उद्धवांना कोडें पडलें होतें. आपल्या हातून कांहीं अपराध घडला म्हणून तर त्याच्या शासनार्थ आपणावर हा प्रसंग आला नाहीं ना, असें त्यांना वाटे. खरी हकिकत जगाला समजून आपण केव्हां दोषमुक्त होऊं, अशी त्यांना हुरहुर लागली होती. लोकांत आपली क्षणैक अपकीर्ति होऊन नाना प्रकारचीं बालंटें जरी आपणावर रचलीं गेलीं तरी खरा प्रकार केव्हां ना केव्हां सर्वांना समजल्यावांचून राहणार नाहीं, अशी त्यांना खात्री वाटे. आज जरी सत्याचा सूर्य असत्याच्या ढगांनीं झांकून टाकला असला, तरी कालांतरानें सर्व ढग विरळून जाऊन सत्याचा प्रकाश पडल्यावांचून राहणार नाहीं, श्रीसमर्थ आपली केव्हां हि उपेक्षा करणार नाहींत, असा त्यांना विश्वास वाटे. हा विश्वास पुढील प्रकरणांत स्पष्टपणें प्रकट करण्यांत आला आहे. तसें च दहनभूमीचे जागीं मारुतीची स्थापना करावी, इतकी च केवळ श्रीसमर्थांची आज्ञा नव्हती, तर त्या मूर्तीचा आकार केवढा असावा व ध्यान कसें असावें, हें हि त्यांनीं सांगून ठेवलें होतें, असें ओवी १६ ते १९ वरून स्पष्टतर होत आहे :

स्वामीचिया वाक्यासाठीं प्राण दिल्हा ।
मज विसरला स्वामी माझा ॥ १
स्वामी माझा मज विसरतां वोंगें ।
रचती अनेगें । बहुसाल ॥ २
बहुसाल वाटी चालटांची जाली ।
आमुची सांडिली । चिंता तुवां ॥ ३
चिंता तां सांडितां थोंवे चि मांडले ।
कोणें हें प्रेरिलें ठावें नाहीं ॥ ४
ठावें नाहीं तुझें करणें आम्हासी ।
कैसें करितोसी काये जाणों ॥ ५
काये जाणों दोष झडावे म्हणोनी ।
कैसें तुझे मनीं कळेना कीं ॥ ६
कळेना करणें तुझें देवराया ।
ऐसी गुप्त माया कासासाठीं ॥ ७
कासासाठीं माझा आट तां मांडिला ।

१ थोंवा = दुःख, पीडा, त्रास, झंझट २ संताप, त्रास, हट्ट

कळेना कोणाला कांहीं केल्यां ॥ ८

कांहीं केल्या मज तुपेक्षीसी ऐसें ।
मज वाटतसे अतर्यामी ॥ ९

अतर्यामी मज भवंसा वाटतो ।
परी लोकांला तो कळेना कीं ॥ १०
कळेना कीं तें चि कळेसें करावें ।
लोकां समजावें प्रगट चि ॥ ११
प्रगट चि कळे तुझा चि प्रताप ।
कळे आपेंआप ऐसें कीजे ॥ १२
ऐसें कीजे आता येकदां अचाट ।
सर्व हि कचाट तुटे जेणें ॥ १३
तुटे जेणें लोक होती खुसीहाल ।
आणि यहु हाल दुर्जनासी ॥ १४
दुर्जनासी हाल सज्जन न्याहाल ।
ऐसें चि अढाळ करी देवा ॥ १५

करीं देवा स्वामीस्थापनेचें स्थळ ।
मारुती सबळ कीजे तेथें ॥ १६
कीजे परमील सांगीतला तैसा ।
भयानक ऐसा दाखवावा ॥ १७
दाखवावा जेणें ध्यान भरे चित्तीं ।
स्वामी संचरती मनामध्यें ॥ १८
मनामध्यें ध्यान आठवें स्वामीचें ।
साग पूजनाचे नित्य घडे ॥ १९

नित्य घडे कथा निरूपण सांग
साधन अव्यंग नित्य घडे ॥ २०
नित्य घडे लोकां दर्शन स्वामीचें ।
सर्वांचे मनींचें पूर्ण व्हावें ॥ २१

पूर्ण व्हावी पूजा आनंदकल्लोळ ।
सुख आल्हाळ करी देवा ॥ २२

करी देवा सर्व प्रांजळ निवळ ।
नको खळखळ कोणे काळीं ॥ २३

कोणे काळीं सुख नष्टाचें दिसेना ।
वा जगज्जीवना ऐसें कीजे ॥ २४

ऐसी कीजे हद येकदा दयेनें ।
शिवराम म्हणे देवराया ॥ २५

अशा रीतीनें दिवाकर आणि उद्धव यांच्या वादातील उद्धवाची बाजु आज बहुतेक त्याच्या च मुखानें महाराष्ट्रास प्रथम च ऐकावयास मिळत आहे.

## योगी सर्वस्वें मोकळा

येथें च हें टाकळीमठाचें सामान्य विवेचन संपवून मठातील ग्रंथसंग्रहाकडे वळावयाचें, पण इंदूरबोधनमठाच्या संग्रहातील उद्धवाचें एक अपूर्व पद व टाकळीसंग्रहातील एक महत्त्वाचा श्लोक या ठिकाणीं च वाचकांस सादर करण्याचा मोह अनावर होत आहे. कोणा तरी शिवराम नावाच्या श्रीसमर्थशिष्याचें तें पद आहे म्हणून श्रीसांप्रदायिक विविध विषय, द्वितीय खंड, लेखांक ८३ यांत तें पूर्वीं दिलें होतें, पण आज तें पद उद्धवाचें आहे, या भावनेनें वाचतांना त्याची गोडी निराळी वाटत आहे. त्या भावनेनें वाचकांना हि तें वाचतां यावें, म्हणून येथें देत आहे. कोणी मजवर अशी टीका करितात कीं, श्रीसमर्थसांप्रदायिक कवितेमध्यें मी इतका गुंतून पडलों आहे कीं, इतर वाचनाचा मला छंद नाहीं, इतर कांहीं मीं वाचलें नाहीं, श्रीसांप्रदायिक वाङ्मयाशिवाय दुसरें वाङ्मय आहे, श्रीसमर्थांशिवाय जग आहे, याची मला जाणीव नाहीं श्रीसमर्थसंप्रदायाशीं, वाङ्मयाशीं, चरित्राशीं माझें इतकें तादात्म्य झालें आहे, असें मला वाटत नाहीं. तसें झालें असतें तर मला आनंद वाटला असता. वरील आक्षेपातील दुसरा भाग मात्र खरा आहे कीं, माझें इतर वाचन फार थोडें आहे, मुळीं च नाहीं म्हटलें तरी चालेल. हें च पहा, अवांतर वाचन असतें आणि बुद्धीला विविधता आली असती, तर या अप्रतिम पदाचें वर्णन माझ्या कडून निराळ्या त हेचें झालें असतें पण माझें वर्णन इतकें च कीं, हें पद मला अति आवडलें, तें मी

अनेकदां वाचलें, तें वारंवार वाचावें असें मला वाटलें व प्रत्येक वाचनाचे वेळीं त्या पदापासून होणारा आनंद व त्याविषयीं वाटणारें कौतुक हीं वाढत गेलीं. तो च अनुभव वाचकांस हि येईल.

देवें लग्न केलें नाहीं । म्हणउनी पोर जालें नाहीं ।
पोराचें हि लग्न नाहीं । म्हणउनी वरें ॥ १
पोर होउनी मेलें नाहीं । सून होउनी मेली नाहीं ।
विधी पोर जालें नाहीं । म्हणउनी वरें ॥ २
आणी कन्या ते ही नाहीं । अथवा विधवा जाली नाहीं ।
विला पोर जालें नाहीं । म्हणउनी वरें ॥ ३
पोराला हि पोर नाहीं । पोरासाठीं कर्ज नाहीं ।
कर्जासाठीं व्याज नाहीं । म्हणउनी वरें ॥ ४
व्याजासाठीं दिवाण नाहीं । दिवाणाचा दंड नाहीं ।
दंडासाठीं मोलें नाहीं । म्हणउनी वरें ॥ ५
माल्यासाठीं विदेश नाहीं । दात विचकणें हि नाहीं ।
करूनि घ्या हो कांहीं नाहीं । म्हणउनी वरें ॥ ६
मागण्यासाठीं येळीलें नाहीं । म्हणउनि प्राण देणें नाहीं ।
येकासाठीं येक नाहीं । म्हणउनी वरें ॥ ७

योगी सर्वस्वें मोकळा । पाहतां त्याची अकळ कळा ।
पाहतां दुनियाहूनि निराळा । सर्वस्वेंसी ॥ ८
धन्य धन्य माहापुरुष । ते चि ईश्वराचे अंश ।
शुकासारिखे उदास । म्हणती त्यांसी ॥ ९

शिवरामाला तारिलें । जन्मापासुनि मुक्त केलें ।
भक्त लोक मुक्त केले । रामराजें ॥ १०

१ एकाद्याला दंड झाला असतां तो देण्यासाठीं किंवा एखाद्याचा नातेवाईक तुरुंगांत पडला असतां त्यास सोडविण्यासाठीं किंवा जप्त झालेली जमीन जप्तींतून सुटी करण्यासाठीं लोकांच्या दारावर नांगर टाकून आपलें गाऱ्हाणें सांगत सांगत जी भीक मागावयाची तिला मालें म्हणतात. २ ओशाळें

वर रघुनाथाचा खरा । पुन्हा जन्म नाहीं खरा ।
सारासारविचार बरा । याकारणें ॥ ११

उदासीनतेचें घमशान । ऐसें करूं शके कोण ।
दया जगदीशाची पूर्ण । तरी च होये ॥ १२

दया दास्यत्वें घडवे । दास्यीं बुद्धि च अडवे ।
तरी ते कैसी सांपडते । ईश्वरकृपा ॥ १३

देवी कृपा संपादणें । विश्वलोकीं धन्य होणें ।
ऐसें शिवराम म्हणे । प्रचीतीनें ॥ १४

महाराष्ट्रास पूर्वी उद्धयांची ओळख होती, त्यापेक्षां आज थोडीशी तरी जास्त झाली असेल, असें मला वाटतें व ती ओळख करून देण्याचें भाग्य सत्कार्योत्तेजक सभेला लाभलें, याचा मला आनंद होतो.

## श्रीराम आणि श्रीशिवछत्रपति

आतां फक्त उद्धवांचा एक श्लोक सांगून आपण टाकळीमठांतील बाडें क्रमशः हातीं घेऊं व त्यांत काय आहे तें पाहूं.

रामाचा अवतार झाला म्हणजे काय झालें याचें श्रीसमर्थांनीं जसें एका श्लोकांत वर्णन केलें आहे, त्या च पद्धतीनें, श्रीशिवरायांनीं आपला अवतार संपविला म्हणजे काय झालें तें उद्धवांनीं एका श्लोकांत सांगितलें आहे.

राम आले म्हणजे कोण आले तें श्रीसमर्थ सांगतात:

आला राजा महीचा दिनकरकुळिचा त्याव वौंशावळीचा ।
आला आत्मा जगाचा मुनिजनऋषिचा प्राण त्या साधकांचा ।
आला दाता दिनाचा जप पशुपतिचा ध्यास त्या वाल्मिकीचा ।
आला सिंधु सुखाचा सुरवर म्हणती काळ हा राक्षसांचा ॥

आणि श्रीशिवराय गेले म्हणजे कोण गेले तें उद्धव सांगतात :

गेला मोका गडांचा हयगजपतिचा आणि त्या भूपतींचा ।
शूरांचा सज्जनांचा ऋषिजनमुनिचा आणि त्या देवतांचा ।
भक्तांचा पंडितांचा चतुर सुमतिचा साबड्यांभाविकांचा ।
नाना विद्या कवींचा कुशळ जगतिचा बोलक्यांनेमकांचा ।

हा श्लोक वाचून माझ्या मनांत जे विचारतरंग येतात ते च वाचकांच्या हि मनांत उठणार, तेव्हां त्यांचा उच्चार करण्याच्या भरीस न पडतां आतां आपण एकदम टांकळी मठांतील संग्रहाकडे वळू.

## टांकळी मठांतील संग्रह

# १ ]

[ २०० वर्षांचें

हें बाड अत्यन्त महत्त्वाचें आहे, दुःखाची गोष्ट इतकी च कीं, त्याचीं पहिलीं आणि शेवटचीं कांहीं पानें फाटून नष्ट झालीं आहेत. ७० ते ३४२ इतकीं पानें शाबूत आहेत. या बाडाची अपूर्वता अशी कीं, अन्यत्र कोठें हि उपलब्ध न झालेली अशी श्रीसमर्थांची किती तरी कविता या बाडांत आरंभीं दिलेली आहे. शेकडों श्लोकांत आणि पदांत श्रीसमर्थांनीं रामायणी कथा क्रमशः वर्णिली आहे. दुर्दैव कीं, पहिलीं जीं ६९ पृष्ठें फाटलीं गेलीं, त्यांत या पदांपैकीं च पदें होतीं, असें दिसतें. या बाडांत असलेल्या श्रीसमर्थांच्या अप्रकाशित कवितेचीं छापील पन्नास साठ पृष्ठें सहज भरतील. मालेंतील पंधरावा भाग भांप्रदायिक विविध विषय, यांतील लेखांक ३८ मध्यें या अप्रकाशित कवितेचा नमुना वाचकांस सादर केला होता.

या बाडांत पा. २५० वर श्रीसमर्थकृत संतांची आरती ऊर्फ संतनामावळी आढळली ती विविध विषयांक ४१ त पंधरा वर्षां मागें च दिली होती. विविध विषयांचा तो खंड शिल्लक नसल्यामुळें व आपल्या हयातींत तो पुन्हां छापला जाण्याचा संभव नसल्यामुळें ती आरती आजच्या वाचकांस पुन्हां सादर करण्याची इच्छा होते, अशासाठीं कीं, ही आरती सांप्रदायिकांच्या पाठांत असावी.

श्रीराम

सनकादिक सनत्कुमार सनकसनंदन नारद ।
तुंबर अंबरीष भीष्म प्रल्हाद ।
बळी पृथु आर्षभ ध्रुव उपमन्यु रुक्मांगद ।
अश्विनीकुमार गजेंद्र प्रसिद्ध ॥ १ ॥

जय जय आरती भक्त सुखमूर्ति ।
नमावें अव्यक्त आणियेले व्यक्ति ।

वैराग्यभास्कर सहज निज शांति ।
ज्ञानघन पूर्ण स्वयंबोधस्थिति ॥ ध्रु० ॥

रुद्र बिभीषण शुहक याज्ञवल्की आणि जनक ।
पिंगळा उद्धव अक्रूर पार्थ परीक्षिति शुक ।
वसुदेव विदुर कुबिजा सुदामा पुंडरीक ।
नाथ गोपीचंद निकट सेवक ॥ २ ॥

निवृत्ति सोपान ज्ञानेश्वर मुक्ताबायी चांगदेव ।
दोघे सुरदास रामदास पाहो ।
विमळानंद सुखानंद भिराबायी सद्भाव ।
धना सेना कबीर परमानंद मेहो ॥ ३ ॥

पंपादास ( स ) ज्जन कृष्ण चरचरि ।
तुलसी नामा नारा विठा बांसुरी ।
जसवंत गंगल पाठक मुद्गल नरहरि ।
खेचर जोगा नागा माष्टा यहिरो डिंगरी ॥ ४ ॥

अलखिदास जाल्हण मानदास रेणुकानंदन ।
कानपात्र कूर्मदास अंता गोरा धुंडिजनार्दन ।
केशवदास चांगा परसोबा नायक पद्मन ।
काको सुदामा सावतां अच्युत एकोजनार्दन ॥ ५ ।

अवधूत रामानंद माधवदास ।
रोहिदास चोखा बंका जनकासेवेस ।
आणिक जाले होती आरति तयांस ।
रमा गरुड जय विजय निज दास ॥ ६ ॥

एक आरति करितां भक्तांचे वोळी ।
तेणें सहस्र आरत्या केल्या वनमाळी ।
बाळका पूजितां जेवी जननी वोपली ।
रामीरामदास भावें वोवाळी ॥ ७ ॥

यादिवाय या बाडात श्रीसमर्थकृत तत्त्वपट्‌संक्षेप ( पृष्ठ ११७-१२७ ) म्हणून पर्यायरत्न हें प्रकरण आहे. तें फार मोठें आहे. श्रीसमर्थांच्या यादिलेल्या

अप्रकाशित कवितेचा जो एक भाग आपणांस काढावयाचा आहे, त्यांत तें प्रकरण देऊं.

शिवाय देवदास, निरंजन व मुसळराम अशा श्रीसमर्थांच्या शिष्या शिष्यांची थोडी फार कविता या बाडांत आहे. ती कांहीं कांहीं विविध विषयांत पूर्वी दिलेली आहे. नामदेवाचे अभंग मधून मधून पुष्कळदां आले आहेत. शिवाय

| | |
|---|---|
| जयराम पान २७८, | मोहनविप्र पा. २७९, |
| गुसायीनंदन २७९, | जनपंडित २७९, |
| गुणायी २८२, | निरंजन २९७, |
| लीलाविश्वंभर ३००, | भोजलिंग ३०१, |
| बाबा शंकर ३०२, | मुक्तेश्वर ३०४, |
| देवदास ३०४, | मुसळराम ३११ |

इत्यादिकांची थोडी फार कविता आहे.

मनाचे श्लोक पा. २८३, अनुदिनिं अनुतापें पा. २९८, ओव्याशतकां-पैकीं संसाराच्या ओव्या पा. ३०६, रामायणातील कांहीं पातें पा. ३१२, दासबोधांतील कांहीं समास पा. ३२७, इत्यादि प्रकाशित कविते-पैकीं हि कांहीं कविता आहे.

# २ ]

[ १५०

हें सुमारें १२५ पृष्ठांचें बाड सर्व गुजराथी कवितेचें आहे. कविता गुजराथी, पण लिपी देवनागरी आहे. अक्षर सामान्य आहे. बाह्य स्वरूपांत मोहकता मुळीं च नाहीं. भाषा गुजराथी असल्यामुळें कवितेंत काय गोडी आहे ती मला समजली नाहीं.

बाड चाळून पाहिलें, बहुतेक कविता श्रीकृष्णचरित्रपर आहे.

मळो गोविंद, नरसई, प्रभुदास, रामईयो, आत्माराम, काशीदास, दास मीठा, अशा सात कवींची कविता या बाडांत आहे.

बहुतेक कविता ' गरबा ' स्वरूपाची आहे. अनेक गरबे तींत आहेत. कवितेचा हा गरबा काय प्रकार आहे, तो आपल्याला जरी अपरिचित असला, तरी गुजराथेंत व गुजराथी मंडळींत तो सर्वसामान्य आहे.

(१) एकनाथी भागवतांतील कांहीं भाग

(१) निवडक मनाचे श्लोक

(१) तान्हाजी कृत तुळजादेवीचें अष्टक

फजीतीच्या जीण्या परिस वरवें हें च्चि मरणें ।
न साहे हा धंदा चुकुर बहु मी काय करणें ।
भवानी निर्वाणीं त्वरित मजला पाव जननी ।
रुणाचे हे धेके दुर करुन दे अन्न सदनीं ॥ १

बहु खंडीं तूझा निकट तुळजे दास म्हणतो ।
कृपा ये ना माझो मन कठिण केलें परम वो ।
नको हो तूं अंबे मजवरि उदासीन जननी ॥ २

असावी हे माझी परम तुळजे लाज तुजला ।
सखे कोण्ही नाहीं वडिल तुजवांचून मजला ।
तुला मी हें मागे करकमल जोडून जननी ॥ ३

असे आठ श्लोक आहेत. पहिल्या श्लोकाचें चवथें चरण तें च प्रत्येक श्लोकाचें होय, असें समजावयाचें, असें दिसतें.

(१) गोसावीदास कृत मोरेश्वराची आरती

(१) साठी संवत्सराचे श्लोक

(१) एकनाथ कृत प्रल्हादचरित्र

ओवीसंख्या २७४

(१) फिरकोळ

आरंभ—पर हि परता पर
परमात्मा ईश्वर ।
तयाचा न कळे पार
वेदांत श्रुति ॥ ध्रु०

शेवट-- स्वयें विर्धा विश्वंभरु ।
विश्वनाथ सद्गुरु ।
कृपेचा तो सागरु । दीनोद्धारक ॥
त्यानें तारुनियां जडजीवा ।
दाखविला पूर्ण ठेवा ।
छेदुनिया भय भवा । उद्धार केला ॥ ५

८ ] [ २५०

जीर्ण, अपूर्ण, शाई उडून अक्षरें कमी अधिक पुसट झालीं आहेत. पृष्ठांक दिलेले नाहींत. सुमारें ६० पृष्ठें आहेत.

( १ ) मेरु अनंत यांचीं दोन पदें, पहिलें अपूर्ण, त्याचा शेवट
अनंतवचनें रत्नहितसुचने ।
मेरुसि अंतर्यामीं ॥ ३ ॥

( १ ) आसन घालुनि प्राण निरोधुनि
तारक ते जपती रघुपति ॥ १ ॥
सीव सीवा रे ॥ ध्रु० ॥
वसउनि कासी हृदयाकासी ।
नित्य तपे तपती रघुपती ॥ २ ॥
पावन करिशी सकळ हि जगती ।
अनंत मेरु गती ॥ रघुपती ॥
सीव सीव जपती ॥ ३

( १ ) श्रीसमर्थकृत सुंदरकांड व युद्धकांडाचीं पहिलीं दोन शतें

( १ ) अनुदिनीं अनुतापें तापलों देवराया ।

( १ ) घेउनि हृत्वक स्वामीचा पुसोनि प्रत्यय वो भी चा ॥ १
वें पद होउनि पाहे वा । उगा चि निवांत राहे वा ॥ध्रु०॥
भावना हे वोसरते । समाधि जे ठाईं सरते ॥ २ ॥
मेरु अनंत पद जाला । जाला अनुभव निमाला ॥ ३ ॥

( १ ) वाचे सद्गुरुचा महिमा वोलूं काये ।
पूर्व पुण्यें जोडले त्याचे धन्य पाये ।
आतां कळिकाळादिक हे तृणप्राये ।
जननि जनक जन सदन सुहृद जन ।
सकळ साधन गुण चरण गुरुचे ॥ ध्रु० ॥
विद्या श्रुति शास्त्रें तीर्थें व्रतें दानें ।
जप तप पूजा लय लक्ष नाना अनुष्ठानें ।

सकळें साधिलीं मजला गुरुध्यानें ।
सद्गुरुदयेनें जाला ज्ञानाचा उदये तेणें ।
स्वरुपिं तन्मय मिथ्या भव भय कैचें ॥ १ ॥

विश्वीं विश्वात्मा व्यापक गुरुरावो ।
तेथें भिन्न कल्पाया कैचा उरला ठावो ।
अवघा समरसला देवो भक्तिभावो ।
सहज स्वानंदघन दृश्य ना अदृश्य तेथें ।
गोसाविनंदनपण हारपोनि गेलें ॥ २ ॥

---

( १ ) हिणाहूनि मी हीण जैसे भिकारी ।

( १ ) मेरुकृत पद
प्रगट प्रगट मम इष्ट भीमा रे कष्ट वारी ।

( १ ) त्याचें नाम विसरूं कैसें आतां रे ।
जेणें माझा घेतला भार माथां रे ॥ १ ॥

त्याचें रूप पाहीन धणीवरी रे ।
त्याचे पाय वंदीन माथां शिरीं रे ॥ २ ॥

भवार्णवापासुनी सोडवीलें रे ।
ब्रह्मानंदसागरीं बुडवीलें रे ॥ ३ ॥

केशवस्वामी कृपाळु महाराज रे ।
त्यावीण कोण राखेल माझी लाज रे ॥ ४ ॥

इत्यादि केशवाचीं दोन चार पदें

( १ ) किरकोळ, एक दोन पानें अस्पष्ट

९ ] [ २५०

हें तत्कालीन बाड आहे. तें कदाचित् उद्धवांच्या हातचें हि असेल. त्याचीं आरंभीचीं आणि शेवटचीं कांहीं पानें गेलीं आहेत. बाड जीर्ण झालें आहे. तें सुंदर आहे.

त्यांत श्रीसमर्थकृत सुदकांडाचीं २ पासून १० पर्यंतचीं पानें आलीं आहेत.

# १० ]

[ १५०

हीं दोन लहान बाडें एकत्र शिवलेलीं आहेत एक बावीस पानाचें बाड आहे व त्याच्या पोटात मधोमध दुसरें साठ पानाचें आहे.

यात अनेकांचीं अनेक पदें, अभग, प्रकरणें आहेत. त्यात बहेरु, सहजबोधसिंह, शेना न्हाउ, येका श्यामनाथ हीं नावें नवान दिसतात.

वहेरूंचे २०।२५ अभग आहेत.

सुरदास, मध्वमुनेश्वर, निरजन, केशव, अनत, रगनाथ, चिन्मयनदन, छवीपा, जयरामपत, मीरा, येका श्यामनाथ, येकनाथ या प्रत्येकाचें एकाद दुसरें पद अथवा अभग आहे.

नामदेवकृत दामाजीपंताची रस्त, ओवीसख्या ३१ ( पान ४ )

तुकाराम, उद्धवचिद्घन, अमृतराय, शिवदिनकेसरी, आनदतनय, याचीं पदें अथवा अभंग बरे च आहेत.

यस्वलिंगकृत संतमालिका आहे

अंबरनाथाचें एक पद ( पा. २० )

बोल बोल बोल आता ।
माझे सगे पढरिनाथा ॥ ध्रु०

फार गोड आहे.

शेनान्हाऊकृत रोहिदासकबीरस्तवन आहे

शिवराम याचे कृष्णचरित्रपर एक पद, व

श्रीसमर्थांचीं

( १ ) तैसा नव्हे माझा राम ।
सकळ जीवाचा विश्राम ॥ ( पा. १३ )

( २ ) कधिं था रिकामा होसी ।
कधिं सतसमेप्रति जासी ॥ ( पा. १४ )

( ३ ) कां रे अझुनी निदसुरा ।
नाम स्मरसिना फजितखोरा ॥ ( पा. २४ )

अशीं तीन पदें आहेत.

या बाडात कांहीं अभंग, पदें अप्रकाशित आढळतील.

सतोष जैसा । पिंजारियासी ।
कापुस पिंजायाचा ॥ २
अमृत म्हणे कधिं छंद हा जाइल ।
रुपये मोजायाचा ॥ ३

हें अमृतरायांचें पद छापलेलें आहे का नाहीं, ठाऊक नाहीं.

ज्यासी नावडे पांडुरंग । तो हा जातीचा रे मांग ॥ १
रामनामावीण जें तोंड । ते जाणावें चर्मकुंड ॥ २
दास नव्हे विठोबाचा । तो रे लेक दो बापाचा ॥ ३
तुका म्हणे त्याचे दिवशीं । गेली होती मांगापाशीं ॥ ४

ही कठोर वाणी माझ्या वाचण्यांत आली नव्हती.

# ११ ]

[ २००

हें बाड आकारानें लहान आहे. त्याचीं १६८ पृष्ठें आहेत.

अगदीं आरंभीं

हद्द जाली सीमा जाली । प्रचीतीसी प्रचीत आली ।
कैसी आनंदवेळ वाहिली । सुंदर मठीं ॥ ११

हें बारा ओव्यांचें प्रकरण आहे. तें च प्रकरण डोमगावमठांतील हि एका बाडांत आहे व त्यावरून तें श्रीस. वि. वि. पाठ दुसरा, ले. ८२. यांत प्रसंगोपात्त दिलेलें आहे.

नंतर पंचीकरणावर थोड्या अपूर्ण ओव्या आहेत. नंतर क्रमशः खालील प्रकरणें आहेत :

( १ ) जुन्या दासबोधांतील पंधरावा
रघुनाथध्यानाचा समास
( २ ) श्रीमत् भगवद्गीता अध्याय बारावा,
तुकारामकृत सम अभंगासह
( ३ ) श्रीमत् भगवद्गीता अध्याय पंधरावा,
वामनकृत सम श्लोकासह
( ४ ) आत्माराम ( ५ ) अंतर्भाव ( ६ ) पूर्वारंभ
( ७ ) रघुनाथध्यान ( हेंच प्रकरण सगुणध्यान म्हणून प्रसिद्ध आहे, त्याच येथें रघुनाथध्यान म्हटलें आहे. )

( १ ) पंचमान ( १ ) मानपंचक, ( १ ) पंचसमासी
श्रीसमर्थांचीं ' लघु काव्यें ' छापतांना या बाडाचा पुष्कळ उपयोग होईल.

## १२ ] [ १४५

हें सरासरी ६० पृष्ठांचें बाड आहे. अक्षर अगदीं वाईट आहे. तें कोणी मुलानें किंवा अशिक्षितानें लिहिलेलें दिसतें.

याच्यावर पानाचे अंक मुसलमानपद्धतीप्रमाणें उलट्या बाजूनें घातलेले आहेत.

पानें ३५ व ३२ यांच्या मागच्या बाजूस शके १७०८ चील नोंदी आहेत.

तुका, ज्ञानदेव, दास, भानुदास, मुंताई, सुरदास, नागेश, मध्वमुनेश्वर, शिवराम यांचे क्वचित् अभंग आहेत.

बाड अति अशुद्ध, बहुधा निरुपयोगी.

## १३ ] [ १५०

या अगदीं चिमुकल्या बाडांत आरंभीं तात्कालीन कोणा अभ्यासकानें ' अनाम्याचि नामाचा संकेत ' म्हणून ब्रह्माचीं १२९ नांवें छतरलीं आहेत व नंतर द्विपुटीचीं ४२ उदाहरणें, त्रिपुटीचीं २५ उदाहरणें, चौपुटीचीं ३० उदाहरणें, पंचपुटीचीं १८, षट्पुटीचीं ६, सप्तपुटीचीं १७, अष्टपुटीचीं १५, नवपुटीचीं ८, दशपुटीचीं २, अशीं उदाहरणें दिलीं आहेत; अकापुटी शब्द लिहून खालीं उदाहरण न देतां जागा कोरी सोडली आहे; नंतर द्वादशपुटीचीं दोन उदाहरणें, चतुर्दशपुटीचें एक उदाहरण व शेवटीं षोडश पदार्थांचीं नावें सांगून

बहुत कागदीं असे । परंतु पाठ तें नसे ।
प्रसंगमान माहिती । समीप वैखरी रिती ॥

या श्लोकानें बाड संपविलें आहे.

## १४ ] [ १५०

हें एक कागदाला कागद चिकटवून महजरप्रमाणें लांब वेटाळें केलेलें आहे. त्यांत आरंभापासून शेवटपर्यंत बहेरु याचे अभंग आहेत. ते मोजले तों ४३ भरले.

अर्से दिसतें, वहेरु यांचा एकुलता एक मुलगा वारला, त्या दुःखाच्या भरांत कांहीं उद्वेगाचे, कांहीं संतापाचे त्यांनीं हे अभंग केले.

कोण दोष घडला माथा। सांग सांग पंढरिनाथा॥
तुझ्या सेवेसी तत्पर। बरा फेडिला उपकार॥

नष्टा नारायणा। दुष्ट कर्म केलें।
सिंधूंत बुडविलें। जहाज माझें॥ १
वैर साधुनिया। पुत्र माझा नेला।
ध्वज हा मोडिला। परलोकीचा॥ २
दुःख तें भोगावें। किती हे दिवस।
कधीं हें आयुष्य। सरेल माझें॥ ३
अहा रे अदृष्टा। कैसी घेसी धांव।
घातकी हा देव। कळों आला॥ ४
मागें पुढें तुवां। न केला विचार।
कैसी आणिली धाड। आम्हावरी॥ ५
वहेरु म्हणे देव। चांडाळ घातकी।
काये आलें हातीं। सांग तुझ्या॥ ६

वहेरु म्हणे विठ्या। निर्दय पाषाण।
याच्या संगें कोण। सुखी जाला॥

परम निर्दयी। कळला आम्हांस।
तोंडातुनी घांस। काढियेला॥
तुझा म्या अन्याय। काय केला चोरा।
सांग सांग पोरा। गवळियाच्या॥

राईचा अन्याय। सूळीं देणें तया।
अरे घातकीया। कैसें केलें॥
वहेरु म्हणे तुझें। हो रे निसंतान।
कैसे आम्हां रान-। भरी केले॥

मेल्यामागें कोण। पाहे तुझें सुख।
आंधळ्यासी दीप। दावी जैसा॥

राहावें कोण्हे स्थळीं । जाऊं कोण्हे देशीं ।
कैसी हे विवसी । आम्हा आली ॥
शक्ति हे राहिली । न दिसे डोळा ।
कैसें हें कपाळा । दुःख आलें ॥

इत्यादि. हे बहेरु कोण, कोठील, केव्हां होऊन गेले, टांकळीमठाशीं यांचा संबंध काय, वगैरे कांहीं माहिती नाहीं. वर दहाव्या बाडांत याचे कांहीं अभंग आढळले व हे या वैराग्यांत. दहाव्या बाडांतील अभंगांत पुत्रशोक वगैरे कांहीं नव्हता. यांचे आणखी पुष्कळ अभंग असावेत. हे पूर्वी नुसतें ऐकून हि ठाऊक नव्हते.

# १५ ] [ ११७

सबंध कागदाच्या आकाराचें बारा पृष्ठांचें म्हणजे बारा च कागदांचें हें बाड आहे. घडीच्या जागीं कांहीं अक्षरें फाटण्यांत गेलीं आहेत.

त्यांत ज्ञानदेवदासेन कृत तत्त्वपट दिला आहे. पंचीकरण समजण्याला हा तत्त्वपट केव्हां तरी प्रसिद्ध होणें अवश्य आहे. सर्व विषय, समजूत पडेल अशा रीतीनें सविस्तर मांडून दाखविला आहे.

त्याचा शेवट – " शके १७२६ रक्ताक्षिनाम संवत्सरे माद्रपद शुद्ध त्रयोदशि तद्दीनि समाप्त "

# १६ ] [ १५०

ज्ञानेश्वरींतील 'शब्दपर्या' या बाडांत आहे. शब्दपर्या=शब्दपर्याय.

यांत अकारविल्हेनें ज्ञानेश्वरींतील कठीण शब्द व त्यांचे अर्थ दिलेले आहेत.

# १७ ] [ १००

हें दहा वीस पानांचें अगदीं किरकोळ बाड आहे. त्यांत श्रीसमर्थांचे अभंग आहेत. पण त्यांत हि कांहीं अप्रकाशित आहेत. त्यामुळें बाड अलिकडचें आणि किरकोळ असलें तरी उपयुक्त आहे.

# १८ ] [ १६१

ही मुक्तेश्वरकृत हनुमंत नाटकाची पोथी होती. ओवीसंख्या १३४. लेखनकाल १६९२ श्रावण वद्य ३०. हस्ताक्षर शिवजी माधजी प्रभु कायस्त त्याती माहिमकर.

कै. नारायणराव मेहेळकर हे काव्यसंग्रह संपादित असतां त्यांनीं ही प्रत मागून घेतली होती, पण पुढें ते निवर्तल्यामुळें ती प्रत परत आली नाहीं.

या अनुक्रमांकाचे जागीं अर्थात् संग्रहांत ही पोथी नाहीं.

हें प्रकरण काव्येतिहाससंग्रहांतील अनेक कविकृत पहिल्या भागांत छापलेलें आहे.

# १९ ] [ १५०

ज्ञानेश्वरीशब्दपर्यायाची ही दुसरी प्रत होय. ती पोथीच्या स्वरूपांत आहे. अनुक्रमांक १६ पेक्षां ही जास्त सुंदर आहे.

# २० ] [ १५०

## श्रीदासबोधाचें मुखवस्त्र

आपल्या मासिकाच्या ११३ व्या अंकात शुद्धचर्चेपैकीं ११३ व्या च लेखां-कांत जें श्रीदासबोधाचें मुखवस्त्र दिलें आहे, तें हें नव्हे. त्याच्या ७९ ओव्या असून त्यांत क्रमशः प्रत्येक दशकाच्या प्रत्येक समासांत कोणता विषय आला आहे, तें सांगितलें आहे.

प्रस्तुतचें मुखवस्त्र अगदीं निराळ्या स्वरूपाचें आहे. ग्रन्थराजाच्या *पहिल्या दशकाच्या पहिल्या च समासांत या ग्रन्थांत* कोण कोणते विषय आले आहेत याचें जें उत्तर दिलें आहे, त्या उत्तरांत सांगितलेले विषय कोण कोणत्या समासांत निरूपिले आहेत, तें या मुखवस्त्रांत सांगितलें आहे.

सभेच्या ग्रन्थराजाच्या आवृत्तींत टिपेंत हे विषय दर्शविले आहे. त्यांत आणि या मुखवस्त्रांत दोन तीन ठिकाणीं फरक आहे. शिवाय हें मुखवस्त्र ओवीबद्ध असून त्याच्या अवघ्या २५ च ओव्या आहेत. म्हणून तें सबंध मुळाबरहुकूम छापावेसें वाटलें. तें पुढील मिळेल देऊं.

१८५१ श्रावण शु. ३ शनिवार

श्रीराम प्रसन्न

श्रीदासबोधग्रंथ याचें गुप्तग्रंथ

कोणे दशकिं कोणे समासीं काय बोलिलें याचा विचार

आतां वंदूं गजानन । मातें शारदेसी नमन ।
सद्गुरुस शरण । अनन्य भावें ॥ १
श्रोतीं व्हावें सावधान । येकाग्र करूनिया मन ।
आतां सांगेन प्रश्न । ग्रंथगर्भींचे ॥ २
पहिले दशकीं प्रथम समासीं । उभविले शाविस आशंकेसी ।
ते कोणे दशकीं कोणे समासीं । सांगितले पुढां ॥ ३
मुख्य भक्तीचा निश्चयो । चौथे दशकीं नवविधा निश्चयो ।
जाला असे येथें संशयो । तुटोन गेला ॥ ४
शुद्ध ज्ञानाचा निर्धार । पांचवे दशकीं सहावे समासीं विस्तार ।
सांगितला तो अति तत्पर । होऊनि ऐका ॥ ५
आतां वैराग्याची आशंका । तरावे दशकीं चवथे समासीं देखा ।
विचरोन वर्ततां त्या सुखा । पात्र होईजे ॥ ६
आत्मस्थितीची विचारणा । अष्टम दशकीं अष्टम समासीं जाणा ।
निर्धारितां जन्ममरणा । ठाव कैंचा ॥ ७
आतां शुद्ध उपदेश । सहावा दशक दुसरा समास ।
पाहोनिया सावकाश । विवरण करावें ॥ ८
पावे सायोज्य मुक्ती । चौथे दशकीं दहावे समासीं युक्ती ।
बोलिली असे ते श्रोतीं । श्रवण करावें ॥ ९
मोक्षप्राप्तीचें निरूपण । ज्ञानदशकीं सप्तम समासीं जाण ।
केलें त्याचें विवरण । केलें पाहिजे ॥ १०
जाणावया शुद्ध स्वरूप । पूर्ण दशकीं दहावे समासीं रूप ।
केलें तेणें श्रवणें तद्रूप । होऊन जाईजे ॥ ११
विदेहस्थिति ते कैसी । सप्तम दशकीं सातवे समासीं ।
निरूपिलें तें मानसीं । आणिलें पाहिजे ॥ १२
आतां ऐक अलिप्तपण । गुणभूत दशकीं सहावें समासीं जाण ।
सांगितलें तें करावें श्रवण । येकाग्र चित्तें ॥ १३
मुख्य देव तो कैसा । सीम दशक दुसऱ्या समासा ।
अवलोकितां मग मानसा । संदेह कैंचा ॥ १४

आतां भक्ताचा निर्धार । जगज्जोतीदशक सप्तम समासीं विचार ।
केला तो श्रोतीं सादर । होऊनि ऐकिजे ॥ १५

जाणावया जीव आणि शिव । श्रीमद्दशकीं प्रथम समासीं भाव ।
मानसीं आणितां वाव । संदेह होतो ॥ १६

कैसें तें ब्रह्म शाश्वत । सप्तम दशकीं चौथे समासीं सिद्धांत ।
केला तेणें संशयास अंत । होऊन गेला ॥ १७

उपासना मुख्य ते कैसी । पंधरावे दशकीं नवमे समासीं ।
निरोपिलें तें मानसीं । सदृढ धरावें ॥ १८

कवित्व करावें कैसें । चौदावे दशकीं तृतीय समासें ।
बोलिलें तें सावकाशें । श्रवण करावें ॥ १९

नाना युक्तीचें तें चातुर्य । अष्टादश दशकीं सहावे समासीं पर्याय ।
सांगितला तेणें श्रवणें होय । समाधान ॥ २०

कळाया आपण कोण । वैराग्य दशकीं तिसरे समासीं निरूपण ।
केलें तें करावें श्रवण । सावध होऊन ॥ २१

मायोद्भव तो कैसा । अष्टम दशक तिसरे समासा ।
पाहतां मग कायसा । संशय उरे ॥ २२

पंच महाभूतांचा विचार । आठवे दशकीं चौथे समासीं निर्धार ।
केला तो सत्पर । होऊन ऐका ॥ २३

ब्रह्मांडकर्ता तो कोण । त्रयोदश दशकीं आठवे समासीं खूण ।
निरूपिली तेणें पूर्ण । समाधान याणें ॥ २४

नाना प्रकारींचीं मतें । आठवे दशकीं दहावे समासीं समस्तें ।
सांगितलीं तीं धरावीं चित्तें । श्रोते जनीं ॥ २५ ॥ ७९ ॥

# २१ ]

[ ७५

श्रीहनुमंतस्वामीकृत बखरीला अनुसरून कोणी हें ओवीबद्ध श्रीसमर्थचरित्र लिहिलेलें आहे. त्याचे नऊ अध्याय पुरे होऊन दहावा अध्याय अर्धवट सोडलेला आहे. त्यांत चाफळमठाच्या स्थापनेपर्यंतचा कथाभाग आला आहे.

ग्रंथकारानें आपलें नांव कोठें च दिलेलें नाहीं.

# २२ ] [ १५०

हें एक अगदीं किरकोळ सतरा पानांचें बाड आहे. पहिलें पान गहाळ आहे.

त्यांत रामदास, मध्वनाथ, वहेणी, नामा, तुका, जनी, ज्ञानदेव यांचे अभंग आहेत.

# २३ ] [ २००

नित्यानंदविरचित निरंजनाष्टकाची ही पोथी आहे.

संस्कृत ८ श्लोकांवर ही ७७ ओव्यांची टीका आहे.

पोथीचीं एकंदर पानें १२, पैकीं पहिलीं ५ पानें गहाळ आहेत, म्हणजे पहिले चार श्लोक व त्यावरील टीका यांना आपण मुकलों.

हें अष्टक पूर्वी कोठें उपलब्ध असल्याचें मला माहित नाहीं.

अष्टकाचा शेवट :

निरंजनाष्टक स्तुतिस्तोत्र । श्रीदत्तें स्तुति केली विचित्र ।
निरंजनीं अलक्ष सूत्र । पुण्य पवित्र सुखाचें ॥ ७१

स्वानंद मिनला निरंजनीं । मुद्रा अगोचर उन्मनी ।
सदोदित अखंड ध्यानीं । निरंजन स्वानंद ॥ ७२

मुळीं स्तुति स्वानंदाची । स्वयें आनंदेंविण कैंची ।
स्तुति श्रीदिगांबर देवाची । पुराण पूर्वीची विस्तारें ॥ ७३

निरंजनाष्टक त्रिकाळपठण । स्वानंदें जो करील श्रवण ।
सायोज्य पद पावे जाण । ब्रह्म निर्गुण निरंजन ॥ ७४

जो जो करी जे मनोरथ । ते ते तया होईल प्राप्त ।
निरंजनस्तुति विचित्र । शुद्ध पवित्र सत्वाचें ॥ ७५

स्वानंदें श्रीदत्तें स्तुति केली । स्वानंद श्रीदत्त माउली ।
स्वानंद निरंजन साउली । नित्यानंदवाणी वदली स्वानंदें ॥ ७६

इति श्री निरंजनाष्टक । जपतां निवारे संकट ।
स्वानंद नित्यानंद घनदाट । स्तुति निष्टंक निर्गुण ॥ ७७

## २४ ] [२००

ज्ञानदेवविरचित अमृतानुभवाच्या पोथीचीं २५ तें ३४ पानें यांत चवथ्या प्रकरणाच्या २१ व्या ओवीपासून पांचव्या प्रकरणाच्या शेवटापर्यंत भाग आला आहे.

## २५ ] [१००

यांत हनुमंतस्वामीकृत प्रकरणात्मक बखरीचा कांहीं भाग व महिपतिकृत दासविजयाचा कांहीं भाग आहे. दोन्हीं प्रकरणें पोथीवजा बाळबोध लिपींत लिहिलेलीं आहेत. हीं मूळचीं डोमगांवमठांतील होत.

दासविजय च हल्लीं संतविजय म्हणून प्रसिद्ध आहे. त्याचे फक्त पहिले दोन अध्याय आहेत.

बखरींची प्रकरणें १ ते ४ व शेवटचें १३ वें प्रकरण एवढीं च आहेत. शेवटच्या प्रकरणाचा शेवटचा मजकूर महत्त्वाचा आहे. तो असा :

" ही प्रती जुने प्रतीवरील शके १७१५ प्रमाथी नाम संवत्सरे माघ वद्य द्वादशी बुधवारी परळी मुकामी लिहिली परंतु जुने प्रतीवर विशेष चरित्राचा विस्तार नव्हता म्हणोन 'शके १७१९ ईश्वर नाम संवत्सरे आषाढ वद्य पक्षी जेतापुरचे मुकामी मल्हारी रामराव चिटनीस व रंगो लक्ष्मण याणी श्रीचीं' प्रार्थना केली जे श्रीचे चरित्र विस्तारेंकरून ल्याहावयाविषइ आज्ञा जाली पाहिजे त्यावरून श्रीनें स्वमुखें कांहीं सांगितलें आणि जुने बखरीवरील पाहोन श्रीसमर्थांचें चरित्र लिहिलें....हनुमंतस्वामीनी चाफळ मुकामी आज्ञा करून चरित्र समाप्त करविलें....समाप्तीचा शक १७४० बहुधान्य नाम संवत्सरे आश्विन शुद्ध दशमी मृगुवासर....नंतर त्या च शकांत श्री हनुमान स्वामी याणी देह फसवे परळी येथें ठेविला ... फाल्गुन शुद्ध सप्तमी बुधवारी प्रातःकालीं सप्तमी होती अस्तमानीं देह ठेविला त्या समईं अष्टमी होती म्हणोन शुद्ध अष्टमी श्री चे चिरंजीव श्री महादेव

स्वामी आहेत त्यांचे चरण घेऊन सर्व सांप्रदाय व शिष्य-मंडळी आहेत ॥ "

यावरून असें होतें कीं हनुमंतस्वामींनीं लिहिलेली बखर त्रोटक होती. तिची १७१५ तील एक प्रत घेऊन मल्हार रामराव चिटनीस व रंगो लक्ष्मण यांनीं १७१९ त तिचा विस्तार केला.

हल्लीं प्रकाशित असलेली बखर ही ही विस्तार पावलेली बखर होय.

हनुमंतस्वामींनीं लिहिलेली मूळची त्रोटक बखर हि सुदैवानें आपणांस उपलब्ध झाली आहे. पुढील अनुक्रमांक त्या च प्रतीचा आहे.

## २६ ] [ १४२

हनुमंतस्वामींनीं सांगितलेली मूळची बखर ती ही. ही मोडींत लिहिलेली आहे. सुटे २५ उभे बंद आहेत. ते प्रथम एका बाजूस लिहून नंतर येवटून बंदांच्या पाठीमागच्या हि बाजूस लिहित लिहित बाराव्या बंदाच्या पाठीमागें बखरीची समाप्ती झाली आहे.

दुर्दैव मात्र असें कीं, पहिला सबंध बंद, नवता अर्धा बंद, पंचविसावा अर्धा बंद, असे गहाळ आहेत व बंद ७, ८, ९, २४, २५ यांच्यांतील मधला च थोडा भाग कसरीनें नाहींसा केला आहे.

ऐतिहासिक आणि सांप्रदायिक दृष्टीनें या बखरीला फार महत्त्व आहे. इतिहासभक्तांना आणि सांप्रदायिकांना ही बखर लवकर छापली जावी, अशी तळमळ लागली पाहिजे. या प्रतीचा शेवट असा आहे :

" शके १७११ सौम्य नाम संवत्सरे श्रावण शु॥ ९ रो गुरुवारी ते दिवसी प्रारंभ केला तो श्रावण वद्य ९ नवमीस समाप्त जाहाली फलावे सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ती " " हस्ताक्षर मोरो भगवंत सबनीस कीले सजनगड. "

## २७ ] [ १५०

हे दीडशें वर्षांमागच्या दोघातिघांच्या हातच्या दासबोधाच्या प्रतींचीं कांहीं पानें. प्रती अगदीं सामान्य आहेत.

हें पत्र इतरत्र छापलेलें आहे, पण अशुद्ध छापलें आहे. श्रीसमर्थांच्या कवितेचा आपणांस जो एक भाग पहावयाचा आहे, त्यांत हें पत्र अवश्य येईल.

( १ ) मानपंचक संपूर्ण श्लोकसंख्या ॥ १२५ ॥
( १ ) दासबोधाचें गुरुस्तवन संपूर्ण ओवी संख्या ७९
( १ ) वीस श्लोकांचें एक संकीर्ण प्रकरण. आरंभ :
माना नाना मना नाना । नानाना ममना घरें ।
नाना नाना नमा नाना । नामानें भरलें तरें ॥ १
( १ ) तसेंच एक नऊ ओव्यांचें प्रकरण. आरंभ :
जे समजाचे अनुज । जेष्ठोदर किंवा आत्मज ।
भगिनी दुहिता किंवा भाज । हें हि कळेना ॥ १
( १ ) प्रकाशित स्फुट प्रकरणांपैकीं ६१ वें स्फुट प्रकरण. आरंभ :
संसारीं धावते कोणें । गुरूंच्या गूढ पुरुषा ।
वंश तो वाटला पुढें । नाना जाति शुभंकळीं ॥ १
( १ ) ५६ वें स्फुट प्रकरण :
जगदात्मा जगदीश्वरी । परमात्मा परमेश्वरी ॥
( १ ) शकुनवंती – सरस प्रकरण – ४९ श्लोकांचें. शेवट—
क्षकारे लभते भाग्यं राज्यसन्मानमेव च ।
संपदा विविधा तत्र प्रमाणं च प्रजायते ॥ ४९
॥ इति केवलीभाषित सिद्धिमाळा ॥
( १ ) लिखित—जनस्थान गोदातटी । परम पावन पंचवटी ॥
हें श्रीसां. चि. वि. २८ त छापलें आहे.
( १ ) तूं भक्तांचें माहेर । तूं विरक्तांसी आधार ।
तूं ज्ञानियाची थार । संतापातीत ॥ १
तूं योगाचें मंडण । तूं साधकाचें भूषण ।
सर्व साधकाचा क्षण । संग तुझा ॥ २
तूं धार्मिकाचा आश्रयो । तूं पुण्याचा निश्चयो ।
तुझेनि वाक्यें मनोजयो । साधकांसी होये ॥ ३
तूं भजनाचें जीवन । तूं सगुणाचें रक्षण ।
तूं शांतीचें गोडपण । आनंदमये ॥ ४

तुझेनि भक्तिरंग माजे । तुझेनि उपासना गाजे ।
तुज परमार्थ हा साजे । भावार्थपणें ॥ ५
तूं सन्मार्गाचा कैपक्षी । तूं अनन्याचा अंतरसाक्षी ।
तुझी... ...

पुढील भाग गहाळ. हनुमंतस्वामीकृत बखरींत श्रीसमर्थांनी मातुःश्रींना लिहिलेलें म्हणून एक पत्र दिलें आहे, त्यांत दोन तीन पत्रें एकत्र केलेलीं दिसतात. त्यांत या वरील ओव्या हि आढळतात. त्यांत त्या कशा अशुद्ध छापलेल्या आहेत हें हि यावरून दिसतें.

(१) राम तो जाणिजे आत्मा । सर्वांतरात्मा तो चि तो ॥
इत्यादि १५ श्लोक. पुढील भाग गहाळ.

चतुर्थमान प्रकरणापैकीं होत.

(१) रामावरील एका संस्कृत स्तोत्राचें एक पान–श्लोक १४ ते २१

(१) स्फुट प्रकरण ५ पैकीं ११ ते २० श्लोकाचें एक पान

(१) स्फुट प्रकरण ४२ पैकीं फक्त ३, ४ व ५ हे तीन श्लोक असलेलें एक पान. त्या श्लोकांचा येथें २२, २३, २४ असा क्रम आहे. त्यांत शिवाय पाठांतर आहे, म्हणून जेवढा भाग या पानावर आला आहे तेवढा येथें देतों.

+ + + + ती रासावी । शब्दाशब्दीं परोपरीं ।
तुटली प्रीती ते खोटी । राखिली पाहिजे परी ॥ २२
विपट बहुधा लोकीं । चालतें तें कळेचिना ।
शोधिलें पाहिजे आधीं । जाणजाणों चि वर्तणें ॥ २३
वर्ततां येत नाहीं रे । वर्तणें न कळे जनीं ।
सकळासी राखणें राजी । हें मुख्य वर्म जाणिजे ॥ २४

(१) स्फुट प्रकरण ५७ पैकीं श्लोक १२।१३।१४ असलेलें एक पान.

(१) परचक्रनिरूपण नाम समास ॥ १ ॥ चा अपूर्ण भाग. जेवढा आहे तेवढा श्रीसं. वि. त्रै. १४ त दिलेला आहे.

तात्पर्य, या क्रमांकात मूळचीं बरीं च महत्त्वाचीं प्रकरणें असलीं पाहिजेत. जीं गहाळ झालीं आहेत, त्यांना आपण कायमचे मुकलों असल्यास तें आपलें दुर्दैव होय.

३६ ] [ २५०

त्रुटित पत्रें

( १ ) आलया लटकि च सटपट रे ॥ ध्रु० ॥

हें ज्ञानदेवाचें पद. वा०यसम्रहातील अनेककविकृत पदसंग्रह भाग दुसरा, यात छापलेलें आहे, पण अशुद्ध

( १ ) निर्गुणरूपीं मिळाला जन पावन जाला ॥ ध्रु० ॥
बहुत वेळ आला गेला । सज्जनसंगें निवाला ॥ १
आत्मशास्त्रगुरुपरिचय पाहाता ।
अंतरिं निश्चय आला ॥ २
दास म्हणे मन आत्मनिवेदन ।
उन्मनयोगिं बुडाला ॥ ३

( १ ) आलेस ज्यागे । समर्थांचें हिंदुस्थानी पद

( १ ) बहु आतुरा चातुरा हि पडेना ॥ अष्टक

( १ ) हें एक पाठपोट पान उद्धवाच्या हातचें दिसतें.

रघुविराविण आस असेचिना ।
रघुविराविण माय दिसेचिना ।
रघुविराविण बाप दिसेचिना ।
रघुविराविण गोत दिसेचिना ॥ १

तुम्ही प्रार्थना सारिखी बुद्धि जाली ।
म्हणानी तुम्हा शुद्धि सर्व उडाली ।
मना मानलें तें तसें सर्व कलें ।
म्हणोनी तुम्हें सर्व ही येश गलें ॥ १

किती भक्तलोकासि ते प्रार्थना हो ।
तुम्ही रामनामासि ठाकूनि या हो ।
अरे तुमचे हातीचा लाभ जातो ।
पुढें प्राप्त काळावरी होये ना तो ॥ १

खरें सीघ्र उठोनि वेगीं पळावें ।
समर्था प्रभूच्यापिं भेटीसि यावें ।

घरी सर्व ही सौख्य पावाल वेगीं ।
तुम्हा सूचना रे चला सर्व नेगीं ॥ २

जनीं जाणता सर्व ही अतरीचें ।
तयालागि कां सीकवावें परीचें ।
कसा जाणता नेणता वोळखावा ।
विवचूनि आधीं वरा शोध घ्यावा ॥ १

सकळ समजोनि बोलावें । सकळ समजोनि चालावें ।
सकळ समजोनि समजावें । कांहीं येक ॥ १

समयीं जसें लाविसी जे विलेनें ।
तसें ते चि वर्तोन ते ते विलेनें ।
न ये साधिता लाविलें ज्या सीमेनें ।
तरी भ्रांत पावोन ते श्लाघ्यतेनें ॥ १

(१) मोतीयाचे पाणी राजण भरिला ।
पोट भरनी पेला । ज्ञानदेव ॥ १
अभ्राची सावोली धरूनिया हातीं ।
गेलासे येकांतीं । निवृत्तिदेव ॥ २
पुष्पाचा परिमळ वेगळा काहाडीला ।
तो हार लेईला । सोपानदेव ॥ ३
हिऱ्याच्या ठुगऱ्या लेवण जेविली ।
पोट भरनी घाली । मुक्ताबाई ॥ ४
चवघाचें वर्म आलें असे हाता ।
वटेश्वर स्वता । तीये ठाईं ॥ ५

(१) आम्ही मागों ऐसें नाहीं तुजपासीं । तुकारामाचा अभग
(१) गौहत्या घडली ज्याला । आम्ही सत म्हणूं त्याला ॥ १
नाहीं केलें मद्यपान । वृथा त्याचें सतपण ॥ २
इतुकें घडे जया ठाईं । मुक्तेश्वर तया पाईं ॥ ३

३७ ] [ १५०

(१) निपट कपट नाहीं अतरामाजि कांहीं ॥ भीम वि/ वि/ ३१
(१) अनतगोपाळदासकृत येकनाथाची आरती.
(१) शरणागत मी तुझा कृष्णा । आनदाचिये ॥

हें जयरामस्वामींचें कृष्णाप्पाधर पद. श्रीदा. वि. वि. १८

( १ ) मध्वनाथकृत सकुबाईचें चरित्र–धोंगोठंच्या ५९

( १ ) गोविंदात्मज प्रल्हाद कृत ' नरसिंपुर धामराज नरहरि ' वर दोन पदें.

३८ ] [ १००

ही मोडींत लिहिलेल्या एका बखरीचीं पहिलीं अवघीं पांच पानें आहेत. मथळ्यावर ॐकाराचे खालीं " हे बखर अमृत गणेश बरवे याची बखर असे " असा मजकूर असून तो खोडलेला आहे व उजवे बाजूस " येकापासून तर अदुसष्ट पावेतों असे " असा मजकूर असून तो हि खोडलेला आहे. डावे बाजूस मात्र १० चा अंक, त्या खालीं रेघ देऊन ११ चा अंक व पुन्हा त्या खालीं रेघ देऊन ६८ चा अंक कायम आहे.

नमनानंतर बखरीचा आरंभ आहे तो असा:

" श्रीमंत राजमान्य राजश्री नानासाहेब व भाऊसाहेब साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी होळकर व जनकोजी सिंदे मुकाम कुंभेरी दोन्ही कर जोडून सीर साष्टांग दंडवत विज्ञापना तागाईत छ १७ माहे सफर पावेतो साहेबाचे कृपावलोकनें करून वर्तमान यथास्थित असो विशेष आपल्यापासून आम्ही स्वार जाहलो ते सुखरूप पावलो दिल्ली हसनापुरास पावल्यानंतर इकडील हकीकत ऐसी आहे की...."

असली बखर छापलेली पाहण्यांत नाहीं. दुर्दैव, कीं, तिचीं नुसतीं आरंभींचीं पांच च पानें उपलब्ध असून ६३ पृष्ठें म्हणजे वस्तुतः सर्व च बखर अनुपलब्ध असावी. अशी एक बखर आहे व संशोधकानीं ती शोधून काढली पाहिजे, एवढी कल्पना करून देण्यापुरतें च या पांच पानांचें काम आहे. हीं पांच पानें ऐतिहासिक साधनांत देण्याचा विचार आहे.

३९ ] [ १०५

बाड अपूर्ण आहे. आरंभींचीं, शेवटचीं व मधलीं कांहीं कांहीं पानें गेलीं आहेत. यात तीन ग्रन्थ आहेत:

( १ ) हरिहरदास कृत पवनविजय ( उपलब्ध ओ. २०४ )

आतां नमून श्रीगुरु । जो आदिलिंग महेश्वरु ।
स्तुति करितां पारु । कदा न कळे ॥ ५
ऐसा श्रीगुरु वंदिला । नृसिंहु स्मरिला ।
तव ज्ञानप्रकाशु केला । हरिहरदासा ॥ ६

माझ्या समजुतीप्रमाणें ग्रंथ अप्रकाशित आहे.

( २ ) मूळस्तंभ. अपूर्ण आहे. याचा शेवट :

तव म्हणे पार्वती । अहो जी देवा पशुपती ।
आतां माझी फिटली भ्रांती । सर्वाराची ॥ ४७
अनुभव मनासी आला । ज्ञानबोध साध्य ।
आंतीपदर फिटला । तुमचेनी प्रसादें ॥ ४८
संपूर्ण जाला शिवबोधु । ईश्वरपार्वतीसंवादु ।
दोहींचा अनुवादु । येथुनी जाला ॥ ४९
हा श्रीशिवनिजबोधु । ऐकोनि वर्तती साधु ।
पाविजे वायके शिवबोधु । शिवनीतीचा ॥ ५०
जें पडेल पुरुषासी साकडें । तें करिजे हें उघडें ।
नेमुनियां धडपुडें । मग वाचीजे ॥ ५१

इति श्री मूळस्तंभ । ईश्वरपार्वतीसंवादे ।
दत्तात्रय अवधूत अनुवादे । सप्तमोध्याय. ॥

प्रसंग ॥ ७ ॥ ❀ ❀ ❀ ❀ ॥ सके १६७८ ॥ ईश्वा नाम संवछरे ।
माहे वद्य बीजीयां बुधवार प्रहर पहिला हस्ताक्षर माहादेव धादा
उपनाम पानगव्हाणे त्याचे पुस्तक ॥

म्हणजे १६७७ युव नाम संवत्सरे माघ वद्य २ बुधवार, असें वाटतें.

( ३ ) तिसरा ग्रन्थ म्हणजे भागवतावरील कांहीं भाग दिसतो. अर्थात् अपूर्ण आहे. एकुणवीस अध्याय होऊन गेले. विसाव्या अध्यायाच्या १ ते १५८ ओव्या व पुढच्या मधल्या च कांहीं २१८ पर्यंतच्या ओव्या आहेत. हा कोणाचा ग्रन्थ आहे, तो प्रकाशित का अप्रकाशित आहे, मला सांगतां येत नाहीं. ग्रन्थ अनेक दृष्टीनीं महत्वाचा आहे. वाचकास बोध व्हावा म्हणून कांहीं ओव्या सादर करतों :

महानंदा यदुकुळभूषणा । पुढें बोले ग्रन्थरचना ।
मधुरेसी जाऊनी वैकुंठराणा । काय करिता जाला ॥ १

पुढ़ेंगवितावी अध्याई कथन । कंस मारून बंदीमोचन ।
त्यावर जालें मौंजीबंधन । मग नंद गेला गोकुळा ॥ ७

यावरी सुदामा नाम ब्राह्मण । संकर्षण आणि श्रीकृष्ण ।
गुरुगृहाप्रती तिघे जण । विद्याभ्यासासी चालिले ॥ ८

अवंतीनगरामाजी जाण । महाऋषी संदीपन ।
जो शास्त्रज्ञानी निपुण । चान्ही वेद मुखोद्गत ॥ ९

यानंतर मग

त्यासी शरण आधीं जावे ॥
हें चि आश्चर्य वाटते ॥
हें चि लक्षण शिष्याचें ॥
त्याची संगती न धरावी ॥
ते हि शिष्य,जाणावे ॥

इत्यादि चरणें चवथ्या चरणाचे जागीं असलेल्या कित्येक ओव्या आहेत. त्या बोधप्रद आहेत.

ज्या सद्गुरुसेवा नावडे येथार्थ । काय जाळावा त्याचा परमार्थ ।
गुरुसेवेवीण विद्या समस्त । अविद्या होती जाण पा ॥ १९९

# ४० ] [ १००

हीं ४ ते २९ पुढीं पानें आहेत. त्यांत फक्त मधलीं २२ व २३ हीं दोन पानें नाहींत. कोणता ग्रन्थ आहे तें कळत नाहीं. ग्रन्थ ओवीबद्ध आहे. मधल्या नसलेल्या दोन पानावरील १५८ ते १७६ ओव्या वगळून १७ ते २२२ ओव्या आहेत. आरंभींचीं ३ पृष्ठें गेलीं आहेत व २९ नंतरचीं किती पृष्ठें गेलीं असतील तीं खरीं. ग्रन्थाचा वाचकांस बोध व्हावा आणि शोध लागावा, म्हणून मधल्या मधल्या कांहीं ओव्या उतरून घेतों :

निवृत्तिचरणवंदन । प्रसाद परम गहन ।
राहिलें कूटस्थ होऊन । गुणातीत ॥ २८

वस्तु सांगावया कारण । चौथं राहिले मुके होऊन ।
अठरांचीं अंत करणें । त्रिपुटी जालीं ॥ ३६

साही जण खटपटत । चौघे जण वेवादत ।
इतुकीयातें जाणत । तें चि बीज ॥ ३७

येका भोजन मिळालें । तेणें जग पाहिजे धालें ।
अथवा येकासी मुक्तपण आलें । तरी काये सर्व हि मुक्त ॥ १०१

विश्वास फळेल ज्यासी । म्हणोनी भजे तयासी ।
जो आणून दे अनुभवासी । तो चि श्रीगुरु ॥ १८४

## ४१ ] [ १००-२००

यात कागदांचे ९४ तुकडे आहेत. पैकीं काहीं पोथ्याचीं पानें असावींत. त्यात ध्यानदसुत, रामदास, शिवसुत मुनेश्वर, रंगनाथ, तुकाराम, माळो, शिवदिनकेसरी, मुसळ, नायनरहरि म्हणे महिपती, विष्णुदास नामा, कबीर, मध्वनाथ, अमृतराय, येकोबामा, येकनाथ, नामदेव, उद्धवचिद्धन, उद्धव, रेणुकानंदन विठा, चिदानंद, ज्ञानदेव, मेरु, गोविंदसुतात्मज, पुंडलीक, केशव, थोघला, अनंत इत्यादिकांचें एकाद दुसरें पद, अभंग वगैरे आहेत. एक मंत्राचा कागद आहे. एकादा औषधाचा आहे. एका कागदावर खानदेशांतील दळींच्या एरंडोल तालुक्यातील पद्मालय येथील गणपतीवर आरती आहे. ती, केंव्हाची व कोणी केली आहे, कळत नाहीं. काहीं सूचीचीं पानें आहेत. अशा सूच्या बहुतेक मठात आढळतात. ओव्याचीं अथवा अभंगाचीं अथवा पदाचीं पहिलीं दोन चार अक्षरें स्मरणार्थ लिहिलेलीं असतात. पूर्वी सर्वांचें पाठांतर खूप असे व उजळणी करण्याला या सूच्या उपयोगीं पडत असल्या पाहिजेत. श्रीसमर्थांचा एकाद दुसरा अभंग नवीन आहे व काहींत पाठांतर आहेत. शेवटच्या सोपनाच्या तुकड्यावर पुस्तकाची मोठी यादी आहे. तींत निवृत्तेश्वरी ग्रन्थाचा उल्लेख आहे. ही अपूर्व गोष्ट होय. असला ग्रन्थ माझ्या पाहण्यात आलेला नाहीं. कोणाच्या आला असल्यास ठाऊक नाहीं. माझें वाचन फार थोडें आहे. निवृत्तेश्वरी नावाचा ग्रन्थ छापलेला तरी नाहीं. असला अपूर्व ग्रन्थ संशोधकानीं शोधून उजेडात आणला पाहिजे. ती यादी येथें देतों :

श्रीनरहरीवरद

यादी पुस्तके नावनिसीवार ता। मुकुंद आबाजी कुळकर्णी मौजे निगडी ता। सातारा श १७१२ भाद्रपद वद्य २

| | |
|---|---|
| १ श्रीज्ञानेश्वरी आधे १८ | १ श्रीविवेकसिंधु आधे १८ |

| | |
|---|---|
| १ श्री भागवत आधे ३१ | १ आनंदलहरी ओव्या १५४ |
| १ श्रीसमश्लोकी वामन कृत आधे १८ | १ स्वात्मा अनुभव २२८ |
| १ श्रीनिवृतेश्वरी आधे १८ | १ परमामृत प्रकर्ण १४ |
| १ श्री रुक्मिणीस्वैंवर आधे १८ | ये॥ संख्या ३२५ |

हे मुकुंद आबाजी आपल्या परिचयाचे आहेत. विठ्ठल शिवदेव विंचूरकरांचे ते पुतणे होत. धुळें व धुळ्याजवळील लळिंग आणि सोनगीर या ठिकाणांशीं त्यांचा विशेष संबंध येतो. कृपा तो कल्याणासाठीं श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, द्वितीय खंड, लेखांक ५२६ पहावा.

## ४२ ]

[ १००-२००

निवळ गळाठा. तथापि टाकतां येत नाहीं. आम जो गळाठ वाटतो त्यांतील च एकादा कागदाचा तुकडा उद्यां महत्वाचा वाटावयाचा. श्रीमंतांच्या घरांतील कचऱ्यांत हि एकाद वेळेस मौक्तिक सांपडावयाचें !

## ४३ ]

[ १००-२७५

पत्रें यादी, वगैरे

हीं पत्रें वगैरे, श्री संप्रदायाचीं कागदपत्रें, 'द्वितीय खंड,' या पुस्तकांत लेखांक ५२७ ते ५५० म्हणून छापलेलीं आहेत.

## ४४ ]

[ ४००

ही सहज चारशें वर्षांमागें लिहिलेली एक पोथी आहे. ती एकनाथांच्या हि पूर्वींची आहे, असें लिपीवरून म्हणवां येतें. दुर्दैव कीं, पोथी अपूर्ण आहे, तिची फक्त ३ ते ४१ पानें आहेत. ग्रन्थ ओवीबद्ध असून त्यांत शुकजन्मकथा वर्णिलेली दिसते. १४ ते ४४९ ओव्या आहेत. पहिल्या दोन पानांत १३ ओव्या गेल्या व शेवटचीं किती पानें आणि किती ओव्या

गेल्या, देव जाणे. ग्रन्थकाराचें नाव आढळत नाहीं. शोध लावता यावा म्हणून दोन चार ओव्या सादर करून ठेवितों. पोथी मननीय आहे.

षट्कर्मी ब्राह्मणु । वेदशास्त्रीं प्रविणु ।
आचारपरायेणु । ब्रह्ममूर्ती ॥ ९८
ऐसे जन्म अपारा । न सुकृती येरझारा ।
सुख दुःख करकरा । दारिद्र्यता ॥ १००
आणि तपसिळ दारुण । याचा जाईल प्राण ।
कोवळे चरण । पोळती पायें ॥ २००
श्वापदें सकळें । असती खेळमेळें ।
सिंहासी गोवळे । खेळवितातीं ॥ ३००
उपकार घडेल लोकां । वोळखिजेल + + + का ।
राज्या हांडनि अनेका । सुख नाहीं ॥ ४००

# ४५ ] [ १५०

सुमारें शंभर पृष्ठांचें हें जुनें बाड आहे तें महत्त्वाचें आहे. त्याचीं मधून मधून काहीं पृष्ठें गहाळ झालीं आहेत, हें दुर्दैव होय. टाकळी मठांतील संग्रहाचें स्वरूप सांगण्याला आरंभ करण्यापूर्वी उद्धवाची जी थोडीशी माहिती देण्यात आली, ती बहुतेक या बाडाच्या आधारानें होय. या बाडात शिवरामांची म्हणजे च उद्धवाची बरी च कविता आहे व थोडी फार श्रीसमर्थ, अनंतमौनी, नामदेव वगैरेंची आहे. कोणा 'बालका' चें एक पद पंचवटींच्या रामावर व एक टाकळी येथील श्रीसमर्थस्थापित मारुतीवर आहे.

उद्धवाची कविता चटका लावणारी आहे. पुढें कोण आणि केव्हां पुन्हा या बाडाकडे वळणार आहे, परमेश्वरास ठाऊक! म्हणून आज च उद्धवाची आणखी थोडी अधिक ओळख करून घ्यावी व वाचकांस करून द्यावी, असें मनांत येतें.

काहीं पूर्व पुण्य होतें, काय होतें कोणास ठाऊक, पण काहीं होतें म्हणून श्रीसमर्थांचे चरण जोडले आणि सुखरूप झालों.

मातें पूर्व पुण्य समर्थ जाणावें ।
मज काय ठावें । रूप त्याचें ॥ १
रूप त्याचें ठावें नाहीं कीं मजला ।
थोर लाभ जाला स्वामीयाचा ॥ २
स्वामीयाचा लाभ अद्भुत जाहाला ।
देहाधडी केला वियोग तो ॥ ३
वियोग तो गेला संयोग जाहाला ।
लाभ दुणावला । असंभाव्य ॥ ४
असंभाव्य मज सुख फार जालें ।
दुःख सर्व गेलें । हारपोनी ॥ ५
हारपोनी गेलें दुःख हें सकळ ।
सुखाचा सुकाळ । फार जाला ॥ ६
फार जाला परीपूर्ण चि अमूप ।
तेणें सुखरूप । विसांवलों ॥ ७
विसावलों चिंता गेली बहु दुरी ।
कोणेविसीं उरी नाहीं आतां ॥ ८
नाहीं आतां उरी कांहीं देवराया ।
माझी सर्व माया । दुरी ठेली ॥ ९
दुरी ठेली सर्व माया चि वहाली ।
निजपदीं जाली दृढ गांठीं ॥ १०
दृढ गांठीं जाली शिवराम लीन ।
होउनी तल्लीन उगा ठेला ॥ ११

स्वामींच्या चरणापासून दूर कोठें तरी जाऊन महंती करण्याची उद्भवांना नव्हती, स्वामींच्या चरणीं विपद्धन जावें, असें त्याना वाटे.[1]

स्वामीचे चरण ते माझी महंती ।
महंती ते किती । पायापुढें ॥ १

आतां व्हावी जोडी स्वामीच्या पायाची ।
तेथें महंतीची । चाड नाहीं ॥ ९
श्रीचे पाईं दुजेपणें म्या नसावें ।
अभिन्न चि व्हावें ऐसें मनीं ॥ १२
अभिन्नत्वें चिरकाळ म्या असावें ।
शिवराम भावें । विनविते ॥ १४

श्रीसमर्थ आपल्या शिष्यांना कोणत्या युक्तिबुद्धि शिकवीत त्याची उदव, म्हणून, पुढील प्रकरणांत परीक्षा देत आहेत :

शब्दांचा गल्हांटा कामांचा गल्हाटा ।
लोकांचा गल्हांटा । करूं नये ॥ १
शब्द निवडावे लोक निवडावे ।
सर्व हि जाणावे । उंच नीच ॥ २
तयापरी सर्व कामें निवडावीं ।
प्रकारें जाणावीं । बहुविध ॥ ३
शब्द-लोक-कामें सर्व कालविलीं ।
गळंगा चि केलीं । आगें मागें ॥ ४
तरी नाना दुखें कोसळती फार ।
दुखाचे डोंगर । होत जाती ॥ ५
शब्दांच्या माळिका लोकांच्या माळिका ।
कामांच्या माळिका समजाव्या ॥ ६
आधीं मुख्य येक मग खालेखाल ।
पाहावें सखोल । बुधीयोगें ॥ ७
उचाहुनी उंच नीचाहुनी नीच ।
किती पांच पेंच । वोळखावे ॥ ८
किती येक द्वारी कळवी विवेकें ।
तरी सर्व सुखें । होता येती ॥ ९
मग शब्द कामें आणी सर्व लोक ।
चालती धमक । कारबार ॥ १०

पूर्ण असून त्याची १ ते ८ पत्रें आहेत. नंतर पृष्ठ १६ पासून दुसरें प्रकरण सुरू झालें आहे. पुन्हा मधलीं च १०९ ते ११३ पत्रें म्हणजे तेरावें व चवदावें अशीं प्रकरणें नाहींत. शेवटचे पृष्ठाचा अंक २२१ आहे.

या प्रतीचा लेखनकाळ शेवटीं दिला आहे तो :

" शके १६३४ नंदननाम संवत्सरे भाद्रपद शुध १२ द्वादशी सोमवासरे तद्दिने अष्टावक्र ग्रंथ लिखितं । "

ग्रन्थ अपूर्व आहे व ग्रन्थाचा विषय महत्त्वाचा आहे. तो अप्रकाशित रहावा हें महाराष्ट्राचें दुर्दैव होय हा च अला काय, असे कैक महत्त्वाचे ग्रन्थ महाराष्ट्रानें अद्यापपर्यंत अप्रकाशित राहू दिले आहेत !

भारत-इतिहास-संशोधक मंडळाच्या शके १८३५ च्या इतिवृत्तांत तंजावर येथील श्रीसरस्वतीमहालांतील प्राकृत ग्रन्थाचें जें टाचण प्रसिद्ध केलें होतें, त्यांत हि सिद्धान्तचिद्दंबरीची नोंद आहे त्या प्रतीचा लेखनकाल शक १५७१ दिलेला आहे. त्या प्रतीची ग्रन्थसंख्या ३८५० दिलेली आहे, पण प्रस्तुतच्या प्रतीच्या शेवटीं " ग्रंथसंख्या ५००० " अशी नोंद आहे.

४९ ] [ १०५

श्रीशनिश्वरस्तोत्र, सात्याजमिहिपतिकृत, ओवीसंख्या १७८. लेखनकाल शके १७४६ श्रावण शुद्ध १५. प्रतीचा मूळ मालक : बाळाराम तावरे कसबे नाशिक ठिकाणा महलें तावरे याळे त्रिंबक दरवाजा. सदरहु पोथी बाळाराम तावरानें शके १७५७ त टाकळीस मारुतीच्या पायापाशीं मठपतीस अर्पण केली. स्तोत्र छापलें गेलेलें आहे च.

५० ] [ १५०

| | | |
|---|---|---|
| १ रामजन्म, | २ अहल्योद्धार, | ३ सीतास्वयंवर, |
| ४ भरतभाव, | ५ लोपामुद्रा, | ६ रामायण, |
| ७ कृष्णजन्म, | ८ पूतिकाभक्षण, | ९ उखळबंधन, |
| १० बाळक्रीडा, | ११ हरिविलास | १२ कात्यायन, |
| १३ यज्ञपत्नी, | १४ धनसुधा, | १५ ब्रह्मस्तुती, |
| १६ वेणुसुधा, | १७ रासक्रीडा, | १८ रासोत्सव, |
| १९ राधाविलास, | २० गोपीगीत, | २१ कंसवध, |

२२ द्वारकाविजय, २३ रुक्मिणीविलास, २४ भामाविलास,
२५ मुकुंदविलास, २६ वामनचरित्र, २७ नृहरिदर्पण,
२८ नामसुधा, २९ गीतार्णव, ३० परमगुरु,
३१ ध्यानमाला, ३२ राजयोग, ३३ प्रियसुधा,
३४ गजेंद्रमोक्ष, ३५ भीष्मप्रतिज्ञा, ३६ तत्त्वमाला,
३७ चित्सुधा, ३८ स्फुटश्लोक, ३९ भागवत चतुःश्लोकी

अशीं वामनपंडितांचीं ३९ प्रकरणें लिहिलेलीं होतीं, असें येथर्शी दिलेल्या वरील यादीवरून दिसतें; पण आता यांत फक्त प्रकरणांक ६, ११, १४, १५, १६, १९, २२, २५, २८, ३२ ते ३९ एवढीं च प्रकरणें पूर्ण किंवा अपूर्ण अशीं शिल्लक राहिलीं आहेत. पंडितांचीं बरीं च प्रकरणें छापलीं गेलीं आहेत, तथापि वरील यादीतील कांहीं अद्यापि अप्रकाशित असावींत, असें वाटतें.

येथें टाकळी मठांतील उपलब्ध संग्रहाचें वाचन संपलें. याशिवाय मठांत आणखी संग्रह होता. एकनाथी भागवताच्या दोन प्रती होत्या, एक शक १६२३ तील व दुसरी १६९१ तील. कृष्णदासमुद्गलाचें रामायण होतें. ज्ञानेश्वरीची एक जुनी प्रत होती, पण तिचें शेवटचें च पृष्ठ नसल्यामुळें त्यावर लेखनकालाचा उल्लेख असल्यास सांगतां येत नाहीं. लिपीवरून प्रत नाथांच्या हि पूर्वीची वाटली. उद्धवसुतकृत श्रीसमर्थचरित्राची प्रत होती. १७१८ तील दासबोध होता. इत्यादि आणखी ग्रन्थसंग्रह होता. जो संग्रह आम्हांस उपलब्ध झाला तो एका च खेपेस मिळाला, असें नव्हे. टाकळीस आम्ही अनेकदा गेलों होतों, पण पहिल्या प्रथम गेलों होतों तो दिवस चांगला स्मरतो. श्रीराम, श्रीमारुतिराय, श्रीसमर्थ, श्रीउद्धवांची समाधी इत्यादिकांचें दर्शन घेऊन आम्ही डोमगांवीं जाण्यास निघालों. डोमगांव नगर जिल्ह्याला लागून मोगलाईंत सीना नदीचे कांठीं आहे. कुर्डुवाडी पासून डोमगांव आठ कोस येईल व केम आणि जेऊर या दोन्ही स्टेशनांपासून सहा सात कोस येईल. १८२५ च्या पौष शु. २ स आम्ही

## डोमगांवीं जाऊन पोचलों.

पोचलों तों तिन्ही सांजा झाल्या होत्या. गांव जवळ आलें तों समजलें कीं, प्लेगामुळें सर्व गांव बाहेर पडलेलें आहे. सृष्टि भयाण आणि उदास भासत होती. मठपतींच्या झोपडीपाशीं गेलों तों चांगली रात्र पडली होती. कै. बापुसाहेब महाराज यांनीं पत्र दिलें होतें तें मठपति कै. अंबादास

महाराज यांस दिलें तें त्यांनीं प्रथम मस्तकीं प्रत्यक्ष धारण केलें आणि मग वाचलें. शेजारीं एक तरुण बसला होता, तो मजकूर निरखून पहात होता. आपण देवांना ! असें त्यानें मला विचारलें. मला आश्चर्य वाटलें. नऊ वर्षांपूर्वी पुण्यास माव्याच्या शाळेंत सहा महिने पाचव्या इयत्तेवर शिकविण्यास आम्ही होतों, त्या वेळीं तो तरुण पंधरा सोळा वर्षांचा असून त्या वर्गांत होता. दरम्यानच्या नऊ वर्षांत अर्थात् त्याच्यांत फरक पडला होता, मजमध्यें नव्हता. त्यानें सांगण्यापूर्वी मी त्यास ओळखणें शक्य नव्हतें. महाराजांनीं पत्र वाचून तें त्याचे जवळ दिलें. त्यानें पत्र वाचलें. आमची सर्व व्यवस्था त्या तरुणाकडे लागली. डोमगांवीं आम्हांस तो आप्त च भेटला. त्याचें नांव यशवंतराव पीळ. यशवंतराव हे मठपतींचे मेहुणे असून मठाचा कारभार पहात होते. दुसऱ्या दिवशीं सकाळीं यशवंतरावाबरोबर गांवांत मठांत गेलों तो दिवस आम्हांस परम भाग्याचा वाटला ! त्या दिवशीं श्रीकल्याण-महाराजांनीं लिहिलेल्या आणि श्रीसमर्थांनीं स्वहस्ताक्षरें शोध घातलेल्या श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाचें प्रथम दर्शन घडलें ! तसें च श्रीसमर्थांनीं कल्याणांना घालून दिलेल्या किरयाचें दर्शन घडलें ! श्रीकल्याणस्वामींच्या अंगावरील बनातीचा तुकडा व तसल्या च कापडाची श्रीसमर्थांची एक जीर्ण पण मोठी चची, यांचें दर्शन घडलें. कल्याणाचे शिष्य उद्धवजमठपति केशवस्वामी यांनीं लिहिलेली सोनेरीरुपेरी पोथी पहावयास मिळाली. गार श्रोवाद झाले होते. मठांत हि काणी फिरकत नव्हते. किती तरी काळ या वस्तु जवळ घेऊन आम्ही कल्याणाच्या समाधीपाशीं सभामंडपांत कंठिला मूळ प्रतीवरून पहिला समास वाचला व शेवटपर्यंत पोथी मधून मधून चाळली आणि काहीं टिपणें केलीं. काहीं पृष्ठांचे फोटो घेतले किरयाचा फोटो घेतला. सोनेरीरुपेरी प्रतींतील हि चित्रांचे आणि पृष्ठांचे फोटो घेतले यापेक्षां त्या खेपेस जास्त काहीं करणें शक्य नव्हतें. ग्रन्थराजाच्या मूळ प्रतीवरून केलेली एक प्रत मठांत होती, ती तेवढी मठपतींच्या परवानगीनें बरोबर घेतली. शिवाय गिरिराजबुवांनीं आपल्या संग्रहीं असलेला पोथा दिला आणि नानाबुवांनीं सहा वाहे दिले. पहिल्या खेपेस एवढी च संपत्ति मिळाली.

१८५२ कार्तिक शुद्ध १०

## श्रीसमर्थांच्या आज्ञेनें

कल्याणमहाराज डोमगांवीं रहावयास गेले होते. एका प्रसंगीं पर्यटणांत उभयता बरोबर असतां 'तुम्ही येथें वास्तव्य करावें' अशी समर्थांची कल्याणांना आज्ञा झाली होती. त्या संकेतानुरूप शक १६०० च्या सुमारास कल्याण डोमगांवीं रहावयास गेले असावेत. श्रीसमर्थांच्या ठिकाणीं कल्याणांची निष्ठा अतुलनीय होती. कोणा हि एकनिष्ठ शिष्याला, भक्ताला किंवा अनुयायियाला उपमा द्यावयाची तर कल्याणांची देतात. तशी च त्यांची श्रीसमर्थचरणीं निष्ठा होती! श्रीसमर्थांची आज्ञा झाली म्हणून स्वतः पुढच्या बाजूस वसून मागच्या बाजूस झाडाची फांदी तोडल्यामुळें जे विहिरींत पतन पावले, त्या कल्याणांनीं श्रीसमर्थांना च आपले प्राण मानले होते, हें उघड आहे. श्रीसमर्थांनीं हि कल्याणांच्या एकनिष्ठेची स्वतः अनेकदां परीक्षा पाहिली होती व इतरांस साक्ष पटविली होती. या गुरुशिष्यांच्या एकरूपत्वाची परमावधी त्या शेवटच्या प्रसंगानें झाली. वाचकांस ठाऊक च आहे कीं, निर्याणानंतर श्रीसमर्थांच्या अस्थि चाफळास वृंदावनांत नेऊन ठेवल्या होत्या व त्या गंगेत नेऊन टाकण्याविषयीं कल्याणाचे शिष्य उंब्रजमठपति केशवस्वामी कल्याणांची वारंवार परवानगी मागत व 'पुढें पाहू' म्हणून दरखेपेस कल्याण लांबणीवर टाकीत. अखेरीस आतां परवानगी मिळेल च या भरंवशानें १६३६ च्या आषाढ शु. १३ ला केशवांनीं अस्थि काढल्या व मार्गांत डोमगांवीं कल्याणांना भेटून पुढें जाऊं म्हणून त्या अस्थि बरोबर घेऊन ते महायात्रेस निघाले. महदाश्चर्य असें कीं, ज्या क्षणीं तिकडे चाफळास श्रीसमर्थांच्या अस्थि वृंदावनाच्या बाहेर काढण्यांत आल्या, त्या च क्षणीं इकडे डोमगांवीं कल्याणांनीं आपला देह ठेवला! केशवस्वामी अस्थि घेऊन डोमगांवीं पोचले. त्यांना हें वृत्त कळलें. पश्चात्ताप झाला! म्हणून च 'पुढें पाहू' असें महाराज वारंवार म्हणत असत, पण आपण न विचारतां हें काय केलें, म्हणून त्यांना अतोनात दुःख झालें. योगायोग च तसा होता. काय योग म्हणावा पहा, नंतर डोमगांवाहून उभयतांच्या अस्थि एकत्र होऊन पुढें गंगेस जाऊन मिळाल्या! ही कथा च इतकी अपूर्व आहे कीं, हल्लींच्या काळीं तिच्या खरेपणाविषयीं एखाद्यानें शंका घ्यावी. पण हा घडलेला इतिहास आहे आणि तो निष्ठावंतांना अखंड प्रोत्साहन देत राहील. श्रीदास-विश्रामधामकर्त्यांनीं म्हणून च या गुरुशिष्यपणाची धन्यता गायिली आहे :

धन्य धन्य हें गुरुशिष्यपण ।
धन्य धन्य हें सेवाविधान ।
धन्य धन्य हें अभेदलक्षण ।
धन्य धन्य लीळा अगाध ॥ ११६-१५२

यापुढें प्रत्येक रामदासियानें आयुष्यात एकवार तरी

## डोमगांवीं गेल्यावाचून राहूं नये

अशी माझी विनंति आहे. मुख्यत दोन कारणासाठीं प्रत्येकानें डोमगावीं जावयाचें एक, श्रीकल्याणचरणीं मस्तक ठेवण्यासाठीं आणि दुसरें, श्रीकल्याणस्वामींच्या हातच्या मूळ ग्रंथराजाचें आणि श्रीसमर्थांनीं घालून दिलेल्या किच्याचें दर्शन घेण्यासाठीं ग्रंथराजाविषयीं यापूर्वीं पुष्कळ लिहिलें गेलें आहे व यापुढें हि पुष्कळ लिहिलें जाईल.

## श्रीसमर्थांचा किच्चा

मात्र आज च प्रथम प्रसिद्ध होण्याचा योग येत आहे. या किच्याविषयीं हनुमंतस्वामी बखरींत हकिकत सांगतात ती अशी

" कोणे एके दिवशीं समर्थांची स्वारी रामघळींत असता कल्याणास काहीं ग्रंथ लिहिण्य स सांगितला, त्यावरून कल्याणानें ग्रंथ लिहून पुस्तक स्वामी पुढें ठेविलें. तें पुस्तक स्वामींनीं पाहून कल्याणास सांगितलें कीं, तुझें अक्षर चांगलें नाहीं तर अक्षर चांगलें कर. असें म्हणता च, महाराज, किच्चा दिला असता मी अक्षर चांगलें करीन. असें म्हणता च स्वामींनीं झोळींत हात घालून किच्चा काढून दिला. त्यावरून कल्याणानें काहीं दिवसांनीं चांगलें अक्षर करून दाखविलें. नंतर स्वामींनीं त्याजकडून दासबोध ग्रंथ लिहविला. त्या किच्यात गोंवाच्या बाईंचीं अक्षरें असून बालबोध लिपि आहे व ती देवनागरी असून तिचा अर्थ स्वामी व कल्याण या दोघास च ठाऊक होता. "

अशी हकिकत सांगून हनुमंतस्वामी म्हणतात, " तो किच्चा अद्यापी ( शक १७१५ ) डोमगावचे मठात आहे." त्याप्रमाणें तो किच्चा अद्यापि हि ( १८५३ कार्तिक व. ११ ) डोमगांवीं मठात आहे व यावच्चंद्रदिवाकरौ तो तेथें राहो, अशी प्रार्थना आहे. किच्चा म्हटला म्हणजे आपली जी समजूत होते, तसा हा किच्चा नाहीं. हा किच्चा म्हणजे पोथीचें एक पान आहे. तो श्रीसमर्थांनीं घालून दिलेला आहे, असें मला वाटत नाहीं. हनुमंत स्वामी हि

प्रस्तावनेंत २२४ शिष्यांचीं आणि महंतांचीं नांवें दिलेलीं आहेत, तीं पहा. तात्पर्य, अजून नव्याण्णव शतांश संशोधन संशोधकांच्या कृपादृष्टीची वाट पहात आहे, यांत शंका नाहीं. एकट्या कल्याणांच्या ४२ शिष्यांचा शोध लावून संशोधन करण्याचें एखाद्या रामदासियानें मनावर घेतलें तर एक हयाती सहज निघून जाईल. आजपासून पुढें वीस वर्षें शंभर श्रीसमर्थाभिमानी रामदासी संशोधनकार्यासाठीं खपतील तर कांहीं म्हणण्यासारखें संशोधन झालें, असें शक १८८४ त कदाचित् अभिमानानें म्हणतां येईल. म्हणून या निमित्तानें या ठिकाणीं माझी

## सर्व रामदासियांना विनंति

आहे कीं, तुमच्या आवडीचे आणि जिव्हाळ्याचे जे इतर व्याप असतील ते सर्व सांभाळून तुमच्या एकंदर कार्यक्रमांत श्रीरामदासी संशोधनकार्याला हि अवश्य थोडी जागा देण्यांत यावी.

आतां आपण डोमगावमठातील व इतर संग्रहाचा परामर्श घेऊं. हा संग्रह डोमगांवीं अनेकदां जाऊन मिळाला. पहिला अंक एकंदर क्रमापैकीं बाडाचा, मधला अंक त्या त्या ठिकाणच्या बाडाचा आणि शेवटचा अंक बाडाच्या हयातीचा असतो, हें कायमचें लक्ष्यात असूं द्यावें.

## डोमगांवमठांतील संग्रह

५१ ] १ [ २५४

श्रीसमर्थांच्या कवितेचें हें प्रचंड बाड सबंध श्री कल्याणस्वामींच्या हातचें आहे. ज्ञानकोशाच्या तीन चार भागां एवढें तें मोठें आहे. सभेच्या संग्रहांत एवढें मोठें दुसरें बाड नाहीं व दुसरीकडे कोठें हि माझ्या पाहण्यांत आलेलें नाहीं. जगाच्या पाठीवरील कुठल्या हि प्रदर्शनांत मांडण्याला तें योग्य आहे. तें अत्यन्त प्रेक्षणीय आहे. अथपासून इतिपर्यंत अक्षर एकसारखें सुंदर आहे. श्रीरामदास आणि रामदासी ग्रन्थमालेंतील तिसऱ्या व दाहाव्या भागाच्या प्रस्तावनेंत या बाडाचें किंचित् वर्णन आलेलें आहे. तिसऱ्या भागांत शेवटचा शेवटल्या हस्ताक्षराचा नमुना हि दिलेला आहे.

पाटपोट एक पृष्ठ धरलें म्हणजे २२१ व्या पृष्ठावर या बाडाचा मध्य येतो. म्हणजे आपल्या हल्लींच्या पद्धतीप्रमाणें या बाडाचीं २२१×२×२ =

१२४ पानें होतात. सर्व पानांची लांबी ९½ इंच आहे, पण मधोमधच्या पानाची रुंदी ७ इंच आहे, तर अगदीं वरच्याची १० इंच आहे. अशी या बाडाची रचना आहे. तें मधोमध पोटातून जाड सुतळीनें शिवलेलें आहे. दोन्ही बाजूंचे पुठ्ठे खूप लठ्ठ आहेत. रद्दी कागद एकमेकाला डकवून ते बनविलेले आहेत. या रद्दी कागदावर जी मोडी लिपी आहे ती शीवकालीन आहे. मागील बाजूच्या पुठ्यांत १०९५ हा सन तीन ठिकाणीं आढळला. सन १०९५ म्हणजे शके १६०७. या च पुठ्यात मुरलीधराचें, देवीचें, विजापूरच्या एकाद्या सरदाराचें आणि कांहीं किरकोळ अशीं चित्रें आढळलीं.

हें सबंध बाड उभेकडून टापलें गेलें आहे. हें सबंध बाड म्हणजे मालेंतील तिसरा भाग श्रीरामदासांची कविता, पाचवा भाग श्री श्लोक मनाचे आणि दहावा श्रीकरुणाष्टकें.

बाडांत कांहीं पानें कोरीं सोडलेलीं आहेत. अशा पानांपैकीं पृ २२२ वर प्रतापमारुतीचें चित्र काढलेलें आहे व पृ. २२३ वर कोणा महंताचें चित्र आहे. हें चित्र ज्यांचें म्हणून कोणी काढलें असेल त्यांचें च म्हणून बाड ५१ (१) मध्यें हि एक चित्र काढलेलें आहे. चित्र काढणारा पूर्ण कलाभिज्ञ नसेल. दोहोंत साम्यता फार आहे. हीं चित्रें कोणाचीं असावीं, याचा निश्चय होत नाहीं, पण मनांत येतें कीं, तीं कल्याणमहाराजांच्या कोणा शिष्यानें त्यांचीं म्हणून काढलीं असावीं. चित्रें भव्य पुरुषाचीं आहेत आणि कल्याण-महाराज हि भव्य होते. दोहोंत स्वारी बसलेली आहे, पण या बाडांत दोन्ही पाय एका च बाजूला दुमडलेले आहेत, तर त्या बाडांत जेठा मारून बसलेले आहेत. यात उजव्या हातांत कुबडी समोर जमिनीवर टेकून धरलेली आहे, तर त्यांत तो हात गुडघ्यावर टेकून नाकाशीं धरला आहे. दोहोंत करांगुलींत आंगठ्या, कानांत कुंडलें, मनगटांत आणि गळ्यांत माळा आहेत. या चित्रांत अंगावर एक हुर्मुजी रंगाचें वस्त्र आहे, त्यांत नाहीं. एक फरक मात्र मोठा आहे, जटा दोहोंत आहेत, पण या चित्रांत दाढी नाहीं, ती त्या बाडांतील चित्रांत आहे. हा फरक कां असावा, सांगता येत नाहीं. त्या बाडातील चित्र जास्त चांगलें साधलेलें आहे. त्याची प्रतिमा देण्याचा विचार आहे.

या बाडाला मोल नाहीं. या च काय, पण कोणत्या च बाडाचें मोल करतां यावयाचें नाहीं. ही आपल्या महाराष्ट्राची बहुमोल अशी खरी संपत्ति

प्रस्तावनेंत २२४ शिष्यांचीं आणि महंतांचीं नांवें दिले [illegible] अभिमान असलेली तात्पर्य, अजून नव्याण्णव टक्यांत संशोधन [illegible] ! नाचतात च, आपण महात आहे, यांत शंका नाहीं. एकट्या [illegible] कोणाच्या जिवावर उड्या टाकून संशोधन करण्याचें एकाद्या [illegible] हयाती सहज निघून जाईल [illegible] होते, याची साक्ष हें बाड देत राहील. [illegible]मिमानी रामदासी [illegible] संशोधन झालें [illegible] म्हणून या [illegible]

२ [ २५०

हें हि एक बहुमोल लठ्ठ बाड आहे. तें बहुतेक उंब्रजमठपति केशवस्वामी यांच्या हातचें आहे. केशवस्वामींचें अक्षर चांगलें टपोरें आहे. या बाडांत खुद्द कल्याणस्वामींची वरी च कविता आरंभीं, शेवटीं आणि मधून मधून आहे. ती उतरून घेतली आहे, केव्हां तरी एकवार छापली पाहिजे. याशिवाय या बाडांत कविता आहे ती :

( १ ) मुक्तेश्वरकृत सभापर्वांपैकीं पूर्वद्यूत
( २ ) वेणाबाईकृत सीतास्वयंवर, आपल्या मालेंत छापलेलें, भाग बारावा
( ३ ) कृष्णदाससमुद्गलकृत युद्धकांडापैकीं अहिमहि आख्यान
( ४ ) विष्णुदासनामा कृत भागवतांतर्गत हनुमंतभेटी
( ५ ) केशवस्वामींचीं दोन पदें :

[ १ ]

तो मज बहु माने बहु माने ॥
मायेची गृह सुत दारा । तो० । भावरिला मनचारा । तो०
नेणे कामविकारा । तो० । गुरुपदिं केला थारा । तो० ॥ १
साधुत्व सांगे । तो० । सदा सनातन सांगे । तो०
आहे पंथा लागे । तो० । असंग होउन जागे । तो० ॥ २
चिन्मयतीर्थीं राहे । देव सनातन पाहे ।
गगन सगन साहे । चमळ निजसुख लाहे । तो० ॥ ३
साधक म्हणऊं नेणे । सिद्ध मी ऐसें न म्हणे ।
विमळ मळ चि जाणे । परम दशा हे याणें । तो० ॥ ४
अपेक्ष शुद्ध ज्ञाळा । आधीं शुचना थाळा ।
निजसुख देउनि पाळा । केशवस्वामी जाळा ॥ तो० ॥ ५



श्रीसमर्थशिष्य

**श्रीकल्याणस्वामी**

श्रीरामदासी संशोधन
पृष्ठे १०३-१०५

सत्कार्योत्तेजक सभा
धुळे

[ २ ]

तो मज मानेना मानेना ॥

भगवद्भक्तिविरोधी । प्रपंच परवा योधी ।
तारक मार्ग निषेधी । असत्समागम वेधी ॥ तो० ॥ १
विचारमंदिर पाडी । कोरुन संशय काढी ।
भूतदयावरी फाडी । केली दुर्मति गाढी ॥ तो० ॥ २
अकर्मपंथें चाले । जाणपणें अति डोले ।
शम दम परते केले । परोक्ष ज्ञान बोले । तो० ॥ ३
गुणमयांचें घर वसवी । रतिपति अंतरिं वसवी ।
नसती चिंता डसवी । सर्व सखा हरि रुसवी । तो० ॥ ४
सज्जनचरणा न ठवे । प्रबोधबोधें न निवे ।
सर्वगता प्रति न शिवे । केशवप्रभुरूप नव्हे । तो० ॥ ५

( १ ) केशवस्वामी व समर्थ यांचीं पत्रोत्तरें. ( रा. वि. वि. ९९ पहा. )

५३ ] २ [ २२५

अति महत्वाचें बाड. कल्याणस्वामींचे शिष्य मुद्गलस्वामी ऊर्फ मुधावा स्वामी यांच्या हातचें हें बाड आहे. तें सर्वच श्रीसमर्थांच्या पदपदांतरांचें आहे. आतांपर्यंत आपण श्रीसमर्थांची जी इतर कविता छापली आहे, म्हणजे मन्यराज दासबोध व श्री श्लोक मनाचे या खेरीज मालेंतील तिसरा भाग श्रीसमर्थांच्या कवितेचा, दहावा भाग करुणाष्टकांचा व पंचविसावा भाग पदपदांतरांचा, यांत आली नाहीं अशी पुष्कळ कविता या बाडांत आहे. आपणांस श्रीसमर्थांच्या कवितेचा आणखी जो एक भाग लवकर च काढावयाचा आहे, किंवा काढला पाहिजे, त्यांत ही सारी अप्रकाशित कविता देण्यांत येईल.

याशिवाय या बाडांत आणखी तीन गोष्टी आहेत. एक, तें कल्याणस्वामींचें चित्र. त्याची प्रतिमा देण्यांत येत च आहे. कल्याणस्वामींची प्रतिमा ही आज प्रथम च प्रसिद्ध होत आहे. दुसरें, बाडाच्या शेवटीं श्रीसमर्थ, श्रीकल्याणस्वामी, श्री जगन्नाथस्वामी व श्रीमुधावास्वामी यांच्या मठांचीं नावें दिलेलीं आहेत. तीं आपण पूर्वीं च मालेंतील तिसऱ्या भागाच्या प्रस्तावनेंत दिलीं होतीं. जगन्नाथ व मुधावा हे कल्याणस्वामींचे शिष्य होत. जगन्नाथ हे सहयलेमठाचे अधिपति होते व मुधावा हे कल्याणांचे पश्चात् डोमगांव मठाचे अधिपति झाले. हीं नावें या बाडांत सन ११३१ म्हणजे शके १६८२ त लिहिलेलीं आहेत. तीं

बहुधा मुघावांचे शिष्य भिवाजी किंवा रामाजी यांपैकी एकानें, बहुधा रामाजी यांनीं लिहिलेलीं असावीं. मुघावाच्या पश्चात् गादीवर बसले भिवाजी, परंतु त्यांचे बंधु रामाजी हे विशेष साक्षपी होते. या उभयतांनीं च कल्याणमहाराजांच्या समाधीचें प्रस्तुतचें मंदिर बांधलें. आणि तिसरी गोष्ट अशी कीं, या बाडांत एक दोन पानावर, होऊन गेलेल्या महंतांच्या पुण्यतिथी वेळोवेळीं निरनिराळ्या मंडळींनीं लिहून ठेवलेल्या आहेत. त्यांत श्रीसमर्थांच्या पुण्यतिथीची हि नोंद आहे, पण ती आश्चर्यकारक आहे. त्यांनीं बाडाच्या शेवटीं शके १६८३ त महंतांचीं नांवें लिहिलीं आहेत, त्यांच्या च हातच्या पुढील चार नोंदी एका च वेळीं लिहिलेल्या दिसतात :

" शके सोळासें १६०५ रुधीरोद्गारि माघ वद्ये नौमी उत्तरायेणे तद्दिनि श्रीसमर्थाचा आवतार पुर्ण ॥ छ ॥

" शके सोळासे १६३६ जये नाम संवछरे आधीक उपरीतिक आशाढ उत्तरायेण त्रयोदसि शुक्लपक्षे श्री स्वामीचा आवतार पुर्ण ॥ कल्याण॥

" शके १६७१ शुक्ल नाम संवछरे उत्तरायेणे जेष्ठ शुद्ध चतुर्थी श्री स्वामीचा अवतार पुर्ण ॥ मुद्गलस्वामी ॥

" शके १६७० पौश वद्ये द्वीतिया श्रीजगंनाथस्वामीचा आवतार पुर्ण विभव संवछरे "

जगन्नाथांच्या शेवटच्या नोंदींत १६७२ होतें, त्यांत २ खोडून १६७० केलें आहे.

नंतर पुढची नोंद भीमराज म्हणजे भिवाजीबावांच्या पुण्यतिथीची आहे. ती निराळ्या हातची आहे :

" श्री भीमराज स्वामीचा आवतार पुर्ण सके १७१० किलक नाम संवछरे उत्तरायेणे शसीरुतु माघमासे शुक्लपक्षे त्रयोदशी भानुवासरे चतुर्थ प्रहरे दीवसा पुष्य नक्षत्र आयुष्मान योगे तैतीलकर्णे रुद्रवेंसे आवतार पुर्ण सन ११९८ चंद्र १२ जमादीलावल "

पुढील दोन नोंदी एका च वेळीं एकानें च लिहिलेल्या आहेत :

" तिर्थरुप माहाराज माहारुद्रबावाचा अवतार पुर्ण पौष वद्य

७ सोमवार सके १७३३ प्रजापति नाम संवत्सरे सन १२२१

" तिर्थरुप महाराज हनुमंतबावा अवतार पुर्ण सके १७८१ पौष शुद्ध १५ "

या याद्याचीं आरंभीचीं पाच सात पानें कोरी सोडलेलीं होतीं, त्यांपैकीं तीन पानांनंतर कोणा दासबाळानें हनुमंतबावांच्या कारकीर्दीत मठाच्या परंपरेवर केलेलें एक पद आहे. त्यांत जी माहिती आली आहे तिच्या आधारानें पुढील परंपरावृक्ष तयार होतो. हें याद व पुढील ५५ वें याद यांवरून पुण्यतिथी घेतल्या आहेत.

श्रीसमर्थ

|

शिष्य कल्याण ( १६२१ आषाढ शु. ११ )

|

शिष्य सुधावा ( पु. ति. १६७१ ज्येष्ठ शु. ४ )

|

| दोघांस ओटींत घेतले |

भिवाजी (१७१० माघ शु. ११) — रामाजी (१६९१ कार्तिक व. १३)

रामाजी →

| येथून | पुत्रपरं- | परा |

महारुद्र (१७३३ पौष व.७) — लक्ष्मण (१७४१ आषाढ व.५) — देवाजी (वैशाख व. ६) — क्षीरसागर

लक्ष्मण → हनुमंत (१७८१ पौष शु.१५) — राघोबा — सीताराम

देवाजी → रामचंद्र — शिवराम — राजाराम — रामकृष्ण

रामचंद्र → सखाराम

गादीवरील पुरुषांचीं नांवें वरील वृक्षांत मोठ्या अक्षरांत दाखविलीं आहेत. हनुमंतबावापर्यंत गादी ब्रह्मचाऱ्यांची होती. भिवाजी, महारुद्र आणि हनुमंत या तीन पिढ्यांचा तरी क्रम असा होता कीं, वडील बंधूनें ब्रह्मचारी राहून इतर बंधूनीं गृहस्थाश्रम करावा. परंतु हनुमंतबावांच्या नंतर निरुपायानें गादी गृहस्थाश्रमी झाली. अलिकडच्या काळांत, म्हणजे देखील १७८१ च्या पूर्वीच्या काळांत, सखारामबावा फार विख्यात होऊन गेले.

५४ ]

४

[ २००

हें बाड मूळचें नानाबुवांच्या संग्रहांतलें, तें माझ्या चुकीनें आरंभी च देशविहेत लागलें गेलें. मूळचा सर्व संग्रह मठांतील च असला पाहिजे, अशी माझी कल्पना असल्यामुळें चुकीची दुरुस्ती करण्याची आवश्यकता वाटली नाहीं.

बाडाचीं एकंदर पानें १७९×२=३५८, पैकीं पहिल्या पंधरा पानांतील चार पानें आहेत, बाकीचीं नाहींत व शेवटचें १७९ वें पान नाहीं. हें बाड म्हणजे षड्रिपु प्रकरणापासून तिसऱ्या भागांतील अखेरपर्यंतचीं प्रकरणें होत. तीं आपण बाड अनुक्रमांक ५१ ( १ ) वरून छापलीं आहेत. त्यांची च नकल म्हणजे हें बाड होय. ती नकल ५१ ( १ ) वरून च केलेली दिसते. दर पिढीचे लोक आपआपल्या पुरत्यासाठीं श्रीसमर्थांचें व इतर आपआपल्या आवडीचें वाङ्मय लिहून काढीत, असें जें मीं म्हणत असतों, त्याला हें बाड एक प्रमाण होत आहे.

मालेंतील भाग तिसरा – श्रीसमर्थांची कविता – फार महत्त्वाचा असतां सांप्रदायिकांकडून त्याचा जितका व जसा अभ्यास व्हावयास पाहिजे तितका व तसा होत नाहीं, याचें मला वारंवार वाईट वाटतें. जेव्हां जेव्हां तो भाग मी हातीं घेतों, तेव्हां तेव्हां या अनास्थेचें मला स्मरण होतें आणि वाईट वाटतें. किती अप्रतिम कविता या भागांत आहे! तो भाग वाचल्यावांचून श्रीसंप्रदायाचें स्वरूप कोणास कळणार च नाहीं. ती कविता अभ्यासिल्यावांचून जो राहील तो श्रीसांप्रदायिक कसला! इतक्या महत्त्वाची ती कविता आहे.

५५ ]

५

[ १५०

सुमारें २०० पानांचें हें बाड आहे. त्याचीं आरंभीचीं दोन तीन व शेवटचीं चार पांच पानें गहाळ आहेत.

त्यांत मधून मधून मिळून ८४ पदें समर्थांचीं आहेत. त्यांपैकीं अद्यापि कांहीं अप्रकाशित आहेत. तसें च समर्थांचे कांहीं अभंग व पांच ओवी-शतकें आहेत.

केशवस्वामींचीं सुमारें दहा पदें आहेत. एकादटुसरा तुकारामांचा अभंग आहे. मध्वमुनीश्वरांचें एकादें पद.

दासबोध ग्रन्थांत कोणकोणते विषय आले आहेत, त्यांचा जो पहिल्या च समासांत उल्लेख आहे, ते विषय ग्रन्थांत कोठकोठें आले आहेत, ते एका पानावर दर्शविले आहेत. त्यांच्या आधारें च आपण, सभेनें प्रसिद्ध केलेल्या ग्रन्थराजांत पहिल्या समासावर टीप दिलेली आहे.

आनंदनंदन कृत १९ श्लोक रामायणावर
जगज्जीवन कृत जटायु आख्यान.

समर्थ समर्था तुला नीरवीलें ।
तुझें नाम फल्याणसें मीरवीलें ।
तुझे नामधारी तुझी सर्व सत्ता ।
भजे रे मना रामदूता समर्था ॥

इत्यादि कल्याणांचीं वरीचशीं पदें, श्लोक, पंचकें वगैरे. कल्याणांची कविता कधीं काळीं प्रसिद्ध करण्याचा योग आला तर या बाडाकडे जरूर वळलें पाहिजे.

या बाडाच्या पोटीं एक जुना कागद आहे. त्यावर कांहीं पुण्यतिथींची नोंद आहे. त्या कागदावरून त्या तिथी पुन्हां बाडांत दि उतरलेल्या आहेत. त्या अशा :

" वैशाख वद्य शष्टिस तीर्थरूप देवाजी पंताचा काळ जाला गोर साचें आगस्ती

" आश्वीन शुद्ध त्रयोदसीस मातुश्री परंधामास गेली

" शके १६९१ विरोधि नाम संवछर कार्तिक वद्य त्रयोदशी रवीवार ते दिवसि तीर्थरूप रामाजीबावा परंधाम पावले

" शके १६९५ वीजय नाम संवछरे भाद्रपद वद्य येकादसी रवीवार पुश नक्षत्र रात्रौ घटीका सा + + अनंतबावाचा आवतार + + जाला "

याशिवाय बाडांत आणखी एका ठिकाणीं आणखी एका पुण्यतिथीची नोंद निराळ्या हस्ताक्षरांत आहे :

" तीर्थरूप लक्षुमण गोसावीयाचा आवतार पुर्ण सके १७४१ प्रमाथी नाम संवछरे आषाढ वद्य पंचमी सोमवारी सन १२२९. "

५६ ]

६

[ १५०

हें एक सुमारें वीस पृष्ठांचें लहानसें बाड आहे. त्यांत आरंभीं पंचीकरण असून नंतर पंचीकरणावर च श्रीसमर्थांचे सात व शिवराम पूर्णानंदांचे पांच अभंग आहेत. आदासे मांडून पंचीकरण दिलेलें असल्यामुळें तें समजण्यास सुलभ झालें आहे. यासाठीं हें बाड केव्हां तरी छापून निघालें पाहिजे.

५७ ]

७

[ २१०

हें एक लहान आकाराचें लठ्ठ बाड आहे. त्यांत कविता नसून जमाखर्च व इतर संस्मरणीय नोंदी आहेत. त्या सर्व बाळबोध लिपींत आहेत. शके १६४४ ते १६५४ पर्यंतचा जमाखर्च आहे. त्या अवधींत मठानें कोणांकडून पैसे कर्जाऊ काढले, कोणांस दिले, व्याजाचा दर काय होता, रामनवमीस, दासनवमीस व इतर पुण्यतिथींस काय खर्च होत असे, या खर्चांस जगन्नाथबावा, शिवरामबावा, आण्णाबावा, सुन्दरबावा, रामाजी, केशव, भेघश्याम, जानव वगैरे कोणकोणा महंतांकडून काय मदत होत असे, कपडालत्ता, धनधान्य, घोडी वगैरे वस्तूंच्या किंमती काय असत, इमारतीवरील कामगारांना दरमहाचें वेतन काय असे, वगैरे पुष्कळ 'बोधप्रद माहिती या जमाखर्चांवरून होणार आहे. पण तो हेतु सफल होण्यासाठीं सर्व च बाड छापून काढलें पाहिजे. तें शक्य नाहीं. अशा दृष्टीनें तत्कालीन परिस्थितीचा अभ्यास करणारांना सभेच्या संग्रहालयांत बाड केव्हा हि पहावयास सांपडेल.

तथापि महत्त्वाच्या कांहीं नोंदी येथें देण्याचा विचार आहे. कल्याणस्वामींच्या महंतांची गावनिशीवार एक यादी या बाडांत एका ठिकाणीं आहे, ती प्रथम देऊन मग इतर नोंदी देतों.

यादि श्री स्वामीचे महंत

| | |
|---|---|
| १ रामाजीदादा बारामतिकर | १ केशवबावा उंबरजकर |
| १ जानाबाबावा वडगांवकर | १ भिवाजीबावा अष्टेकर |
| १ आंताजीबावा नीनामकर | १ जगन्नाथबावा तडोळेकर |
| १ शकराजी गो वाईकर देशपांडे | १ सिवाजी गो अपचदे |
| १ कृष्णाजी गो तामसेकर | १ बहिरव गो वाईकर |
| १ स्वामी | १ सीवराम गो व्यातुरकर |

१ रामाजीबावा वाळुजकर
१ स्वामीदास तेलंगसीकर
१ जयेराम गो
१ गोविंद गो पनाळेकर
१ आनंत गो सेणवी
१ आणाजीबावा भालकिकर
१ माहादेव गो वराडकर
१ आपाजी गो हुजुरचे
१ मुन्हारबावा हुजुरचे
१ रामाजि गो गुरव
१ आंबाजी गो मांजगांवकर
१ रुदास गो घोडेश्वरकर
१ शामजी गो जवळेकर
१ लक्षुमण गो धीरवाडहेकर
१ काळुशाई
१ हरिबावा सुमकर
१ रामाजि गो रेवडिकर
१ सुंदर जयराम
१ वासुदेव गो
१ आनंत भट
१ माहादेव गो इसलामपुरकर
१ आपाजी गो नासिककर
१ गोविंद गो कोळगांवकर
१ निळकंठबावा हुजुरचे
१ नारोबा गो पांगरकर देशपांडे
१ नारायेण गो वाडेकर
१ सीवराम गो देवगांवकर
१ शंभु गो
१ आनु आका
१ वलिमहमद नांदणजकर

१ खेत्रपाळ गो नामवंसि कुरडूकर

या यादीनें संशोधकांना केवढें मोठें संशोधनक्षेत्र मात होत आहे. आतां इतर कांहीं नोंदी देऊन त्यांविषयीं एकाददुसरें वाक्य बोलूं :

( १ ) श्रीराम स्वामी

धीस्वावसु संवछरे श्रावण वद्य १ सीदो पायरूट कामास लावीला थी प्या हीसेब माघोंल पुस शुद्ध प्रतिपदा पावेतो रुपये जमा केले कामात ५०

बाकी रोखा केला गुजारत भीकाजी सुतार व कुसाजी सुतार याची मारफातीनें रु १३० करार जाले येकूसे पांस

( २ ) पस्वगम नाम संवछरे मार्गेश्वर शुद्ध ४ सोमवार सुर सन ११३७ खाणी उदाजी उद्याजी संताजी कामास लावीले दर माहे रुपये ८ प्रमाणे

यांत विश्वावसु म्हणजे शक १६४८ व प्लवंगम म्हणजे १६४९. कल्याणस्वामींना जाऊन बारा तेरा वर्षे झालीं होतीं. त्या वेळीं समाधीचें कांहीं काम झालें असावें. पण हल्लीं जें समाधिमंदिर आहे त्याचें काम फार पुढें झालें. समाधीच्या मुख्य दरवाज्यावर शके १६९५ चा उल्लेख आहे च. पुढील नोंदी मात्र त्या वेळच्या दिसतात :

( ३ ) चीत्रभान संवत्छरि मंडपाचा पाया खाणायासि आरंभ केला कार्तीक शुद्ध ११ येकादसि सन हजार ११७२ शके १६८४

( ४ ) श्रीरामवरदस्वामी

श्रीकल्याणस्वामी

वीजये नाम संवछरी श्री चे इमारतिचा पाया खोतला फाल्गुण शुद्ध पंचमी ५ आरंभ केला खाणायासी वैशाखमासीं पाया घातला

विजय म्हणजे शके १६९५

( ५ ) दुर्मुख नाम संवछरी चउतरा तयार केला माघ वद्ये चतुर्दसी खर्चाचा तपसील रुपयाचा ( पुढें तपसील दिलेला आहे. )

दुर्मुख = शके १६९८

( ६ ) वीलंबी नाम संवछरे श्रावण शुद्ध दसमीस वरील इमारतिस चीरे काढायासी आरंभ केला सीदोजी पाथरूट

विलंबी म्हणजे शके १७००

( ७ ) पुढिल्या स्वामीच्या देवळाचा पाया खाणायास आरंभ चैत्र शुध प्रतिपदा संवछर प्रमोद

अशी एक मध्यें च एका ठिकाणीं नोंद आहे. प्रमोद = १६७२ किंवा १७३२

तात्पर्य, असें हें बाड महत्त्वाचें आहे. सबंध बाड च निरनिराळ्या दृष्टीनें जिज्ञासूंनीं अभ्यासिलें पाहिजे. उदाहरणार्थ, या बाडांत पांच पंचवीस ठिकाणीं घोड्यांच्या खरेदी विक्री आढळतात. त्यावरून असें वाटतें, या मठांतील पूर्वीच्या महंतांना घोड्यांचा फार नाद असावा. अशीं बहुविध अनुमानें या बाडाच्या अभ्यासानें काढता येतील.

५८ ] ८ [ १५०

कल्याणस्वामींच्या कवितेचें हें बाड आहे. उसवल्यामुळें पत्रें अगदीं अलग झालीं आहेत पृष्ठसंख्या ४१ × २ × २ = १६४.

त्यात कल्याणस्वामींचीं ८७ पदें, ५ ओवीबद्ध स्फुट प्रकरणें व ७४ श्लोक निरनिराळ्या विषयावर, अशी एकदर कविता आहे.

तेव्हा ही एवढी कविता केव्हा तरी छापून निघाली पाहिजे, हें स्पष्ट आहे.

या हि बाडात शेवटीं शेवटीं श्रीसमर्थांच्या पुण्यतिथीच्या शकाचा चमत्कार केला आहे व त्युतीं शक आणि तिथी हीं दिलीं नाहींत तर तीं एका श्लोकात गोविलीं आहेत तो श्लोक असा

सोळासे वरि पाच जाण रुधिरोद्गाराते संवत्सरीं ।
माध्यान्हीं आणि माघ वद्य नवमी त्या इदुवारांतरीं ।
रामा आत्मनिवेदना करुनिया सत्कीर्तिची हे ध्वजा ।
ज्यानें सर्व जनात लाविलि वरी त्या रामदासा भजा ॥

परंतु श्रीसमर्थांनीं १६०३ त पूर्णावतार केला ही गोष्ट तत्कालीन अस्सल कागदपत्रांवरून सिद्ध आहे.

बाडाच्या लेखकानें आपल्या कल्पनेप्रमाणें पुढील नोंद करून ठेविलेली आहे :

" दासबोध ग्रंथ प्रारंभ शिंपे जाहला सके १५८२ शके पथरावे व्याशींत जाहाला ग्रंथी भुगोलरचनेचे समासात. "

५९ ] ९ [ १२०

हें एक किरकोळ बाड आहे. त्याचीं ८० पानें होतीं. आरंभींचीं आणि शेवटचीं नऊ नऊ पानें गहाळ आहेत

( १ ) यात श्रीसमर्थांचीं दहा बीस पदें आहेत. ' भीमरूपी महारुद्रा ' स्तोत्र आहे.

( २ ) भ्रमद्यारिणी, महारुद्रस्वामी, हनुमतरोया व एकादश रुद्र यावर आरत्या आहेत.

( ३ ) ' आका गाया गेली ' हें वेणाबाईचें पद आहे.

(४) कल्याणांचीं व कल्याणांवर कांहीं पदें आहेत.

(५) सुवचा कन्यानें होईल, याचा ठोकताळा दिला आहे. मेघमाळा आहे.

(६) 'तेथें राम सखा राम सखा' हें शिवदिनकेसरींचें समर्थांवरील पद आहे.

(७) याशिवाय कबिर, केशव, तुळसीदास, मध्वमुनेश्वर, यादवदास, आनंदतनय, रंगनाथ, येकनाथ, गोसावीनंदन इत्यादिकांचीं कांहीं पदपदांतरें आहेत.

(८) पूर्वी वाचकांना ठाऊक असली, तरी पुढील तीन पदें केव्हां हि वाचावीशीं वाटतील.

[ १ ]

पूर्ण दयेनें भरलें । तें मन निष्ठुर कां केलें ॥ ध्रु०
गजेंद्राच्या हाकेसरिसें । धांउनिया आलें ॥ तें० ॥ १
प्रल्हादाच्या भावार्थासी । स्तंभीं गुरगुरिलें ॥ तें० ॥ २
भिल्लणीचीं बोरें खातो । मन नाहीं विटलें ॥ तें० ॥ ३
पांचाळीच्या आकांतासी । गजबजुनी आलें ॥ तें० ॥ ४
येकाजनार्दनाच्या कृपेनें । निसिदिनिं पदिं रमलें ॥ तें० ॥ ५

[ २ ]

रामदास माउली । माय माझी रामदास माउली ॥ ध्रु०
सच्चित्सुखघन वरद प्रतापी । शांतीची साउली ॥ १
अनन्य जे नर शरण रिघाले । तयालागिं पावली ॥ २
केशविं केशव निजसुख सेवी । आठवितां चि धावली ॥ ३

[ ३ ]

सद्गुरुवचन घट्ट केलं । मागिलं पुढिलं झाड गेलं ।
जीव चि तो शिव जालं । तन्मय होउनिया ठेले ॥ ध्रु०
फाटकं तुटकं नेस्तो मी । मन मानेल तेथें यस्तो मी ।
वेडा वेडासा दिस्तो मी । महा गिळोनी अस्तो मी ॥ १
काम क्रोध जाळिला । माया मोह खाणिला ।
केशव स्वामी रंगला । गुरुपदासी जडियेला ॥ २

(९) एकनाथांच्या भावार्थरामायणाचे कांडवार एकंदर अध्याय किती याची एक नोंद एका पानावर या बाडांत आहे. ती अशी :

येकनाथी भावार्थ रामायण आध्ये संख्या ॥ २७९

२७ बाळकांड, १८ अयोध्याकांड

२३ आरण्यकांड, १८ किष्किंधाकांड

४२ सुंदरकांड, ९० युध्यकांड

६१ उत्तरकांड

२७९

निर्णयसागर छापखान्यानें इ. स. १९१७ त छापलेल्या प्रतीशीं ही संख्या ताडून पाहतां असें दिसतें कीं, पहिल्या पांच कांडांतील संख्या बरोबर आहे, पण शेवटच्या दोन कांडांच्या अध्यायांची संख्या छापलेल्या प्रतींत वाढलेली आहे. डोमगांव संग्रहांत असलेल्या भावार्थ रामायणाच्या प्रतीचा उल्लेख पुढें येईल. ती प्रत शके १६९६ तील आहे. तिच्यांतील युद्धकांडाचा शेवटचा अध्याय गहाळ आहे, पण उत्तरकांड संपूर्ण आहे. त्या प्रतींत या दोन कांडांचे अध्याय वरील नोंदींत असलेल्या संख्ये इतके च, म्हणजे अनुक्रमें ९० आणि ६१ च आहेत. पण निर्णयसागरनें छापलेल्या प्रतींत ती संख्या अनुक्रमें ९२ आणि ७७ आहे. निर्णयसागरप्रतीच्या प्रकाशकानें आपल्या प्रस्तावनेंत मुद्दाम म्हटलें आहे कीं "अनेक ठिकाणच्या हस्तलिखित प्रती संपादन करून त्यांतील शुद्ध व सरस पाठ घेऊन" आपण प्रत तयार केली आहे. पण दुर्दैव असें कीं, त्या अनेक ठिकाणांचीं त्यांनीं नांवें सांगून ठेवलीं नाहींत, किंवा हस्तलिखित प्रतींचे लेखनशक दिलेले नाहींत ! तात्पर्य, १६९६ तील हस्तलिखित प्रतींत व आज प्रसिद्ध झालेल्या छापील प्रतींत इतका फरक पडावा, ही बाब निःसंशय विचार करण्यासारखी आहे. प्रस्तुतच्या बाडांत एका पृष्ठावर सन १२२२ म्हणजे शके १७३४ तील कांहीं जमाखर्च आला आहे. १७३४ सालांतील या बाडांतील वरील नोंद व १६९६ तील प्रत ही मात्र बरोबर जमतात.

६० ] १० [ १५०-

चवतीस पृष्ठांचें एक लहानसें पण उपयुक्त बाड. यांत श्रीसमर्थकृत सगुणध्यान आहे. ताडून पाहण्यास उपयोगी पडेल. शिवाय अनुदिनिं अनुतापें । हें करुणाष्टक व दासबोधांतील १ × ४ व ४ × ३ समास, असे आहेत.

हे राम विश्राम कल्याणरासी

हा चवथा चरण असलेले कल्याणस्वामींचे पांच श्लोक आहेत.

श्रीसमर्थांचे पुढील पद आहे :

अनंत युगाची जननी । तुळजा रामवरदायिनी ।
तिचें स्वरूप उमजोनि समजोनि । राहे तो ज्ञाता ॥ ध्रु०
शक्तीवीण कोण आहे । हें तों विचारून पाहे ।
शक्तीविरहित न राहे । येश कीर्ती प्रताप ॥ १
शिवशक्तीचा विचार । अर्धनारीनटेश्वर ।
दास म्हणे हा विचार । तत्त्वज्ञानी जाणती ॥ २

## ६१ ] ११ [ १२५

१०२ × २ × २ = ४०८ पृष्ठांचें हें बाड आहे. महारुद्रस्वामींच्या कारकीर्दीत म्हणजे १७३३ च्या पूर्वी तें कोणी तरी लिहिलें असावें, असें आरंभी जे नमनाचे श्लोक दिलेले आहेत, त्यावरून वाटतें.

यांत श्रीसमर्थांची थोडी कविता आहे, पण कल्याणांची पुष्कळ आहे. शिवाय

( १ ) मुक्तेश्वर कृत विराट पर्व
( १ ) जगज्जीवन कृत बालकांड
( १ ) मुक्तेश्वर कृत अहिरावणमहिरावणवध
( १ ) श्रीधर कृत हनुमज्जन्मकथा

हीं प्रकरणें आहेत.

( १ ) शाम कृत कल्याणस्वामींवर एक पद आहे.
( १ ) विठ्ठलनाथ कृत दोन चार पदें आहेत.
( १ ) मीराबाई व मानपुरी यांची किरकोळ कविता आहे.

शेवटीं जगज्जीवनकृत हि कांहीं पदपदांतरें आहेत. जगज्जीवन म्हणजे जगन्नाथ, हे कल्याणांचे शिष्य, तडवळेमठाचे अधिपति होत. त्यांची इतरत्र पुष्कळ कविता आहे. तडवळेमठाकडे जेव्हां आपण वळूं, तेव्हां पाहूं च. तथापि, आज त्याचें एक पद ऐकून ठेवावें :

येक गुरुसेवा । भेटवि देवदेवा ॥ १
हें वर्म कळे ज्यातें । सायोज्य लाभ त्यातें ॥ ध्रु०

येक गुरुभक्ति । विण स्वमिच्या च मुक्ति ॥ २
येक गुरु आवडी । भवभ्रांत सर्व दवडी ॥ ३
येक गुरुतीर्थ । सफळित सर्व अर्थ ॥ ४
येक चि गुरुनाम । पाववि सौख्यधाम ॥ ५
येक गुरुनिष्टा । संहरि गर्भकष्टा ॥ ६
येक गुरु राजा । जगज्जीवनप्रभु माझा ॥ ७

६२ ] १२ [ २००

सुमारें ३०० पृष्ठांचें हें बाड आहे. पहिलीं आणि शेवटचीं मिळून दहा वीस पानें नष्ट झालेलीं आहेत.

बाडांचे दोन प्रकार असतात : एकाद्या ग्रन्थकाराचीं सबंध प्रकरणें ज्यांत उतरलेलीं असतात तो एक प्रकार व दुसरा प्रकार म्हणजे जो तो आपआपल्या आवडीप्रमाणें अनेकांच्या ग्रन्थांतून उतारे उतरून घेतो किंवा महत्त्वाची माहिती टिपून ठेवतो. प्रस्तुतचें बाड दुसऱ्या प्रकारचें आहे.

त्यांत श्रीसमर्थांच्या कवितेंतील तर उतारे आहेत च, पण इतर पांच पन्नास कवींच्या काव्यांतील हि उतारे आहेत. श्रीसमर्थांचीं कांहीं पदें, कांहीं अभंग, षड्रिपूंपैकीं काम आणि क्रोध, ग्रन्थराजातील कांहीं निवडक ओंव्या, रामायणांतील थोडा भाग, पंचसमासींपैकीं शेवटचा समास ( आतां शिष्या सावधान ), अशी श्रीसमर्थांची कविता आहे. पण त्याशिवाय कल्याण, उद्धव, विंयक, वेणी, दत्तात्रय, कल्याणाचे शिष्य रामराज, जगज्जीवन, रामीदासी, श्याम, कण्हेरी मठाच्या वासुदेवाचे शिष्य माधव इत्यादि सांप्रदायिकांची हि थोडी फार कविता आहे. कोणी नरहरी म्हणून कल्याणाचे शिष्य दिसतात. ५७ व्या बाडांत जीं कल्याणशिष्यांचीं ४३ नावें आलीं आहेत, त्यांत नरहरी नाहींत. म्हणजे ४३ हे कांहीं सर्व शिष्य नव्हत, ते प्रमुख होत. नरहरींचें एक पद आहे :

सद्गुरु वर्णवेना । ज्याचा पार चि न कळे कोणा ॥ ध्रु०
सा अठरा आणि चार । तेही न कळे त्याचा पार ॥ १
जो का अनंत अपार । स्वामी निर्गुण निर्विकार ॥ २
धर्मस्थापनेकारणें । जेंही अवतार चि घेणें ॥ ३
रामदासांचिये वंशीं । स्वामी कल्याण आहेर्निशीं ॥ ४
वृत्ति निवृत्ति निमाली जेथें । जाला नरहरी तल्लीन तेथें ॥ ५

त्या च प्रमाणें त्या ४१ त नसलेले कोणी दिगंबर होते.

> कल्याणस्वामी ध्यातों अनुदिनीं ।
> दिगंबर शरण जाय रे जाय रे जाय रे ॥ ३

याशिवाय एकनाथ, गोसावीसुत, रेणुकानंदन, केशव, रमावल्लभदास, तुकाराम, निवृत्तिदास, ज्ञानदेव, मुक्ताबाई, अच्युत, चिंतामणी, श्रीधर, विठ्ठल, राघवाचिद्घन, पुरंदरविठ्ठल, अनंत, गोसावीसुत, भानुदास, गोणाई, केशवाचा नामा, विष्णुदास नामा, रंगनाथ, शिवराम पूर्णानंद, मीराबाई, लधीप, धरवलिंग, कबीर, जसवंत, अखंडानंद इत्यादिकांची कांहीं ना कांहीं कविता या बाडांत आहे.

असें हें सर्वसंग्राहक स्वरूपाचें बाड आहे. त्यांत मध्यें च एका पृष्ठावर "श्रीसमर्थस्वामींचें काव्य" म्हणून ग्रन्थसंख्या दिली आहे. तशली च यादी पुढील बाड ६४ ( १४ ) च्या शेवटच्या पानावर आहे. ती यादी अशी :

> १४६२ रामायेण येक हजार
> १६१७ आष्टाक्षरी दोनी
> १७५० फुट श्लोक सवाया
> ३७४२ योव्या वीसाक्षरी
> १६५४ फुट ग्रंथ समास वीर
> ९०० पदें आभंग भुपाळ्या डफ
> ३०२५ लळतें आभंग
> २४ आरत्या

बाड ६४ हें या बाडाच्या पूर्वीचें असून त्यावरून च या बाडांत ही ग्रन्थसंख्या उतरलेली दिसते.

एका पृष्ठावर श्रीसमर्थांवर दोन संस्कृत श्लोक आहेत, ते असे :

> वैराग्यारामसीमाऽमिततममहिमा नाम भीमावतारः ।
> कामारिप्रेमधामा गुणगणगरिमा रामनाम्नो विरामः ।
> धीमान्कामादिदामाविकृतमतिरविश्रीविमान्माधवे यः ।
> स श्रीमान् रामदासः सुरगुरुरवनीमागतः किं गुरुर्नः ॥ १
>
> रामरामेति रामेति जपन्नास्ते सदैव यः ।
> तस्मै श्रीरामदासाय प्रणमामि कृताञ्जलिः ॥ २

# ६३ ] १३ [ १५०

२०० पृष्ठांचें बाड. पहिलीं एक दोन पृष्ठें गहाळ आहेत.

यांत श्रीसमर्थकृत सगुणध्यान, राजधर्म, क्षात्रधर्म हीं प्रकरणें असून अंबेवर दोन पदें व इतर कांहीं स्फुट पदें आहेत.

कल्याणावर शिवरामांचें एक पद.

जगज्जीवन कृत ' श्रीरामसमर्थडोहळे '.

वेणाबाई कृत ' आका गांवा गेली '.

मुक्तेश्वरांची एकनाथ महाराजावर एक सुंदर आरती.

शिवाय कल्याण, रंगनाथ, आनंदतनय, तुकाराम, इत्यादिकांची थोडी फार कविता आहे.

भूम येथील श्रीकल्याणशिष्य हरिबावा यांच्या वर एक अष्टक आहे. मागें वृत्तचर्चेंत १६० या लेखांक ' भूम ' वर आला होता. त्यांत हरिबावांच्या समाधिशकाचा श्लोक संशयास्पद रीतीनें दिला होता, तो या बाडावरून बरोबर देतां येत आहे :

शाके षोडश अब्धि साद्रि गणिते भाद्रे सिते पौर्णिमा ।
मायावत्सरि भानुवार प्रथमे यामार्धि जाली सिमा ।
नक्षत्रं शततारका शुभदिनीं पावोनि मुक्तापुरी ।
श्रीकल्याणपदाब्जि राहुनि हरी दीना जना उधरी ॥

शके १६७६ भाद्रपद शु. १५ रविवार हा हरिबावांच्या समाधीचा काळ होय.

श्रीसमर्थांची कविता ताडून पाहण्यास या हि बाडाचा उपयोग होणार आहे.

# ६४ ] १४ [ २५०

( १ ) सुमारें २५० पृष्ठांचें हें बाड सुंदर, प्रेक्षणीय आणि महत्त्वाचें आहे.

( २ ) सर्व साधक बाधक प्रमाणांचा विचार करून आपण असें ठरविलें आहे कीं, श्रीसमर्थांनीं शिवतरच्या घळींत शके १५८१ त सात दशकाच्या अखेरपर्यंतचा ग्रन्थ लिहून तो पुरा केला. शानदशक म्हणजे

स्वारीचें वर्णन दिसतें. पण या समासांत कांहीं संकेत तर नसावा, अशी जबर शंका येते. दहाव्या ओवींत विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें कोठें आहेत ? बाराव्या ओवीचा काय अर्थ ? लंबोदर म्हणजे मोरो त्रिमल व मुख्येश्वर म्हणजे स्वतः शंकरावतारी शिवाजी महाराज, असा कांहीं संकेत यांत आहे कीं काय ? पंचवर्गे, अष्टवर्गे, कोटीवर्गे म्हणजे काय ? इत्यादि शंका येतात. वाचकांना स्वतः विचार करून ठरवितां यावें, म्हणून तो समास येथें देतों :

फुट समास

कृपाळुपणाची मुस । साक्षात्काराची मांदुस ।
मानससरोवरीं हंस । बैसले तेथें ॥ १
अपराधक्षमेचें गगन । क्षावक्षमेचें भूलक्षण ।
आंतरसाक्षत्वें आत्मलक्षण । जेथें वसे ॥ २
तूं ब्रह्मादिकाची जननी । ब्रह्मादिक तुजपासुनि ।
भुवनत्रैं जितुके प्राणी । तितुके वर्तती तुझ्या गुणें ॥ ३
तुझ्या गुणासि नाहीं पार । म्हणौनि बोलिजे अपार ।
सिंधुमध्यें वज्राचे डोंगर । रक्षूनि सिध केले ॥ ४
पृथ्वीमधील जितुकीं वसनें । भिजऊनि सोपें नाहित पुर्णें ।
कज्जळपात्र तें आपुणें । जैसें तैसें ॥ ५
सुरतरवराची लेखनी । पत्रासी योजिली धरणी ।
लिहितां ब्रह्मादिकाची सिणली वाणी । परंतु अंत नलगे ॥ ६
जेथें वेद वेडावले । जेथें तर्क चाकाटले ।
विषम काळ ते दुरि जाले । जिच्या स्मरणें ॥ ७
मौन्यगर्भी गुरुगंगा । त्रैलोक्यासि आली उपेगा ।
तीवेगळा मी कैचा गा । सांगा तुम्ही ॥ ८
क्रियामात्र तिज लागली । माझी शक्ती कोठें वेचली ।
मज ठाव चि नाही वेगळी । सकळा ठाईं ॥ ९
आतां सकळकर्ता वचण । पापीपुण्यात्मलक्षण ।
ऐसें हें निरूपण । मज निवेदन करावें ॥ १०
रहेना तें समजेना । समजेना तें रहेना ।
समजणें रहेंति घडेना । योगेश्वरी ॥ ११
आता सांभाळा तुमचे तुम्हीं । येथुन जालों मोकळे आम्ही ।
पुढें मोहिमेचे कामीं । फौजा चालवाव्या ॥ १२

श्रीगणाधिपती फरश घेउनी । मुशकारूढ होउनी ।
आंकुश झलझल आवनी । आकाश पिंवळें ॥ १३

मंद्राचळासारिखा मुशकु । ऐरावतीहुनि आधिकु ।
धरके मारूनि रंकु । चौदंति केला ॥ १४

तो मुशकु आपुलेन उड्डाणें । पाडिन म्हणे तारांगणें ।
ऐरावतीचें सामर्थ्य उणें । सहज चि जालें ॥ १५

ऐसा देव विघ्नहरु । घेऊनि गणाचा दळभारु ।
स्वामी कार्तिका सारिखा चकांग वीरु । वीरभद्र हि चालिला ॥ १६

आचाधिया पुढें लंबोदर । त्याचे पाठीसी मुरयेश्वरु ।
सकळ गणाचा दळभारु । साठी सहस्रें ॥ १७

त्या समागमें चि मार्गें । मूळमाया पंचवर्गें ।
अष्टवर्गें कोटीवर्गें । चालधा पुढें ॥ १८

६५ ] १५ [ १००

किरकोळ सुमारें ५० पृष्ठांचें बाड. पहिलें पृष्ठ गहाळ

( १ ) ज्ञानदेव कृत हरिपाठाचे २७ अभंग
( १ ) शंकर कृत दामाजीपंताची रसीद, ४६ कडवीं
( १ ) सुरदासाचें एक ३ कडव्यांचें पद–सुदामजीकु देखत श्याम हासे ॥ ध्रु०
( १ ) उद्धवचिद्घन कृत एक ३ कडव्यांचें पद–यशोदे गोपी दालगजा ॥ ध्रु०
( १ ) विप्रलुकाचें सहा कडव्यांचें एक गोड पद :

ऐका श्रोते भाविक भोळे सांगतो अंतरखुणा ।
तुम्ही विठ्ठल रखुमाई म्हणा ॥ ध्रु०

( १ ) तुकाराम कृत ' आवंढ्या नागनाथ येथील हरिपालाचें चरित्र ' ३६ ओव्या
( १ ) अनागोंदी राज्याचें चरित्र, ६५ ओव्या, अपूर्ण, आरंभींच्या दोन ओव्या :

ऐका तें चरित्रमहिमान देवाचें । उच्चारितां वाचे हरती दोष॥ १
अनागोंदीमध्यें असे नृपनाथ । नाम हें विख्यात रामराजा ॥ २

६६ ] १६ [ १२५

सामान्य. पृष्ठसंख्या ६८ × २ × २ = २७२. पहिलीं चवदा व शेवटचीं बारा पृष्ठें गहाळ.

( १ ) थालीपाक, १४१ ओव्या, मुक्तेश्वरकृत

( १ ) रामजानकी भेट, श्रीधरकृत

( १ ) रुक्मिणीस्वयंवर, मुकुंदराजकृत

( १ ) समर्थ, कल्याण, जगज्जीवन, वेणाबाई, स्वामीदासी, उद्धवचिद्धन, शिवराम, केशव, मानपुरी, कृष्णदासमुद्गल, गोसावीनंदन, कृष्णदयार्णव, माळो, तुका, यांचीं काहीं पदपदातरें.

( १ ) श्रीसमर्थांवर एक संस्कृत श्लोक :

यो दासबोधमुखभूरितिबंधनै : स्वै . ।
दूरीचकार विमलात्मपरप्रवृत्त्यै ।
अन्तस्तम : कलुषमानसमानवानाम् ।
श्रीरामदासगुरुपादमहं भजामि ॥

६७ ] १७ [ १२५

दीडयें पृष्ठांचें बाड. मधलीं काहीं पृष्ठें गहाळ.

तडवळेमठपति जगन्नाथमहाराज यानीं रामजन्मोत्सवात करण्यासाठीं फार गोड कथा रचलेल्या आहेत. वाल्मीकिचरित्रापासून आरंभ करून श्रीरामराज्याभिषेकापर्यंतचा भाग या कथातून वर्णिलेला आहे. स्वतः त्याचें विविध स्वरूपाचें कवित्व त्या कथात आहे च, पण मधून मधून श्रीसमर्थ, एकनाथ महाराज, मध्वमुनेश्वर, वेणाबाई इत्यादिकांच्या काव्यातील अनुरूप असे उतारे घेऊन त्यानीं कथाच्या गोडींत भर घातली आहे.

यापैकीं काहीं कथा या बाडांत आहेत, काहीं आणखी इतर दि बाडात आहेत. त्या सर्वांच्या आधारें या कथा छापून प्रसिद्ध केल्यास त्याचा महाराष्ट्र-भर त्वरित प्रसार होईल, अशी मला खात्री आहे. डोमगाव वगैरे भागांत अद्यापि उत्सवांत या च कथा होतात. इकडच्या महाराष्ट्रांत मात्र त्याची वार्ता नाहीं. या कथाचीं वाचकास ओळख करून देण्यासाठीं वाल्मीकिचरित्रानंतर आलेलें जगन्नाथमहाराजाचें एक पद येथें देतों .

### रामाई माझी

वाल्मीकाची आधार दोरी । रघुवंशा सुजाण झाली ।
कौसल्ये गर्भी उद्भवली । रामाई माझी ॥ ध्रु०
ताटीकेचा प्राणहर्ता । ऋषीचे निजकार्यकर्ता ।
स्वानंदाची पूर्ण मूर्ति । रामाई माझी ॥ १
अहिल्येचा पाश तोडी । सभरीं त्रिंबक मोडी ।
भार्गवाचा गर्व झाडी । रामाई माझी ॥ २
पितृचे निजवाक्य पाळी । येऱ्या बाणें मारी वाळी ।
सुग्रीवादिवानरमेळीं । रामाई माझी ॥ ३
सागरीं पाषाण तारी । रावणादिक राक्षस मारी ।
देवाचें निजकार्य करी । रामाई माझी ॥ ४
जानकीचा शोक वारी । बिभीषणातें राज्यीं स्थापी ।
भेटी दे भरतासी ऐसी । रामाई माझी ॥ ५
वेदशास्त्रीं अद्भुत कीर्ति । नामस्मरणें जड जीव तरती ।
जन्मांतरींचीं कर्में हरती । रामाई माझी ॥ ६
जगजीवनप्रभुनाम मिरवी । स्मरणें संता भवभय बुडवी ।
अनिर्वाच्यस्वरूपीं शिरवी । रामाई माझी ॥ ७

या थोड कथा छापून निघाल्या च पाहिजेत.

६८ ] १८ [ १५३

पृष्ठें १११ × २ × २ = ४४४. वरीचशी गहाळ.

बरोवर निमा भाग म्हणजे १११ × २ पृष्ठापर्यंत श्रीसमर्थकृत रामायण. नंतर देवदासकृत संतमाळा व नंतर अगदीं च किरकोळ लिखाण. रामायण, संतमाळा व किरकोळ लिखाण, या तिन्ही प्रकरणाचीं हस्ताक्षरें भिन्न भिन्न.

देवदासकृत संतमाळा मागें कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं ग्रंथमालेंत छापली होती ती त्यांनीं धीड येथें मिळालेल्या प्रतीवरून छापली होती. त्या प्रतींतली शेवटची रचनाकालाची ओवी अशी आहे :

क्षयसंवत्सर आषाढमासीं । सोमवार शुद्धीयेसी ।
पूर्णता झाली ग्रंथासी । श्रोतीं सावकासी परिसीजे ॥ १४६

या ओवीवरून व अंतर्गत पुराव्यावरून संतमाळेचा रचना काल रा. राजवाडे

यांनीं शके १६०८ ठरविला होता. राजवाडे यांनीं अनुमानानें ठरविलेला हा शक बरोबर असल्याबद्दल प्रत्यंतर पुरावा, तंजावरच्या सरस्वतीमहालांतील मराठी ग्रन्थांचें जें टांचण भा. इ. सं. मंडळाच्या १८३५ च्या इतिवृत्तांत आलें आहे, त्यांतील ३३ व्या दप्तरांत असलेल्या या प्रकरणाच्या प्रतीच्या शेवटीं १६०८ शकाच्या प्रत्यक्ष निर्देशानें च मिळाला. असें असतां या बाडांतील या प्रकरणाची शेवटची ओवी अशी आहे :

> दुर्मुख नाम संवत्सर कार्तिकमासीं । सोमवार तृतीयेचे दिवसीं ।
> पूर्णता झाली ग्रंथासी । श्रोतीं आदरेंकरूनि परिसिजे ॥ ११८

संवत्सर आणि महिना भिन्न आहेत. हा संवत्सर बरोबर असल्यास १६३८ हा रचनाकाल धरावा लागेल. कार्तिक व. ३ ला सोमवार आहे. अंक न देतां या ओवीच्या पुढें एक ओवी आहे ती :

> इति श्रीकरुणामृतरसग्रंथ । चैतन्यांकित देवदासकृत ।
> संपूर्ण जाला समास । प्रथम प्रसंगः ॥

अर्थात् श्रीरामदासांकित देवदास ते हे नव्हत. नंतर ही प्रत करणारानें आपलें नांव, गांव व काळ दिला आहे.

" शके १७०१ विकारीनाम संवत्सरे मार्गेश्वर शुध १ बुधवारिं संतमाळिकालेखनपुस्तक समाप्तः ॥ हस्ताक्षर विश्वंभर जयेराम तरडे जोसी कसबे कोळगावकरेण लिखीतं शुभं भवतु ॥ "

६९ ]

१९

[ १५०

शिवण उसविली गेल्यामुळें सर्व पानें सुटीं झालेलीं आहेत. ६५ पृष्ठापर्यंत पानें आहेत, त्यांत पहिलीं १ ते ७, ९, १३ अशीं पानें गहाळ आहेत. ६५ च्या पुढचीं किती पानें गेलीं असतील तें न कळे.

यांत फक्त श्रीसमर्थांचे अभंग आहेत. ६५ व्या पानावर १५७ वा अभंग पुरा होऊन १५८ वा चालू झालेला आहे.

५८ वें बाड ज्यांच्या हातचें आहे त्यांनीं च हें हि बाड लिहिलेलें आहे. यांत आतांपर्यंत न छापले गेलेले असे कांहीं अभंग आहेत.

७० ] २० [ १५०

मुकुंदराजविरचित परमामृत ग्रन्थाचीं आदलीं मधलीं पांच पन्नास पानें.

७१ ] २१ [ ७५

श्रीकल्याणशिष्य जगन्नाथ महाराज यांनीं श्रीरामजन्मोत्सवासाठीं रचिलेल्या कथांची ही वही आहे. ती कोणी तरी पन्नास पाऊणशें वर्षांमागें उतरलेली दिसते.

७२ ] २२ [ १००

किरकोळ. ७५।८० पृष्ठें

( १ ) मनाचे कांहीं श्लोक

( १ ) श्रीसमर्थांचा अभंग–येक उपासना धरीं ।
मक्ति भावें त्याची करी ॥

( १ ) श्रीसमर्थांचे कांहीं अप्रकाशित अभंग

( १ ) जगज्जीवन, धुंडीराज, कबीर, तुका, अमृतेश्वर, दासकल्याण, कृष्णदास, इत्यादिकांची कांहीं कविता

( १ ) ब्रह्मानंद श्रीधर कृत पारधीकथा

७३ ] २३ [ १००

किरकोळ. १००।१२५ पृष्ठसंख्या. पहिलीं व शेवटचीं दहा पांच पानें गहाळ.

या बाडांत अथपासून इतिपर्यंत अनेकांचे अभंग आहेत. त्यांत विशेष भरणा तुकाराममहाराजांच्या अभंगांचा आहे. प्रथम १ ते ८० अभंग आहेत, त्यांत ५४ तुकाराममहाराजांचे च आहेत. बाकीचे मानुदास, ज्ञानदेव, चिन्मयनंदन, एकनाथ, चोखराज, आनंदतनय, नामदेव इत्यादिकांचे. नंतर पुन्हां १ ते ५८ अभंग आहेत. त्यांत श्रीसमर्थांच्या अभंगांचा भरणा विशेष असून उद्धवाचेंद्धन, विष्णुदासनामा, जनाबाई, माधव, मानपुरी, सहजानंद,

लीलाविश्वंभर, ज्ञानदेव, तुकाराम, इत्यादिकांचे थोडे थोडे आहेत.

या ८० + ५८ = १३८ अभंगांत कांहीं तरी अप्रकाशित आहेत च.

७४ ] २४ [ १५०

या मठांत कोणी अनंतसुत म्हणून होऊन गेले, त्यांचा अजून पत्ता लागला नाहीं. मग ते मठांतील पुरुषांपैकीं कोणी असोत, किंवा मठाभिमानी असोत, किंवा शिष्यपरंपरेंतील असोत. पण त्यांची कविता या मठांतील संग्रहांत मधून मधून आढळते.

अवघ्या वीस पृष्ठांचें हें एक शिवलेलें लहान बाड आहे. तें अनंतसुतांनीं लिहिलेलें श्लोकबद्धपत्र आहे. त्याचे २७ श्लोक आहेत. हरीनें आपल्यावरें कृपा करावी, असा पत्राचा भाव आहे. श्लोक अगदीं सामान्य आहेत. पहिला आणि शेवटचे दोन श्लोक देतों :

हा भाव माझा चरणारविंदी।
ठेऊनियां मी चरणांसि वंदीं।
चिंता असे त्या निज सेवकाची।
तैसी असावी मज सेवकाची ॥ १

अनंतसुत विनवी कर जोडुनी।
कृपादृष्टि पत्र हें अवलोकुनी।
पाहिजे विनविलें लडिवाळपणें।
लिहिलें पत्र वाचुनि पाहणें ॥ २६

धरुनि भाव लिहिलें अपुल्या करें।
परिसिजे विनती करुणाकरें।
दास होइन मी हृदयांतरीं।
ठेविला दृढ भाव चरणावरी ॥ २७

७५ ] २५ [ १०१

पंचवीस तीस पृष्ठांचें लहानसें बाड

यांत उद्धवचिद्घनांची पंचवीस पदें आहेत. शिवाय, रामकल्याण, सामराजकल्याण, राघव, जगजीवन, मच्छनाथ वगैरेंचीं कांहीं आहेत.

सगुणचरित्रें परम पवित्रें सादर वानावीं।

हें पद एकनाथांच्या नांवावर प्रसिद्ध असल्याचें आम्हांस ठाऊक आहे. पण या पदाची फार ओढाताण झाल्याचें मी पहात आहे. या बाडांत तें पद मध्वनाथांच्या नावावर दिलें आहे.

उद्धवचिद्घनांचीं पदें फार गोड आहेत. कीर्तनकारांना तीं फार आवडतील, अशीं आहेत. कागदावर लिहिलेलीं वाचण्यापेक्षां गाणाराच्या तोंडून तीं ऐकावयास मिळालीं पाहिजेत. वाचकांना कल्पना व्हावी, म्हणून एक पद उतरून घेतों :

उघड हरि नामीं सांपडसी ॥ ध्रु०
अष्टांगादिक योग महातप । करितां नातुडसी ॥ १
उमगीतां सुमनेंसि कदा हि । श्रुतिशास्त्रां दडसी ॥ २
उद्धवचिद्घन नाचत कीर्तनीं । त्या आंगीं दडसी ॥ ३

या च बाडांत असलेलें पुढील पद निगडीकर रंगनाथांचें दिसतें :

करूनियां काय घण घण घण ॥ ध्रु०
तीर्थें सर्वें बहु केलीं परि ते । जागवी षड्रिपु दण दण दण ॥ १
गोड दिसे बहिरंग जनाप्रती । अंतरीं उद्वस भण भण भण ॥ २
निजरंगीं मन शांत नव्हे जों । कामज्वरें तनु फण फण फण ॥ ३

७६ ] २६ [ १२५

बाड उसवलें आहे. त्यामुळें आद्यन्ताचीं किती पानें गहाळ झालीं आहेत हें सांगण्यास साधन नाहीं. १२६ पानें शिल्लक आहेत.

श्रीसमर्थ, उद्धवचिद्घन, कल्याण, जगज्जीवन, शिवराम, रंगनाथ, कृष्णदास, केशव, श्रीधरब्रह्मानंद, तुका, इत्यादिकांची स्फुट कविता या बाडांत आहे.

७७ ] २७ [ १५०

पृष्ठसंख्या ३३×२×२=१३२. पैकीं आरंभीचीं ११ व शेवटचीं १० गहाळ.

दासबोधांतील कांहीं उतारे, कांहीं करुणाष्टकें व श्रीसमर्थ, कल्याण, तुकाराम, नामदेव, केशव, ज्ञानदेव इत्यादिकांची स्फुट कविता.

७८ ] २८ [ १००

आत्माराम प्रकरणाचा फक्त पहिला समास

७९ ] २९ [ १५०

हें लहान २६ × २ × २ = १०४ पृष्ठांचें च बाड आहे, पण त्यांत नाविन्य पुष्कळ आहे.

( १ ) त्यांत श्रीसमर्थ, कल्याण, जगज्जीवन यांचीं बरीं च पदपदांतरें आहेत.

( २ ) श्रीसमर्थकृत पार्वतीविवाहाच्या ३१ ओव्या आहेत. पहिली आणि शेवटची ओवी :

आतां राहों द्या गदलला । महादेव उमासि चालिला ।
पार्वतीचा विवाह जाला । कोणेपरी ॥ १

दास म्हणे दाता थोर । आमुचा देव रामेश्वर ।
देवभक्तांसी अंतर । आडळेना ॥ ३१

( ३ ) श्रीसमर्थांच्या निर्याणाच्या वेळच्या त्या चार ओव्या आहेत. त्या ओव्यांत पाठांतर फार आढळतें, म्हणून त्या येथें देऊन ठेवल्या पाहिजेत :

माझी काया जाईल परें । मी तों आहे जगदांतरें ।
ऐका स्वहित उत्तरें । सांगिजेल ॥ १

राहा देहाच्या विसरें । वर्तो नका वाईट चेरें ।
तेणें भक्तीमुक्तीचीं द्वारें । चोजवती ॥ २

नका करूं वटवट । पहा माझा अंथपट ।
तेणें सायोज्याची वाट । ठाईं पडे ॥ ३

बुद्धी करावी स्वाधेन । मग हें मजुर आहे मन ।
हें चि करावें साधन । दास ह्मणे ॥ ४

( ४ ) अनंतकवींच्या श्रीसमर्थांवरील अष्टकापैकीं तीन श्लोक :
( १ ) ज्याची पूर्ण समाधि ( २ ) जेणें सात्विक ( ३ ) निर्माणस्थळ

( ५ ) श्रीसमर्थांवर दोन सुभाषित श्लोक :

जेहीं भक्तिनौका दिनां उद्धराया ।
स्वयें स्थापिली हा भवाब्धी तराया ।

सर्वे साम्यता त्या घडे पार्वतीशा ।
नमस्कार माझा तया रामदासा ॥ १
जेणें सत्वरा पावती दास बोधा ।
पहावें प्रितीनें तया दासबोधा ।
कृपेनें तयाचे चि हो काळ ग्रासा ।
नमस्कार माझा तया रामदासा ॥ १

( ६ ) साम्राज्य किंवा सामराज हे श्रीकल्याणाचे एक प्रमुख शिष्य दिसतात. त्याची कविता हि या संग्रहात पुष्कळदा आढळते. असें असतां त्या ४३ त मात्र त्याचें नाव नाहीं. ओळखीसाठीं त्याचीं दोन पदें देतों.

[ १ ]

काया वाचा सप्रेम मनोभावें रे । सद्गुरुसी शरण वेगीं जावें रे ॥ ध्रु०
ज्याच्या पाईं अनंत तीर्थी वास रे । त्याच्या तीर्थे जाती महा दोष रे ॥ १
ज्याच्या हातें हातासी देव येतो रे । देही असतां विदेही पूर्ण होतो रे ॥ २
ज्याच्या बोधें तुटती द्वयभेद रे । सबाह्य अंतरीं कोंदाटे ब्रह्मानंद रे ॥ ३
कृपा करुनी निर्वाणपदा नेती रे । साम्राज्य कल्याण सुख देती रे ॥ ४

[ २ ]

*धन्य तो साधु जाणा कल्याण योगीराणा ॥ ध्रु*
*ज्याच्या चरणाची ऐसी ख्याती । जे शरण जाती*
*ते ते साधक सिद्ध होती । हे पावन कीर्ती*
*महिमा वर्णू मी किती । श्रुति नेति नेति म्हणती ॥ १*
*माथां ठेऊनि मोक्षपाणी । गुज सांगोनि कानीं*
*दावी सस्वरूप निजध्यानीं । निज दाउनी नयनीं*
*सामराज कल्याण दानी । भक्तासी जो निदानीं ॥ २*

( ७ ) कल्याणाच्या योग्यतेविषयीं ही च साक्ष त्याचे दुसरे एक शिष्य शाम देत आहेत. याचें नाव त्या ४३ त आहे.

धन्य हा सद्गुरुपाणी कल्याणमोक्षदानी ॥ ध्रु०
माथां ठेउनियां हात । श्रवणीं सांगोनिया मात ।
केला स्वरूपीं येकांत । ऐसी ज्याची पै करणी ॥ १
हातें पातक घाताघात । केला संसार नि पात ।
शामा म्हणे जगन्नाथ । जेणें दाविला नयनीं ॥ २

( ८ ) याशिवाय केशव, वेणी, मध्वनाथ, मेकनाथ, उद्धवचिद्धन, वामन वगैरे यांचा हि थोडथोडा परामर्ष या बाडांत घेण्यांत आला आहे.

( ९ ) त्यां ४१ त नसलेले कोणी पुरुषोत्तम म्हणून कल्याणांचे शिष्य होते. त्यांनीं कल्याणांवर केलेली एक आरती आहे.

## ८० ] ३० [ १००

पृष्ठसंख्या अवघी ६०. पहिली व शेवटचीं कांहीं पानें गहाळ

( १ ) शुकदेवाच्या आदिजन्मकथेचें एक पान

( १ ) येकनाथांची आनंदलहरी, संपूर्ण, १५३ ओव्या

( १ ) जगन्नाथ कृत रामकथा, अपूर्ण, ७४ ओव्या

## ८१ ] ३१ [ १२५

२८ पृष्ठांचें एक लहान बाड. यांत आरंभीं जगन्नाथकृत उत्सवांतील एक आख्यान अथवा श्रीरामदासजन्मकथा, दोन श्लोक लिहून, अपुरी सोडली आहे. पण ही च कथा पुढें ८३ ( ३३ ) बाडांत असल्यामुळें हळहळण्याचें कारण नाहीं.

## ८२ ] ३२ [ १५०

श्रीसमर्थ कृत अंतर्भाव. संपूर्ण

## ८३ ] ३३ [ १५०

चाळीस पृष्ठांचें बाड.

यांत श्रीदासचरित्र, संपूर्ण प्रकरण आहे. तें आपण श्रीरामदासी ग्रन्थमालेंतील पंधरावा ग्रन्थ, श्रीसांप्रदायिक विविध विषय, यांत लेखांक ४७ म्हणून पूर्वीं च छापलें आहे.

येथून दुसऱ्या पानावर ' नवग्रहाचें मंत्र ' दिलें आहे.

८४ ] ३४ [१००

७६ पृष्ठें शिल्लक आहेत. आरंभीचीं आणि शेवटचीं मिळून सुमारें ३० गहाळ.

( १ ) जगज्जीवन कृत बालकांड, ओवी ७५ ते १८१
( १ ) श्रीधर कृत हनुमज्जन्मकथा, २५ पदें
( १ ) ब्रह्मगिरि अमृतराय कृत दामाजी चरित्र
( १ ) येका शिवरामांचें एक पद : रथ जातो गे घड घड घड ।
( १ ) जगज्जीवन कृत रामकथेपैकीं काहीं भाग, अपूर्ण

८५ ] ३५ [१००

रद्दी बाड. १०० पृष्ठसंख्या.

येकाशिवराम व उद्धवचिद्धन यांचें एकाद दुसरें पद.

८६ ] ३६ [१५०

आकारानें अगदीं लहान ( ४" × २½" ) पण उपयुक्त असें हें बाड आहे. पृष्ठसंख्या २६ × २ × २ = १०४. बाड उसवलेलें आहे व सर्व पत्रें अगदीं सुटी झालीं आहेत, पण सुदैवानें एक हि पत्र हरवलेलें नाहीं. यांत पुढील प्रकरणें आहेत.

( १ ) श्रीसमर्थ कृत अंतर्भाव, संपूर्ण

( १ ) श्रीसमर्थ कृत मानसपूजा, संपूर्ण

( १ ) परंतु येकवचनी देव येक । हें ऐतिहासिक दृष्ट्या अत्यन्त महत्त्वाचें असें १७ ओव्यांचें श्रीसमर्थ कृत एक प्रकरण. या ओव्यांतील वर्णन शिवतरच्या घळीसंबंधाचें आहे, पण ही गोष्ट त्या वेळीं लक्ष्यांत न आल्यामुळें तें चाफळलेल्या संबंधानें च असावें, या कल्पनेनें आपण तें मालेंतील तिसऱ्या भागाच्या प्रस्तावनेंत दिलें होतें. या प्रकरणाचा शेवट ' इति श्री फुट ग्रंथ समास प्रथम ॥ १ ॥ असा केलेला आहे.

( १ ) उठा प्रातःकाळ जाला । अवघे राम पाहूं चला ।

हा समये टळला । मग अंतरला श्रीराम ॥ ध्रु०

ही श्रीसमर्थ कृत सुपाळी.

(१) निश्चयाचा महामेरु । हें श्रीसमर्थांचें श्रीशिवकल्याणराजाला पत्र

८७ ] ३७ [ १५०

धमर पृष्ठांचें किरकोळ बाड. त्यांत श्रीसमर्थ, कल्याण, जगजीवन, शिवराम, श्रीधर, कबीर, चिन्मयनंदन, गोसावीनंदन, इत्यादिकांचीं सामान्य पदपदांतरें आहेत. पण त्यांत च एक ऐतिहासिक महत्त्वाचें पद आहे. तें सांप्रदायिक विविध विषयांक ४६ त दिलें होतें, पण तो ग्रन्थ हल्लीं दुर्मिळ झाल्यामुळें तें पद येथें देतों :

येथूनि आतां कल्याण सर्वांचें ।
धाफळा येणें जालें दीनानाथाचें ॥ ध्रु०

क्षय यछरीं नियोग जाहाला । यात्रे मधें रथांक मोडला ।
सर्धीवासुनि सृष्टीसंव्हार जाहाला ।
देखोनी दयाकलोळ वोळला ॥ १

शब्द विकारीं मंगळवासरीं । प्रतिपदा मुख्य पदाधिकारी ।
मंगळमाता श्यामात श्रीहरी ।
दुख शोक चिंता भय संव्हारी ॥ २

ऐका हो मोठी चमत्काराची परी । अष्टादशे घाये जालीं अंबरीं ।
आश्चीर्य वाटे सर्वांचे अंतरीं ।
अगाध लीळा दाविली यापरी ॥ ३

स्वामी सद्गुरु वातसुतावतारी । श्रीरामनामें विश्वासी उधरी ।
विश्वासें जाणा जो कोण्ही अंगीकारी ।
तो हि जगासी पावन चि करी ॥ ४

यश कीर्ती प्रताप महिमा । आनंदवनभूवनीं उपमा ।
दुख शोकासी दुरी करी या नेमा ।
सद्गुरुरुपें राघवीं हा प्रेमा ॥ ५

काय या पदाचा अर्थ करावा ? विविध विषयांक ४६ त अर्थ सुचविला व

होता, आतां हि मनांत येतो, पण सर्वांच्या विचारास जो अर्थ येईल तो च खरा.

या बाडांत पुढील एक सुभाषित श्लोक आहे, तो प्रसिद्ध आहे असें वाटतें. तो कोणाचा आहे ?

वेदीं जो स्तविला जगीं प्रगटला जो निर्जरीं वंदिला ।
नंदें खेळविला घरीं विचरला गोपांगनीं वेष्टिला ।
आनंदें भरला भरोनि उरला भक्तां पुढें राहिला ।
तो हा विठ्ठल पंढरीस नयनीं भीमातिरीं देखिला ॥ १

८८ ] ३८ [ १०० ते २५०

गळांठा. गळांठा म्हणजे पाचोळा, पण निरुपयोगी मात्र नव्हे. पोथ्यापुस्तकें, कागदपत्रें वगैरे अस्ताव्यस्त झाल्यामुळें परस्परांशीं फारसा संबंध नसलेले एकत्रित झालेले कागदाचे तुकडे या पुडक्यांत बांधून ठेवले आहेत.

( १ ) श्रीसमर्थकृत अभंग, पदपदांतरें यांचे सतरा कागद

( २ ) कोणा गंगाधरांचीं अनंतदेवावर दोन पदें

( ३ ) ज्ञानदेव कृत भगवद्गीतेवरील टीकेचीं तीन च पानें. हे ज्ञानदेव म्हणजे ज्ञानेश्वर नव्हत. त्यांनीं ज्ञानेश्वरांना नमन केलें आहे :

पूर्वी व्यासाचें संस्कृत । तें ज्ञानदेवें केलें प्राकृत ।
म्हणोनी उपकार बहुत । जाहला जना ॥ ७
त्या व्यासा करोनी नमस्कारु । मग नामिला ज्ञानेश्वरु ।
आतां नमूं श्रीगुरु । जेणें अज्ञान फेडिलें ॥ ८
आतां वंदूं निजरूपें ज्ञानगुरु । जेणें मस्तकीं ठेविला करु ।
मज दिधला कवित्ववरु । ज्ञानदेव म्हणे ॥

( ४ ) गोसावीनंदन कृत रेणुकादेवीवर पद

( ५ ) गुंडो केशव कृत एक पद–भज रे भज रे गोविंदा ।

( ६ ) शिवदिनकेसरी कृत–बोला रे बोला श्रीराम वाचे बोला ।

( ७ ) ह्याज रासणें अंबिके तुला ॥ ८

( ८ ) विठ्ठल कृत अहिल्योद्धार

( ९ ) जगज्जीवन कृत साधुमहिमा–४९ ते ९९ ओव्या

( १० ) येकनाथ कृत पंचीकरण–अपूर्ण

(११) बाळकृष्णाची अष्टोत्तरशत नांवें
(१२) हरिभक्तपरायण महाराज राजाधिराज राजेश्री बाबा यांस यादोबाचें पत्र
(१३) बाजी शंकर व भवानी शंकर देशमुख मुक्काम डोमगांव यांस किले सोलापुराहून अनंतभट जोशी याचें पत्र
(१४) आडतीस आरत्या–महत्त्वाच्या
(१५) मुकुंदस्तोत्र
(१६) मराठी पचतंत्रपैकीं कांहीं भाग–मोडींत लिहिलेला
(१७) मध्वनाथ, जगज्जीवन, कृष्णदयार्णव, येकाजनार्दन, गंगाधर, स्वामीदास, तुकाराम, वामन, केशव, इत्यादिकांच्या कवितेचीं त्रुटित पत्रें
(१८) किरकोळ पानें

८९ ] ३९ [ ११५

उभा अर्ध्या कागदाचें हें बाड आहे. त्याचीं ११ ते ८९ पृष्ठें उपलब्ध आहेत.

बाड महत्त्वाचें आहे. त्यांत कोणा जयरामजजांकित कवीचीं सुमारें ३०० पदें आहेत. जयराम कोण, त्यांचे पुत्र कोण, नातु कोण व त्या नातवाचे हे शंकित कोण, कोठील, केव्हां होऊन गेले, हें जाणण्याला कांहीं साधन नाहीं. कविता अति सरस आहे. हरिभक्ति हा एक च विषय सर्व पदांचा असून तो इतक्या विविध तऱ्हेनें वर्णिला आहे कीं, प्रत्येक पदाची गोडी निराळी घाटते. भाषाप्रभुत्व म्हणून ज्याला म्हणतात तें या कवीच्या ठाईं पूर्ण दिसून येतें. रुक्मिणीस्वयंवर, कात्यायनीव्रत, विरहणी, गौळणी, कृष्णयशोदासंवाद, कृष्णाचीं गाऱ्हाणीं, गोपींचीं गाऱ्हाणीं, मुरली, वासुरी, पूर्णकाम इत्यादि निरनिराळे प्रसंग घेऊन त्यांनीं भक्ति प्रतिष्ठिली आहे. अशी सुंदर प्रेमळ कविता अंधारांत पडून रहावी, हें पाहून जीव हळहळतो. शके १८३९ त भारत–इतिहास–संशोधक मंडळाच्या पंचम संमेलनप्रसंगीं या कवीवर एक टांचण सादर केलें होतें. त्यात कवीच्या कवितेचा मासला म्हणून पाच पदें दिलीं होतीं. पण या कवीकडे पाहण्यास महाराष्ट्रास अजून सवड झाली नाहीं, हें दुर्दैव होय.

१८५४ आषाढ व. ११

जयरामजजांकित

यांच्या काव्याचा नमुना म्हणून दोन पदें सादर करून पुढील बाड हातीं घेऊं.

[ १ ]

घे मुक्तीच्या गडा मानवा । नय आई घोंकडा ॥ ध्रु०
सुलभ नृतनु तुज भली फावली । जे दुर्लभ औघडा ॥ १
अति दुर्गमतर स्थळा घ्यावया । घालुनि देतों धडा ॥ २
आत्मानात्मविचारीं बैसुनी । रथ चालवि घडघडां ॥ ३
दानयज्ञतप या सेनेचें । ध्वज उडवीं फडफडां ॥ ४
साधु संत द्विज सद्गुरसेवा । सेनापति चौकडा ॥ ५
रहसी सत्पात्रतें बोधुनि । सोडिं यंत्र भडभडां ॥ ६
नवविध भक्ती सिडिया लाउनि । चढ औघड हा कडा ॥ ७
अनुदिनिं हरि भजनाचें यागावें । भगड धों धों चौघडा ॥ ८
सद्वृत्ती सद्भक्ति विरक्ती । स्त्रिया घालिती सडा ॥ ९
जयरामजजांकित विनवितसे । या गोष्टी सौघडा ॥ १०

[ २ ]

काय रे हे नरकाया । दवडिसि कां नरका या ॥ ध्रु०
बहु दुर्लभतर अवचित लाधली । घातली सुलभ विलया ॥ १
परिवारादिक मायिक संगें । लागसी कां तूं ठकाया ॥ २
रत हरिभजनीं तूं जरि होसी । तरि न लागसी झकाया ॥ ३
राहसी काचा जन्मोजन्मीं । वेळ हे लाधली पिकाया ॥ ४
जयरामजजांकितप्रभु भजसी । लाहसी कैवल्य फुका या ॥ ५

बाडाचा कागद ठिसूळ आहे, त्यामुळें फार सावधगिरीनें वापरावा लागतो.

या च कवीच्या कवितेचें एक सुंदर बाड भा. इ. सं. मंडळाच्या संग्रहीं आहे. त्यांतील कवितेवरून हा कवि शेवटचे बाजीराव साहेब पेशवे यांच्या कारकीर्दीत होऊन गेला, असें दिसतें. (मंडळाचें त्रैमासिक वर्ष ३, अंक १ पहा)

९० ] ४० [ १००

पृष्ठसंख्या ११०. जीर्ण बाड.

रा. सं. १८

या बाडांत सुमारे सुमारे ४०० अभंग आहेत. त्यांत सुमारे १०० तुकारामांचे आहेत व थोडे तुकयाबंधु यांचे आहेत.

बाकीच्यांत श्रीसमर्थ, नामदेव, चोखळा, रंगनाथ, जोती, केशव व चोखामेळा यांचे आहेत.

९१ ] ४१ [ १००

पृष्ठसंख्या ५४. जीर्ण बाड.

( १ ) यांत एकनाथांचा जोहार व श्रीसमर्थांचें सुंदरकांड व युद्धकांडाचा कांहीं भाग आहे. श्रीसमर्थकृत पदपदांतरें आहेत. एकादें अवलोकनांत असावें :

हे गुरुपाय

त्रिविध तापासि हारक हे गुरुपाय ।
भवसिंधूसी तारक हे गुरुपाय ॥ ध्रु०

स्वात्मसुखाचें बीज हो हे गुरुपाय ।
ज्ञानाचें निज गुज हो हे गुरुपाय ॥ १

भक्तिपंथासी लाविती हे गुरुपाय ।
नयनीं रघुवीर दाविती हे गुरुपाय ॥ २

पूर्ण कृपेचा सागर हे गुरुपाय ।
सहज शांतीचें आगर हे गुरुपाय ॥ ३

रामदासाचें जीवन हे गुरुपाय ।
सकळ जिवासी पावन हे गुरुपाय ॥ ४

( २ ) श्रीसमर्थसंप्रदायाच्या स्वरूपाविषयीं पुढील ओव्या सांप्रदायिकांत प्रसिद्ध आहेत, पण त्या सर्वांच्या च पाठांत असाव्या :

हनुमंत आमुची कुळवल्ली । राममंडपा वेली गेली ।
श्रीरामभक्तीनें फळली । रामदास बोले या नांवें ॥ १

आमुचे कुळीं हनुमंत । हनुमंत आमुचें मुख्य दैवत ।
तयावीण आमुचा परमार्थ । सिद्धी न पवे सर्वथा ॥ २

साध्य आम्हांसी हनुमंत । आराध्य दैवत श्रीरघुनाथ ।
गुरु श्रीराम समर्थ । उणें काय दासासी ॥ ३
दाता येक रघुनंदन । वरकड लंडी देईल कोण ।
तया सांडुनी आम्ही जन । कोणाप्रती मागावें ॥ ४
म्हणोनी आम्ही रामदास । रामचरणीं आमुचा विश्वास ।
कोसळोनि पडो रे आकाश । राघवाची कास न सोडूं ॥ ५
स्वरूप सांप्रदाय अयोध्या मठ । जानकी देवी श्रीरघुनाथ दैवत ।
मारुती उपासना नेमस्त । वाढविला परमार्थ रामदासी ॥ ६

( ३ ) याशिवाय या बाडात वेणी, केशव, दिगंबर याची तुरळक कविता आहे. कल्याणशिष्य आपचंद मठपति शिवराम यानीं कल्याणावर केलेली आरती आहे.

कल्याणांची आरती

अविनाश ब्रह्म जें कां नाम कल्याण ज्याचें ।
विद्वान बोलताती सार सर्व शास्त्रांचें ।
न खंडे अखंडीत ध्यान योगीवृंदाचें ।
पहातां मुहूर्त मूर्ती । कोड पुरे लोचनाचें ॥ १
जय जया मोक्षपाणी । स्वामी कल्याणराजा ।
आरती वोवाळीन । विश्वंभरा विश्वबीजा ॥ ध्रु०
अवतार ब्रह्मवंशीं । शक्ति अद्‌भुत देहीं ।
मारुतीस्वरूप भासे । जिंकिले हे रिपु साही ।
जितेंद्रिय ब्रह्मच्यारी । पूर्ण लक्षणे देहीं ।
षड्गुण ईश्वराचा । पार न कळे कोण्हा हि ॥ २
धन्य हे वंशावळी । हंस विधी वशिष्ट योगी ।
रामचंद्र भीम पुढें । रामदास कलयुगीं ।
सद्गुरु कल्याणस्वामी । चिरसुखानंदभोगी ।
नातुडे द्वैतभावा । शिव निःसंग संगी ॥ ३

( १ ) हनुमंत आख्यान, ४३ ओव्या

( १ ) महारुद्रस्वामीवर राघवाची आरती

( १ ) श्रीसमर्थ, कबीर, जगज्जीवन, सामराजकल्याण, रंगनाथ, आनंदसुत, तुकाराम, केशव यांचीं पदपदांतरें

( १ ) कांहीं हिंदुस्थानी भाषेंतील प्रकरणें, त्यांत कबीररोहिदास यांचें आख्यान

( १ ) श्रीसमर्थांवर एक पद :

रामदास माउली सद्गुरु रामदास माउली ॥ ध्रु०
या जगदोद्धारासाठीं हो विप्रमंदिरीं अवतरली ॥ १
प्रपंच लटिका जाणुनियां पंचवटिसि आली ॥ २
द्वादश वर्षें तप केलें कृपा रघुनाथा आली ॥ ३
बीजमंत्र सांगुनियां वरें हुर्मुजी दिधली ॥ ४
कृष्णातीरासी जाया आज्ञा श्रीरामें केली ॥ ५
द्वादश वर्षें तप केलें उपासना हे प्रगटविली ॥ ६
चांफळखोरा जाउनिया राघवमूर्ति स्थापिली ॥ ७
अद्भुत कीर्ति करुनिया सज्जनगडासी आली ॥ ८
आपण निजधामा जाया आज्ञा वेणीसी दिधली ॥ ९
जगदोद्धार करा जा हो आज्ञा कल्याणा केली ॥ १०
आश्रय निजदासा केला समाधिसेजे पहुडली ॥ ११

९३ ] ४३ [ १२५

सुमारें १२० पृष्ठांच्या एका बाडांतील उरलेलीं अवघीं २४ पृष्ठें. बाकी सर्व गहाळ.

यांत वामनकृत वामनावताराचें चरित्र संपूर्ण व रुक्मिणीचरित्र अपूर्ण

९४ ] ४४ [ १००

६८ पृष्ठें बाकी. आरंभींचीं व शेवटचीं मिळून ४८ पृष्ठें गहाळ.

( १ ) वामनकृत नृहरिदर्पण, ८७ ते १४८ श्लोक

( २ ) नामदेवकथन, कोण कृत न कळे

( १ ) अवधूतकृत शुकरंभाकटाव

( १ ) रावणबिभीषणसंवाद, आर्या

( १ ) श्रीधरांचें एक पद

सत्यपर रामा विश्रांती सुखिये नामीं ॥

( १ ) जनजसवंत आख्यान

रामदास दासनके सेवक ।
राघव निजपदध्यासी ।

( १ ) राघवकृत बोढनारजपुतचरित्र

आरंभ—सत्पाचीं चरित्रें परिसावी सादर ।
करितों नमस्कार संतालागीं ॥ १
शेवट—विश्वंभरकृपें वर्णिलें राघवें ।
संतजन भावें परिसोत ॥ ५३

( १ ) विठ्ठलकृत

राघव नाम धरें राघव नाम धरें ।
आदरें तूं गाई । भव लंघुनि जाई ।
भ्रमसी कां । स्वहित विचारी रे ॥ ध्रु०

( १ ) उद्धवचिद्धन कृत एक सुंदर पद :

पाहातां जगीं अवघे चि मज्ञ गळ्या ॥ ध्रु०
सोनें येक नग अनेक । काप फुलें सुगळ्या ॥ १
माती येक घट अनेक । रांजण कीं सुघळ्या ॥ २
तंतु येक पट अनेक । सेले कीं पगळ्या ॥ ३
आत्मा येक शरीर अनेक । समजा हे चि गळ्या ॥ ४
उद्धवचिद्धन भ्रांत त्रितापें । मदीं देत धुळ्या ॥ ५

हें पद दुसरीकडे हि पुष्कळ ठिकाणीं आढळतें. त्यांत पाठांतरें फार झालेलीं आहेत.

( १ ) याशिवाय तुका, नामा, मुक्तेश्वर इत्यादिकांची अभंगादि पदपदांतरें

९५ ] ४५ [ १५०

या बाडांच्या योगें आपल्या वैभवाचा आणि दैन्याचा एकदम च साक्षात्कार होतो. ही सारी ग्रन्थसंपत्ति पाहून आनंद होतो तो त्या च वेळीं

तिची आपल्या हातून मात्र अशी धूळधाण झालेली पाहून दुःख होतें.

या च बाडाची स्थिति पहा. त्याचीं मूळचीं २४० पृष्ठें होतीं, पैकीं आज १०८ उरलीं आहेत, बाकीचीं आरंभीचीं आणि शेवटचीं मिळून १३२ पृष्ठें आपल्या अनास्थेला, अज्ञानाला, निष्काळजीपणाला, मूर्खपणाला, कशाला तरी बळी पडून नष्ट झालीं !

जीं घड राहिलीं आहेत त्यांत पुढील प्रकरणें आहेत.

( १ ) गोसावीसुत कृत रामायणावरील पदें

( १ ) कल्याणशिष्य स्वामीदास कृत श्रीरामस्तवनपर सवाया ३६. उत्कृष्ट आहेत. छापण्यासारख्या आहेत.

( १ ) स्वामीदास कृत पाच आरत्या, पैकीं एक समर्थांवर :

आरंभा रहिता तूं निर्गुण निजरूपा
ब्रह्मांडाहुन परता सिद्धावस्वरुपा ।
स्वामी आत्मारामा हरणा त्रितापा
तुझिया अनुभवज्ञानें चुकल्या भवखेपा ॥ १
जय देव जय देव जय सद्गुरु स्वामि समर्था ।
सकळै रामदासां तूं मुळ परमार्था ॥ ध्रु०
जीवशिवापर देवा साक्षी विश्वाचा
योगेश्वरवेषें तूं अवतार साचा ।
प्रांजळ अगाध वक्ता चहुं सा अठराचा ।
अपरांपर सुखदानी वदवेना वाचा ॥ २
सद्गुरु सर्वेशा तूं वरदायक शुधा
ग्रंथ नौका निर्मित प्रभु दासबोधा ।
श्रवणें मननें निरसे अवि दुर्घट बाधा
जड जीव तरले भावें पाहोन या शोधा ॥ ३
षड्गुण सर्वेश्वर जो ब्रह्मांडीं नटला
धर्म स्थापुन लावी जन हे भजनाला ।
संसर्गें वहुतांचा उधार केला
आतां तरती पुढें निश्चयो बोला ॥ ४
कीर्ति यश प्रताप धरितां महिमेसी
पाहावां कुंठित वाणी न धरे लक्षासी ।

सद्भावें करुणाघन मन कल्याणेसीं
श्रीद सत्य रामीं वर स्वामीदासीं ॥ ५

( १ ) श्रीसमर्थकृत कांहीं कांहीं अभंग, स्फुट प्रकरणें, स्फुट श्लोक, षड्रिपु, पंचसमासीचा शेवटचा समास, वगैरे

( १ ) रंगनाथा कृत जोहार. त्याचा शेवट असा :

मग रामदासबावाचे दरबारीं। राहिलो रंगनाथ परवरी।
जुगानजुगें चाकरी करी। तरी कोणी च दूर न करी।
मायबाप जोहार घ्या ॥ ४६

( १ ) तसें च रंगनाथांचें गुरुशिष्यलक्षणात्मक ८४ ओव्यांचें एक उत्कृष्ट प्रकरण आहे.

( १ ) याशिवाय या बाडांत ज्ञानदेव, नामदेव, तुकाराममहाराज, विष्णुदासनामा इत्यादिकांची किरकोळ कविता आहे.

तात्पर्य, या बाडांतील स्वामीदासांच्या सवाया व रंगनाथांचीं दोन्हीं प्रकरणें छापलीं गेलीं पाहिजेत.

९६ ] ४६ [ १००

चवदा पृष्ठांचें लहान बाड

यांत आरंभीं ३५ संस्कृत सुभाषित श्लोक आहेत, नंतर कांहीं औषधें आहेत आणि शेवटीं कांहीं मंत्र आहेत.

९७ ] ४७ [ १०२

श्रीधरकृत पांडुरंगमाहात्म्याची ही पोथी आहे. ती संपूर्ण आहे. एकंदर अध्याय दहा. ओवीसंख्या अध्यायवार ७५, ११४, १०१, ९९, ७६, ५१, ५२, ७६, ५४, ७९ एकूण ७७७.

प्रतीचा लेखनकाल, शके १७५२, शेवटीं दिलेला आहे.

९८ ] ४८ [ ११४

चिंतामणी कृत मल्हारीमाहात्म्याची पोथी. पोथी साद्यन्त आहे, हें भाग्य. ग्रंथ अप्रकाशित आहे, असें वाटतें.

ग्रन्थाचे एकंदर पांच अध्याय आहेत. ओवीसंख्या बरोबर ५००. हे चिंतामणी कोण, केव्हां होऊन गेले, याचा शोध लावण्याचें संशोधकांना काम झालें. त्या कामीं प्रत्येक अध्यायाच्या शेवटच्या ओवींची मदत होईल :

मार्तंड कृपेचा क्षीरसागर। विठ्ठल चैतन्य वैरागर।
जयाचे चरणीं लागतां कर। चिंतामणी होतसे ॥ १-११०
श्रोतीं ऐकिजे सादर। परिग्रथवर्णे होय उद्धार।
म्हणे क्षीरसागरसुत शंकर। चिंतामणी तात्याचें ॥ २-९७
मार्तंडचरण सुधाकर। देखोनि उचंबळे क्षीरसागर।
चिंतामणी चुंचुकार। चकोर चरणीं संतांच्या ॥ ३-९३
कथारूपें रत्नाकर। तयामाजी हा क्षीरसागर।
चौदा अक्षराचा मंत्र। रत्नरूपें ज्या गर्भी ॥ ४-१०७
सनत्कुमार सांगेल सुदती। सावध चित्तें ऐकिजे श्रोतीं।
हे चिंतामणीची विनंति। मान्य करा श्रोते हो ॥ १०८
संतकृपेचा क्षीरसागर। चवदा विद्येचा आगर।
जोडला म्हणे जोडूनि कर। चिंतामणी उपमन्यु ॥ ५-९१

पोथीच्या शेवटीं 'शके १७४० बहुधान्य सं. कार्तिक शु. ९' एवढी एक च ओळ जास्त आहे. १७४० हा रचनाकाल आहे, कीं लेखनकाल आहे, सांगतां येत नाहीं.

**९९ ]** ४९ [ १५०

दासबोधाच्या एका जुन्या प्रतीचीं जीर्ण झालेलीं अवघीं तीन च पानें. अगदीं पहिल्या दशकाच्या पहिल्या समासाचीं दोन व नवव्या दशकाच्या आरंभींचें एक, मिळून तीन पानें.

**१०० ]** ५० [ १००

सहा सुटीं पानें.

( १ ) वाल्मीकिचरित्राचीं दोन पानें, ५ वें व ६ वें
( १ ) वेणाबाई कृत कौला चे पहिले सहा श्लोक
( १ ) दहावे भीमरूपी १४ ते २२
( १ ) केशवस्वामी आणि समर्थ यांचीं पदोत्तरें

१०१ ] ५१ [ २००

एक जीर्ण पान

त्यांत श्रीकल्याणशिष्य श्याम याचीं दोन पदें व भीमध्यान आहे.

१०२ ] ५२ [ ७५

किरकोळ बाड. यांत एकनाथ, मानुदास, कान्हा, तुकाराम, तुक्या बंधु यांची किरकोळ कविता आहे.

सुमारें १०० संतांचीं नांवें उतरलेलीं आहेत.

१०३ ] ५३ [ १५०

पृष्ठसंख्या ५३ × २ × २ = २१२. महत्त्वाचें बाड.

( १ ) 'रामदासाचे समग्र ग्रंथ' म्हणून छापणारांनीं स्वतःची सुधारून समजूत करून घ्यावी व इतरांची करावी, परंतु खरें पाहू गेल्यास श्रीसमर्थांचे समग्र ग्रंथ आपण छापले असें म्हणण्याची वेळ येण्यास अजून पुष्कळ अवकाश आहे. कदाचित् असें केव्हां च म्हणतां हि यावयाचें नाहीं ! प्रस्तुतच्या बाडांत श्रीसमर्थांची अप्रकाशित अशी कविता किती तरी आहे. आपण करुणाष्टकें छापलीं, स्फुट श्लोक छापले, पदपदांतरें छापलीं, तरी या बाडांत अप्रकाशित पदें, श्लोक, कांहीं उपदेशपर सुभाषितवजा, कांहीं तत्त्वज्ञानपर, कांहीं आत्मचरित्रपर आढळतात. सभेच्या संग्रहांत श्रीसमर्थांची जेवढी म्हणून उपलब्ध कविता आहे तेवढी सर्व पुढील वर्षी छापण्याचा संकल्प आहे तोंवर या बाडांतील कांहीं गोड श्लोक वाचकांस सादर करितों.

न होतां मनासारिखें दुःख वाटे ।
अकस्मात येऊनि संताप लोटे ।
अशी आदरें शांति तेथें करावी ।
विवेकीं जनीं गोष्टि जीवीं धरावी ॥ १

घरीं आणि दारीं, प्रपंचांत आणि व्यवहारांत आपणा सर्वांवर किती तरी असे प्रसंग येतात, अशा वेळीं हा उपदेश आठवला पाहिजे.

साधुत्व आणि क्रोध एका जागीं आढळतां कामा नये. ब्रह्मणीं माणसें क्रोधवश झालेलीं आढळलीं, म्हणजे पुढील श्लोक मनांत म्हणावा :

भले पाहतां ब्राह्मणे दिसता हो ।
परी अंतरीं क्रोध संताप कां हो ।
मुखीं शब्द तैसी च क्रोया करावी ।
तया साधका कोण रे शब्द ठावी ॥ १

हें बाडाचें वाचण आहे याचें स्मरण होऊन कधानें हात आवरतों. असे चैंमर श्लोक या बाडात आहेत.

आत्मचरित्रार तीन श्लोक देतों आणि पुढें जातों :

अघोरा वनामाजि येकांत जावें ।
उदासीन चित्तें तयाला पहावें ।
घरीं धांव घ्यावी गिरी तो चढावा ।
देहे कष्टवावा घरा वीसरावा ॥ १

असें श्रीसमर्थ करीत. रामा धांव म्हणून डोंगरांत, एकांतांत हांका मारीत !

भवें त्रासलों हाक मारूनि जावें ।
गिरीशृंग पाठार ते प्राथवावें ।
सुखें वस्ति विश्रांति तेथें करावी ।
मनोवासना रामरूपीं भरावी ॥ २

बहु झाडखंडें बदंडें अचाटें ।
गिरीसारिखीं थोरथोरें कपाटें ।
बहू सावजें व्याघ्र सिंहे कलाली ।
तेथें रामदासें असे गुंफ केली ॥ ३

कुठल्या गुंफेचें हें वर्णन ? शिवतरच्या, कां हेळवांकच्या, कां चंद्रगिरीच्या, कां त्या, कां आपण अजून पाहिली नाहीं अशा च एकाद्या, कां कोणत्या, काय सांगावें ?

( २ ) दासविश्रामधामकर्त्यांनीं दासगीता म्हणून संबोधिलेली श्रीसमर्थकृत संस्कृत पंचाध्यायी या बाडांत आहे. पण चमत्कार असा, इतर ठिकाणांप्रमाणें त्यांत हि चार च अध्याय आहेत.

( ३ ) कल्याणांची बहुतेक सारी कविता–पदें, श्लोक, ओव्या – या बाडांत आली आहे. ती छापण्याची जेव्हां वेळ येईल, तेव्हां इतरत्र आलेल्या त्यांच्या कवितेशीं ताडून पाहण्यास ही उपयोगीं पडेल च.

( ४ ) तसें च श्रीकल्याणांचे दोघे शिष्य साम्राज्य आणि शाम या उभयतांची पुष्कळ च पदें या बाडांत आहेत. शाम यांचे कल्याणानुग्रहाचे अकरा श्लोक आहेत.

( ५ ) कल्याणस्वामीवर केशवांचें एक व जनाबाबा यांचीं दोन पदें आहेत.

( ६ ) वामन कृत नामसुधा

( ७ ) ओवीबद्ध अजामेळउद्धरण

आरंभ–परिसा कथा सावधान ।
अजामेळाचें उद्धरण ।
कैसा पावला नारायण ।
महा पतितातें ॥ १

शेवट–नारद कथा सांगतां ।
वीणा गळाला अयचिता ।
अगस्तीनें चरणीं ठेविला माथा ।
सप्रेमेंकरूनी ॥ ९०
हे कथा वैशंपायन ।
श्रोता जनमेजय आपण ।
सद्गदीत सजळ नयन ।
जाले समस्तांचे ॥ ९१

( ८ ) याशिवाय कबीर, राघव, केशव, ज्ञानदेव, एकनाथ, जनजसवंत, तुकाराम, मुक्ताई, चांगा, निजानंद, कृष्णदास, वामन, नामा, नामयाची जनी, नाम्यास्वामी (?), गोसावीनंदन, जनमैत्रनागा, इत्यादिकांची थोडी फार कविता आहे.

( ९ ) दासबोधांत कोणकोणते विषय आले आहेत त्याचा पहिल्या च समासांत जो उल्लेख आहे त्याप्रमाणें ते विषय कोठकोठें आले आहेत, त्यांची एक यादी मागील बाडाक ५५ त आली आहे, तशी च एक यादी या हि बाडात आहे, पण तींत उगीच थोडा फरक आहे, म्हणून ती यादी येथें देतों :

दशक ४ समास १ नवविधाभक्ति

४ × १० सायोज्यमुक्तीचा
५ × ६ शुद्ध ज्ञानाचा
६ × २ शुद्ध उपदेशाचा
७ × ४ मुख्य ब्रह्माचा
७ × ७ विदेहस्थितीचा
८ × ३ मायोद्भवाचा
८ × ४ पंचभूतांचा
८ × ७ मोक्षप्राप्तीचा
८ × ९ आत्मस्थितीचा
८ × १० नाना मतांचा
९ × १० अलिप्तपणाचा
१० × ७ मुख्य भक्ताचा
११ × १ जीवशिवाचा
११ × २ मुख्य देवाचा
१२ × ३ आपण कोण हा
१२ × ४ वैराग्याचा
१३ × ८ कर्ता कोण हा
१४ × ३ नाना कवित्वाचा
१५ × ९ मुख्य उपासना
१८ × ६ चातुर्याचा
२० × १० शुद्ध स्वरूपाचा

( १० ) वरील यादी संपतां च याहांत पुढील एक नोंद आहे, तिचा हेतु अथवा अर्थ माझ्या लक्षांत येत नाहीं, तो कोणाच्या तरी यावा, म्हणून ती नोंद जशीच्या तशी देतों :

अभंग

द १ × स ६
८ × ९
११ × ६
११ × ७
१२ × ४
१३ × ५
१५ × २
१६ × १
१६ × १०
१८ × ३

१०४ ]

५४ [ १५०

पृ. सं. ३६ × २ × २ = १४४. बाड सायंत आहे. महत्त्वाचें आहे.

( १ ) यांत आरंभीं श्रीसमर्थांचीं तीन पदें असून नंतर क्रमशः पूर्वारंभ, जुनाट पुरुष, आत्माराम, पंचसमासी अशीं प्रकरणें आहेत.

( २ ) नंतर पुष्ट ग्रंथ म्हणून

परंतु येकवचनी देव येक । जेणें सोडिले देव अनेक ॥

हें १७ ओव्यांचें प्रकरण. त्याचा शेवट

' इति श्री पुष्ट ग्रंथ समाप्त प्रथम ॥ १ ॥ ' असा च केला आहे.

( ३ ) त्यानंतर लागली च हनुमताचा श्रीरामाची आज्ञा ७ ओवी, बिभीषणाला रामाचा वर ४ ओवी व वाल्मीकीला आश्वासन ६ ओवी, मिळून १७ ओव्या आहेत. पण त्या कोणाच्या आहेत, कळण्याला मार्ग नाहीं. बहुधा श्रीसमर्थकृत असाव्यात.

( ४ ) नंतर ४१ श्लोक रामायणाचे आहेत, पण ते हि कोणी केलेले आहेत, सांगता येत नाहीं.

( ५ ) त्रयोदशाक्षरी मंत्राचा तेरा कोटी जप झाला असता श्रीरामदर्शन होण्याविषयींचा अभंग

( ६ ) आणि शेवटीं साठ संवत्सरांची फलश्रुति दिलेली आहे. ती कांहीं विशिष्ट वर्षांबद्दल आहे, का सर्वसामान्य आहे, हें पाहिलें पाहिजे. अमुक संवत्सरात अमुक महिन्यात 'राजीयासी पीडा होईल,' 'लोकासी पीडा होईल,' 'धारण मंद होईल,' 'उत्तर दिशेसी दुकाळ पडेल,' 'टोळ येतील,' 'मेघ वरुषेल,' 'पश्चिमेचा राजा सुखी सुभीक्ष होईल,' 'राजे राजे यासी युध्य होईल,' 'मारवाड देशीं विग्र होईल,' 'सुभिक्ष होईल,' 'नगदेशीं अपार पीकें होतील। राजाविग्रह होईल। नवी मुद्रा पडेल। गोद्विजास पीडा होईल,' 'भुमीकंप होईल,' 'गौडदेशी पीडा होईल,' 'दिलीचे देशीं भये होईल,' 'रोग उपजेल,' 'तेलंगण देश व करनाटक व कोंकण देशीं भये होईल,' 'देश उद्वस होतील,' 'महायुध्य होईल,' 'राजपात होईल,' इत्यादि भविष्यकथन आहे. त्यानें याचीं वीस पानें व्यापिलीं आहेत. शेवटीं "ऐसी साठी संवत्सराची फळश्रुती पार्वतीप्रति शंकरें सांगीतली असे" असा शेरा आहे.

१०५ ] ५५ [ १५०

पृ. स. १०२ शाबूत. आरंभींचीं १८ व शेवटचीं २४ गहाळ

( १ ) मुक्तेश्वरकृत थालीपाक, ७२ ते १५८ ओव्या.

( २ ) कृष्णदासमुद्गलकृत पाताळकांड, संपूर्ण, दोन प्रसंग. १३८ + १५८ = २९६ ओव्या.

( ३ ) सानुमुनाभाटण–अपूर्ण

१०६ ] ५६ [ १००

पृ. सं. ४४. किरकोळ बाड.

( १ ) जगज्जीवनकृत रामकथेपैकीं कांहीं भाग

( १ ) कल्याणकृत ब्राह्मणाची व दासबोधाची आरती

( १ ) श्यामकृत मृदुल्याची आरती

१०७ ] ५७ [ १००

पृ. सं. १०८.

( १ ) अथर्वण गंगाधरकृत शंकरमहिमा

अप्रकाशित प्रकरण दिसलें, त्याचा शेवट असा आहे :

सव मिळु जाला थापावेगळा । तारामंडळा । दाव दिधला तपासी
नक्षत्रामाजी पैठ उगवतो । जन देखती । शोभिवंत आकाशीं
पुष्पकविमानीं येऊनी । नेला उचलोनी । बैसविला कैलासीं
तेंहुनी जालें हें वृत्त । जगविख्यात । भक्ताथागीं धन्य दिवसीं ॥ ४१
जाणतां नेणतां पूजा शंकर । स्मरा हरिहर । गिरिजामनोहर
दुस्तर हा भवसिंधुतारक । मोक्षदायक । अव्यक्त निराकार
प्रतक्ष कलिमलनाशन । जगजीवन । स्वामी हा रामेश्वर
चरणकमळ चिंती मानसीं । ध्याये अहर्नेशीं । अथर्वण गंगाधर ॥ ४२

( १ ) पद—पळा पळा महापिसा येतो आयली ।

( १ ) पाळुळ—भरतखंडामाजी । शरयुतीर या गांव ।

( १ ) मुक्तेश्वर कृत तुळसीची आरती

( १ ) हनुमंतास आज्ञा, बिभीषणास वर, वाल्मीकीस आश्वासन ( बाडांक १०४ ( १ ) प्रमाणें )

( १ ) समर्थ, वामन, जयराम, मध्वमुनेश्वर, रंगनाथ, येकनाथ, माधवदास, केशव, निजानंद इत्यादिकांची किरकोळ कविता

१०८ ] ५८ [ १५८

हा अंक व पुढील दोन अंक मिळून येकनाथी भावार्थ-

रामायणाची पोथी आहे. तथापि ती सबंध नाहीं. फक्त बाळकांड नाहीं, बाकीचीं सर्व कांडें आहेत. सर्व कांडाचें अक्षर सुंदर आहे, पण लेखक भिन्न भिन्न दिसतात. आकार हि भिन्न आहेत.

निर्णयसागरमध्यें सन १९१७ त छापलेल्या ग्रन्थाशीं मधून मधून ताडून पाहिलें तों फार च फरक आढळला. कोणाला यत्किंचित् दोष देण्याची इच्छा नाहीं, तथापि वस्तुस्थिति अशी खरी कीं, साधुसंताच्या ग्रन्थांच्या प्रमाणभूत आवृत्त्या काढण्याचा आजपर्यंत महाराष्ट्रानें करावा तसा प्रयत्न च केला नाहीं. श्रीसमर्थसंप्रदायाचें प्रकाशनकार्य चालू आहे, कै. राजवाडे यांनीं ज्ञानेश्वरीची प्राचीनात प्राचीन प्रत प्रसिद्ध केली आहे व नगर, बेळगाव या शहरीं ज्ञानेश्वरमंडळें स्थापन होत आहेत, पण अजून एकनाथमहाराजांकडे कोणाचें विशेष लक्ष गेल्याचें दिसत नाहीं.

या बाडांकाचा आकार १०" × ७½" आहे. त्यांत फक्त उत्तरकांड आहे. त्याचा शेवट असा :

" सके १६९६ जयनामसंवत्सरे । श्रावण शु. ९ । सोमवार तद्दिनि उत्तरकांडलेखन समाप्त । हस्ताक्षर धुंडिराज आत्मज मल्हारी उपनाम मारखळ वास्तव्य मौजे खांडवि देव श्रीखंडेश्वर प्रांत बारसी श्री भगवंत आंबरीषवरदचरणप्रसादें संपूर्ण जालें श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥ ग्रोवि ॥ ८०६४ ॥ ॥ छ ॥ "

१०९ ] ५९ [१५०

एकनाथी भावार्थरामायणापैकीं युद्धकांड. १२" × ७½". लेखनकाल कोठें आढळला नाहीं.

११० ] ६० [१५२

या अंकात अयोध्याकांड, अरण्यकांड, किष्किंधाकांड व सुंदरकांड अशीं चार कांडें आहेत. आकार १२" × ५½" आहे.

अयोध्याकांडाचा शेवट :

" सके १६८४ चीत्रभानुनामसंवछरे भाद्रपद मासे शुक्लपक्षे प्रतिपदायां भृगुवासरे अयोध्याकांड समाप्त वोवीसंख्या २०९२ दोन हाजार ब्यानव ॥ छ ॥ लेखन श्री स्वामिचरणि डोमग्रामि ग्रंथ समाप्त ॥ सन हजार ११७२ "

अरण्यकांडाचे पहिले १८ प्रसंग कोणी मागाहून लिहिलेले दिसतात. तें कोणा आधुनिकाचें काम दिसतें. अक्षर सुवाच्य आहे पण बाईनें लिहिलेलें आहे. पुढचे पांच प्रसंग पूर्वींचे लिहिलेले आहेत. त्यांचा शेवट :

" सके १७०१ विकारीनामसंवछरे माघ वद्य १३ त्रयोदसीस संपूर्ण ॥ "

पुढच्या दोन कांडांच्या शेवटीं लेखनकाल दिलेला नाहीं.

१११ ] ६१ [ १५०

श्रीमत्परमहंसपरिमाजकाचार्यश्रीभारतीतीर्थविद्यारण्यमुनिवर्यविरचिता पंचदशी तीवरील त्यांचे शिष्य रामकृष्ण यांच्या प्राकृत व्याख्यानासह.

११२ ] ६२ [ १५०

अनेकार्थध्वनीमंजरी. संस्कृत ग्रन्थ. पृ. सं.५०. उदाहरणार्थ :

कुंतलः केशपाशः स्यात्कुंतलो देशवाचकः ।
कुंतलः सूत्रधारश्च कुंतहस्तस्तु कुंतलः ॥ ३४

कांतारं काननं प्रोक्तं कांतारः पाकशासनः ।
इक्षुभेदश्च कांतारः कांतारो दुर्भरोदरः ॥ ९१

श्लोकाधिकारः, अर्धश्लोकाधिकारः व पादाधिकारः असे ग्रन्थाचे तीन भाग असून तिन्ही अधिकाराचे क्रमशः ९६, ८२ व २५ मिळून २०३ श्लोक आहेत.

१८५४ श्रावण व. ६

११३ ] ६३ [ १७५

हें एक सर्वसंग्राहक पुडकें आहे.

( १ ) पूर्वी कागदाला कागद चिकटवून पृष्ठिपत्रें तयार करीत. लड बाडांना अशीं च पृष्ठिपत्रें असत. पोथ्या सुरक्षित रहाव्या म्हणून लाकडी फळ्यांच्या ऐवजीं केव्हां केव्हां अशीं लड लड पृष्ठिपत्रें वापरीत. त्या वेळेस त्यांना जे रद्दी कागद वाटत त्याचा उपयोग पृष्ठिपत्राकडे करीत, पण आज त्या रद्दी कागदांत आपणांस इतिहास आढळतो ! खरोखर म्हटलें म्हणजे जुन्या बाडांना असलेलीं पृष्ठिपत्रें हि आपण उलगडून पाहिलीं पाहिजेत. पण तसें करण्याचें मला सहसा धैर्य होत नाहीं. लांकडी फळ्यांच्या ऐवजीं जीं पृष्ठिपत्रें वापरीत तीं उलगडून पाहण्यास मात्र संकोच वाटत नाहीं. अशीं दोन पृष्ठिपत्रें या सर्वसंग्रहांत आहेत. शक्य तितकीं तीं उलगडून पाहिलीं. विशेष महत्त्वाचें त्यांत कांहीं आढळलें नाहीं. जुनीं पंचांगें, जुने जमाखर्च व जुनीं पत्रें त्यांत आढळलीं. शके १६६५ रुधिरोद्गारीसंवत्सराच्या पंचांगाचा कांहीं भाग, कांहीं थोडी पत्रें व शके १६७४ अंगिरानाम, १६७७ युवानाम संवत्सरांतील दिवसादिवसांचे जमाखर्चांचे बरेचसे तुकडे त्यांत आहेत. रोजच्या या जमाखर्चांच्या तुकड्यांना रोजनामा म्हटलें आहे. त्यांच्या मथळ्याचे जागीं ' श्रीनरसिंह ' देवतेचें नांव लिहिलेलें आहे. शिवराई, अलमगिरी, टक्‍, रुपये हीं नाण्यांचीं नांवें त्यांत आढळतात. पत्रांत किंवा जमाखर्चांत नांवें पुष्कळ आहेत, पण प्रमुखांचीं नाहींत.

( २ ) शके १७६५ तील मौजे रोहले पो हवेली परंडा येथील गांवझाडा

( ३ ) संस्थान डोमगांव येथील शक १७१२ त झालेलें सनदापत्रांचें एक फेरिस्त

( ४ ) शके १७९३ तील ताळेबंद

( ५ ) अज्ञानसिद्ध कृत काळज्ञान ग्रन्थाचें शेवटचें १७ वें पृष्ठ. ग्रन्थाची ओवीसंख्या ४९७.

( ६ ) आदित्यहृदयाचें शेवटचें पृष्ठ. त्यावरील मजकूर :

" दुर्मुखनामसंवत्सरे चैत्रमासे शुक्लपक्षे त्रयोदश्यायां शुभतिथौ मंदवासरे तद्दिने इदमादित्यहृदयस्य पुस्तकं समाप्तं शुभं भवतु ॥छ॥

इदं पुस्तकं गंगाधर कृष्णस्य झेयं ॥ ७ ॥ ”
म्हणजे ही पोथी १६३८ साल होती.

( ७ ) यादवदासकृत हनुमतस्वामींची आरती

( ८ ) गोसावीनंदनकृत रामायणापैकीं दोन पृष्ठें

( ९ ) नामा विनवी केशवाचा–एक अभंग त्या अभंगाच्या कागदाला मुद्गलगोसावी यांच्या एका पत्राचा चिकटलेला थोडा भाग आहे. पत्रसमाप्तीचा शिक्का

डेखनसीमा मुद्गलमति

( १० ) शिवकालीन जमाखर्चाचे तुकडे आत असलेलें एक लहान पृष्ठिपत्र

( ११ ) दहा किरकोळ तुकडे

## सावळारामबुवांकडील संग्रह

खुद्द मठातील संग्रह संपला. आता सावळारामबुवा, नानाबुवा, दुर्गाबाई, फैनचे देसाई साहेब, दत्तात्रयबुवा व निंबराजबुवा यांच्या कडील व काहीं किरकोळ संग्रह पहावयाचा. आरंभीं सांगितलेंच आहे कीं, हा हि संग्रह वस्तुत मूळचा डोमगावमठांतील च असला पाहिजे.

# ११४ ] १ [ १००

पृष्ठसंख्या १०१ × २ × २ = ४०४

( १ ) श्रीसमर्थ, माधो, केशव, सुरदास, रंगनाथ, मिराबाई, कल्याण, शिवदिनकेसरी, तुकाराम, मेरु, जयरामसुत, जगजीवन, चिन्मयनंदन, मच्छनाथ, कबीर, गोसावीनंदन, जगमित्रनागा, सच्चिदानंद, अनंततनय, वेणाबाई, गंगाधर, मुद्गल, विष्णुदास नामा, मुक्तेश्वर, रामचंद्र, लीलाविश्वंभर, शिवराम, इत्यादिकांची काहीं ना काही कविता या बाडांत आहे. त्यांत अर्थात समर्थ आणि तुकाराम यांच्या कवितेचा भरणा विशेष आहे.

( २ ) कल्याणकृत शुकरामसंवादाचे १८ श्लोक

( ३ ) गंगाधरानीं श्रीरामाचा हात पाहून सांगितलेलें भविष्य

( ४ ) मुक्तेश्वर कृत वनपर्वांतील १३ वा अध्याय

(५) रामचंद्र कविकृत सुदामचरित्राचे ३२ श्लोक

(६) जनीं जाहली पूर्ण हे भक्ति नवमी।
कृपें तोषला स्वामि हा नित्य नेमीं।
यदाश्रीजयानंदकल्याणमस्तु।
तथास्तु तथास्तु तथास्तु तथास्तु ॥

हा श्लोक सर्वांना पाठ असावा.

(७) श्रीरघुनंदन पूर्णकृपाघन वाम सिता सति शोभतसे।
सव्य लक्ष्मण भरत शत्रुघ्न सन्मुख मारुति तो विलसे।
अंगद सुग्रिव भक्त बिभीषण जांबुवत गुण गर्जतसे।
श्याम विशेष पटाधीश राघव दास मनीं सदा चिंतितसे ॥ १

श्रीगुरुची जरि पूर्ण कृपा जरि दैवबळें तुजलागिं घडे।
पाहसि ब्रह्म चराचर व्यापक निर्मळ निश्चय तो विघडे।
तन्मयता जरि छाहसि सदृढ दृश्य समस्त हि हे विघडे।
देव चि होउनि देव चि पाहसि हे गति उग्र तपें न घडे ॥ १

हे दोन श्लोक पूर्वी कोठें छापलेले माझ्या स्मरणात नाहींत.

(८) मेरुस्वामींचें एक पद :

*भिसें भिंगोळें गारोळें। ज्याचें पाहणें घुलें।*
*दृष्टी घेउन बैसली। चित्त चोरनी नेलें ॥ ध्रु०*
*काया चंचळ चपळ। पळ स्थिर न राहे।*
*धांव घालुनी भावबळें। त्याचे धरिले पाये ॥ १*
*पाये न सोडी सर्वथा। माझा जीव गेलिया।*
*काया विसर्जन जाली। मेरु लागला पायां ॥*

भिसें = केसाळ. भिंगोळें = भयकर. गारोळें = घारडोळे. घुलें पाहाणें = मान वाकडी करून पाहणें.

(९) या बाडात निजानंदाच्या रंगाचीं पदें आलीं आहेत, तीं वारी निगडीकर रंगनाथांचीं होत. त्यांचा जो श. १८२४ त प्रसिद्ध झालेला पदसंग्रह आहे, त्यांत पुढील पद योग्यशा पाठांतरानें आढळतें :

सदा श्रीहरिचें नाम मुखीं गात जा ॥ ध्रु०
वर्णाश्रमविहित धर्म करणें हा परम धर्म
निरहंकृति कजनयन ध्यात जा ॥ १ ॥

सत्संग शास्त्रश्रवण श्रवणाचें करुनि मनन
निजध्यासि पूर्ण सुखी राहत जा ॥ २ ॥
निरतिशय निजानंद हा चि अहर्निशि छंद
अंतरंग तो चि जनीं पाहत जा ॥ ३ ॥

(१०) तुळजे तुजला आलों मी शरण ॥ ध्रु०
त्रिपुराबाई सुंदर तुकाई । दासवि सं निजचरण ॥ १

(११) जगीं धन्य ते ब्रह्मपुरी मसूरी ।
अधिष्ठान तें जाहलें असुरारी ।
असंख्यात सामर्थ्य या मारुतीचें ।
बहु चालिलें काम ईमारतीचें ॥ १

असा एक च श्लोक या बाडांत एका ठिकाणीं दिला आहे. मसूर येथें त्या काळीं प्रसिद्ध असलेल्या ब्रह्मपुरींत श्रीसमर्थांनीं स्थापिलेल्या मारुतीला उद्देशून हा श्लोक आहे, हें उघड आहे.

११५ ] २ [१००

पृष्ठसंख्या १९१ × २ = ३८२. दुर्दैवानें एकाद दुसरें पान गहाळ आहे.

या बंद बाडांत वामन कृत श्रीमत् भगवद्गीतेवर समश्लोकी टीका आहे.

अक्षर सुंदर आहे. हे वामन म्हणजे पार्थसारथी वामन होत. त्या त्या अध्यायाचा अंक घालून प्रत्येक अध्यायाचा शेवट बहुतेक सारखा च आहे. अठराव्या अध्यायाचा शेवट :

इति टीका समश्लोकी अध्यायीं अठरावया ।
श्रीपार्थसारथी कर्ता जो वामन मनोरथी ॥

११६ ] ३ [१००

पृ. सं. ६४ × २ = १२८. आरंभींचीं आणि शेवटचीं बरींचशीं गहाळ दिसतात.

(१) श्रीसमर्थ, रामदासदास, कल्याण, दत्तात्रि, स्वामीदासी,

शिवराम पूर्णानंद, वेणी, तुकाराम, जगजीवन, येकनाथ, शामराज, यांची थोडी फार कविता.

( २ ) कृपादृष्टि कल्याण हा जें विलोकी ॥
हा चवथा चरण असलेले पांच श्लोक

( ३ ) वेणी कृत श्रीरामगुहसंवाद, ४४ श्लोक, पैकीं पहिले तीन गहाळ. " नावेचे श्लोक गोड्क उदार " असें या प्रकरणाचें नांव आहे.

( ४ ) वेणी कृत रामायणीकथामहात्म्यपर अकरा ओव्या

( ५ ) थाळीपाक, १-१४१ ओव्या.

आरंभ—दुर्योधन हस्तनापुरीं । राज्य करी सहपरिवारी ।
सर्वे म्हणे आपुले सरी । रास तो हि ठेंगणा ॥ १

शेवट— यापरी संपला थाळीपाकु । ऐकता भवभयाचा कंपु ।
नातळे हे कविनायेकु । व्यास बोले भारतीं ॥ १४१

( ६ ) समर्थकृत-स्वामी तुझ्या वियोगें घटिका जातसे युगें ॥

( ७ ) वामनपंडित कृत भरतभाव. या गोड काव्याचीं तीन प्रकरणें पूर्ण असून चवथ्याचे सहा श्लोक आहेत. पुढचीं पानें गहाळ आहेत. हें काव्य पूर्वी काव्यसंग्रहांत छापलेलें आहे, पण तें तेथें प्रकरणशः न छापतां एक च प्रकरण म्हणून छापलें आहे; शिवाय त्यांत पाठभेद हि आहेत. पंडितांनीं मात्र तें मूळ प्रकरणशः च लिहिलें असलें पाहिजे, असें अंतर्गत पुरावा च सांगतो. छापलेल्या प्रतींतील ४६ या श्लोक हा या बाडांतील दुसऱ्या प्रकरणाचा शेवटचा श्लोक होय. तो असा :

प्रकरणीं पुढिल्या गुरुराज तो । भरतसंगतिनेंच विराजतो ।
परि पर्यी गुरु होय समागमीं । तरि च राम मिळे निगमागमीं ॥ २७
इति भरतभाव ॥ २ ॥

**११७ ] ४ [ २००**

पृ. सं. ६३ × २ × २ = २५२. आरंभींचीं कांहीं गहाळ.

( १ ) दास, रमावल्लभदास आणि गोसावीनंदन यांच्या कवितेंतील कांहीं रामायणकथाभाग

( २ ) येकनाथांचीं रामावर पदें

( ३ ) वेणीकृत चौछाचे श्लोक २६

( ४ ) श्रीसमर्थकृत कांहीं अभंग, पदें, वगैरे, यांतील कांहीं अद्यापि अप्रकाशित आहेत.

जाण रे बापा जाण । अनुभव सोपा जाण ॥ ध्रु०

नभाचिये सारिखें । नभ नव्हे पारिखें ।
इंद्रिया आरिखें । वेढावलें ॥ १

डोळियांत भरलें । देखण्यांत चोरलें ।
वारियांत थारलें । उडेचिना ॥ २

जाणिवेंत आगळें । नेणिवेंत वेगळें ।
स्वरूप सगळें । रामदासीं ॥ ३

( ५ ) मुक्ताबाई कृत तारीचे अभंग

( ६ ) मेणाबाई कृत च्यार पदें

( १ ) पदरेणूतें आजि धन्य मी ।
( २ ) आका गांवा गेली ।
( ३ ) तुझी तुझी तुझी । पावना रामा ॥
( ४ ) पाहातां पाहातां द्वैत सरलें वो ।

( ७ ) ॥ श्री राम जय राम जय जय राम ॥ १ ॥

उपासनेचें उत्तीर्ण व्हावें ।
भक्तजनें भजन वाढवावें ।
अंतरीं विवेकें समजावें ।
सफळ कांहीं ॥ १ ॥

( ८ ) जगज्जीवन कृत

रामचंद्रा कृपा करी

करुणासागरा स्वामी । रामचंद्रा रघोत्तमा ।
पतितोद्धारका मातें । रामचंद्रा कृपा करी ॥ १
विमला अरविंदाक्षा । राकेन्दुवदना विभो ।
भैरोंरपदद्यावासी । रामचंद्रा कृपा करी ॥ २
ब्रह्मरूप चिद्भानु । अही सद्गुणालया ।
कंजपाणी रमाकांता । रामचंद्रा कृपा करी ॥ ३
पद्दीमर्दनाधिया । प्रचंडा राक्षसांतका ।
समरा सौख्यदानी हे । रामचंद्रा कृपा करी ॥ ४

आगमयागर्भमीयाहे । तरणीकुळभूषणा ।
स्वधर्मरक्षणा श्रीमान् । रामचंद्रा कृपा करी ॥ ५
ताटिकातनुसंव्हारा । गाधीजमखरक्षका ।
दिव्यदेही शिलानारी । रामचंद्रा कृपा करी ॥ ६
निगमागमगुह्यार्था । मराळयोगिमानसा ।
स्मरारिदाहशांता हे । रामचंद्रा कृपा करी ॥ ७
तव नामसुधास्वादा । साम्यताऽमृत तें न ये ।
सकृन्नामें जिवा मुक्ती । रामचंद्रा कृपा करी ॥ ८
येकपत्नी येकबाणी । येक चि शर आन्यथा ।
घादे अक्षे दोघे । रामचंद्रा कृपा करी ॥ ९
कल्पांत समयो जाल्यां । गानृतावाक्षियेमा ।
वैदेही तव अर्धांगी । रामचंद्रा कृपा करी ॥ १०
धातया धारणाज्ञानी । धार्मिका धरणीपते ।
रेणुकासुतगर्वाग्नि । रामचंद्रा कृपा करी ॥ ११
मद मी आळसी नेणे । स्नान संध्या पुजाविधी ।
भक्तिप्रेमा नसे चित्तीं । रामचंद्रा कृपा करी ॥ १२
सकळ अपराधाचा । पुतळा मूर्तिमंत मी ।
क्षमोनी सर्व हि मातें । रामचंद्रा कृपा करी ॥ १३
बहुधा तारिले दोषी । ऐकतां मन गुंतलें ।
म्हणोनी आश्रयो केला । रामचंद्रा कृपा करी ॥ १४
निज मीद न संडावें । प्रभु श्री जगज्जीवना ।
पदाब्जीं भक्ति द्यावी हे । रामचंद्रा कृपा करी ॥ १५

( ९ ) रंगनाथ निजानंदाची कांहीं पदें. त्यांत कांहीं अप्रकाशित. शके १८२४ निगडीमठानें याचा पदसंग्रह छापलेला आहे. त्यांत निदान

रे सज्जना आंतर निवर्वी सांग गोष्टी ।
थोर भाग्यें जाहाली तुझी भेटी ॥ ध्रु०

हें पद आढळत नाहीं.

( १० ) आनंदनंदन कृत सीतास्वयंवर
श्लोक ६९, पदें ३३, सवाया ५, चूर्णी ७

( ११ ) संस्कृत वीं दीडशें सुभाषित श्लोक
( १२ ) रामरक्षास्तोत्र. कांहीं पाठांतरें आहेत
( १३ ) शंकराचार्य विरचित रामाष्टकस्तोत्र
( १४ ) संस्कृत हनुमान्माला
( १५ ) येकनाथ कृत चिरंजीवपद. याप्रकरणाचें या ठिकाणीं भागवतसार असें नांव दिलेलें आहे.
( १६ ) जगज्जीवन कृत कौसल्येच्या डोहळ्याची कथा
( १७ ) विठ्ठलकवि कृत सीतास्वयंवर

११८ ] ५ [ १००

पृ. सं. ३६ × २ × २ = १४४. पहिलीं दोन तीन पानें गेलेलीं.

यांत श्रीसमर्थ कृत आत्माराम ग्रन्थ पूर्ण असून सगुणध्यान प्रकरण लिहिण्यास प्रारंभ करून सोडलें आहे.

११९ ] ६ [ १५०

पृ. स. ७८ × २ × २ = ३१२, पैकीं आरंभीचीं ५६ व शेवटची वितकीं च मिळून ११२ पृष्ठें नष्ट !

सुकेश्वर कृत विराटपर्व

१२० ] ७ [ २००

पृ. स. ५९ × २ × २ = २३६, पहिलीं आणि शेवटचीं २८।२८ गहाळ. दुर्दैव !

या बाडांत विष्णुदासनामा कृत ओवीबद्ध हरिश्चंद्र आख्यान असून त्याचा शेवट, असलेल्या पानापैकीं शेवटच्या चार पानाच्या अलिकडे झाला आहे. त्यामुळें या हृदयंगम आख्यानाचा शेवट वाचावयास मिळतो, पण पहिल्या सुमारे १०५ ओव्यास आपण मुकलों आहोंत. एकंदर ओवीसंख्या ८१२ शेवटीं नमूद आहे.

विष्णुदासनामाचें हें प्रकरण पूर्वी कोठें छापलेलें किंवा उपलब्ध असलेलें मला ठाऊक नाहीं.-

# १२१ ] ८ [ १००

पृ. सं. सुमारें १५०. किरकोळ बाड

यांत समर्थ, जयराम, गणेशनाथ, श्याम, वेणी, अमृतराय आणि जनी यांची कविता आहे, गोपीचंद आख्यान आहे.

# १२२ ] ९ [ २००

पृ. सं. ७० × २ × २ = २८०. आरंभींचीं आणि शेवटचीं दोन चार गहाळ

( १ ) यांत श्रीसमर्थ, ज्ञानदेव, मुक्ताई, वामन, कबिर, येकनाथ, जगज्जीवन, केशवराज कवि, रंगनाथ, केशवाचा नामा, कल्याण, वेणाबाई, कल्याणांचे शिवराम, श्याम, कोन्हेरीदास, तुकाराम, माळो, वामन, स्वामीदास, कृष्णदासमुद्गल, इत्यादिकांची कविता आहे.

( २ ) श्रीसमर्थांच्या कवितेपैकीं कांहीं अप्रकाशित अशी हि आहे.

( ३ ) अगदीं आरंभीं कृष्णदासमुद्गलांच्या युद्धकांडाचा १३ वा प्रसंग व शेवटीं १४ वा प्रसंग अशीं आहेत.

( ४ ) भृगु–पुलोमा–च्यवन–कथाभाग, ४७ ओंव्या.

( ५ ) श्याम कृत पावन जन्मा नर आला परि उपाय नाहीं केला ।

( ६ ) येकनाथांचें पद–वेदामाजी ओंकार सार ।

( ७ ) जगज्जीवन कृत संस्कृत स्तोत्र–वंदे राजीवनेत्रं ।

( ८ ) वाल्मीकें शत कोटी रामायेण रचिलें । २० ओव्या

( ९ ) तो चि येक पुरुषार्थी ।

( १० ) क्षीरसिंधु मिळाले आरमचाहा ।

( ११ ) या बाडांत लिहिणारानें आपल्या आवडीप्रमाणें ग्रन्थराज दासबोधांतील अनेक उतारे घेतले आहेत. तसे च इतर हि अनेक ठिकाणचे घेतले आहेत. त्यांतील कांहीं प्रकाशित आणि कांहीं अप्रकाशित असे आहेत. चार उतारे येथें देतों :

[ १ ] प्रतिष्ठेचें भय

वाचस्पतीचेनि पडिपाडें । सर्वज्ञता तरी जोडे
परी नेणिनेमाजी दडे । महिमेभेणें ॥ १

चातुर्य लपवी । महत्व हारवी ।
पिसेपण मिरवी । आवडोनी ॥ २

वरिवरि देह न पुजी । लोकांतें न रंजी ।
स्वधर्म वाग्ध्वजीं । बांधो जी नेणे ॥ ३

परोपकार न बोले । न मिरवी अभ्यासिलें ।
न शके विकूं जोडिलें । ख्यातीसाठीं ॥ ४

### [ २ ] अतिथि

आकस्मात अतीत आलिया समई ।
सोडी काई नये त्याचा ठाई ।
तो हि माझे स्वरूप पाहीं ।
अन्न ते समई समर्पावें ॥ १

अतीत जातां प्राण्मुख ( पराङ्मुख ) ।
त्या सर्वे पुण्य जाये निशेख ( निःशेष )
समई अन्न द्यावें आवश्यक ।
नाहीं तरी उदक तन्हीं द्यावें ॥ २

ब्राह्मण बैसउन पंक्ती ।
जे कोण्ही पंक्तिभेद करिती ।
ते मोलें पाप विकत घेती ।
त्योसी अधोगती निश्चितार्थं ॥ ३

### [ ३ ] मनोनिग्रह

पृथ्वीची करवेल चौघडी । महामेरूची बांधवेल पुडी ।
शून्याची मुरडवेल नरडी । परी या मनाच्या वोढी अनिवार ॥ १

वारा बांधवेल मोटे । समुद्र घोटवेल घोटे ।
अग्नि ग्रासवेल आयचटे । परी मन आत्मनिष्ठे न ये न ये ॥ २

काळ जिंकवेल सर्वथा । त्रिभुवनीं लावेल आपुली सत्ता ।
परी मनोनिग्रहाची वार्ता । तुजविण अच्युता न घडे पैं ॥ ३

### [ ४ ] समाजाचें एक चित्र

संध्यास्नानजपीं विलंब करितो तो भट कामा नये ।
कामें जो परिची करील सकळें तो येक चिपास ये ।

मागेना घट गोड खाउनि शिळें गोठ्यांत रात्रीं निजे ।
जागे चाकरसा भटांत भट हा ऐसा अम्हा पाहिजे ॥ १

घोडें घेउनि मूळ जाउनि घरा छेडी सुना आणितो ।
थाळें खेळवितो सुरासि पुजितो सांजे गुरें बांधितो ।
गाई दोहुनि दूध खाउनि सदा गोठ्यांत रात्रीं निजे ।
जागे चाकरसा भटांत भट हा ऐसा अम्हा पाहिजे ॥ २

( १२ ) कल्याण कृत ध्रुवाख्यान, १४ श्लोक

( १३ ) वेणाबाई कृत कथा रामायणी विचित्र ।

( १४ ) कल्याणशिष्य स्वामींदास कृत रामनाममहात्म्यपर एक पद—
राम राम राम जपा आदरें ।
अक्षरें दोनीं परम सुंदरें ॥ ध्रु०

( १५ ) श्रीरामचंद्र अवतार पूर्ण ब्रह्म हा ।
भक्ताभिमानी दासासि कल्पद्रुम हा ॥ ध्रु०

## १२३ ] १० [ २००

पृष्ठसंख्या ९६ × २ × २ = ३८४, शिवाय आरंभींचीं आणि शेवटचीं पांच पंचवीस पानें गहाळ. कागद जीर्ण झाला आहे. बाड महत्त्वाचें आहे. अक्षर सुंदर आहे. तें कल्याण स्वामींच्या कोणा शिष्याचें असावें.

( १ ) या बाडांत श्रीसमर्थ, जयदेव, वामन चिदानंद, माधवात्मतनय नरहरि, जगजीवन, देवदास, तुकाराम, रंगनाथ निजानंद, हाम्राज्य, कबीर, मानपुरी, अलंदानंद, केशव, अनंत, मध्वनाथ, चिन्मयनंदन, श्याम, उद्धवचिद्धन, वेणी, कृष्णदासमुद्गल, स्वामींदास, येकनाथ, रंगानुज, गोपाळ, शिवदिनकेसरी, काकात्मज, कोकिळ, ज्ञानदेव, विष्णुदास नामा, माळो, शिवराम, कल्याण, सुरदास, येका शिवराम, रामानंद, दत्तात्रय, आनंदतनय, कृष्णदासानंद, इत्यादि ज्ञात आणि अज्ञात सत्पुरुषांची कविता आहे.

कर्पुरगौरा शिव शिव ॥ ध्रु०
× × × ×
पडलों या भवकांतारीं ।
श्रमलों मजलागीं तारीं ।
काकात्मज पार उतारीं ॥ ३

हे काकात्मज पूर्वी कोणी येऊन गेले होते ।

१२५ ] १२ [ १५०

पृ. सं. ३५ × २ × २ = १४० शिवाय दहा पाच गहाळ.

(१) जगज्जीवन कृत

(१) ध्रुवाख्यान–श्लोक ६४

(२) उपमन्यूची कथा–श्लोक ६१

(२) श्रीसमर्थ, जगज्जीवन, अखडानंद यांची किरकोळ पदपदांतरें

१२६ ] १३ [ २२५

नेहमीं प्रमाणें निम्म्या भागापर्यंत च पृष्ठांक दिलेले आहेत. पृष्ठसंख्या ८२ × २ × २ = ३२८, पैकीं दुर्दैवानें पहिलीं वीस पानें व बहुधा तितकीं च शेवटचीं गळून पडून हरवलेलीं आहेत.

बाड काळजीपूर्वक अथपासून इतिपर्यंत सुंदर अक्षरानें लिहिलेलें आहे. हें सबंध बाड रामदासी ग्रन्थमालेंतील तिसऱ्या भागांत आलें आहे. यांत आरंभीं स्फुट प्रकरणें आहेत, तीं ९ व्या पासून आहेत. म्हणजे पहिलीं जीं वीस पृष्ठें हरवलेलीं आहेत, त्यांत पहिलीं ८ स्फु. प्र. गेलीं. नंतर क्रमानें षड्रिपु, पंचीकर्णयोग, चतुर्थमान, मानपंचक, पंचमान व स्फुट श्लोक हीं प्रकरणें आहेत. शेवटच्या पृष्ठाचा शेवट स्फु. श्लो. ५८ × १२१ या श्लोकात झालेला आहे. अर्थात् स्फु. श्लो. चा पुढील भाग हरवलेल्या पृष्ठांत गेला.

बहुतेक प्रकरणें तिसऱ्या भागाशीं ताडून पाहिलीं. कांहीं पाठांतरें लिहून काढलीं. किरकोळ पाठांतरें देत नाहीं, पण ५१ व्या स्फुट प्र. चे ६ च श्लोक तिसऱ्या भागांत आहेत, त्यापुढें आणखी पाच श्लोक या बाडात आहेत. ते मात्र येथें देतों. वाचकांनीं आपआपल्या प्रतींत ते उतरून घ्यावे.

स्नान संध्या सुचि नाहीं देव धर्म असेचिना ।
सत्संग नेटका नाहीं व्यर्थ संसार जातसे ॥ ७
संपत्ति संतति नाहीं वित्पत्ति तों असेचिना ।
काळ सार्थक हि नाहीं व्यर्थ संसार जातसे ॥ ८
जप ध्यान पुजा नाहीं योग संन्यास नाहळे ।
निश्चयो येक हि नाहीं व्यर्थ संसार जातसे ॥ ९

याळत्व नेणतां गेलें तारुण्य सरलें मदें ।
वृधाप्य रोगव्याधीनें व्यर्थ संसार जातसे ॥ १०
स्वहीत करणें नाहीं ऐसे ते आत्मघातकी ।
नेणती दास देवाचे व्यर्थ संसार जातसे ॥ ११

मालेंतील विसरा भाग आपण बाडांक ५१ वरून छापून काढला. त्या बाडांत या प्रकरणाचे ६ च श्लोक असून त्यावर कोणी गुणाकाराचें × चिन्ह करून ते श्लोक सोडून 'पुनरुक्ति' असा शेरा मारला आहे. म्हणून कदाचित् पुढचे म्हणजे वरील पांच श्लोक तेथें लिहिले गेले नसावे. बाडांक ५४ हें ५१ वरून च आहे, त्यांत हि फक्त पहिले सहा च श्लोक आहेत, पुढचे पांच नाहींत. पुनरुक्ति म्हणण्याला हे श्लोक बाडांक ५१ मध्यें पूर्वी कोठें आल्याचें दिसत नाहीं. प्रस्तुतचें १२६ वें बाड ५१ वरून लिहिलें गेलें नाहीं, एवढें खरें.

हीं बाडें महत्त्वाचीं असून प्रेक्षणीय आहेत.

# १२७ ] १४ [ १५०

पृ. सं. ८३ × २ × २ = ३३२. दोन्ही बाजूंचीं कांहीं पृष्ठें गहाळ. हें हि बाड महत्त्वाचें आहे.

( १ ) यांत श्रीसमर्थ, जसवंत, जगजीवन, नामा, तुका, शिवराम, दिगंबर, रंगनाथ निजानंद, सुरदास, श्रीधर, जनार्दनचरण, वामन, केशव, जयराम, कल्याण, प्रल्हाद, सुखानंद, आनंदसुत, अनंत, गोपाळीनंदन, उद्धवचिद्घन, मीराके प्रभु यांची कविता आहे.

( २ ) या हि बाडांत श्रीसमर्थांची कांहीं अप्रकाशित कविता आहे. तसें च सभेच्या व्यतिरिक्त इतरत्र जी श्रीसमर्थांची कविता प्रकाशित झालेली आहे तींत बहुधा अशुद्धें फार आढळतात. त्यामुळें अशी हि कविता प्रसिद्ध करणें सभेला भाग आहे.

कां मुळ्ळासी

कैचें घर कैचें दार । मिथ्या सकळ हा व्यापार ।
अंतीं सोयरा रघुवीर । कां मुळ्ळासी ॥ १
कोणी नव्हेति रे कोणाची । सकळ सांगाति दैवाची ।
धरीं सोये त्या रामाची । कां मुळ्ळासी ॥ २

बहु अवघड आहे घांट । कैसी न कळे उरकेल वाट ।
होईं रघुवीरजीचा भाट । कां भुललासी ॥ ३
फिर माघारें परतोन पाहें । येक धर्म चि होऊनि राहे ।
धन जोडिलें न राहे । कां भुललासी ॥ ४
ऐसी करावी या जोडी । राहे येथें तेथें गोडी ।
सोडी मिथ्या प्रपंचवोढी । कां भुललासी ॥ ५
केव्हां जाइल न कळे स्वास । राहतें घर पडेल वोस ।
ये कुडीचा उपजेल त्रास । कां भुललासी ॥ ६
सावध होई रे या ऐसा । वोढीं जळते घरिंचा वांसा ।
स्मर माझ्या रमाधीशा । कां भुललासी ॥ ७

( ३ ) जगज्जीवन कृत हरिश्चंद्र आख्यान, ओवी १०१
( ४ ) थाळीपाक, ओवी १४१. शेवट :

धर्म म्हणे कृष्णचरणीं । केंची भवभयाची काहाणी ।
अवघे असों समाधानी । चिंता निदानीं नातळे ॥ १३८
अमृतसागरीं परिनळा । त्यास मृत्य फोडून आला ।
तो कुंजरपुष्ठीवरी बैसला । तो श्वानें चाविला नयचे किं ॥ १३९
हस्त ठेउनि पांडवमाथां । अभय दिधलें समस्तां ।
आज्ञा मागोन विश्वकर्ता । जाता जाला संतोषें ॥ १४०
यापरी संपला थालिपाकु । ऐकतां भवभयाचा पंकु ।
नातळे हें कविनायकु । व्यास बोले भारतीं ॥ १४१

( ५ ) श्री शंकराचार्य विरचित शिवपंचाक्षरिकास्तोत्र
( ६ ) प्रल्हाद कृत नमो भक्तजनवत्सला पांडुरंगा ।
( ७ ) या बाडांत कल्याणांची हि बरी च कविता आहे.

१२८ ] १५ [ १५०

पृष्ठसंख्या ६७ × २ × २ = २६८. शिवाय दोन्ही बाजूंनी दहा पांच हरपलेलीं. दोन इंच रुंदीचें व सवा चार इंच लांबीचें हें एक मुठींत मावणारें चिमुकलें बाड आहे. त्यांत हि श्रीसमर्थांची कांहीं अप्रकाशित कविता आहे च.

( १ ) त्यांत श्रीसमर्थ आणि श्रीकल्याण याची घरीं च पदपदांतरें आहेत. शिवाय तुका, केशव, जगज्जीवन, वेणाबाई ( धन्य जिणें० ), सुरदास, अनतसुत ( यांचीं कांहीं कानडी हि पदें आहेत ), मानपुरी, नरहरि, शिवराम, स्वामीदासी, बोधला, पुरुषोत्तम ( कृत कल्याणांची आरती ), उद्धवचिद्धन, श्यामा कल्याण, मध्वनाथ, दत्तात्रि, श्रीधर, माधव विट्ठल, मेरु, इत्यादिकांचीं पदपदांतरें आहेत.

( २ ) श्रीसमर्थांचे शिष्य अनंत मौनी व त्यांचे मेरु. उभयतांच्या समाधी तंजावर जवळ मन्नारगुडीस आहेत. रामसोहळा, भीमोपदेश वगैरे ग्रन्थांचे कर्ते ते हे मेरु. तंजावरच्या सरस्वतीमहालात याची सारी कविता आहे. श्रीसमर्थांच्या तीन तसबिरी काढल्या होत्या त्या यानीं च. त्यांचीं दोन पदें :

[ १ ]

सखया रामाला पाहावें । सखिये स्वस्वरुपीं राहावें ॥ ध्रु०
माइक सांडुनियां परतें । राहुनि गगना हि वरतें ॥ १
प्रेमें कव्यवळियां हृदईं । भेटे प्रतीतिचे ठाईं ॥ २ .
मौनी अनंत गुज बोले । मेरु स्वानंदें डोले ॥ ३

[ २ ]

सत्वर धाउनियां आजि ये । करुणासदये मम माये ॥ ध्रु०
स्वबोधनिर्झरस्तनधारा । लाउनि मम वदनीं सैरा ॥ १
पावोनि भवासिंनें तृप्ती । निजवीं निजांकिं दे सुमती ॥ २
स्वस्वरुपांवर पांघरवीं । निर्भय मेरुशि दे पदवी ॥ ३

( ३ ) श्रीशंकराचार्य विरचित गुर्वष्टकम्—

गुरोरंघ्रिपद्मे मनश्चेन्न दत्तं ।
ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ॥

( ४ ) देव हा नाटकी मोठा गे बाई ये ॥ ध्रु० हें पद कोणाचें ?

( ५ ) श्रीसाम्प्रदायिक विविध विषयांक ५१ यांत जो कल्याण कृत संतमाळा दिलेली आहे ती या च बाडावरून.

१२९ ] १६ [१००

हें सात फुट लांबीचें व सवा पांच इंच रुंदीचें एक चेटाळें आहे. त्यांत पंचीकरण आहे.

## नानाबुवांकडील संग्रह

१३० ] १ [२००

पृ. सं. १८९ × २ = ३७८. शिवाय पृष्ठांक न घातलेलीं शिपटीं चवदा च फाटलेलीं सहा पानें.

( १ ) श्रीसमर्थ कृत सगुणध्यान–पृष्ठें २–८

( २ ) मुक्तेश्वराचे आदि, सभा, वन व विराट पर्वांपैकीं कांहीं कांहीं प्रसंग–पृष्ठें ९–१७६

( ३ ) जगज्जीवन कृत हरिश्चंद्राची कथा-सगळी च पृष्ठें ११६-११९

( ४ ) कृष्ण याज्ञवल्की कृत कथाकल्पतरु–पृष्ठें १७६–१८९ येथपर्यंतचें हें बाड एकाच्या च हातचें आहे. त्यानंतर लागलीच

( ५ ) विदेहस्वामींचें पुढील पद. तें निराळ्या हातचें आहे. पद महत्त्वाचें आहे. ज्यांना त्या काळीं सुद्धां श्रीसमर्थांची प्रतिमा म्हणत त्या कण्हेरी मठाचे अधिपति वासुदेव, त्यांचे विदेहस्वामी हे शिष्य होत. ते मद्रे मठाचे अधिपति झाले होते. श्रीसांप्रदायिक कागदपत्रांच्या द्वितीय खंडांत मद्रे मठांतील कागदपत्रें छापलीं आहेत, त्यांवरून जी माहिती होऊं शकली, त्यापेक्षां या पदांत त्यांच्या विषयीं जास्त माहिती आहे. विदेह आणि विश्वंभर असे दोघे बंधु. त्यांच्या वडिलांचें नांव विनायक. ते काशीस रहात. विश्वंभरांनीं गृहस्थाश्रम केला व विदेह ब्रह्मचारी राहिले. त्यांनीं बद्रिकाश्रमीं अनुष्ठान केलें. तेथें त्यांना साक्षात्कार झाला कीं, दक्षिणप्रांतीं श्रीरामदास आहेत, त्यांनीं कित्येकांचा उद्धार केला आहे, त्यांत वासुदेवांना प्रत्यक्ष श्रीगुरूचा च अधिकार प्राप्त झाला आहे, त्या वासुदेवांना तुम्ही शरण जा, म्हणजे ते तुम्हांस तुमच्या नांवाप्रमाणें यथार्थ च विदेहस्थितीला नेऊन पोंचवितील.

## पद विदेहस्वामीचें

काशीखंडीं येक विनायक तो पंडित ।
विश्वेश्वरध्यानीं रंगला हो अखंडित ।
त्याचे पुत्र दोघे विवेकवैराग्यमंडित ।
विदेह विश्वंभर तो नाना मवांत खंडित ॥ १ ॥

जन्मुनि सार्थक केलें हो ।
भजनीं चित्त भुकेलें हो ॥ ध्रु० ॥

विश्वंभर तो गृहस्थ विदेह ब्रह्मचारी जाला ।
दुस्तर तरणोपाय पुसे भावें पूर्वजाला ।
जनक निरोपी सत्संगें तूं पावसी निजगुजाला ।
जप तप तीर्थे भ्रमतां आळवी श्रीगिरिडव्हजाला ॥ २ ॥

स्वामी मजला तारीं हो ।
भवभयजलधी उतारीं हो ॥ ध्रु० ॥

बद्रिकाश्रम देखोनि डोळां अनुष्ठान मांडिलें ।
अपार साधन साधुनि शरीर अनुतापें दंडिलें ।
दुर्घट जन्मांतरिचें पातक समूळ हि खंडिलें ।
श्रीहरिदर्शन होतां प्रेमें मीतूंपण सांडिलें ॥ ३ ॥

आतां मज उद्धरि का हो ।
झडकरि स्वकरीं धरि का हो ॥ ध्रु० ॥

देवें प्रबोध केला दक्षिणप्रांतीं श्रीरामदास ।
शरणागता ( ला ) गुनि बोधें पाववितो पदास ।
तन्मयस्वरूपीं वासुदेव तो सर्वस्वें उदास ।
सारासारें फेडुनि संशय निरसील भवभेदास ॥ ४ ॥

घालुनि कृपा अंजन हो ।
दाविल नित्य निरंजन हो ॥ ध्रु० ॥

उल्हासोनि पोटीं कृष्णातीरासी पातला ।
सद्गुरु श्रीरामदासां हरुषें नमस्कार घातला ।
धाबुदेवीं विवाद करीतां अनुभवरस चोतला ।
देहीं च पूर्ण विदेही अद्‌भुत नवलाचो वीतला ॥ ५
गुरुची अघटित करणी हो ।
मानस रतलें चरणीं हो ॥ ध्रु० ॥

१३१ ] २ [ २००

पृ. सं. १०१ × २ × २ = ४०४. यांत
( १ ) अनंत कृत श्लोकबद्ध सीतास्वयंवर, गजगौरी, सुधन्वा, मयूरध्वज, अहिमहिचरित्र, हनुमंतकृष्णभेट, अश्वमेध
( २ ) येकनाथ कृत रामायणांतील व भागवतांतील कांहीं प्रकरणें
( ३ ) नामापाठक कृत भरतभेट
( ४ ) कृष्णदासमुद्‌गल कृत उमारमासंवाद व युद्धकांडापैकीं कांहीं प्रसंग
( ५ ) मुक्तेश्वर वनपर्व आणि आदिपर्व यांतील कांहीं प्रसंग
( ६ ) श्रीधर ब्रह्मानंद कृत चंद्रहासचरित्र, कृष्णचरित्र, दिव्य जानकी, बाणासुराची कथा
( ७ ) श्रीसमर्थांचीं थोडीं पदपदांतरें
( ८ ) श्रीगुरु विदेह अमृतेश्वर कृत पारधीकथा
( ९ ) कोनेर गंगाधर कृत कृष्णचरित्र
( १० ) जगज्जीवन कृत रामकथा व पद्मपुराणांतील कांहीं भाग
( ११ ) रंगनाथांचीं कांहीं पदें
( १२ ) शाम शिवरामतनय कृत प्रल्हादचरित्र
अशीं प्रकरणें आहेत. अर्थात् यापैकीं कांहीं प्रकरणें अप्रकाशित आहेत.

१३२ ] ३ [ १५०

पृ. सं. ११२ × २ × २ = ४४८. शिवाय आरंभींची आणि शेवटचीं पांच पन्नास पानें, कांहीं अभंग व कांहीं अर्धवट फाटलेलीं व

कसरीनें खालेलीं आहेत. अनास्थेमुळें या बाडाचे फार हाल झालेले दिसतात. या बाडांत

( १ ) श्रीसमर्थ, हरिकवि, उद्बोध, बस्वलिंग, नवलक्ष लाल, भीघर, कोकिळ, नरहरि, रुक्मण्णापंत, मानुदास, रगोजीबावा ( पुढें रघोजी लिंबाळकर आहेत, ते च हे असावेत ), चिंतामणीसुत मुद्गल, सुरदास, अमृतराव, जगज्जीवन, अनंत, विठारेणुकानंदन, माळो नरहरि, ( असून पुन्हां ) माळोपंत, सीताराघव, शिवराम, आनंदतनय, जयरामात्मज ( जयरामसुतकृत संतमालिका हि आहे ), केशव, शिवदिन केसरी, मृत्यंजय, रमावल्लभ, कृष्णदास ( पुढें कृष्णदास जयराम आहेत, ते च बहुधा हे ), येका शिवराम, रमानंद, जनमैत्रनागोबा, जगन्नाथस्वामी, चोखामेळ, अमरनाथ, गोसावीनंदन, मीराबाई, तुकाराम, नामदेव, येकनाथ, रंगनाथ, आत्यास्वामी, मध्वनाथ, चिन्मयनंदन, नामयाची बहिण आंबाई, जनी, गोणाई, कान्होपात्र, बोठा, नारा, मादा, गोंदा, परिस भागवत, रघोजी लिंबाळकर, नीळकंठ, विष्णुदास नामा, गोन्हा कुंभार, कृष्णदास जयराम, उद्धवचिद्घन, तुलसीदास, कल्याण, वेणाबाई, मुकुंदराज, निवृत्तिदास, ज्ञानदेव, वामन, नारायणस्वामी, या ६७ भगवद्भक्तांची कविता–अभंग, पदपदांतरें, वगैरे–आहे. कोणाचे दहा पांच, कोणाचे पांच पन्नास तर कोणाचे शें दोनशें अभंग वगैरे आहेत. तुकारामांचे १७५ अभंग आहेत, रंगनाथांचीं पन्नास साठ पदें आहेत, त्यांत रामदास चतुराक्षरि मंत्र हें पद आहे, श्रीसमर्थ, केशवस्वामी व जयरामस्वामी यांच्या पदांचा भरणा विशेष आहे. नामदेव आणि विष्णुदास नामा यांच्या अभंगांची सळमिसळ केलेली आहे. कांहीं पंजाबी कवित हि आहे. ज्ञानेश्वरी, दासबोध, भागवत इत्यादि ग्रन्थांतील निवडक उतारे आहेत. दासांचा दास श्रीपती जालासे देव न पाहे जात अजाती। हा नारायणस्वामींचा कटिबंद फार गोड आहे.

( २ ) यांत कितीतरी अप्रकाशित कविता सांपडेल.

( ३ ) मात्र हें बाड व याच्या मागचीं च १३० आणि १३१ हीं बाडें अति अशुद्ध लिहिलेलीं आहेत. त्यामुळें समजून वाचतांना किंवा उतरून घेतांना फार त्रास पडतो.

त्यांत १ ते ४५ ओव्या आहेत, पण त्या उद्धवसुतकृत श्रीचरित्राच्या सत्ताविसाव्या अध्यायांतील ४२ ते ८८ या ओव्या आहेत.

( ४ ) जयदेव भाषित श्रीरामनाममनोरमं भज अमृततत्त्वमयम्।

( ५ ) " शके १७३५ श्रीमुखनाम संवत्सरे मार्गेश्वर वद्य ७ भौमवासरे घटि १८ पळे ५१ सह अष्टमी " ची कोणा बापु मेढे यांच्या कन्येची जन्मपत्रिका

( ६ ) महारुद्रस्वामींच्या आत्माराम गोसावी यांस गेलेल्या दादेगांव मठाच्या बाबतींतील पत्राची नकल

( ७ ) सखाराम दादा संस्थान डोमगांव यांस गोपाळ भगवंत देशमुख प्रांत फडेवलित यांचे कडून दादेगांव मठाच्या बाबतींतील पत्र

( ८ ) किरकोळ

१३५ ] २ [ १५१

पृ. सं. ३९ × २ × २ = १५६

( १ ) श्रीसमर्थ, कल्याण, त्रिजगज्जीवन, वेणी ( मन कां राघवीं भरेना ), श्याम, तुका, रामराज्य कल्याण, राघवचिद्घन, उद्धवचिद्घन, मध्वनाथ, दत्तात्रि आणि दत्तात्रय ( एक च कां निराळे ? ), रंगनाथ, माळो, केशव ( यांचीं सहजिक च यरीं च हिंदुस्थानी पदें असवात ), कबीर, गिरिधर गोविंद, मानपुरी, लतीफ ( राम नाम नौवत बज्याई ॥ ध्रु० ), अनंत, जनी जनार्दन, येका जनार्दन यांचीं पदपदांतरें.

( २ ) क्षात्रधर्म श्रीसमर्थकृत, वाढून पाहण्यास उपयोगी

( ३ ) कण्हेरीमठाचे वासुदेव त्यांचे शिष्य माधव यांचे एक पद आहेः

वाल्मीक तरला रे तरला जन उद्धारिला ॥ ध्रु०
मर मर म्हणतां जप अनुसरला पावन वेगीं जाला ।
विधिसुत नारद येउनि तेथें परोपकार केला ॥ १
कारण भाव तयाला फळला राम चि होऊनि ठेला ।
नसतां राघव तो अवतरला भविष्य सांगोनि गेला ॥ २
ऐसा राघव गातां ध्यातां स्मरतां काम विराला ।
वासुदेवीं माधवदासीं विकल्प दुरावीला ॥ ३

वेद आणि पुराणें पाहिलीं शोधून । त्यांतील अर्थ पूर्ण ठसला मज ।
आणि त्या पाहतां प्रपंचीं तत्वता । सुखाची ते वार्ता दिसेचिना ॥ ३
जितुका हो व्याप तितुका संताप । मोहाचा प्रताप वृद्धिंगत ।
विवेकाचा लेश दृष्टीसी पडेना । वास्तव सीतारमणा शरण झालो ॥ ४
तुझा म्हणवीतो हे चि धरनि चित्ती । मज मंदमती उध्दरावें ।
त्या तों दृढ रामा धरलीसे कास । न सोडी सायास केलीयानें ॥ ५
समर्था उचीत तें चि करावें जी । मी हि आहे राजी रामराया ।
आपुल्या ब्रिदासाठीं दीनासी रक्षावें । अवगुणा नाणावें चित्तामाजी ॥ ६
मी तों केवळ आहे अवगुणाची रासी । परी तुझी दासी म्हणवीतो ।
येणें करूनी + + + + + + जालों । संसारा मुकलो राम म्हणे ॥ ७

भक्तवत्सला दीनबंधु । सोडी उपाधीचा वेधु ।
नाहक भ्रमजळीं बुडतो । लटिका शोक कीं करितो ॥ १
यांतुन पार करावे जी । तळमळितो जीवाजी ।
तुम्हांवाचून नाहीं त्राता । म्हणोनी जालो विनविता ॥ २
माझी प्रार्थना ऐकोनी । कृपा करावी स्वामीनीं ।
दीनबंधु तुमचें नांव । ऐकोनी जडला माझा भाव ॥ ३
आतां विलंब करूं नये । हातीं धरनी लावी सोय ।
दास म्हणवितो तुमचा । मनोभावें काया वाचा ॥ ४
आतां उचित जें स्वामीसी । तें चि करावे राजी दासी ।
रामें निश्चये चि केला । सर्व उपाधी मुकला ॥ ५

महाराजाचे कृपेन । रामा नाहीं हो बंधन ।
सर्व ब्रह्म चि जाणतो । मी हि तैसा चि दिसतो ॥ १
नाहीं संशयाची वार्ता । दृश्य नाहीं चि पाहतां ।
सर्व स्वरूप चि आहे । घनीभूत दिसताहे ॥ २
दिसत न दिसत ऐसा । वृत्तिरहित अनुभव त्यासा ।
माझा मजला हो जाला । रामा प्रसाद फळला ॥ ३

( ३ ) गंगापंडिताची कथा म्हणून कागदांचें एक वेटाळें असून

त्यांत १ ते ४५ ओव्या आहेत, पण त्या उद्धवसुतकृत श्रीचरित्राच्या सत्ताविसाव्या अध्यायांतील ४३ ते ८८ या ओव्या आहेत.

( ४ ) जयदेव माधित श्रीरामनाममनोरमं भज अमृततत्त्वमयम्।

( ५ ) " शके १७३५ श्रीमुखनाम संवत्सरे मार्गेश्वर वद्य ७ भौमवासरे घटि १८ पळे ५१ सह अष्टमी " ची कोणा बापु मेढे यांच्या कन्येची जन्मपत्रिका

( ६ ) महारुद्रस्वामींच्या आत्माराम गोसावी यांस गेलेल्या दादेगांव मठाच्या बाबतींतील पत्राची नकल

( ७ ) सखाराम दादा संस्थान डोमगांव यांस गोपाळ भगवंत देशमुख प्रांत कडेवलित यांचे कडून दादेगांव मठाच्या बाबतींतील पत्र

( ८ ) किरकोळ

१३५ ] २ [ १५०

पृ. सं. ३९ × २ × २ = १५६

( १ ) श्रीसमर्थ, कल्याण, त्रिजगज्जीवन, वेणी ( मन कां राघवीं मरेना ), श्याम, तुका, रामराज्य कल्याण, राघवचिद्धन, उद्धवचिद्धन, मच्छनाथ, दत्ताग्नि आणि दत्तात्रय ( एक च कां निराळे ! ), रंगनाथ, माळो, केशव ( यांचीं साहजिक च बरीं च हिंदुस्थानी पदें असतात ), कबीर, गिरिधर गोविंद, मानपुरी, लतीफ ( राम नाम नौबत बजाई ॥ ध्रु० ), अनंत, जनी जनार्दन, येका जनार्दन यांचीं पदपदांतरें.

( २ ) क्षात्रधर्म श्रीसमर्थकृत, ताडून पाहण्यास उपयोगी

( ३ ) कन्हेरीमठाचे वासुदेव त्यांचे शिष्य माधव यांचे एक पद आहे:

वाल्मीक तरला रे तरला जन उद्धरिला ॥ ध्रु०

मर मर म्हणतां जप अनुसरला पावन वेगीं जाला।
विधिसुत नारद भेटुनि तेथें परोपकार केला ॥ १

कारण भाग्य सभाग्य फळला राम चि होऊनि ठेला।
नसतां राघव तो अवतरला भविष्य सांगोनि गेला ॥ २

ऐसा राघव गातां ध्यातां स्मरतां काम विराला।
वासुदेवीं माधवदासीं विश्रांत दुरावीला ॥ ३

# १३६ ] ३ [ १५०

पृ. सं. २६×२×२= १०४. शिवाय आरंभींची, शेवटची व मधली हि मिळून सुमारें ५०।६० नष्ट.

( १ ) प्रसंग ३४ वा म्हणून ८ च ओव्या, अपूर्ण, पहिली ओवी:—

वैरी थोर अथवा सान । परी यासीं जाणिजे सावधान ।
काळसर्प कां हुताशन । याहस्यां सर्वथा नावरे ॥ १

( २ ) ध्रुवाची कथा, अपूर्ण—पराची कथा सरपथा मोक्ष दावी ।

( ३ ) श्रीसमर्थ, कल्याण, अनंत व जगजीवन यांचीं कांहीं पदपदावर्तें.

# १३७ ] ४ [ १५५

पृष्ठसंख्या ६४ × २ × २ = २५६, शिवाय आ. व शे. एक दोन पृष्ठें हरवलेलीं.

( १ ) या बाडात इतर प्रकरणांशिवाय श्रीसमर्थ, कल्याण, जगजीवन, साम्राज्य, शाम, जनपंडित, दत्त, येका शिवराम, दत्तात्री, वेणी ( कथा रामायणी विचित्र, ओवी ११ ), केशव, श्रीधर ( कृत श्लोक ), ब्रह्मचैतन्य ( नामस्मरणपर २५।३० ओव्या ), अनंत, विठ्ठल, उद्धव, तुकाराम, रंगनाथ, जनजसवंत, जनार्दन, उदयचिद्धन, मच्छनाथ, शिवराम, सखा, गोसावीनंदन, विष्णुदास नामा, राघव, शिवदिन केसरी, कल्याणशिष्य, स्वामीदास ( अष्टपदी उचारा रामा पतितपावना ॥ ) इत्यादिकांचीं पदपदावर्तें वगैरे आहेत.

( २ ) मुख्यतः या बाडाच्या च आधारें सांप्रदायिक विविध विषयांक ५२ यांत सामराज कल्याण व विषयांक ६१ यांत शाम कल्याण यांची ओळख करून देण्यांत आली होती.

( ३ ) राघव म्हणून जे वर नमूद केले आहेत, त्यांचीं या बाडांत पांच पदें आहेत व यापूर्वी हि इतर बाडात त्यांची कविता आली होती. हे राघव म्हणजे कल्याणांचे बंधु शिरगांवमठपति दत्तात्रय, त्यांचे पुत्र होत, असें त्यांच्या एका पदातील उल्लेखावरून दिसतें. तो उल्लेख असाः

स्वामी सज्जनपर्वतनिवासी । तारक ब्रह्म अव्यय सुखरासी ।
सद्गुरुरूपें नमूं दत्तात्रयासी । स्मरणमात्रें वारिलें राघवासी ॥
रा. सं. २१

(४) विष्णु आणि राम यांचा संवाद–ओ. सं. ४०

(५) राम आणि कृष्ण यांचें अवतारचरित्रसाम्य–ओ. सं. ९

(६) कृष्णदाससमुद्गल कृत युद्धकांडांतील प्रसंग ५ वा संपूर्ण व प्रसंग ६ वा अपूर्ण

(७) वेणाबाई कृत श्रीरामगुहसंवाद, ४४ श्लोक

(८) श्रीसमर्थ कृत क्षात्रधर्म

(९) नऊ कडव्याचें एक हिंदुस्थानी पद आहे, तें कोण कृत आहे न कळे. त्याचा शेवट :

नामा अकबर दोनो सहज मीलाया।
उनका झगरा साचो जी ॥

(१०) जयवंत म्हणजे बहुधा श्रीसमर्थ च असावेत. त्यांचें हिंदुस्थानी पद राम राम सीताराम ॥ ध्रु०

(११) रामनाममहिमा–२० ओव्या

पहिली–वाल्मीकें शतकोटी रामायण रचिलें।
तें येका शंकरें चि पाहीलें।
मग तें भाग त्रय केलें।
लोकोपकाराकारणें ॥ १

शेवटची–ऐसें असो शंकरें बोलीलें। तें पार्वतीस अनुभवा आलें।
मग तिनें हि आरंभिलें। दीक्षा चंद्रचूडाची ॥ २०

(१२) शेवटच्या पृष्ठावर शाहुमहाराजाच्या पुण्यतिथीची नोंद आहे ती : " शके १६७० सन ११५९ मार्गेश्वर वद्य ३ प्रीतीया राजा शाहु छत्रपति शिव झाले शुक्र संवत्सर " यात संवत्सराचें नांव बरोबर आहे, तेव्हां १६७० ऐवजीं १६७१ पाहिजे होतें. मराठी साम्राज्याच्या छोट्या बखरींत मिति ११ दिली आहे, ती मात्र चुकलेली दिसते, वद्य तृतीया च बरोबर आहे. इंग्रजी ता. १५।१२।१७४९ येते.

(१३) तीन संस्कृत उतारे व शेवटच्या उताऱ्याचें मराठी रूपांतर अशीं या बाडांत आहेत, तीं देतों :

[ १ ]

राजीवायतलोचनं रघुवरं नीलोत्पलश्यामलम् ।
मंदारस्मितमण्डपे सुरभिते सौवर्णके पुष्पके ।
आसीनं नवरत्नराजखचिते सिंहासने सानुजे ।
सीतालक्ष्मणलोकपालसहितं वन्दे सदा राघवम् ॥ १
कौसल्या जननी पिता दशरथः संलक्षणो लक्ष्मणः ।
शत्रुघ्नो भरतानुजो जनकजा जाया वसिष्ठो गुरुः ।
सुग्रीवश्च बिभीषणः प्रियसखौ मान्यो हनूमान्गुरुः ।
सायोध्या नगरी सुतौ कुशलवौ श्रीरामदासा वयम् ॥ १

[ २ ]

यं प्राहुः शिवनिर्विशेषमनिशं ब्रह्मेति वेदान्तिनः ।
कर्तारं कृतलक्षमाणपटवः सद्युक्तिभिस्तार्किकाः ।
अन्ये स्वाभिमतं वदन्ति बहुधा सांख्याः प्रधानं परम् ।
तस्मै सद्गुरवे तु सन्तु नतयः श्रीरामदासाय मे ॥

[ ३ ]

प्राच्यां सप्तमुनिस्थलं वरनदीं कृष्णामथाग्नेर्दिशि ।
प्रख्यातं शिखरेश्वरं तकहारीरस्थितमल्लद्विपम् ।
नैऋत्यां दिशि तारकेश्वरमहं वन्दे प्रतीच्यां तथा ।
विख्याते तु चिपोळने भृगुकुलाधीशं च रामाभिधम् ॥ १
वायव्यां तु महाबळेश्वरमथोदीच्यां जनक्षेमदं ।
पापघ्नं धरमेरुलिंगममरव्रातैः सदापूजितम् ।
ईशान्यां पर्वतेश्वरं तु पाली सह्यादिशादाभिधेः ।
मध्ये सज्जनपर्वतं भवहरं वन्देष्टतीर्थैर्युतम् ॥ २

[ ४ ]

मध्ये सज्जनपर्वतास भमुनी तीं अष्टतीर्थें करा ।
पूर्वे सप्तमुनीसहीत वरची कृष्णा असे सुंदरा ।
कोणीं तो शिखदेव दक्षिणदिशे पाळीत मार्तंड तो ।
पाहा सावध तारकेश्वर असे नैऋत्य कोणीं च तो ॥ २
आहे पश्चिम तें चिपोळणिं नमा त्या रेणुकानंदना ।
वायव्येस महाबळेश्वर भजा जो नाशितो यातना ।
घ्या तें सादर मे–

( अपूर्ण )

१४२ ] ९ [ २००

पोथी पृ. सं. १८० × २ = ३६०, परंतु पहिलीं २६ व मधलीं कांहीं व शेवटचें, अशीं पत्रें गहाळ.

पार्थसारथी वामन कृत श्रीमद्भगवद्गीतेवरील समश्लोकी टीका. सुंदर अक्षर. बाडानुक्रमांक ११५ ची वाहून पहावी.

१४३ ] १० [ ७५

५० पृष्ठांची पदपदांतरांची एक वही. पहिलीं दहा पानें हरवलेलीं.

हिच्यांत श्रीसमर्थ, कबीर, येकनाथ, सुरदास, मीराबाई, अलख निरंजन, कल्याण, मच्छनाथ, तुलसीदास, तुकाराम, केशव, येका शिवराम, माणिक रुद्रनाथ, जगर्जीवन, अंबो, इत्यादिकांचीं पदपदांतरें वगैरे आहेत.

१४४ ] ११ [ २००

हीं मुळचीं सुटीं ५२ पत्रें असून, त्यांपैकीं जीर्ण होऊन जीं नष्ट झालीं, त्यांऐवजीं नवीन घातलेलीं आहेत. अशा या जीर्णोद्धरित ५२ पत्रांपैकीं १-५, १३, १५-२०, २९-३६, ३८-४५ मिळून २८ पत्रें गहाळ आहेत व २५ शिल्लक आहेत.

हा तपशील अशासाठीं सांगितला कीं, हीं ५२ पत्रें महत्त्वाचीं होतीं.

त्यांत श्रीसमर्थकृत एकदर फक्त २९५ अभंग होते.

१४५ ] १२ [ २००

सुटीं ३ पत्रें.

श्रीसमर्थ कृत दहा आरत्या, त्यांत एक अप्रकाशित

१४६ ] १३ [ १५०

या बाडाचीं मूळचीं पृ. सं. ४१ × २ × २ = १६४ त्यांपैकीं १२० पृष्ठें गहाळ असून फक्त ४४ शिल्लक आहेत.

हें बाड महत्त्वाचें असून त्याचा फार च थोडा भाग शिल्लक राहिला आहे.

त्यांत श्रीसमर्थ कृत पूर्वारंभ या प्रकरणावर टीका होती. पूर्वारंभ प्रकरणाच्या एकदर ओव्या ६०, पैकीं जो भाग शिल्लक उरला आहे, त्यांत १७ ते ३१ या ओव्यावरील टीका आहे.

ही टीका कोणी केलेली आहे, हे समजण्याला बाडाच्या या अवशिष्ट भागांत मार्ग नाहीं.

## केजच्या देसाईसाहेबाकडील संग्रह

# १४७ ] १ [२००

पृ. सं. १५२. संपूर्ण, सुटर बाड.

या बाडांत श्रीसमर्थकृत कांहीं पदें व श्लोक, कल्याणशिष्य स्वामीदास यांचें एक पद व कांहीं संस्कृत सुभाषितें आहेत. शिवाय पुढील प्रकरणें आहेत.

( १ ) कृष्णदासमुद्गल कृत युद्धकांडापैकीं प्रसंग ५ वा, ओव्या १०९

( १ ) श्रीसमर्थ कृत षड्रिपु

( १ ) श्रीसमर्थ कृत पंचीकरणयोग

# १४८ ] २ [१५०

पृष्ठसंख्या १४८ × २ = २९६, पैकीं पहिलीं ५ × २ = १० व शेवटचीं २ × २ = ४ हरवलेलीं; म्हणजे पत्रावर अंक दिलेले ६ ते १४६ पत्रें शिल्लक आहेत.

सभेच्या संग्रहांत प्रेक्षणीय अशीं जीं कांहीं बाडें आहेत, त्यांपैकीं हें एक होय.

या बाडांत फक्त श्रीसमर्थ कृत रामायण आहे. सहाव्या पत्रावर सुंदरकांडाच्या ४६ व्या श्लोकापासून आरंभ झाला आहे तो १४६ व्या पत्रावर युद्धकांडाच्या तेराव्या म्हणजे शेवटच्या शतकाच्या ९५ व्या श्लोकापाशीं शेवट झाला आहे.

पानाच्या प्रत्येक बाजूवर पांच पांच श्लोक आहेत.

एकंदर न असें दिसतें कीं, लेखक प्रथम सुट्या पत्रांवर लिहित आणि शेवटीं तीं पत्रें शिवून बाडें तयार करीत. त्यामुळें केव्हां केव्हां अक्षरें शिवणींत जात.

५१ बाड उपलब्ध नसतें, तर या बाडाचें मोल करतां आलें नसतें.

## १४९ ] ३ [ १५०

पृ. सं. १०५ × २ × २ = ४२०. शिवाय आरंभींचीं १४×२=२८ व शेवटचीं २१×२=४२ हरवलेलीं आहेत.

(१) श्रीसमर्थ, कल्याण, गोरखनाथ, तुकाराम यांचीं पदपदांतरें
(२) थाळीपाक
(३) मुक्तेश्वर कृत आदि, सभा, वन पर्वांतील कांहीं आख्यानें
(४) कृष्णदासमुद्गल कृत युद्धकांडापैकीं ७ वा, ५ वा, वगैरे प्रसंग
(५) वेणाबाईकृत श्रीरामगुहसंवाद, कौल, कथा रामायणी विचित्र
(६) राम आणि कृष्ण यांचें अवतारसाम्य
(७) जगज्जीवन कृत रामकथा, कांहीं कांहीं
(८) विष्णुदास नामा कृत स्वर्गारोहण
(९) श्रीधर ब्रह्मानंद यांचीं बरींच प्रकरणें
(१०) नामा अकबर दोनो मिलाया ।
उनका झगरा साचो जी ॥
(११) मुकुंदराज कृत कृष्णचरित्रपर, हिंदुस्थानी
(१२) उद्धवचिद्धन कृत परिसा भागवत व गोरा कुंभार यांचीं चरित्रें

ऐसे अपार संत वर्णितां संशय सर्व हि जातो ।
आठवलें तें ऐका भावें उद्धवचिद्धन गातो ॥

(१३) वस्वलिंग कृत गजगौरी आख्यान
(१४) दोन स्फुट

[ १ ]

चमत्कारें चि घांवणी

नक्रानें ग्रास दांतीचा । पानेंदीं धरिला वळें ।
तात्काळ सोडिला देवें । चमत्कारें चि धांवणी ॥ १

अरिष्टें निर्मिलीं नाना । पिता पुत्रासि मारवी ।
प्रल्हादाकारणें तेथें । चमत्कारें चि धांवणी ॥ २
कापट्य कौरवीं केलें । पंडुपुत्रासि जिंकिलें ।
द्रुपदीकारणें तेथें । चमत्कारें चि धांवणी ॥ ३
कोपली सापत्न माता । लेंकुरा धिक्कारिलें ।
त्या ध्रुवाकारणें तेथें । चमत्कारें चि धांवणी ॥ ४
दुर्बळा दुग्ध मिळेना । दाखविलें देवाकडे ।
उपमान्याकारणें तेथें । चमत्कारें चि धांवणी ॥ ५

[ २ ]

साधुमहिमा

ज्याचा महिमा अपार । रेडा करी वेदोचार ।
समाधीं होती साक्षात्कार । ज्ञानदेव ते जाणा ॥ १
साधूची अगम्य कोण महिमा । ऐका हो
साधूची अगम्य कोण महिमा ॥ ध्रु०
मौमी मोहोदाव भला । रामें आपण सिद्धी नेला ।
रणछोडी श्रीराम केला । महा मुद्गल द्विजवर्यें ॥ २
प्रतिमादेव पूजूनि योजा । करें जेवबी केशवराजा ।
लिंगाकार दावी पूजा । खेचर विसा यें नामा ॥ ३
नाना मत्सरें फेडिली । कृष्णें शुश्रूषा केली ।
महिमा नवचे अनुमानिली । येकनाथ माउली ॥ ४
जळीं पुस्तकें तारिलीं । अनुमानिक नव्हे बोली ।
मामना ज्याची फांकली । तुकोबा प्रसिद्ध जाणा ॥ ५
ज्याच्या दर्शना उदीत । भीम गर्जे अळा आंत ।
तिष्ठे उपासना धाउदांत । रामदास ते ज्ञानी ॥ ६

१५० ] ४ [ १५०

पृ. सं. ७४ × २ × २ = २९६. पहिलें एक च पृष्ठ व शेवटचीं कांहीं नाहींत. बराचसा भाग उसवलेला आहे. कांहीं उसवलेलीं पृष्ठें डोमगांवीं दुर्गाबाईच्या संग्रहात मिळालीं व बाकी केमक्षा. अर्थात् या सर्वांचें मूळ डोमगांवचा मठ होय, हें उघड होत आहे.

लघुकाव्यांचा भाग काढतांना या बाडाचा उपयोग होईल. यांत श्रीसमर्थकृत पूर्वारंभ, जुनाटपुरुष, अंतर्भाव, आत्माराम, निर्गुणध्यान, पंचीकरण योगांतील ५ वा योग, चतुर्थमानापैकीं १ लें व २ रें मान, पांगुळ ( भरव गा खंडामाजी ), पंचसमासी, सप्तसमासी हीं प्रकरणें व थोडी किरकोळ कविता आहे.

रंगनाथ कृत-रे सज्जना अंतर निववी सांग गोष्टी ।

१५१ ] ५ [ १२५

पृ. सं. ४५ २ × २ = १८०. पहिलीं आणि शेवटचीं पांच पांच पृष्ठें नष्ट.

कृष्णदासमुद्गलकृत रामायणापैकीं ३५, ६२, ७१ असे तीन प्रसंग
श्रीसमर्थ कृत युद्धकांड, सप्त पहिलें, श्लोक ३३ ते ९६
विष्णुदासनामा कृत द्वापारीं श्रीकृष्ण आणि हनुमंत यांच्या भेटीची कथा, ओवी २९५ संपूर्ण
दासबोधांतील अनेक निवडक उतारे
उपमन्युकथा २० श्लोक-करुनि वंदन श्रीगुरुच्या पदा। कोणकृत न कळे
वाल्मीकिचरित्र १९ श्लोक-कोण कृत न कळे
किरकोळ, श्रीसमर्थकृत पदें.

१५२ ] ६ [१२५

पृ. सं. २४ × ४ = ९६ पैकीं दोन्ही बाजूचीं सहा सहा नष्ट.

( १ ) श्रीसमर्थ, शिवराम, जगज्जीवन, स्वामीदास, उद्धवचिद्घन, नारायणात्मज, दासजयराम ( पंढरी येथ्रा वर ), वेणी ( तुझ्या नामावीण मज कंठेना ), गोविंदसुत, केशव, तुका, चिंतामणी ( ध्रुवाख्यान ), नीळकंठसुत, यादव कवि, यांची कांहीं कांहीं पदपदांतरें.

( २ ) उद्धवचिद्घनांचें पद

श्रीरामरस गोड लाग्ला गो ॥ ध्रु० ॥
श्रवणसुरें प्राशन करितां चि । तिन्ही लोक धाला ॥ १
घ्राणसुरें चि सुरें चि सुगाउनि । डोळ भाग्ला हो ॥ २
उद्धवचिद्घन सेवित यावरी । अद्वयकाला गो ॥ ३

( ३ ) नारायणात्मजांचे पद

कैवारी राम दासाचा ॥ ध्रु०

कीर्ति जयाची वर्णन करितां । गर्व गळाला चौसाचा ॥ १

दीन जनातें धन्य कराया । जीवें भावें परिसाचा ॥ २

नारायणात्मजप्रभु गुणसागर । दे पद अक्षै लाभाचा ॥ ३

१५३ ] ७ [ १००

गळांठा. विश्वनाथ अघोरेण लिखितं व्यासप्रोक्तं प्रातःस्मरामि स्तोत्रम्, भवानीदास यांचेवर अष्टक,

त्वमेव मे पितामहः पिता त्वमेव सद्गुरो । त्वमेव मे सुहृत्कुलं त्वमेव वर्णआश्रमः ।
त्वमेव धामभूषणं त्वमेव दैवतं परं । कृपाकटाक्षविभ्रमेण शंकरं विलोकय ॥ ९

हें श्रीसमर्थांवरील अष्टक, घोर हा नको फार कष्टलों । ही गोदावीसुतांची गजाननाची एकवीसश्लोकी प्रार्थना, श्रीधरकृत हनुमंताचा जन्मकाळ, इत्यादि

## दत्तात्रययुवांकडील संग्रह

१५४ ] १ [ १००

शिवसुत मल्कुंद कृत भार्गवचरित्राची पोथी

हे मल्कुंद आणि त्यांचा हा ग्रन्थ आजपर्यंत ऐकून हि ठाऊक नव्हते. दुर्दैव इतकें च कीं, ग्रन्थ अपूर्ण आहे. उपलब्ध असलेले हे १२ अध्याय आहेत. मूळ ग्रन्थाचे आणखी किती अध्याय असावेत हे परमेश्वरास माहित. या ग्रन्थाची प्रत आणखी कोणाकडे किंवा इतर कोठील संग्रहांत असेल काय ? कोणी शोध करील काय ?

या ग्रन्थाच्या प्रतीवरून, लिपीवरून, भाषेवरून हे मल्कुंद किंचित् श्रीसमर्थपूर्वकालीन म्हणजे श्रीएकनाथमहाराजांचे समकालीन असावेत, असा माझा ग्रह झाला आहे. पोथीचा कागद अगदीं जीर्ण झाला आहे. जपून वापरावा लागत आहे.

उपलब्ध १२ अध्यायांत ग्रन्थकाराविषयीं नांवापलीकडे जास्त माहिती आढळत नाहीं. पहिल्या मंगळाचरणाच्या अध्यायांत सद्गुरुवंदन आहे, पण तें सर्वसामान्य आहे, त्यांत सद्गुरूंचें नांव सांगितलेलें नाहीं. १२ व्या अध्यायाचा शेवट असा आहे :

सैन्य सेनानी प्रधान वीर । रणीं पडले जाणोनि समग्र ।
अर्जुनाचे बंधु कुमर । येती सत्वर युध्यासी ॥ १७६
ते कथा रणरंगपावन । पुढें प्रसंगीं करूं श्रवण ।
तरी श्रोतीं धावें अवधान । ह्मणे सीवनंदन मच्कुंद ॥ १७७
इति श्री भार्गवचरित्रे स्कंदपुराणे प्रचंडचंडप्रधानवधो नाम द्विशितो प्रसंगः

या पोथीचीं बरीचशीं पानें कागदाला कागद डकवून तयार केलेलीं आहेत. या कागदांच्या डकवलेल्या बाजूस कोठें फारशी मजकूर तर कोठें गांवचे जमाखर्च आहेत. हा फारशी मजकूर तज्ज्ञाकडून केव्हां तरी वाचून घेतला पाहिजे व जमाखर्च बारकाईनें पाहिला पाहिजे. तेव्हां पुढें मागें या पोथीकडे पुन्हां अगत्य वळलें पाहिजे.

१५५ ] २ [ २००

एका तत्कालीन महत्त्वाच्या बाडाचीं विस्कळित झालेलीं सुटीं ५५ पृष्ठें.

कागद अति जीर्ण झाला आहे. अक्षर मोठें आणि सुंदर आहे.

यांत श्रीसमर्थांचीं पदपदांतरें आहेत, मायार्थरामायणाचा कांहीं भाग आहे, कल्याणांची थोडी कविता आहे व श्रीधर आणि कोकिळ यांचें एकाददुसरें पद आहे.

१५६ ] ३ [ १७५

पृ. सं. ४४×४ = १७६, शिवाय आरंभींचीं आणि शेवटचीं निदान सहा सहा पृष्ठें गहाळ. बाड महत्त्वाचें.

( १ ) अगदीं आरंभीं कल्याणशिष्य पुरुषोत्तम कृत भरतगीत आहे. याच्या एकंदर ओव्या १७६ आहेत, परंतु पहिल्या सहा पृष्ठांत १०७ ओव्या गेल्या, त्यांना आपण मुतें सरी मुकत आहोंत. हें गीत अवश्य छापलें गेलें पाहिजे. त्यांत भक्तिरस ओतप्रोत भरलेला आहे. अति प्रेमळ काव्य आहे. नेत्र सजल झाल्यावांचून हें क्वचित् च कोणाला वाचवेल. केवढें दुर्दैव कीं, आरंभींच्या १०७ ओव्या नसाव्यात. कांहीं ओव्या सादर करण्याचा विचार

होता, परंतु मोह आवरतो, कारण उपलब्ध आहेत त्या सर्व च ओव्या अवश्य प्रकाशित व्हाव्या.

( २ ) जगज्जीवन कृत रामायणांतील ५२ श्लोक, उपमन्यु आख्यान ६४ श्लोक व कांहीं पदपदार्ते

( ३ ) राघव कृत ध्रुवचरित्र ( ४ ) मुक्तेश्वर कृत थालीपाक

( ५ ) कल्याणांचे काहीं श्लोक

जनीं तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी ॥ ६ श्लोक
नव्हे तो चि तो शिष्य मोक्षाधिकारी ॥ ५ श्लोक

( ६ ) दत्तात्री यांचीं दोन पदें. डोमगावच्या दप्तरात या दत्तात्रींची कविता मधून मधून आढळते, ते दत्तात्री कोण? कल्याणाचे बंधु दत्तात्रय तर नव्हत ? त्यांचा परिचय व्हावा म्हणून एक पद देतों:

जाणावा तो गे तो चि येक धन्य साधु ॥ ध्रु० ॥
पूर्ण ज्ञाता समाधानी । दृश्य मिथ्या हें जाणोनी ।
कर्म उपासना मनीं राखे क्रिया आदरें ॥ १
स्थूल सूक्ष्म कारण पिंड ब्रह्मांड शोधून ।
साक्षी वेगळा आपण सोहंभावें जो तुरे ॥ २
सर्वसंगपरित्यागी महानुभाव महायोगी ।
ऐसा कुंज बयालाणीं आंगीं नाहीं विशेष ॥ ३
वैरागी तो उदासीन विशेष नैराशता जाण ।
ढोलंगता हें वमन जेणें मानिलें साचें ॥ ४
शांती क्षमा आणि दया सर्वभूतीं उपजे जया ।
जैसे बोल तैसी क्रिया निश्चयंत चळेना ॥ ५
काम क्रोध मद मत्सर दंभ प्रपंचविस्तार ।
जेथें होती निर्विकार । सारासार स्वरूपीं ॥ ६
पतीतपावन तो साचा । निगमा पार न कळे ज्याचा ।
म्हणे दत्तात्री तयाचा संग करी निसंग ॥ ७

( ७ ) पडते पाळीचा प्रश्न-४९ प्रश्नोत्तरें, बोलते पालीचा प्रश्न, चढते पालीचा प्रश्न, माळुकेचा प्रश्न, शिंकेचा प्रश्न, अंकावर दाणा ठेवून प्रश्न पाहण्याची रीत, निरनिराळीं यंत्रें, इत्यादि माळीमताचा भाग

( ८ ) कृष्णदास कृत कामवेरी

(९) श्रीवेणाबाई कृत रामगुहकसंवाद म्हणजे च श्रीनावेचे श्लोक ४४

(१०) केशवांचीं कांहीं पदें—हें भाडियाचें घर नेणती थोर थोर ॥

(११) याशिवाय श्रीसमर्थ, एकनाथ, मानपुरी, श्याम, कबीर, नामयाची जनी, इत्यादिकांचीं पदपदांतरें.

१५७ ] ४ [ १००

गळांठा–(१) डोमगांवच्या मठाची कैफियत, (२) दासबोधाचें मुखवस्त्र–अपूर्ण, (३) दोन जुने–पैकीं एक १६२५ तील–महजर किरकोळ बाबींसंबंधानें, (४) जगज्जीवन कृत रावणमृत्युकथा–अपूर्ण, (५) श्रीसमर्थकृत रामायणाचीं कांहीं पत्रें, (६) अमृतरायकृत भीष्मप्रतिज्ञेचें हिंदुस्थानी पद, (७) डोमगांवमठांतील वंशावळ, (८) श्रीसमर्थ-चरित्राचें टांचण, (९) कांहीं पदांची सूची, (१०) बायाजींच्या कारकीर्दींतील बराचसा पत्रव्यवहार, (११) किरकोळ, (१२) पुढील नोंदीचा एक कागद :

शाकेऽनलर्थ्येदिधभूगे (?) विरोधकृतिवत्सरे।
सहसः शुक्लसप्तम्यां ग्रंथः पूर्तिमगादयं ॥ १
मुकुंदराजौपनिषत्सिंधुनिर्मंथनोध्दृतं ।
भक्तैकजीवनं ह्येतद्रसदापरमामृतम् ॥ २

## निंबराजबुवांकडील पोथा

१५८ ] १ [ १३५

पोथा. ही पोथी प्रचंड आकाराची असल्यामुळें पोथा या नांवानें डोमगांवीं तिची प्रसिद्धी होती. या पोथीचा कागद २०½ इंच लांब व ८½ इंच रुंद असा आहे. पोथीची जाडी २¾ इंच आहे. सभेच्या संग्रहीं ज्या कांहीं प्रेक्षणीय अपूर्व अशा वस्तु आहेत, त्यापैकीं हा पोथा ही एक वस्तु होय.

" श्रीरामदासांचे समग्र ग्रन्थ " छापून काढण्यांत आजच्या प्रकाशकांची जी बुद्धि असते, ती च बुद्धि त्या काळीं कित्येक सांप्रदायिकांत वाव

करीत होती. त्यांना हि वाटे कीं, आपल्या संग्रहीं श्रीसमर्थांचें सारें वाङ्मय असावें. प्रस्तुतचा पोथा हें त्या बुद्धीचें फळ होय. जेवढीं म्हणून श्रीसमर्थांचीं प्रकरणें लेखकाला मिळवितां आलीं तेवढ्याचा त्यानें या पोथ्यांत समावेश केला आहे. या पोथ्यांत काय काय आहे, हें इतक्यांत च सांगतों, म्हणजे त्यावरून या पोथ्याचें महत्त्व वाचकांना कळून येईल. मध्यें च एका ठिकाणीं लेखकानें आपलें नांव व लेखनकाळ हीं दिलीं आहेत : " हस्ताक्षर वेंकाजी नारायण संगमहाळी वस्ती धेन पंढरी शके १७१९ पिंगार्थी नाम संवत्सरे फाल्गुण वद्य षष्ठी रविवार प्रथम प्रहरे समाप्त ". माझी समजूत अशी आहे कीं, १७१९ त डोमगांवी मठांत श्रीसमर्थांच्या कवितेचा यापेक्षां जास्त संग्रह नसावा. अक्षर सुंदर आहे. मधून मधून कोठें निराळें अक्षर आलें आहे. लिहितांना कागदाच्या डाव्या उजव्या बाजूस १३ इंच व वर आणि खालीं १$\frac{१}{६}$ इंच समास सोडलेला आहे. लेखकाला किती श्रम पडले असतील! आज इतके श्रम करण्याचें सहसा कोणास धैर्य होणार नाहीं. निष्ठेवाचून कोण इतके श्रम घेईल!

पोथ्यांत क्रमशः पुढील ग्रन्थ आणि प्रकरणें आहेत:

( १ ) ग्रन्थराज दासबोध. यांत दशकाचीं नावें दिलेलीं नाहींत.

२-१-१६ तील सप्त व्यसनाच्या बाजूला समासांत

द्यूतं च मांसं च सुरा च वेश्या । पापर्द्धिचोरपरदारसेवा ।
एतानि सप्तव्यसनानि हंत । घोरातिघोरान् नरकान् नयंति ॥

असा श्लोक दिला आहे.

द. ९ × १० चे शेवटीं :

" श्रीरामसमर्थ श्रीहनुमंत श्रीरामदासस्वामी । श्रीकल्याणस्वामी श्रीमुद्गलस्वामी । श्रीभिमराजस्वामी ॥ ५ ॥ रामं वातात्मजं वीरं । रामदासं तथैव च । कल्याणं मुद्गलं भीमं । पंडितान् प्रणमाम्यहम् ॥ १ ॥ बुद्धिर्बलं यशोधैर्यं निर्भयत्वमारोग्यता । अजाड्यं वाक्पटुत्वं च । हनुमत्स्मरणाद्भवे ॥ १ ॥ "

असा मजकूर आहे.

द. १५ × ६ च्या पृष्ठावर समासांत ' पीतापासून कृष्ण जालें ' याच्या समोर ' अग्नीपासून काजळ जालें,' ' महीसुत ' समोर ' वरू ' व ' श्वेतास्वेतास ' याच्या समोर ' वरु श्वेत कागद श्वेत,' अशा टिपा लिहिलेल्या आहेत. ' चौदा पीढ्याचे पवाडे ' यावर समासांत टीप आहे ती अशी : ' चौदा पीढ्या–१ निर्गुण २ मुळमाया ३ गुणमाया ४ सत्वगुण ५ रजोगुण ६ तमोगुण

७ व्योम ८ वायो ९ आग्नी १० आप ११ पृथ्वी १२ औषधी १३ आंन १४ रेत–१४ व यय ( एव ) पुरुषः '. हा परंपरेने आलेला अर्थ महत्त्वाचा आहे.

द. २०×५ च्या समासांत टीप आहे ती अशी: ' १ निर्गुण निर्विकारी–१ मुळमाया संकल्परूप २ चैतन्य ३ गुणसाम्य ४ अर्धनारीनटेश्वर ५ प्रकृती-पुरुष ६ शिवशक्ती ७ महत्तत्त्व ८ अर्धमात्रा शुद्धसत्वगुण गुणक्षोभिणी ९ सत्त्वगुण १० रजोगुण ११ तमोगुण १२ मन १३ माया १४ अंतरात्मा जीव–१४ चौदागोनर्शी मुळमाया '.

विसाव्या दशकाच्या अगदीं शेवटीं निराळ्या हस्ताक्षराची एक ओवी आहे ती अशी :

> एसीं आत्ममाया प्रगटली । ते अलक्षतेंवे स्वयें नटली ।
> तेणें आत्ममाया उवटली । सोहंशब्दें चावळलीं संतोषरूपें ॥ १ ॥

( २ ) रामायण. सुंदरकांडाचें एक पत्र व युद्धकांडाची मर्यादा सर्वे. शेवटीं या ठिकाणीं लेखकानें आपलें नांव व लेखनाचा शक लिहिला आहे.

( ३ ) अभंग ललिताचे ३००

( ४ ) आरत्या २० ( ५ ) भूपाळ्या

नंतर या ठिकाणीं २९ ते ३४ अशीं पांच पृष्ठें इतरांनीं केलेल्या आरत्या वगैरे आहेत त्या अशा : पुरुषोत्तमकृत कल्याणांची आरती, श्यामकृत मुद्गलांची, भीमांची, कल्याणकृत दासबोधाची, समर्थांची व वेदमूर्तीची, मारुतीची, कल्याणस्वामीदासीकृत वनशंकरीची, कल्याणकृत तुळशीवृंदावनाची, शिवकृत कल्याणांची, नंतर ज्ञानेश्वरांचें एक पद, हिंदुस्थानी कांहीं पदें व कल्याण आणि शिवक यांनीं केलेल्या भूपाळ्या.

नंतर पुढील प्रकरणांना आरंभ करण्यापूर्वी सहज एक च शिक्का सहा वेळा उमटविलेला आहे. डोमगांव मठाचा तो अधिकृत शिक्का असावा, असें मला वाटतें. तो शिक्का असा :



नंतर पुढील ३२ प्रकरणें–पूर्वारंभापासून तों कृपाळुपणाची मूस पर्यंत–फुट या उदराखालीं दिलीं आहेत.

( ६ ) पूर्वारंभ, ( ७ ) जुनाट पुरुष, ( ८ ) अंतर्भाव, ( ९ ) आत्माराम, ( १० ) पंचसमासी, ( ११ ) सप्तसमासी, पृष्ठ चवदावें, सप्तसमासीच्या प्रत्येक समासाच्या शेवटीं ' इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे .. ' असें आहे, ( १२ ) सगुणध्यान पृ. १९, ( १३ ) निर्गुणध्यान पृ. २२, ( १४ ) मानसपूजा पृ. २६, ( १५ ) फुट समासी–अनित्य अविवेकी अन्याई । ओव्या ७०, पृ. ३० वें, ( १६ ) ऐका दृष्टांचा प्रसंग । दोन समास, प्रत्येकीं १२–१२ ओव्या, ( १७ ) परंतु येकवचनी देव येक पृ. ३३, ( १८ ) मूळमाया षड्गुणेश्वर, ओव्या ८, ( १९ ) देहात्मयोग, ओ. २५, ( २० ) प्रसंग निघाला स्वभावें । ओ. २८, पृ. ३४, ( २१ ) यादी इमारतीकारणें । ओ. २६, ( २२ ) जळ स्थळ काष्ठ पाषाण । ओ. ११, ( २३ ) येका शब्दें, ओ. ४, ( २४ ) पंचाननाचा पडानन्नु । ओ. ५, ( २५ ) येथायोग्य घालावें वय । ओ. १२ , ( २६ ) ऐका प्रपंचविचार। ओ. ४१

( २७ ) सुचित करून अंतःकर्ण । ओ. ३३, पृ. ३७
( २८ ) नमो मंगळमूर्ति विघ्नहरु । ओ. २० पृ. ३७
( २९ ) अल्पस्वल्प संसारधर्म । ओ. २० पृ. ३८
( ३० ) अखंड सावधान असावें । ओ. २१
( ३१ ) सकळ तीर्थांचें सार । ओ. ९, पृ. ३९
( ३२ ) सकळ तीर्थांचें माहेर । ओ. १०
( ३३ ) सकळ गुणाची निधी । ओ. ११
( ३४ ) सकळ तीर्थांची फलश्रुति ।, ओ. ३५, यांत च जनस्थान गोदातटीं । ओव्या आहेत. पृ. ४०
( ३५ ) निश्चयाचा महामेरु । ओ. १५
( ३६ ) कोणाचा भरवसा न धराचा । ओ. १२
( ३७ ) कृपाळुपणाची मूस । जें प्रकरण ६४ व्या बाडांकांत दिलें आहे तें. नंतर

( ३८ ) ओव्याशतकें चवदा व ज्यांना आपण रामदासी मालेच्या तिसऱ्या मार्गात ( ३९ ) स्फुट ओव्या म्हटल्या आहेत, त्या

(४०) स्फुट श्लोक, ज्यांचे आपण मालेंत करुणाष्टकें वगैरे म्हणून स्वतंत्र पुस्तक छापलें आहे ते. तें पुस्तक पहावें. तें आपण बाडांक ५१ वरून छापलें होतें. १३४ व्या करुणाष्टकानंतर त्या बाडांत (४१) मनाचे श्लोक आहेत, तसे च ते या पोथ्यांत हि त्या च ठिकाणीं आहेत.

(४२) श्रीरामदासग्रन्थ–येकवीससमासी त्याला च म्हणतात. ह्या प्रकरणाची जुन्यांत जुनी प्रत मिळावी, म्हणून फार तळमळ वाटते. अति महत्त्वाचें प्रकरण आहे. जुना दासबोध म्हणून च हें पुढें नामाभिधान पावलें. हें इतरत्र लोकांनीं छापलें आहे, पण अति अशुद्ध, अगदीं उलथापालथ करून छापलेलें आहे. या प्रकरणाच्या शेवटीं पोथ्यांत पांच ओव्या आहेत. ज्ञानेश्वरींच्या शेवटीं नाथमहाराजांच्या जशा ओव्या आहेत, तशा च एकवीस-समासीच्या शेवटीं अमृतेश्वरांनीं पांच ओव्या लिहिल्या आहेत. श्रीसमर्थ, त्यांचे शिष्य कण्हेरीमठपति वासुदेवस्वामी, त्यांचे शिष्य मर्डेमठपति विदेहस्वामी व त्या विदेहांचे हे अमृतेश्वर शिष्य होत. त्यांनीं १६९२ त समाधी घेतली. महान् अधिकारी होते.

इति श्री रामदास म्हणे । या समासीच्या निरूपणें ।
अति सूक्ष्म खूण बाणे । समाधानाची ॥ ६५ ॥ समास २१ ॥

असा श्रीसमर्थांनीं येकवीस समासीचा शेवट केलेला आहे. त्यानंतर अमृतेश्वर पांच ओव्या लिहितात, त्या अशा :

ग्रन्था नाम श्रीरामदास । अवघे समास येकवीस ।
धरुनि श्रीरामाची कास । वैराग्यज्ञान कथिलें ॥ १
तुटोनि संदेहाचे मूळ । होय स्थिर बुद्धि प्रांजळ ।
मनन केलिया करतळाकमळ । अर्थ होय ॥ २
तीव्र वैराग्य तीव्र ज्ञान । तीव्र प्रबोध समाधान ।
उपासना ब्रह्म सनातन । ऐक्यता असे ॥ ३
जव जव अर्थ पाहणें घडे । महाबोधाचें भांडार उघडे ।
सूक्ष्म समाधान जोडे । येकायेकीं ॥ ४
श्रीगुरुविदेहअमृतेश्वर । रामदासग्रंथीं समाधि स्थिर ।
अखंड तन्मयता निरंतर । ध्यानसंग्रह ॥ ५

त्यानंतर अष्टाक्षरी या सदराखालीं पुढील प्रकरणें दिलेलीं आहेत :

(४३) षाड्रिपु, (४४) पंचीकर्णयोग,

( ४५ ) चतुर्थमान, ( ४६ ) मानपंचक,
(.४७ ) पंचमान, यानंतर विसऱ्या भागांत ज्यांना आपण ( ४८ ) स्फुट प्रकरणें असें नांव दिलें आहे, तीं प्रकरणें व नंतर ज्यांना ( ४९ ) स्फुट श्लोक म्हणून म्हटलें आहे ते श्लोक, आपल्या तिसऱ्या भागाचा शेवट

शुके घडु घडी घडी । असी कसी महंतडी ।
प्रसंगमान जाणवे । मयोरनृत्य होतसे ॥ १

या श्लोकानें झाला आहे. त्याचे पुढें पोथ्यांत आणखी पांच श्लोक आहेत, ते:

मुगुटी हिरे झळाळ । भृगुटी विशाळ भाळ ।
गोमटी सुढाळ माळ । रत्नकीळ फांकती ॥ २

सर्व हि भूपाळपाळ । छेदुनि विषम ताळ ।
मारुति कपी विशाळ । लोकपाळ रक्षिले ॥ ३

राम तो कृतांत काळ । सोडिले रिपु कराळ ।
फोडिलें कठोर भाळ । बाणजाळ टाकुनी ॥ ४

उठिले कपी चळाळ । भीडती रणीं हळाळ ।
लोटले नदीखळाळ । रक्तगाळ दाटले ॥ ५

सोडितां विकट जाळ । जाहले त्रिकुट काळ ।
तोडिलें रिपुसिसाळ । बंदिशाळ फोडिली ॥ ६

आणि शेवटीं

( ५० ) भीमरूपी महारुद्रा । हें स्तोत्र देऊन हा प्रचंड पोथा समाप्त करण्यांत आला आहे.

असें या पोथ्याचें स्वरूप आहे. या पोथ्यांत फक्त पदपदांतरें आलीं नाहींत, बाकीचा बहुतेक श्रीसमर्थांच्या कवितेचा समुद्र त्यांत सामावला आहे. ६७५ पृष्ठांचा सबंध अन्यराज दासबोध, ५०० पृष्ठाचा सबंध तिसरा भाग, १८६ पृष्ठांची करुणाष्टकें, मनाचे श्लोक व श्रीसमर्थकृत लघु काव्यांचा जो अकरावा भाग आपणांस काढावयाचा आहे तो, असे सर्व ग्रन्थ मिळून हा पोथा यारला आहे. श्रीसमर्थांच्या लघु काव्यांचा अकरावा भाग न काढतां आम्ही पुढचे भाग काढीत राहिलों, याचें कित्येक वाचक आश्चर्य करीत, कोणी रागावत, आम्ही मरण्यापूर्वी तरी तीं काव्यें आमच्या नजरेस पडतील काय, म्हणून कोणी काकुळतीस येऊन पण प्रच्छन्न रागानें पत्रद्वारें विचारणा करावी ! असें होण्याचें कारण आतां वाचकांच्या हृदयांत येऊन त्यांचा राग कांहीं कमी होईल, असा भरंवसा आहे. सर्व उपलब्ध

संग्रहाचें आलोडन होऊन तो भाग निघावा, असा आमचा मनोदय. ती वेळ आतां जवळ येत आहे. गेल्या २८–३० वर्षांत झालेल्या संशोधनाची ही हकिकत संपतां च तो लघु काव्यांचा भाग छापण्यास सुरवात होईल.

येथें डोमगांवमठांतील संग्रहाचें टांचण पुरें होत आहे. पुन्हां चार महिन्यांनीं म्हणजे १८२६ च्या वैशाखांत डोमगांवीं जाऊन पूर्वी आणलेल्या ग्रन्थराजाच्या प्रतीवरून आम्ही जी नकल केली होती, ती मूळ प्रतीशीं ताडून पाहिली. त्या खेपेस आमच्या बरोबर कै. गोविंद काशीनाथ चांदोरकर व रा. रा. लक्ष्मणराव पांगारकर होते. त्रिवर्गांनीं दशक वांटून घेऊन ते मूळ प्रतीशीं चरण आणि चरण ताडून पाहिले. नंतर त्याबरहुकुम ग्रन्थराजाची पहिली आवृत्ति सभेनें छापून काढली. त्यावर पुन्हां एकदा तिसरी आवृत्ति काढण्यापूर्वी वीसचे वीस दशक आम्ही एकट्यानें च मूळ प्रतीशीं ताडून पाहिले; असो. याप्रमाणें १८२६ च्या वैशाखांत डोमगांवीं कांहीं दिवस राहून तेथून पुढें वैशाख वद्य १ स

## जगज्जीवन ऊर्फ जगन्नाथ

यांच्या सडवळे येथील मठांत गेलों. हे जगज्जीवन ऊर्फ जगन्नाथ-स्वामी कल्याणमहाराजांचे एक प्रमुख शिष्य होत. डोमगांवमठांतील संग्रह पहात असतां च वाचकांना त्यांचा थोडा परिचय झालेला आहे. आतां प्रत्यक्ष त्यांच्या च मठांतील संग्रह आणि खुद्द त्यांची च कविता पहावयाची आहे. कल्याणमहाराजांच्या शिष्यमंडळींत जगन्नाथस्वामींच्या इतकी काव्यरचना दुसऱ्या कोणाची नाहीं. ते विद्वान् होते व त्यांच्या मठांत संग्रह हि विपुल होता. चमत्कार मात्र असा कीं, त्यांची कांहीं च कविता आजपर्यंत छापून निघाली नाहीं. सभेच्या दासबोधाच्या शेवटीं श्रीसमर्थांचा जो धांवा दिला आहे, तो यांचा च होय. त्यांची पुण्यतिथी पौष वद्य २ ही हि चार दिवसांवर आली आहे आणि त्या च वेळीं त्यांचा संग्रह पाहण्याची संधी आपणांस लाभत आहे, हा योगायोग म्हणावयाचा. त्यांचा समाधीकाल १६७० पौष व. २. त्यांची समाधी हि सडवळ्यास च आहे. ते श्रेष्ठ प्रतीचे गुरुभक्त होते. त्यांतला एक अंश आपल्यांत उतरेल तर आपण स्वतःस धन्य समजूं.

त्यांची परंपरा अशी:–श्रीकल्याण–जगन्नाथ–गजानन, पुण्यतिथी, चैत्र शु. ५–रंगनाथ ऊर्फ तात्याबा, पु. आश्विन व. २–रघुनाथ, पु

मार्गशीर्ष शु. १३–सखाराम, पु. आश्विन शु. ५–दत्तात्रय. आम्ही गेलों होतों, तेव्हां दत्तात्रय विद्यमान होते, पण ते हि समाधिस्थ झाल्याचें समजतें. परंपरा ब्रह्मचारियांची आहे. मठाला उत्पन्न वरावरी दोन हजाराचें आहे.

## तडवळे मठांतील संग्रह

**१५९ ]** १ [ १७५

या बाडाची पृष्ठसंख्या आपल्या दासबोधाएवढ्या आकाराची १९५ × २ = ७९० आहे. शिवाय दोन्ही बाजूंची शेंदोंडचें पृष्ठें नष्ट झालेलीं दिसतात. यावरून हें बाड केवढें ग्रंथ आहे, याची कल्पना होईल. हें बाड कोणाच्या हातचें आहे, तें समजण्याला साधन नाहीं.

( १ ) या बाडांत एकंदर अठावीस प्रकरणें आहेत, त्यांत २१ प्रकरणें एकट्या जगन्नाथांचीं आहेत. त्यांचीं नावें व प्रत्येकाची ग्रन्थसंख्या पुढें देतों. प्रत्येक प्रकरणाचा बाडांतील ज्या पाठपोट पृष्ठांकावर आरंभ झाला आहे, तो पृष्ठांक आधीं देत आहे. म्हणजे पहिला अंक पाठपोट पृष्ठाचा, पुढें नांव आणि नंतर ग्रन्थसंख्या, असा क्रम आहे. हीं सारीं प्रकरणें अप्रकाशित आहेत. एकंदर ग्रन्थसंख्या २३६९ होत आहे. एवढी सारी कविता आणखी कैक वर्षें अप्रकाशित राहिली, तरी महाराष्ट्रास त्याचें काहीं सुखदुःख नाहीं ना ?

२ मोरेश्वर आख्यान ६० ; ११ खंडेरायाची आदी १२० ;
२५ रामायण बालकांड १८२ ;
५० पेटीची कथा ५० ; ५८ रामेश्वराची कथा १३३ ;
७४ जटायु उद्धार १६० ; ९२ सीतात्रिजटासंवाद ९४ ;
१०३ हरिश्चंद्र आख्यान २०३ ; १२४ कथा गोह्काची ९८ ;
१३६ जयेद्रथवधकथा ९३ ; १४५ हयग्रीवकथा ९२ ;
१५१ मीमें ऋषि आणिला ते कथा ११५ ;
१६३ जांबुळ आख्यान ७० ;
१७२ कथा सात्रजाची ९४ ; १८१ आदी मंदोदरीची १५४ ;
१९७ उपमान्याख्यान ६१ ; २०४ अश्वमेध कथा ३२७ ;
२२८ श्रीपादश्वानसंवाद ९२ ; २३९ सेतुबंध ६६ ;

३४५ दशरथकैकै आदिकथा ८० ; ३५३ रामकथा ६५;

(२) जगन्नाथांच्या या प्रकरणांचा एक विशेष असा आहे कीं, तें बहुतेक प्रकरणांत अनेक वृत्तांचे श्लोक, ओव्या, पदें यांचा उपयोग करीत असतात. कीर्तनकारांना हीं सारीं प्रकरणें उपयोगी पडण्यासारखीं आहेत.

(३) उरलेल्या सात प्रकरणांपैकीं ३ प्रकरणें कोण कृत आहेत, हें कळत नाहीं, पण तीं हि बहुधा जगन्नाथकृत असावींत, असें मला वाटतें. तीं अशीं :

पृ. २७२ वस्त्राहरण, ग्रंथसंख्या २५१. या प्रकरणाचा विषय आधीं अंतःकरणरसात्मक आहे, त्यांत तो कवीनें प्रेमभरानें वर्णिला आहे. त्या ओव्या येथें देत नाहीं, दुसऱ्या च देतों :

ऐसिये वांतडी धांविन्नला। द्रपदीमागें उभा ठेला।
ना तो हृदईंचा प्रगटला। पाठीराखा कैवारी॥ १८८
आला गेला घाटे भक्ता। ज्ञानी म्हणती येथें चि होता।
विश्वव्यापका अनंता। येणें जाणें असेना॥ १८९
सर्वांतरीं जया असणें। तया नलगे धांवा करणें।
आणी राहटे तें तें जाणे। सर्व करणें मन इच्छा॥ १९०
अपार प्रेमळाचें पिसें। न म्हणे सान थोर ऐसें।
नाम स्मरतां अति आवेशें। धांवोनि जाये त्यापासीं॥ १९१
साधुजनाचा प्रतिपाळ करणें। सेवकातें संरक्षणें।
करावया दुष्टास दंडण। नाना अवतार घेतसे॥ १९२

पृ. २६१ कानचकुंडलें दिल्हीं ते कथा, ग्रं. सं. ७१
१८४ रावणाची आदी ४५.

(४) बाकीचीं चार प्रकरणें आहेत तीं : पृष्ठांक २३५ कुशलवांकुशाची कथा, ग्रन्थसंख्या ८८, शेवटची ओवी : सेका जनार्दना शरण। पूर्णब्रह्म सीतारमण। कुशलवांकुश दोघे जण। अंकासनीं बैसविलें॥

पृ. २४४ विष्णुदासनामा कृत गरुडाख्यान म्हणजे च हनुमंतभेटी

पृ. २९९ नामापाठकृत्य भरतभेट, ओवीसंख्या २६९

पृ. १७२ मुकुंदेश्वर कृत अरण्यपर्व; अध्याय ९, श्रीमद्हनुमंतसंवाद, ग्रंथसंख्या ११५

१६० ] २ [ १०५

संपूर्ण सुंदर मद्दराचें बाड, पृ. सं. २१ + २६१ = २८२, २८२ × २ = ५६४. पहिलीं ११ पृष्ठें किरकोळ आहेत. नतर पाठपोट २६१ पृष्ठें निरनिराळ्या कथा, आख्यानें, चरित्रें आहेत. प्रत्येक प्रकरणाचे शेवटीं कर्त्याचें नांव नाहीं. जगज्जीवन, उद्धवचिद्धन आणि वामन यांच्या कवितेची सळमिसळ झालेली आहे. ती निवड माझ्या हातून झाली नाहीं. पुढिलाच्या साठीं तें काम राखून ठेवीत आहे. या बाडांकडे पुढें कोण, केव्हां पाहणार आहे, हरि जाणे !

या बाडांतील सर्व प्रकरणें श्लोकबद्ध आहेत. पहिला अंक बाडांतील पृष्ठांकाचा, पुढें प्रकरणाचें नाव व त्या पुढचा अंक ग्रन्थसंख्येचा :

१ पांडवांची कथा १२६ , १७ भिल्लीशंकरसंवाद ६५ ;
२१ भस्मासुर आख्यान ४३ ; २७ गोपीचंदचरित्र १२४ ;
३८ दत्तजन्मकाळ २१ ; ४० सीता आदी ४६ ;
४५ सीतास्वैर १४० ; ६६ सगराची कथा ९ ;
६८ गंगाख्यान–पहिला प्रसंग ३७ व दुसरा प्रसंग ६३ ;
८२ वामनकृत कृष्णजन्म २८ ;
८६ वामनकृत श्रीरामजन्मकाळ ३२ ;
९० वा. कृत जानकीलोपामुद्रासंवाद ३४;
९६ ज. कृत भीमजन्मकाळ ३२ ;
१०१ वा. कृत अहिल्योद्धार ६२ ; ११० नन्देरदर्पण ७९ ;
१२३ मयूरध्वजकथा ५५ ; १३१ अर्जुनहनुमंतसंवाद ६१ ;
१४१ सीतापार्वतीसंवाद २२ ; १४४ रामरावणयुद्ध ४२ ;
१५१ उद्धवचिद्घनकृत श्रीजानकीवर्णन ९ ;
१५३ शिखरिणी, शार्दूल, स्रग्धरा इत्यादि वृत्तांत श्रीरामवर्णन, श्लोकसंख्या ९ + ३३ = ४२

*हा रामस्तवराज कोण करवी निर्माण जाला कसा ।*
*या हेतुस्तव बोलणें मज घडे मुख्यार्थ जाणा असा ।*

मुख्य प्राण करी स्तवासि करवी प्रेमें जगन्नाथ या ।
जो विख्यात तया नमूं स्तवमिषें श्रीरामदासान्वया ॥ ३३

१६२ श्रीरामपर १२ ; १६५ श्रीकृष्णपर १० ;
१६७ पांडुरंगपर ९ ; १६८ सामर्थ्यपर ५ ;
१६९ साधुमहिमा ३ ; १७० बोधपर ११ ;
१७२ सेवेचे श्लोक ९ ; १७३ स्फुट ४१ ;
१८० ज. कृत ध्रुवाख्यान ६४ ; १८९ श्रीभरतभावकथा ९२ ;
२०१ किरकोळ ; २०३ दक्षवध ५६ ;
२१९ सुभाषित ; २२६ साधनचतुष्टय ;
२२८ जांबुवती आख्यान ; २३४ कार्तिक एकादशी ३९ ;
२३८ शिवरात्रकथा ३५ ; २४२ किरकोळ ;
२४९ रावणमंदोदरीसंवाद ४६ ;

असें या बाडाचें स्वरूप आहे. हें बाड व मागचें बाड लिहिण्याची तऱ्हा पाहण्यासारखी आहे.

## १६१ ] ३ [ ७०

पृ. सं. ७० × २ = १४०. व्यापारी लोकांच्या जमाखर्चांच्या वह्यांच्या आकाराची लांबलचक वही. लेखन अगदीं अलिकडचें आहे, पण त्यांत बरींचशीं श्रीसमर्थांचीं व इतरांचीं प्रकरणें असल्यामुळें तें महत्त्वाचें आहे.

(१) अंतर्भाव पृ. १, (२) पंचसमासी पृ. २, (३) सप्तसमासी पृ. ३, यात हि प्रत्येक समासाचा शेवट १५८ व्या पोथ्याप्रमाणें 'इति श्री दासबोधे गुरुशिष्यसंवादे...' असा च केलेला आहे. (४) चतुर्थमान पृ. ६ (५) पचमन ७, (६) मानपंचक ८ (७) अन्वयव्यतिरेक पृ. १०, हें प्रकरण श्रीसमर्थकृत आहे असा फार जुना गैरसमज आहे, पण हें प्रकरण त्यांचें नसून श्रीसमर्थांचे सीताराम म्हणून शिष्य होते, त्यांचें आहे. ही गोष्ट सांप्रदायिक विविध विषयांत मागें च सिद्ध झाली आहे, तरी पण प्रकाशक 'श्रीसमर्थांचे समग्र ग्रन्थांत' तें घालून हि छापीत च असतात. (८) मठुधा गोसावी पृ. १५, (९)

जुनाट पुरुष १६, ( १० ) पंचीकर्ण, समाप्त ५, पृ. १७, ( ११ ) छत्रनिर्वाह पृ. १८, हें प्रकरण श्रीसमर्थांचें नसून श्रेष्ठांचें असावें, अशी माझी समजूत होते, ( १२ ) मानसपूजा २१, ( १३ ) सगुणध्यान २३, ( १४ ) निर्गुणध्यान २४, (१५) पंचीकर्ण २६, (१६) आत्माराम २८, (१७) पूर्वारंभ ३०, (१८) सप्ताह, श्रीसमर्थकृत व श्रीजगज्जीवनकृत आरत्या, अभंग, भूपाळ्या वगैरे यांसह पृ. ३१, (१९) वेणाबाईचे अभंग ४६, (२०) भीमरूपी स्तोत्रें पृ. ४८, (२१) पंचकें–अभंग, पदें वगैरे ५१, (२२) जगज्जीवनांचीं पदें, पृ. ५३, (२३) श्रीसमर्थांच्या सवाया ६०, ( २४ ) जगज्जीवनांच्या सवाया ६०, आणि ( २५ ) हरिहरकृत श्रीरामनामावळी पृ. ६८, अशीं एकंदर २५ प्रकरणें या बाडांत आहेत.

## १६२ ] ४ [ ७०

भीहनुमंतस्वामिकृत श्रीरामदासचरित्र. हें च चरित्र बखर म्हणून प्रसिद्ध आहे. या बखरीच्या निरनिराळ्या ठिकाणच्या पाच सात प्रति सभेच्या संग्रहीं आहेत. काहीं प्रतींत विषयानुरोधानें एकंदर तेरा प्रकरणें पाडलीं आहेत व कांहींत सलग एक च कथा आहे.

प्रस्तुतची प्रत प्रकरणात्मक आहे. तिच्यांत ५ वें, ९ वें आणि ११ वें, अशीं तीन प्रकरणें नाहींत. प्रत्येक प्रकरण बहुधा निरनिराळ्या लेखकानें लिहिलेलें दिसतें. पहिल्या प्रकरणाचा शेवट :

आत्मस्वरूप जाण नारायणास । सूर्याचेनें प्रभवला रामदास ।
प्रकर्ण पहिलें संतोषमनानें । लिहिलें सिताराम वन्हेकरानें ॥ १ ...
शाके १७८४ दुंदुभिनाम संवत्सर । आश्विन शुद्ध दशमी...

तिसऱ्याचा शेवट असा :

अति आदरें चित्त येकाग्रपणानें । हा प्रसंग लिहिला असे वामनानें ।
जयालागि प्रीति असे रामदासीं । नमस्कार माझा श्रोतया वक्तयासि ॥ १
शाके सत्रासे चौऱ्यासि । दुंदुभि आश्विन पक्षासि ।
भानुवासर येकादसि । चरित्रप्रसंग पूर्ण जाले ॥ १

सभेच्या संग्रहीं असलेल्या प्रतींच्या आधारें बखरीची एक अधिकृत आवृत्ति छापून काढण्याचा सभेचा विचार आहे. किंवा हि नवीन संशोधन झालें आणि बखरींत जरी कांहीं किरकोळ चुका आढळल्या, तरी या बखरीचें

महत्त्व केव्हां हि कमी होणार नाहीं, अशी आम्हांस खात्री आहे. तिची भाषा इतकी गोड आणि विवेचनपद्धति इतकी मोहक आहे ! नित्य जसा दासबोध वाचावयाचा, त्याप्रमाणें नित्य नियमानें बखरीचीं हि चार पानें वाचल्यास, तें मक्तीस पोषक होणार आहे. श्रीसमर्थसंप्रदायिक वाङ्मयाच्या अभ्यासाला आरंभ कोठून करावा म्हणून आम्हांस कोणी विचारल्यास, बखर वाचण्यापासून आरंभ करा, अशी आम्ही शिफारस करीत असतो. बखर तशी च गोड आहे. तिच्यांत एकदां भक्तिप्रेमानें प्रवेश केला म्हणजे श्रीसमर्थचरित्र, श्रीसमर्थसंप्रदाय, श्रीसमर्थवाङ्मय, श्रीसमर्थसंशोधन इत्यादि हरएक सांप्रदायिक गोष्टींविषयीं वाटणारी गोडी सारखी वाढत च जाईल, असें आमचें आश्वासन आहे. प्रथम निष्ठा आणि मग चिकित्सा. निष्ठेचा पाया एकदां भक्कम भरला गेल्यावर, जितकी चिकित्सा कराल तितकी पायाला बळकटी च येत जाईल, हें निश्चित समजा.

# १६३ ]  ५  [ १५०

पृ. सं. ७२ × ४ =२८८ पहिली तीन आणि चार अशीं सात पानें गेलेलीं आहेत.

( १ ) जगज्जीवन कृत पुढील प्रकरणें या बाडांत आहेत :

पृ. १ रामकथा, प्रसंग १ ते ३, ओवी ६४+५०+५०=१६४

पृ. १३ सुग्रीवें कुंभकर्ण श्रोत्रहीन केला ते कथा, प्रसंग १ ते ३, ओवी ८० + ४५ + ५६ = १८१

पृ. २७ कुंभकर्णवध, प्रसंग १ ते ३, ओ. ७३+५५+५३=१८१

,, सीताबिभीषणसंवाद प्र. १ते३, ओ. ५४+४९+६८=१७१

,, ८५ शतमुखरावणवध, ओ. ५३ + ४८ +६३ = १६४

,, ९७ श्रीरामअंजनीसंवाद, ओवीसंख्या १३४

( २ ) श्रीसमर्थस्तवनपर तीन पदें, एक रंगनाथांचें--रामदास चतुराशीर मंत्र पृ. ७७, दुसरें शिवदिनकेसरींचें–रामदास सद्गुरु अविनाशी हृदंये जपना । पृ. ७८ व तिसरें पृ. ६६ वर–रामदास माउली ।

( ३ ) याशिवाय श्रीसमर्थ, कल्याण, जगज्जीवन, केशव, तुका, तुळशीदास, रंगनाथ, यांचीं किरकोळ पदपदांतरें.

( ४ ) याशिवाय हि या बाडांत पृ. ७१ वर भानुदासचरित्र, व

शेवटीं शेवटीं आदिपर्व अध्याय १५ वा अपूर्ण व शकुनवंशी, अशीं प्रकरणें आहेत.

(५) या बाडांतील जगजीवनांचीं प्रकरणें जुनीं लिहिलेलीं आहेत व त्यांचें अक्षर वऱ्यापैकीं आहे, पण बाकीचा भाग अलिकडे कोणी सामान्य अक्षरानें लिहिलेला आहे. तरी तो ७७ वर्षांमागचा आहे. त्याचा लेखनकाल शके १७७७ चा पृ. ११७ वर आला आहे.

(६) शेवटच्या पृष्ठावर श्रीसमर्थांची शिष्यमंडळी म्हणून एकवीस नांवें दिलीं आहेत तीं अशीं :

| | |
|---|---|
| १ अनंतगोसावि मनेरगुडिकर, | १ अनंतगोसावि मेथवडकर, |
| १ मनेकर बाया, | १ वासुदेव गोसावि, |
| १ पिवाजि गोसावि, | १ बाजीगोसावि शिराळकर, |
| १ भैणाजि गोसावि तिसगावकर, | १ देवाजि गोसावि दादेगावकर |
| १ त्रिंबक गोसावि भाटगावकर, | १ बाळकराम बऱ्हाडकर, |
| १ उधव गोसावि टाकळीकर, | १ अनंत गोसावि, |
| १ दत्ताजिबाबा सिरगावकर, | १ अणाजि गोसावि निळेगेकर, |
| १ उधव गोसावि केजकर, | १ अक्काबाई, |
| १ अंतुबाई, | १ अपाबाई, |
| १ विश्वनाथ गोसावि, | १ श्रीस्वामि, |
| १ सबु गोसावि सावताचे वाडिकर | |

यांत भैणाजि म्हणजे बहिणाजी, स्वानुभवदिनकराचे कर्ते दिनकर यांचें मूळचें नांव बहिणाजी होतें, देवाजि म्हणजे देवदास, सबु म्हणजे शंभु, निळग्याचे अणाजि यांना च अप्पाजी म्हणत व श्रीस्वामि म्हणजे अर्थात् श्रीकल्याणस्वामी.

**१६४ ]** ६ [ १२५

पृ. सं. ७८ × २ = १५६. दोही बाजूंचीं कांहीं गेलीं.

(१) व्यंकटेशसुत कृत गोदातीरीच्या पिंपळनेरीच्या पाटलाची सून हालुबाई व धामणगांवचे घोधलेबुवा यांचें चरित्र, ओवीसंख्या १२९

(२) सर्व प्रायश्चित्त, पापापासून मुक्त होण्यास काय करावें, तें गद्यांत सांगितलें आहे, दोन पृष्ठ

( ३ ) श्रीसमर्थ कृत ओवीशतक पहिलें

( ४ ) एकवीस प्रकारचीं रामायणें : वाल्मीकिरामायण, व्यासोक्त रामायण, वशिष्ठ रामायण, शुक, नाटक, बिभीषण, ब्रह्म, शिव, शेष, अध्यात्म, अगस्ति, शैव, आगम, कूर्म, स्कंद, पौलस्ती, अरुण, पद्म, भरत, यमधर्म आणि आश्चर्यरामायण.

(५) श्रीरंगनारायण कृत शालीसुमन यांचें चरित्र, ओवीसंख्या ४५

( ६ ) बोधराजाचें चरित्र, ओ. ४९, बहुधा अनंत कृत. शेवटची ओवी

अनंता भजावें अनंत चि व्हावें ।
अनंत करावें नामस्मरण ॥ ४९

( ७ ) पंढरीमाजी आजी पटले । विठल ब्रह्म नटले ॥ ध्रु०

( ८ ) श्रीसमर्थ, ज्ञानदेव, तुकाराम, त्र्यंबकेशसुत, सदानंद यांचीं पदपदांतरें

( ९ ) संतविजयांत श्रीसमर्थ कृत जे अभंग, श्लोक वगैरे आले आहेत, ते अध्यायवार या बाडांत उतरून काढले आहेत.

१६५ ] ७ [१००

हा बाडाची फार च दुर्दशा झालेली दिसते. त्याची विद्यक पृष्ठसंख्या १३८ × २ = २७६ आहे व आरंभींचीं ७०।७५ आणि शेवटचीं बराबरी तितकीं च, मिळून १५० पृष्ठें फाटण्यांत गेलीं आहेत. त्यांत जगज्जीवनांचीं ( १ ) जांबुळ आख्यान, ओवीसंख्या ७०, ( २ ) जयद्रथवधकथा, ओ. ९३, ( ३ ) गोरक्ष आख्यान, ओ. ९८, ( ४ ) सीतात्रिजटासंवाद, ओ. ९४, ( ५ ) उपमन्युचरित्र, ओ. ६२, ( ६ ) साधूचा महिमा, ओ. ९४, हीं व कांहीं किरकोळ प्रकरणें आहेत. साधुमहिम्याची शेवटची ओवी अशी :

रामदासाचें महिमान । सारकाळ करितसे कल्याण ।
जसीं व्यास जगज्जीवन । स्वानंदघन परमात्मा ॥ ९४

( २ ) याशिवाय जगज्जीवन, केशव, शिवदिन, उद्धवचिद्घन यांचीं पदपदांतरें.

१६६ ] ८ [१५०

पृ. सं. १६ × ४ = १४४. कांहीं पृष्ठें नष्ट.

यांत मुक्तेश्वर कृत आदिपर्वांतील भाग, शाकुंतल, इतर ओव्या असून श्रीसमर्थ, जगजीवन, रमावल्लभदास, रोहिदास, लतिफ, येकनाथ यांचीं पदपदांतरें आहेत.

१६७ ] ९ [ १२५

पृ. सं. ९०×२ = १८० आणि जवळ जवळ इतकीं च पृष्ठें गहाळ.

वरील बाडांक १६२ तील जगज्जीवन कृत श्रीरामकथा, सुग्रीवें कुंभकर्ण श्रोत्रहीन केला ते कथा, कुंभकर्णवधकथा, सीताबिभीषणसंवाद, यवनुखरावणवधकथा व श्रीरामअंजनीसंवाद अशीं फक्त सहा प्रकरणें या बाडांत आहेत.

१६८ ] १० [ २००

पृ. सं. १७६ × २ = ३५२. शिवाय पाठपोट पहिलीं तेरा व शेवटचीं ८ गहाळ. दारिद्र्यानें उद्ध्वस्त झालेल्या खेड्यांतील पडकीं घरें व पराकाष्ठेचें अज्ञान, असभ्य उपेक्षा, दंडाई हलगर्जीपणा, पूर्ववैभवाचें विस्मरण इत्यादि कारणामुळें मोडकळीस आलेल्या व कर्तव्यापासून ढळलेल्या मठांतील फाटकीं बाडें, यांची सारखी च स्थिती होय. दुःख करून काय उपयोग. पुढें पाहिलें पाहिजे.

या सबंध बाडांत ज्ञानेश्वरी व एकनाथमहाराज कृत भागवत, हस्तामलक व अष्टावक्र या ग्रन्थांतील भरपूर निवडक उतारे घेतले आहेत. भाषा शुद्ध आणि तत्कालीन असल्यामुळें अभ्यसनीय आहे.

१६९ ] ११ [ १२५

अति दुर्दशा पावलेलें हें एक बाड आहे. त्याचीं पहिलीं १६ × २ = ३२ पानें घडींमुळें मधोमध फाटून त्यांचा निमा भाग नष्ट झाला

तया सुकृताच्या गुणें मोक्षरासी ।
समर्था प्रभू तूं आम्हां जोडलासी ।
परिछिन्न केला मनाचा निवाडा ।
मतिशून्य कैसा वदावा पवाडा ॥ १८

पदीं लागतां शून्य जन्मांतरें वें ।
अलक्षीत वस्तू चि मी तत् स्वरूपें ।
असे सप्रचीती प्रचीतीस आलें ।
मना उन्मनी कोण बोलेल बोलें ॥ १९

रहे उन्मनी धूम्रन्यायें विराली ।
नसे दृश्य जे वस्तु तद्रूप जाली ।
पुढें ऊरला देह तो राघवाचा ।
गुरूच्या पदीं अर्पिला हो त्रिवाचा ॥ २०

श्रीसमर्थहृदयाचा कांहींसा ठाव आपणास लागावा ही आपली महत्त्वाकांक्षा, हा आपला सारा प्रयत्न, हें आपल्या जन्मजन्मांतराचें ध्येय होय। या अष्टकावरून कांहीं थोडीशी कल्पना करितां येते, नाहीं ! शेवटच्या चार श्लोकांकडे तर किती वेळ पहात बसावें ! आजवर अनेक जन्म झाले, त्या प्रत्येक जन्मात किंचित् पुण्यकर्म व्हावें, तें सारें कर्म एकत्र करून जो थोडासा पुण्यांश तळाशीं राहिला, त्यायोगें समर्था ! प्रभू तूं आम्हां जोडलासी ।, श्रीमंता ! आपण निश्चित ज्ञान पटवून दिलें, त्या आपला ज्यां मतिमंदानें किती हि पोवाडा गायिला तरी तो पुरा पडणार नाहीं, आपल्या चरणांचा आश्रय केल्यानें पूर्वीचीं सारीं जन्मजन्मांतरें निरसलीं, आपण सर्वत्र आहात आणि मी निराळा नाहीं, असा प्रत्यय आला, मन उन्मन झालें, आतां बोलूं तरी कसा, ती उन्मनी अवस्था हि लय पावली, दृश्य मिथ्या झालें, सर्वत्र वस्तु च कोंदाटली आहे, आणि मग आतां हा देह उरला आहे तो कोणाचा ! दुसऱ्या कोणाचा !

पुढें ऊरला देह तो राघवाचा ।
गुरूच्या पदीं अर्पिला हो त्रिवाचा ॥

अशा च ना कांहीं तरी भोळ्यावेडेपणें त्या चार श्लोकांचा अर्थ होतो !

१८५४ पौष शु. १४

१७१ ] १३ [ १५०

पृ. सं. ४९ × ४ = १९६.

वरील बाडांक १६८ त जे उतारे आहेत, ते च तवीतत या बाडांत असून शिवाय बारा ज्योतिर्लिंगावर एक पद, भागीरथीवर अकरा श्लोक व जगन्नाथ कृत माधरदास व गिरिधरलाल यांची कथा, अशीं प्रकरणें आहेत.

श्रीसमर्थांचीं तीन पदें असून त्यांत दोन अप्रकाशित आहेत.

१७२ ] १४ [ २००

पृ. सं. ६१ × २ = १२२. आ. दो. दहा पांच पानें नष्ट. जीर्ण बाड.

यांत श्रीधर ब्रह्मानंद कृत पारधीकथेचा थोडा भाग, विठ्ठल कवि व राघवचिद्धन यांचीं पदें व वामनपंडित कृत कालियाहरण अशीं प्रकरणें आहेत.

१७३ ] १५ [ २००

पृ. सं. ३२ × २ × २ = १२८.

या महत्त्वाच्या बाडांत श्रीसप्तशतीटीका श्लोक व जालंधराख्यान कथा अशीं दोन श्लोकबद्ध व मधून मधून सवाया असलेलीं प्रकरणें आहेत. सप्तशतीचे ११६ व जालंधराख्यानाचे ९४ श्लोक आहेत. हीं दोन्हीं प्रकरणें प्रकाशित करण्यासारखीं आहेत. तीं कोण कृत असावीत, हें उमगत नाहीं. दोन्हीं एकाचीं च मात्र आहेत. जालंधराख्यान जगज्जीवनाचें असावें, असें एकवार वाटलें होतें. इतरांना शोध लावता यावा म्हणून सप्तशतींतील तीन श्लोक व आख्यानाच्या शेवटचे दोन श्लोक येथें उतरून ठेवतों :

विद्वद्भूषणमोदकासन नमूं विद्यावतसाग्रणी ।
वीणापुस्तकधारिणी अभयदा वदूं जगन्मोहनी ।
कैवल्यास्पद दान दे पदनता स्या सद्गुरुपादुका ।
साष्टांगीं प्रणमोनि सुंदर कथा गाईन ते आइका ॥ १

मर्दे मातला घेतलें राज्य सारें ।
रणीं गांजिला पूर्वकर्मानुसारें ।

त्यांत आरंभीं कृष्णदासमुद्गल कृत रामायणापैकीं कांहीं भाग असून नंतर श्रीसमर्थ, केशव, तुका, गोसावीनंदन, देवदास, चैतन्यगुरूचे देवदास, उद्धव रामदास, नारायण, नरहरि, कृष्णदास जयराम, मेरु, विठ्ठलदास, येकनाथ, अनंत, वामन, पुरंधर विठ्ठल, विप्ररामदास यांचीं पदपदांतरें आहेत.

त्यांत श्रीसमर्थ व केशव यांच्या पदांचा भरणा विशेष आहे, देवदास चैतन्य याचें १९ कडव्यांचें हिंदुस्थानी पद सुंदर आहे, पुरंधर विठ्ठलांचें पद कानडी आहे, विप्ररामदासांचें नवरात्रावर पद आहे.

१७७ ] १९ [ १७५

पृ. सं. २५ × ४ = १०० शिवाय आ. व शे. मिळून ७ × ४ = २८ पृष्ठें गहाळ.

( १ ) यांत क्रमशः उद्धवचिद्घन, वामन, पाठकनामा, कबिर, मिराबाई, उमेशानंदन, नरहरी, त्रिमलजनार्दन, विठो अनंत, शिवदास, हरिदास, विष्णुदास नामा, नामदेव, येकनाथ, नरहरि माळी, गोरखनाथ, कृष्णारण्य, मत्स्यनाथ, मानपुरी, गोसावीनंदन, तुका, श्याम, वस्वलिंग, अनंत गोपाळ यांचीं पदपदांतरें वगैरे आहेत. यांत उमेशानंदन, त्रिमलजनार्दन, विठो अनंत, कृष्णारण्य, अनंत गोपाळ हीं नांवें नवीन आहेत.

( २ ) उद्धवचिद्घनांचें विवेकदर्पण म्हणून शंभर श्लोकांचें प्रकरण नवीन आहे. प्रकरण महत्त्वाचें आहे. प्रकाशित होणें अत्यन्त इष्ट आहे. कांहीं श्लोक :

> वंदूनियां सर्व कवेश्वरांसी । मागोनियां स्वदर मधूकरीसी ।
> जें जेविलों टेकर येसि त्यांसी । तें आइका वीनवणी तुम्हांसी ॥ १२
> घडा जिवां साधन मोक्षपर्यी । मुमुक्ष हीं मोक्षपदासि येती ।
> ज्ञानी सदा स्वानुभवें रहाती । ऐसी कथा या कथिजेल ग्रंथीं ॥ १७
> ग्रंथ निर्मळ विवेकदर्पण । देखिजेल आपणासि आपण ।
> यानिमित्य अवलोकुनि पाहा । आवडे तरि अगत्य संग्रहा ॥ १८
> आपणासि सुकर्ले नवमाजी । यांत येक न दिसे म्हणतो जी ।
> मोजणार गुरु सांपडवीतो । भ्रांति सर्व भजनें उडवीतो ॥ २०
> साक्षात्कारीं ज्ञान थांतें बुडालें । तुर्यत्वाचें ते स्थळीं रूप जाले ।
> तें हीं आहे आटवेंवीं समासो । कोण्ही त्यावें उन्मनी घोळवातो ॥ ८५

दिसे स्वप्न तेव्हां नसे स्वप्नभावो । उठे जागृतीमाजि तत्सर्व यावो ।
स्वयें जागृती ब्रह्मरूर्ती आटे । पुढें आपण आपणासी च भेटे ॥ ८८
जया सद्गुरु चिद्घनाची कृपा हे । विवेकाचिया दर्पणा तो चि पाहे ।
शतश्लोक होऊनियां अर्थ याचा । तया भेटि देतो गुरु उद्धवाचा ॥ १००

( ३ ) नरहरी मालोचीं पदें हि अति सुरस आहेत, यावींशीं वाटतात, पण विस्तार होत आहे हें पाहून मन पदोपदीं दचकत असतें. ओलांडून जावें तरी कसें !

[ १ ]

श्री राम जय राम जय जय राम ।
सप्रेमें सर्वदा स्मरे निःकाम ॥ ध्रु०
वैष्णव आनंदें नर्तती जेथें । कर जोडुनी मुक्ती तिष्ठती तेथें ॥ १
योग याग तीर्थाटणें प्रसंन जाहीं । कोटी दैवतें हरिकीर्तना आलीं ॥ २
वैकुंठपुरपती तिष्ठती अंगें । महिमा देखोनि स्वर्गसुख ही पांगे ॥ ३
नामामृतरसअमृतपान । हें सुखवैभव येक नारद जाणे ॥ ४
गोड गोडाहुनी सोपें सोपान। नरहरी म्हणे मालोरूपेनें लाधलों ध्यान ॥ ५

[ २ ]

श्री राम जय राम म्हणा श्री राम जय राम ।
पुरती सर्व हि काम ॥ ध्रु०
आनंदें आवडी घोष करितां । पाविजे वैकुंठधाम ॥ १
गावा ध्यावा नित्य जपावा । विश्वाचा विश्राम ॥ २
नरहरी मालो जीवन माझें । अंतरिचा आराम ॥ ३

( ३ ) अनंत गोपाळाची येकनाथावर आरति आहे, नामा पाठक व एकनाथ यांचीं विंचवांवर पदें आहेत.

भावें जनार्दन बोले उद्धवासी । यारे परियसी गुह्य गोष्टी ॥ १
या नामसामर्थ्यावरील एकनाथांच्या चोपन ओव्या आहेत.

( ४ ) दत्तं जनार्दनं देवं येकनाथं च राघवं । चिदानंदं सदाशांतं अशा परंपरेचा एक श्लोक आहे.

या सघष याबात जगज्जीवन कृत काहीं श्लोकाष्टकें व बाकीं सारीं पदपदातरें आहेत ही सारी कविता अप्रकाशित आहे. श्लोकाष्टकांपैकीं एकाद दुसरें अष्टक श्रीकल्याणस्वामीवर आहे.

गुरुपदि अनुसरला । त्यातें भवनिधि वोसरला ॥ ध्रु ०

१७९ ] २१ [ १००

पृ स. २९ × २ = ७८ किरकोळ वाड. काहीं पृष्ठें गहाळ.

यात मुख्यतः एकनाथी भागवतातील उतारे व तुकाराममहाराजाचे अभग आहेत. शिवाय जयरामकृष्णदास, वामन, केशव, बोधला, बहेणी, शिवराम, नामदेव, नामयाची जनी, रगनाथ, आनदतनय याचे काहीं अभग आहेत.

१८० ] २२ [ ७५

पृ. स. २७ × २ = ५४. शिवाय आरभींचीं ६ नष्ट.

यात आरभीं श्रीसमर्थांचे पधरा अभग होते, त्यांतील पहिले दहा फाटलेल्या सहा पानात गेले. पुढें तुकारामाचे ६० अभग आहेत आणि नतर मुक्ताबाई ( ! ) , केसरी, उद्धवचिद्धन, येकनाथ, गिरिधरप्रभु व कबीर या प्रत्येकाचा एक एक अभग किंवा पद आहे.

१८१ ] २३ [ १००

पृ स. ६०, किरकोळ वाड

यात धुडिराज, नददास, अमृतेश्वर, पुरदर विठ्ठल, श्रीधर, उद्धवचिद्धन, निरजन, रगनाथनिजानद यांचीं पदपदातरें

१८२ ] २४ [ १००

पृ सं. ५२. यात आरभीं सावता याचे सतमेळ्याचे अभग असन पुढें तुकाराम आाण नतर नामदेव याच अभग आहेत.

## १८३ ] २५ [ ७५

पृ. सं. १०८. यांत माल्हो, मीरा, मध्वमुनेश्वर, रंगनाथ निजानंद, तुका, श्रीधर, श्रीधरशिष्य कृष्ण, आदि नारायण, नामा, देवीदास, राघवांकित, जनार्दन, केशव, बाळकृष्ण ( यानीं संस्कृत ग्रन्थाधारें दोन आर्यानें प्राकृतांत उतरलीं आहेत ), येकनाथ, ज्ञानदेव व आनंदसुत याचे अभग पदें वगैरे आहेत.

शेवटीं, हिशोब सोडविण्याचे काहीं आडाखे दिले आहेत.

## १८४ ] २६ [ १००

पृ. सं. ५८. यांत श्रीसमर्थ, जगज्जीवन, रामराज कल्याण ( देखिला नयनीं अयोध्येचा राणा ), सहदेवभाटळी, कबीर, तुकाराम, केशव, एकनाथ, शिवराम पूर्णानंद, सुरदास, नामदेव यांचे अभंग, पदें, वगैरे आहेत.

## १८५ ] २७ [ ७५

पृ. सं. ६०. यांत जगज्जीवनकृत श्रीरामचरित्रपर कथा-भाग असून समर्थ, कल्याण, कबिर यांचीं पदपदांतरें व सह्याद्रीगिरिचा० हे अनंतकविकृत श्लोक आहेत.

## १८६ ] २८ [ १००

पृ. सं. ५२. पैकीं २८ पृष्ठें श्रीसमर्थांचीं पदपदांतरें आहेत, त्यांत काहीं नवीन आढळलीं. नंतर कल्याण आणि जगज्जीवन यांचीं पदें असून शेवटीं दोन तीन पृष्ठें नामदेव आणि रंगनाथ यांचीं पदें आहेत.

## १८७ ] २९ [ १४६

पृ. सं. ६०. या बाडांत एका ठिकाणीं सन ११९६ चा उल्लेख आला आहे, त्यावरून हें बाड शक १७०८ तील ठरतें.

१९८ ] ४० [ १२५

पृ. सं. ४०. कांहीं नष्ट.

या बाडांत ५०।६० तुकारामांचे अभंग आहेत व नामदेव, नरहरी माळी, ज्ञानदेव, मीरा, निवृत्तिदास, केशव, एकनाथ, वटेश्वर चांगा, मुक्ताबाई यांचें एकादुसरें पदपदांतर आहे.

ज्ञानराज

ज्ञानराज माझी योग्याची माउली । जेणें निगमवल्ली प्रगट केली ॥ १
अध्यात्मविद्येचें दाखविलें रूप । चैतन्याचा दीप उजळिला ॥ २
गीता आळंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंद लहरी हेलावली ॥३
छपन्न भाषेचा केलासे गौरव । भवार्णवीं नांव उभारिली ॥ ४
श्रवणाचे मिसें बैसावें येवोनी । साम्राज्य भोगोनि सुखी असा ॥ ५
तुका म्हणे श्रेष्ठ ग्रंथ ज्ञानदेवी । येक तरी वोवी अनुभवा ॥ ६

१९९ ] ४१ [ १००

पृ. सं. २४. मठांतील एकाद्या नवशिक्या मुलाचें हें बाड दिसतें. त्यांत मिराबाईचीं बरीं च पदें आहेत व एकाद दुसरें तुळसीदास, सुरदास, तुकाराम, जगन्नाथ व विष्णुदास नामा यांचें आहे.

संसारीं संतोष वाटला । राम भेटला । मोठा आनंद जाला ।
हें श्रीसमर्थांचें प्रकाशित असलेलें एक च पद शेवटचे पृष्ठावर आहे.

२०० ] ४२ [ १२५

पृष्ठसंख्या ३२. कित्येक पृष्ठें गहाळ.

यांत श्रीसमर्थ, रंगनाथ निजानंद, जगज्जीवन, केशव, तुकाराम, गिरिधरप्रभु, जनी, हरि नारायण, विठ्ठलनाथ, गोविंद, शिवदिनकेसरी व एकनाथ यांचीं पदपदांतरें आहेत.

२०१ ] ४३ [ १२५

पृ. सं. १० × ४ = ४०, पहिलें आणि शेवटचें एक एक पृष्ठ गेलेलें.

यात ३७ अभंग आहेत. २४ चा अंक दोनदा पडला आहे, म्हणजे एकंदर ३८ अभंग होतात. त्यात १ नामदेवाचा आहे, २ तुकयाबंधूचे आहेत व बाकीचे ३५ तुकारामाचे आहेत.

२०२ ] ४४ [ ८०

पृ. सं. १६. किरकोळ. श्रीसमर्थांचीं पदपदावेंरें. शेवटीं दोन कानडी पदें आहेत.

२०३ ] ४५ [ २५०

पृ. सं. १६. कांहीं पृष्ठें नष्ट. बाड तत्कालीन आहे. वामनपंडित कृत बाळक्रीडा. म्हणून पहिला प्रसंग १०४ श्लोकाचा व दुसरा प्रसंग अवघ्या ७ श्लोकाचा प्रकाशित आहे.

प्रस्तुत बाडात शिल्लक असलेल्या पृष्ठात पहिल्या प्रसंगाच्या ११ व्या श्लोकापासून आरंभ असून शेवटच्या ९६ व्या समाप्तीच्या श्लोकापर्यंत सदरहु प्रकरण आहे. म्हणजे प्रकाशित १०४ श्लोकाऐवजीं या बाडात त्या प्रसंगाचे ९६ च श्लोक आहेत. बाड तत्कालीन आहे व प्रसंगाचा शेवट ' येकुन श्लोक स्याहाणों ९६॥ ' असा केलेला आहे, तेव्हां प्रकाशित प्रकरणात ८ श्लोक प्रक्षिप्त मानावयाचे कीं काय ? बाडात बाळक्रीडा असें नाव नसता बाळलीळा असें नाव आहे.

बाडाचें शेवटचें फाटकें पृष्ठ म्हणजे एका शिवकालीन मोडी पत्राच्या आरंभींचा भाग आहे. शिवकालीन मोडी कधीं छपत नाहीं. दोन नावापलिकडे त्या अवशिष्ट पत्रात कांहीं महत्त्व नाहीं. त्या नावाचा कधीं उपयोग व्हावयाचा असल्यास कोण जाणे, म्हणून त्या पत्राचा मथळा येथें देऊन ठेवतों.

महाराज राजमान्य राजेश्री नरहेरपंत
भाऊजी स्वामिजींचे सेवेसी

पंचवटिस्थानें वनविहारण पावना रामा ।
राक्षसमर्दन ऋषिप्रतिरक्षण पावना रामा ।
दशमुख येउनी सीताहरण पावना रामा ।
ऋषिमुखपर्वतीं हनुमद्दर्शन पावना रामा ॥ ३

फळीमर्दन सुग्रीवपाळन पावना रामा ।
सीताशोधन सेतुबंधन पावना रामा ।
रावणमर्दन बिभीषणस्थापन पावना रामा ।
भूमिजाग्रहण अयोध्ये आगमन पावना रामा ॥ ४

नंदिग्रामीं भरता भेटुन पावना रामा ।
अयोध्ये येउनी ऋषि अभिषेचन पावना रामा ।
सर्व वानरा निरोप देउन पावना रामा ।
अका सहस्र राज्य करुन पावना रामा ॥ ५

मोक्षपुरी हे स्वर्गा नेउन पावना रामा ।
त्रिभुवनिं आपुलि कीर्ति ठेउन पावना रामा ।
नामामृत हे दासा देउन पावना रामा ।
हरिला हनुम्यापदीं ठेउन पावना रामा ॥ ६

(४) अशुद्ध प्रकाशनाचें एक नमुनेदार उदाहरण आढळलें तें येथें देतों. अशासाठीं कीं, आपल्या सर्व संतकवींच्या काव्यांच्या शुद्ध आवृत्त्या काढण्याची किती आवश्यकता आहे, ही वाचकांस पटावी.

अनंतजन्में जरी केल्या तपरासी ।
तरी हा न पवसी म्हणे देह ॥ ध्रु०
ऐसें जें निधान लागलें हातीं ।
त्याची केली माती भाग्यहीना ॥ १
उत्तमाचें सार वेदाचें भांडार ।
ज्याच्यानें पवित्र तीर्थें होती ॥ २
म्हणे तुकयाबंधु आणिक उपमा ।
नाहीं या तों जन्मा द्यावयासी ॥ ३

अशा पाठाचा हा अभंग इ. स. १८९६ त तुकाराम तात्यांनीं ' तत्त्व-विवेचकग्रंथप्रसारक ' मंडळीसाठीं छापलेल्या गाथ्यांत आढळतो. तो च पाठ

सन १९०३ त ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीच्या ग्रन्थमालेंत दामोदर सांवळाराम आणि मंडळी यांनीं छापलेल्या गाथ्यांत कायम ठेवलेला आहे. त्र्यंबक हरी आवटे यांनी " ब्रह्मीभूत श्रीनानामहाराज साखरे यांच्या संग्रहांतील पुरातन हस्तलिखित वह्यांवरून पाठ दुरुस्त करून " सन १९०८ त छापलेल्या गाथ्यांत असा च पाठ आढळतो, फक्त त्यांत तपराशी च्या ऐवजीं तपराशी व पवसी चें पावसी एवढी अकारण दुरुस्ती केलेली आहे. सन १९१२ त निर्णयसागर छापखान्याचे मालक तुकाराम जावजी यानीं वासुदेव लक्ष्मणशास्त्री पणशीकर " यांच्याकडून तपासून घेऊन पाठभेदटिप्पणींसहित " छापविलेल्या गाथ्यांत आवट्यांची दुरुस्ती स्वीकारून असाच्या असा च सदरहू अभंग छापलेला आहे.

तुकाराममहाराजांच्या अभंगांचा चिकित्सापूर्वक अभ्यास करणारे महाराष्ट्रांत लक्षावधि होऊन गेले व हजारों असतील. हा अभंग वाचून यात काहीं तरी चुकलें आहे, अशी शंका हि कित्येकांच्या मनात उद्भवली असेल. ' तरी हा न पवसी म्हणे देह । ' म्हणजे काय ? ' म्हणे देह ' याचा काय अर्थ ? कोण म्हणे ? उत्तमाचें सार किंवा वेदाचें भाडार कोण ? कोणाच्या योगें तीर्थांना हि पवित्रपण येतें ? इत्यादि शंका कोणाला आल्या नसतील ? पण करणार काय ? साखरेबुवा झाले काय, विष्णुबोवा जोग घेतले काय किंवा आपले लक्ष्मणशास्त्री पांगारकर झाले म्हणून तरी काय, सर्वांच्या पुढें हा असला अशुद्ध च अभंग टाकला तर त्यानीं तरी काय करावें ?

या अभंगाचा जो गाभा तेवढा च नेमका अधर उचलून प्रकाशकांनीं त्यास निर्जीव करून सोडलें आहे ! प्रस्तुतच्या बाडात हा अभंग आढळतो तो असा :

अनंत जन्मांतरीं केलया पुण्यरासी ।
तरी हा न पवसी ब्राह्मणदेह ॥ ध्रु०
ऐसें हें निधान लागलेंसे हातीं ।
त्याची केली माती भाग्यहीना ॥ १
उत्तमाचें सार वेदाचें भांडार ।
ज्याचेनी पवित्र तीर्थें होतीं ॥ २
तुका म्हणे दुजी आणिक उपमा ।
नाहीं तों या जन्मा द्यावयासी ॥ ३

जी कथा या अभंगाची, ती च हजारोंची. जी दया तुकाराममहाराजाच्या अभंगाची ती च एकनाथाच्या, नामदेवाच्या आणि सर्वांच्या ! एकदा अवल इमर्जीत प्रकाशकानीं जे ग्रन्थ जसे छापून महाराष्ट्राच्या हातीं दिले त्याच्या तशा च आवृत्त्या आजतागाईत महाराष्ट्र काढीत आला आहे व त्याचा च अभिमान आता इतका बळावला आहे कीं, हें च आपलें खरें नाणें म्हणून जें एकदा गांठीं बांधलें तें सोडण्यास चांगले चांगले लोक तयार नसतात ! परंतु

लटिक्याचा साभिमान घेणें । सत्य अवघें च सोडणें ॥

हें काहीं बऱ्याचें लक्षण नव्हे. असला दुरभिमानी वाचकवर्ग श्रीसमर्थ-वाङ्मयाच्या वाट्याला आला नाहीं, हें या वाङ्मयाचें भाग्य होय.

२०८-२०९ ] ५०-५१ [ ११

या दोन रंगनाथकृत योगवाशिष्टसाराच्या प्रती आहेत. त्या संपूर्ण आहेत. या दोन्ही प्रती मोगरेकर रंगनाथाच्या आहेत.

या ग्रन्थाचा एक मोठा चमत्कार वाटतो. रंगनाथ दोन होऊन गेले, एक रामदासपंचायतनांतील निगडीकर रंगनाथ व दुसरे मोगरेकर रंगनाथ. चमत्कार असा, हा ग्रन्थ या दोघांच्या हि नांवावर मोडतो. दोघांची गुरुपरंपरा भिन्न आहे: एक सहज पूर्ण निज रंगि रंगलेले व दुसरे कृष्णानंदाचे. त्यामुळें दोघांच्या प्रतींत प्रत्येक प्रकरणाच्या शेवटीं उभयतांच्या परंपरेला अनुरूप अशा निर-निराळ्या ओंव्या आढळतात शके १८२७ त या ग्रन्थाची एक प्रत छापलेली आहे, ती निगडीकराची म्हणून छापलेली आहे. उभयतांच्या ग्रन्थाचा आणि भाषेचा विचार करता या ग्रन्थाचे कर्ते मोगरेकर रंगनाथ असावेत, असें मला वाटतें. अशा स्थितींत उभयतांच्या नांवावर हा ग्रंथ केव्हा व कसा मोडू लागला याचा उलगडा झाला पाहिजे.

प्रस्तुतच्या दोन्ही प्रतींचें लेखन एका च काळांतलें दिसतें. २०८ व्या प्रतीचा काळ दिलेला नाहीं, पण २०९ व्या प्रतीच्या शेवटीं मजकूर आहे, तो असा :

स्वस्ति श्री नृप शालिवाहन शके १७६३ शर्वनामसंवत्सरे मार्गशीर्ष कृष्ण ७ सप्तमी सोमदिने श्रीवाराणसी क्षेत्रे श्रीराममंदिरे दिवा तृतीय यामे भट्टाधिकारे पोळेपनाम्ना बाळंभट्टस्य सुत [illegible] लिखित ॥

२१० ] ५२ [१००

श्रीज्ञानेश्वरीची परिभाषा पृष्ठें १६.

२११ ] ५३ [९९

षड्विधसमाधीप्रकरण-पृष्ठें १५

मुख्यतः वाक्यसुधेचा आधार घेऊन या प्रकरणांत गद्यांत विवेचन केलेलें आहे. वरील २०९ ह्या ग्रन्थाची प्रत ज्यांच्या हातची आहे त्यांच्या च हातची त्या च शकांतील ही हि प्रत आहे. प्रकाशनाला योग्य.

२१२ ] ५३ (अ) [१००

साधनानुक्रमचूर्णिका-पृष्ठें २

२१३ ] ५४ १०१

निवृत्तिदास ज्ञानदेव कृत उत्तरगीता-पृ. ३३.

मूळ श्लोक १४३, टीका ओवीसंख्या ५८९. प्रतीचा लेखनकाल वगैरे:

इस्ताक्षर भगवंत चीमणाजी नाईक माहाजन कसये पारनेर दस्तुर खुद्द खर नाम संवछरे माहे भाद्रपद शुद्ध ॥ ७ ॥ वार मंगळवारी समाप्त दोन प्रहराव जाले लेखनसीमा कृष्णार्पणमस्तु हे पुस्तक विठल बाळाजि पोळ भ्रष्टाधिकारियाचे असे ॥

म्हणजे शके १७५३ येतो. प्रकाशन होणें इष्ट होय.

२१४ ] ५५ [१०२

श्रीसमर्थ कृत अंतर्भाव-पत्रें ४. शेवट :

शके १७५२ विकृति नाम संवत्सरे ॥ पौष कृष्ण सप्तम्यां दिवा चतुर्थयामे ग्रंथ संपूर्णमस्तु ॥ इदं पुस्तकं पाराशरक्षेत्रे बाळंभटस्य सूनुविठ्ठलेन लिखितं पोळोनामेति विश्रुतं ॥

२१५ ] ५६ [ १००

श्रीसमर्थ कृत पूर्वारंभ-पत्रें २

२१६ ] ५६ (अ) [ १०२

श्रीसमर्थ कृत आत्माराम-पत्रें ८. शेवट :

शके १७५२ विकृति नाम संवत्सरे पौष कृष्ण ४ शनिवारे प्रथम, यामे दिवा तत्समये पुस्तकं समाप्तं ॥ इदं पुस्तकं बाळंभट्टस्य सूनुविठ्ठलेन लिखितं पाराशरक्षेत्रे पोळेपनाम्नेति विख्यातं ॥

२१७ ] ५७ [ १०२

गुंडिराम कृत ओवीबद्ध आत्मशोध ग्रन्थ-पत्रें १५, ओवीसंख्या ५५५.

हा ग्रन्थ अवश्य छापला गेला पाहिजे. आपल्या मायेला तो भूषणावह होईल. याडे तीन चरणांची त्यांतील ओवी अति डौलदार आहे. नमुना पहा :

धन्य गुरराजा । गरीबनवाजा । अहो महाराजा । दीनबंधु ॥ ३९५
दोषी मी मानव । जड मूढ जीव । देवाधिदेव । केले मज ॥ ३९६
केले अघटित । नव्हे जें घटित । वर्णितां कुंठित । झ्याव्हि वाचा ॥ ४००
माझी मज भेटी । केली उठाउठी । सबाह्यता मिठी । अखंडित ॥ ४०१
वाचे मनें काये । व्हावें उतराये । तिहींचा उपाये । न चले तेथें ॥ ४०२
तनु तेथ जड । मन तेथ मूढ । वाचे मौन पडे । अनिर्वाच्य ॥ ४०३

वगैरे. हे गुंडिराम नक्की केव्हां होऊन गेले, हें सांगण्याला मार्ग नाहीं, पण त्याची परंपरा पाहतां ते श्रीसमर्थांच्या हि पूर्वी होऊन गेले असावेत, असें वाटतें. त्याच्या परंपरेच्या ओव्या अशा :

शिष्य म्हणे स्वामी। माझ्या स्वरूपा मी। भेट केली तुम्ही। माझी मज ॥ ५४४
दासविले आजी । अर्ध क्षणामाजी । सहजासहजी । धन्य केले ॥ ५४५
वेदाचा तूं वेद । सिद्धाचा तूं सिद्ध । परमहा प्रसिद्ध । तूं चि धन्य ॥ ५४६
बोलूं जातां बोला । बोल आपोपिला । बोध हि शिणला । महिमा वाणूं ॥

करोनि आत्मशोध । सांगितले विशद । अक्षरसंबोध । पाजियेला ॥ ५४८
साडे तीन छंद । थोडो हे प्रबंध । अथ आत्मशोध । नाम याचें ॥ ५४९
देहे ओंटकर । ओंट हा ॐ कार । योगी सदाकार । आकारली ॥ ५५०
ग्रंथअर्थसार । याणरां साधार । गुरु परात्पर । सांगेन आता ॥ ५५१
सद्गुरु अगाध । वडवानळ सिद्ध । परब्रह्म प्रसिद्ध । नागनाथ ॥ ५५२
तयाचा अनंत । योगी हा विख्यात । तया नादसुत । घोंडिराम ॥ ५५३
त्याचे चरणसरोजीं । सतचरणरजीं । सहजासहजी । गुंडिराम ॥ ५५४

वडवानळ सिद्ध नागनाथ याचा काळ शक १३०० आहे. त्याचे अनंत, अनंताचे घोंडिराम व घोंडिरामाचे गुंडिराम होत. तेव्हा गुंडिरामाचा काळ फार तर १४०० त येतो.

प्रतीचा लेखनकाल १७५२ पौष शु. ३ भृगुवासर असून लेखक बाळंभटाचे पुत्र विठ्ठल हे च आहेत.

प्रतीच्या शेवटीं लेखकानें शनेश्वराचा एक अभंग व निवृत्तिनाथाची आरती अशीं दिलीं आहेत. सदरहु अभंग छापलेल्या गाथ्यातील अभंगाशीं सहज ताडून पाहिला आणि आश्चर्य वाटलें. पूर्वप्रकाशकानीं महाराष्ट्राची चेष्टा तर केली नाहीं, असें मनात आलें. महाराष्ट्राला शुद्धाशुद्ध कांहीं समजत नाहीं, त्याच्या पुढें छापून कांहीं हि टाकलें तरी चालतें, अशी तर त्यानीं आपली समजूत करून घेतलेली नव्हती ? श्री शनेश्वर, एकनाथ, तुकाराम, नामदेव इत्यादिकाचें अशुद्ध छापलेलें वाङ्मय महाराष्ट्र आणखी किती वर्षे चालू ठेवणार, असा साहित्यभक्ताना आतुरतेनें पण आदरानें प्रश्न विचारावासा वाटतो. आपण या सर्व सत्पुरुषाचे अशुद्ध छापलेले ग्रन्थ वाचीत असतो, ही गोष्ट वारंवार महाराष्ट्राच्या नजरेस आणण्याचा मला केव्हा हि कंटाळा येणार नाहीं. हा च अभंग पहा. स्थलसंकोच म्हणून सबंध अभंग न देता पहिलें च कडवें देतों. तें छापलें आहे असें :

कानीं घालुनिया बोटें नाद जे पाहावे ।
न दिसतां जाणाव नऊ दिवस ॥ १

कानात बोटें घालून पहावें, नाद काय होतो तो, हा पहिल्या चरणातील वाक्प्रचार बरोबर आहे, पण दुसऱ्या चरणात ' न दिसता ' म्हटलें आहे, त्याचा

अर्थ काय ? नाद दिसावयाचा असतो, का ऐकावयाचा ? या प्रतींत शुद्ध पाठ आहे तो असा :

कानीं घालुनी बोट । नादातें पाहावें ।
माईकसां जाणावें । नव दिवस ॥ १

असो; आरती न छापलेली आहे, असें वाटतें. ती महत्त्वाची आणि सुंदर आहे, म्हणून येथें देतो :

फळलें भाग्य माझें । धन्य जालों संसारीं ।
सद्गुरु भेटला हो । तेणें धरियेलें करीं ।
पश्चिमे चालविलें । आत्मस्थिती निर्धारीं ।
त्रिकुटावरी नांदे । देखियेली पंढरी ॥ १

तें सुख काय सांगूं । वाचे बोलतां न ये ।
आरतीचेनि गुणें । गेलें मीपण माये ॥ ध्रु०

राउळामाजी जातां । राहे देहे अवस्था ।
मन हें उन्मन जालें । नसे वद्धतेची वार्ता ।
द्वैत हा मावळला । शब्दा आली निःशब्दता ।
तटस्थ होउनी ठेलों । निजरूप पाहातां ॥ २

त्रिगुण गुण वाई । पूर्ण जाळिल्या वाती ।
नवलाव अविनाश । तन्न जाय स्वयंज्योती ।
पाहावां लक्ष तेथें । हलूं विसरली पाती ।
नाठवे माझें मज । न कळे दिवस आणि राती ॥ ३

आरती विठलाची । उजळली अंतरीं ।
प्रकाश थोर जाला । साठवेना अंबरीं ।
रवि शशी मावळले । तया तेज्यामाझारी ।
वाजती दिव्य वाद्यें । अनुहतगजरीं ॥ ४

आनंदसागरांत । प्रेमें बुडी दिधली ।
लाधलें सौख्य मोठें । न ये बोलतां बोली ।
सद्गुरूचेनि संगें । ऐशी आरती केली ।
निश्चयें आनंदाची । तेथें वृत्ति निमाली ॥ ५

# २१८ ] ५८ [ १००

ज्ञानदेव कृत उत्तरगीतेची दुसरी प्रत-पत्रें ३७. वरील २१३ वी प्रत पहा. या प्रतीचें हस्ताक्षर भिन्न आहे.

# २१९ ] ५९ [ १००-१५०

श्रीसमर्थ कृत पंचीकरणाच्या दोन प्रती. एकीचीं पत्रें १४ आणि दुसरीचीं १०. एक सुमारें शंभर वर्षां मागची व दुसरी दीडशें.

# २२० ] ६० [ ९८

जगन्नाथ कृत बोधवैभव-पत्रें २०. मूळ संस्कृत श्लोक ११ व टीका ओवीसंख्या ७१२.

हे जगन्नाथ म्हणजे कल्याणांचे तडवळेमठपति जगजीवन ऊर्फ जगन्नाथ नव्हत. या जगन्नाथांचे गुरु अखंडाश्रम ऋषि होत. ग्रन्थाच्या शेवटीं परंपरेच्या व ग्रन्थरचनेच्या कालाच्या ओव्या आहेत त्या अशा :

ऐसें बोधवैभव आख्यान । ग्रंथ बोधवैभव जाण ।
जें जें अखंडाश्रमाचें वदन । बोलिलें तें म्या लिहिलें असे ॥ ७०६
ऋषीश्वरचंद्रकिरणीं । जगन्नाथसोमकांताची वाणी ।
द्रवली हे तों त्याची च करणी । त्यावीण जगन्नाथ पाषाण ॥ ७०७
बोधवैभवसमाप्ति । संतचरणीं अनंतमती ।
विभवाब्दि आरंभसमाप्ति । माघ शुद्धाष्टमीसी ॥ ७१०
सद्गुरमेघेचा गौरव । ते चि बोधाचें वैभव ।
येथें पाहिजे केवळ भाव । गुरूसी चातुर्य नावडे ॥ ७११
केवळ मूर्ख जगन्नाथा । त्यासी ऋषिकृपेवीण अन्यथा ।
उपाय नसे ऐसें संता । निश्चयेसीं कळावें ॥ ७१२

विभव संवत्सर म्हणजे १६७०. या प्रतीचे लेखक विठ्ठल बाळंभट्ट च आहेत, पण त्यांनीं या ठिकाणीं नांव न देतां नुसता लेखनकाल च दिलेला आहे–

" शके १७५९ जयनाम संवत्सरे फाल्गुन शुद्ध तृतीया सोमे दिने रात्रौ द्वितीययामे श्रीपाराशरक्षेत्रे श्रीराममंदिरे देवसंनिधौ ग्रंथलिखितं ॥ "

२२१ ] ६१ [ १५०

श्रीमत् भगवद्गीतेचें ओवीबद्ध भाषांतर. पहिलीं ३ पृष्ठें व मधून मधून कांहीं पृष्ठें दुर्दैवानें गहाळ आहेत. म्हणून चवदावा अध्याय समूळ नाहीं. शिल्लक असलेलीं पृष्ठें १७८ × २ = ३५६ आहेत व ओवीसंख्या ६७५ भरली.

पण हें भाषांतर कोणी केलेलें आहे, तें कोठें च दिलेलें नाहीं. शेवटच्या कांहीं ओवी :

संजय उवाच

वासुदेव आणि पार्थाचा संवाद । कर्णीं ऐकिला अद्भुत आनंद ।
तेणें रोमांच उभे राहोन जाला स्वानंद । तो राया काय सांगों ॥ ७४
वेदव्यासाचेनि प्रसादें । परम गुह्य मी अनुवादें ।
योगेश्वरें श्रीकृष्णें आनंदें । तरराया प्रति सांगितलें ॥ ७५
राया तें मज पुनः पुना आठवत । जो संवाद असे महा अद्भुत ।
केशव अर्जुनाचा पुण्य पवित्र । तेणें मज संतोष होतो पुनः पुना ॥ ७६
जवं जवं आठवे हरीचें रूप । तवं तवं विस्मय होय अद्भुत ।
तेणें मज सुख होतसे विख्यात । पुनःपुना मी काय सांगों ॥ ७७
जेथें पां श्रीकृष्ण योगेश्वर । दुसरा असे पार्थ धनुर्धर ।
तेथें श्री आणि विजयाचा पटिभद्र । हे दोन्ही अचळ असती राया ॥ ७८
अगाध परमात्म्याची करणी । सकळ शास्त्रें मथन करूनि ।
गीता नवनीत काढाउनि । धनंजयासी दिधलें ॥ ७९
तेणें किरीटीस बोध जाला । परमहंसिवणीस मिळाला ।
सकळ लोकां मार्ग सांपडला । भवसागर तरावया ॥ ८०
अर्जुना जालें समाधान । भगवंतकृपेकरून ।
गेलें अज्ञान अंधपण । दिव्य प्रकाश जाला ॥ ८१
यालागीं महानुभाव महाकवि । तत्पर गीता अभ्यासीं ।
तेणें पावले नेमेसीं । अविनाश पद ॥ ८२
ऐसा कृपाळ देवाधिदेव । जड जीव तराया केला उपाव ।
कळल्या गीतेचा गर्भभाव । पुनरावृत्ति नाहीं तया ॥ ८३

शुभ अशुभ तऱ्ही याणी । करावी गीतेची घोरणी ।
तेणें संतुष्ट चक्रपाणी । कर्मबंधन तोडील ॥ ८४

इति श्रीमत् ...

## २२२ ] ६२ [११७

श्रीमन्महामुद्गलसूरिविरचिता श्रीरामार्या, कंकभट्टविरचिता पदार्थद्योतनी दीपिकेसह—पत्रें ४०, संस्कृत ग्रन्थ.

प्रतीच्या शेवटीं लेखकानें आपलें नाव, गांव व लेखनकाल दिला आहे तो असा :

" रुक्मांगदपंडितवंशजसंजीवनात्मजरामचंद्रेण इदं पुस्तकं कृष्णापश्चिमभागे संगरजक्षेत्रे श्रीगुरुकृपाकटाक्षेण लिखितं ॥ शके १७१७ क्रोधननामसंवत्सरे उत्तरायणे शिशिरर्तौ माघमासे शुक्लपक्षे द्वादश्यां तिथौ भृगुवासरे आर्द्रा-नक्षत्रे चतुर्थप्रहरे शिवालये समाप्तं ॥ "

## २२३ ] ६३ [ ३००

अपरोक्षानुभूति—समश्लोकी टिकेसह—पत्रें १३.

टिकेचा शेवट :

समश्लोकी असी टीका । अपरोक्षानुभूतिची ।
यामनें आर्पिली पाई । शेषशाई गुरुत्चिया ॥ १

गुरु माउली जाण माझी निजाची । सुटे स्तन्यधारा मुखीं चिन्मयाची ।
मये बोलता बोलवीतें च नाचे । जसी नाचवी तैसतैसा च नाचे ॥ २
गुरु बाप माझा समर्थ प्रतापी । शिरे काळ धाके जयाचेनि दर्पी ।
म्हणोनी च निश्चिंत मी आज पाही । जगीं मी च मी नांदरे श्रीजगा ही ॥३
गुरु आयके गोड तो शब्द होऊं । उघे गंधलेपें जडोनी च राहूं ।
गुरु देखते रूप होईन मागें । असी मी गुरुशीं मिळोनी च वागें ॥ ४
गुरूच्या जिभेसी रसत्वे चि पैसूं । गुरुनासिके गंधरूपें प्रवेसूं ।
गुरुहातिची ती क्रिया मी च होय । कदापि गुरूवेगळा मी न राहे ॥ ५
गुरु चालतां मार्ग होऊन राहूं । क्रियातीत त्याची क्रिया मी च होऊं ।
त्रिकर्णैकि व्यापार जो सद्गुरूचा । कळों नेदिवा मी च होऊं त्रिवाचा ॥ ६

ऐसा प्रेमसुधा समुद्रहृदईं पूरी भरे सर्वदां ।
गेल्या तेंच तर्वीं समग्र विरली देहादि द्वया पदा ।
स्वानंदें अपरोक्षिचा अनुभव श्रीचंद्रमा उजळे ।
संसारांतिल पाप ताप समुळीं त्याच्या दयेने पळे ॥ ७

कथिली शंकराचार्यें अपरोक्षानुभूति हे ।
तद्ग्रंथदीपिका दावी शिवराम महाकवि ॥ ८

पूर्णानंदप्रसादें हे दीपिका दाविली स्वयें ।
विचारी यासि विश्वासे शिवराम चि तो असे ॥ ९

# २२४ ] ६४ [ २२४

हा २२४ या ग्रन्थ २२४ च वर्षांनीं आज नोंदण्याचा योग येत आहे.

अमृतानंद योगेश्वर कृत योगराजटिळक पत्रें ३४, ओवीसंख्या ११०, प्रकाशनास सर्वथैव योग्य.

दृष्टि जाहाली स्थिर । मना पडिला विसर ।
परमात्मा श्रीगुरु । देखिलिया ॥ २३

दृष्टि देखिल्या श्रीगुरु । मन जाहालें स्थिर ।
मावळला अंधकार । सकळे ब्रह्म चि दिसे ॥ २४

गुरु शिष्य येक जाले । लोकत्रय आनंदलें ।
शिष्यासी लाधलें । समाधिसुख ॥ २५

जालें जन्माचें फळ । पूर्वज उधरले सकळ ।
यत्न सौंसारीचे सुफळ । भेटले श्रीगुरु ॥ २६

गुरुशिष्याची ऐक्यता । जेवी सागरीं मिळाली सरिता ।
नातरि दीप कर्पूरें वोवाळितां । आत्माराम ॥ २७

गुरुशिष्याचा येकांतु । जेवी आनंदला नाथु ।
तेवी अमृतानंदा गुरुनाथु । प्रसंन जाहाला ॥ २८

ग्रंथ सिधी पावला । श्रीगुरु सुखिया जाला ।
आपल्या पदीं बैसविला । प्रेम दिधलें भक्तीसी ॥ २९

जे हा ग्रंथ अभ्यासिती । तया प्राणिया होय मुक्ती ।
जे सादरपणें ऐकती । तया होय ज्ञानमती ॥ ३३०

लेखकाचें नांव, गाव, आणि लेखनकाळ :

" स्वस्ति श्रीनृपशालिवाहान शके १६३० विरोधीनाम संवत्सरे आषाढ वद्य नवमी सोमवासरे तद्दिनी ग्रंथ समाप्त ॥ आपाजीसुत दत्तात्रीना लिख्यते वास्तव्य पारायर्य ॥ "

२२५ ] ६५ [ १५०

मुक्तेश्वर कृत श्रीएकनाथचरित्र-पत्रें ११, ओवीसंख्या ८७.

२२६ ] ६६ [ १५०

श्रीसमर्थ कृत आत्माराम-पत्रें १६

२२७ ] ६७ [ ८२

श्रीसमर्थ कृत गुरुगीता-पत्रें ११ पैकीं ९ वें पत्र हरवलेलें आहे. ओवीसंख्या १४६.

ही गुरुगीता श्रीसमर्थांच्या नांवावर मोडते, पण ती खरोखर च त्यांची आहे किंवा कसें, याचा आम्हांस अद्यापि निर्णय करणें आहे. श्रीसमर्थांच्या लघुकाव्याचा भाग काढण्यापूर्वी या प्रश्नाचा उलगडा करावा च लागेल.

या प्रतीचा लेखनकाल शेवटीं आहे तो : " शके १७७२ साधारणनाम संवत्छरे ज्येष्ठ शुध्य ३ गुरुवासरे क्षेत्र पागरी. " प्रतीच्या शेवटच्या पृष्ठामागें " इदं पुस्तकं आण्णागोसावीयाचे " असा मजकूर आहे.

२२८ ] ६८ [ १५०

श्रीसमर्थ कृत आत्माराम-पत्रें १२

२२९ ] ६९ [ १५०

श्रीरामसहस्रनामस्तोत्रम्-पत्रें १३

२३० ] ७० [१००

श्रीसमर्थ कृत जुनाट पुरुष-पत्रें ८

२३१ ] ७१ [१५०

श्रीसमर्थ कृत श्री श्लोक मनाचे-अपूर्ण

२३२ ] ७२ [१५०

श्रीसमर्थ कृत तत्त्वबोध-पत्र १. हे १९ श्लोक आहेत. हे श्रीरामदासकृत आहेत म्हणून म्हटलेलें आहे. निर्णय व्हावयाचा आहे.

२३३ ] ७३ [५०

हीं नक्क निरूपणें असून तीं कोणी तरी रचलेलीं दिसतात.

२३४ ] ७४ [२४८

पृ सं. २१३ × २ = ४२६, शिवाय आरंभींचीं ३४ गहाळ व बहुधा तितकीं च शेवटचीं गहाळ.

या बाडांत जिनधर्मियाचा जयमाला ग्रन्थ आहे. त्यांत सरस्वतीपूजा, गुरुपूजा, गोमटस्वामी अष्टक, सामुद्रिक, सिद्ध, सप्तऋषिपूजा, धर्मचंद्रकृत गुर्वाष्टक, वादिचंद्रविरचित श्रीपाल आख्यान, जंबुस्वामीरास, चोवीस तीर्थंकर, मत, देवेंद्रकीर्तिकृत ल्हुनदीश्वरपूजा, आदित्यवारकथा इत्यादि प्रकरणें आहेत. या बाडांत संस्कृत, मराठी, मारवाडी या तिन्ही भाषांचा उपयोग केलेला आहे.

वर ९८ व्या पृष्ठावर जो श्रीसमर्थांचा चित्ता दिला आहे, त्याची जशी लिपी आहे, तशी या बाडाची आहे. या बाडांतील लिपीच्या आधारें तो चित्ता वाचता येईल व तसा तो केव्हा तरी वाचला पाहिजे.

या बाडाच्या २७ व्या पृष्ठावर या बाडाच्या लेखकाचें नाव, गाव व हेतनकाल अशीं दिलेलीं आहेत, तीं अशीं :

संवत् १७४१ वर्षे माहा वदि ११ दिने गुरुवासरे लिखितं ॥ संघवी चिंतामणी साहवावनार्थ ॥ श्रीअवरंगावादनगरे ॥

म्हणजे शके १६०६ माघ वद्य ११ गुरुवार हा दिवस येतो.

हें बाड तडवळेमठांत यावें, याचें थोडें आश्चर्य वाटलें. पूर्व कालीं श्री समर्थसांप्रदायिक मठ सर्वसंग्राहक असत, याचा हा पुरावा च होय. श्रीसमर्थांची तशी शिकवण च होती.

मूर्ख येकदेसी होतो । चतुर सर्वत्र पाहातो ।
जैसा बहुधा होऊन भोगितो । नाना सुखें ॥ ११-१०-१
तो चि अंतरात्मा महंत । तो कां होईल संकोचित ।
प्रशस्त जाणता समस्त । विख्यात योगी ॥ २

**२३५ ]** ७५ [ ३८

पूर्वारंभ, पंचसमासी, सप्तसमासी, अंतर्भाव, आत्माराम, जनस्वभावगोसावी, सोलीव सुख, जुनाट पुरुष, चतुसमासी, अशीं हीं प्रकरणें अगदीं अलिकडे एका ठिकाणीं लिहिलेलीं अशीं आहेत. अगदीं वरील पृष्ठावर "श्रीसमर्थ कृत स्फुट ग्रन्थ" असें असें म्हटलेलें आहे. पण सोलीव सुख हें प्रकरण श्रीसमर्थांचें नसून कल्याणांचें असावें, असें मला वाटतें. पुढें निर्णय होईल च.

**२३६ ]** ७६ [ ८३

*श्रीसमर्थ कृत येकवीससमासी–पत्रें १२० प्रतीचें अक्षर मोठें आणि सुंदर आहे.*

लेखनकाल वगैरे शेवटीं आहे तो असा :

ही येकवीससमासी रघुनाथ बापुजी याने पठनमननार्थे केशवराव नारायण यांजकडोन लिहिविली असे मिती भाद्रपद वद्य ११ सन १२५७ फस॰ संवत १९०६ ॥ येकंदर संख्या वोव्या १३३५ ॥

**२३७ ]** ७७ ११४

पृ. सं. ८४ × २ × २ = ३३६, शिवाय दहा वीस आरंभींचीं आणि शेवटचीं गहाळ.

हें सबंध बाड संस्कृतांत आहे. त्यांत सुभाषित श्लोक पुष्कळ आहेत, कांहीं आख्यानें हि आहेत.

त्यांत आपल्याला सध्यां दोन प्रकरणें स्वतंत्रपणें उतरून ठेवली पाहिजेत व केव्हां तरी प्रसिद्ध केलीं पाहिजेत :

एक, श्रीसमर्थस्तवनपर पांच अष्टकें. पांच हि मिळून ४२ श्लोक होतात व शेवटीं एक स्वतंत्र श्लोक आहे तो असा :

यः पंचरत्नमपि चाष्टकमादरेण ।
संकीर्तयत्यनुदिनं हरिदासवृंदे ।
अप्पाख्यपंडितमसौ हृदि विस्मरेत्किम् ।
एषा कृतिर्यदमुना गदिताग्रगण्या ॥ १

आणि दुसरें प्रकरण हि महत्वाचें आहे. त्यांत शके १६६० त जगन्नाथादि समस्त रामदासशिष्यांनीं कालगांवचे पंडित श्रीकृष्ण यांना प्रश्न केला कीं, श्रीसमर्थांनीं शेवटपर्यंत ब्रह्मचर्याश्रम च चालविला, तेव्हां त्यांचा हा आश्रम कोणता म्हणावा, त्याला शास्त्रांत आधार काय आहेत ते आम्हांस सांगा, त्यावरून पंडितांनीं शास्त्राधारें श्रीसमर्थांच्या पंथाचें समर्थन केलें, असा कथाप्रसंग वर्णिला आहे. पंडितांच्या समर्थनाचें मुख्य सूत्र असें कीं, नायं ब्रह्मचर्याश्रमः किं तु परिव्राडाख्यश्चतुर्थाश्रमभेदः परमहंसवत् ।

२३८ ] ७८ [२००

पृ. सं. ४४ × ४ = १७६, पैकीं आरंभींचीं १८ व विरळीं व शेवटचीं गहाळ.

या बाडांत विठ्ठलदासकवि कृत जानकीस्वयंवर आहे : सर्ग पहिला—जानकीउत्पत्ती, श्लोक २८-६१, सर्ग दुसरा—अहिल्योद्धरण, श्लोक ५८, सर्ग तिसरा—मिथिलाप्रवेश, श्लोक ४९, सर्ग चवथा—रावणमानभंग, श्लो. ५५, सर्ग पांचवा—धनुर्भंग, श्लो. ५२, सर्ग सहावा—लग्ननिर्धार श्लो. ४१, सर्ग सातवा—अपूर्ण श्लो. २१.

२३९ ] ७९ [१००

एक सर्वसंग्राहक पुस्तक—

( १ ) पूर्णानंदांच्या शिष्यास स्वामींचीं निजबोधाचीं मागए फदम्यांचीं

बारा पदें, ( २ ) जैसा भांड्याचा गलोळा वगैरे एक तुकडा, ( ३ ) त्रयोदशाक्षरी मंत्राचा कागद, ( ४ ) बखरीच्या दुसऱ्या अध्यायाचीं ९ पानें, ( ५ ) तुकारामाचे अभंग, ( ६ ) जगन्नाथाच्या कथा वगैरे, ( ७ ) पंचमुखी हनुमत्कवच, ( ८ ) एकनाथी भागवताचीं २०० वर्षांमागचीं काहीं पानें, ( ९ ) श्रीसमर्थ, सुरदास, कल्याण, जगजीवन, सखाराम यांचीं किरकोळ पदें, व श्रीरामनवमीची कथा, ( १० ) श्रीज्ञानदेव तुकाराम–या अमरामाजी येखादा बोलतु म्हणे ।, ( ११ ) मुक्ताबाईचें एक पद, ( १२ ) नाथभुजंगांचीं पदें, सामुद्रिक लक्षणें, ज्ञानदेवकृत पंचमुद्रा व काहीं औषधें–विशेषत:– घोड्याचीं, ( १३ ) मीरा, सुरदास यांचीं पदें व शकुनवती, ( १४ ) येकनाथ कृत जोहार, ( १५ ) श्रीसमर्थ कृत सुंदर रामाबाई, ( १६ ) येकनाथ कृत पिता सांगे पुत्रासी । नको जाऊं पंढरीसी ।, ( १७ ) ज्ञानदेव कृत ७ अभंग, ( १८ ) एकनाथकृत हस्तामलकाचीं काहीं पानें, ( १९ ) कोणी रावजी नीळकंठ यांनीं मनुष्याकृति काढून तींत पिंडब्रह्मांडाचें ऐक्य दाखविलें आहे– अभ्यसनीय, ( २० ) त्या च नीळकंठसुतानें चत्वारदेहाचा काढलेला नकाशा– उपयुक्त, ( २१ ) महामंत्राचा कागद, ( २२ ) अप्रकाशित अशा गोड छुवाख्यानाचा एक च तुकडा, ( २३ ) श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य वासुदेवेंद्रकृत विवेकसारमहाराष्ट्रभाषाप्रबंध दोन पत्रें, ( २४ ) समाधिप्रकरण गद्यात्मक– दोन पत्रें, आणि ( २५ ) किरकोळ.

येणें प्रमाणें तडवळे मठातील संग्रहाचें स्वरूप आहे. तडवळ्याचें काम उरकून तिसऱ्या दिवशीं बैलगाडीनें बार्शीस जातांना वाटेंत दोन तास

## पांचरी

येथें थांबून तेथील मठ आणि मठांतील संग्रह पाहिला. एके काळीं मठांत असलेल्या पुस्तकाची एक यादी आढळली. ती यादी सुमारें दीडशें वर्षांमागची आहे. ती येथें देतों, अशासाठीं कीं, त्यावेळीं मठांत संग्रह कोणता होता, आज त्यांपैकीं किती उरला आहे व त्यांत पूर्वी न ऐकलेले ग्रन्थ कोणते आहेत, हें कळावें.

### यादी पुस्तकें सुमारे स्मरणार्थ

| | |
|---|---|
| १ बाळकांड रामायण येकनाथी | १ गंगामाहात्म्य म्हनसी स्नानस्तोत्र |
| १ किष्किंदाकांड रामा० येकनाथी | १ सामुद्रिक लक्षणें पाहणें |

१ आरण्यकांड रामा० येकनाथी
१ युद्धकांड रामा० कृष्णदासमुद्गली
१ मनाची वही थोरली कृष्णाजिनाची
१ धाकटी मनाची वही भिक्षेची
१ सगुणध्यानाची वही धाकटी
१ श्री शंकराचार्यविरचित पंचीकरण-
महावाक्यसिद्धान्त
१ शरीर उपनिषद्
१ वेणीस्वामीचा कौल
१ स्मार्त भागवत येम्यादशीनवभेद-
निर्णयसिद्धान्त पट
१ रामदुर्ग
१ यशोदेनें संकटचतुर्थी केली कथा
१ स्वप्नाध्यायलघु
१ प्रदोषस्तोत्र संस्कृत
१ दिवसप्रहरपरत्वें पिंगळ्याचें फळ
१ देहल्का अहंकाररावण वर्णन
१ मच्छनाथाच्या रावण्या साव
१ लक्ष्मीपंजर
१ श्लोक येकापाठी यद ४
१ पंचीकरण महावाक्य श्रुति संमत
१ भवानिस्तवराज
१ शिवकवचरुद्रयामळ
१ भरतभेटी आर्या मोरो पंडित
१ हनुमान्मालामंत्र यद ४
१ गवाळ प्रथाची वही घर मूर्ति
१ दशीगाणें चाळी कृष्णपंताची वही
१ राम-कृष्ण-उपासकांचें भांडण
यद २
१ वामनस्वामीचा ग्रंथ चरित्र २७
१ स्वामींच्या हातची वही पत्राची
हरणाच्या कातड्याची थोरली
१ अहिरावण महिरावण चरित्र
१ घराचें आयुष्य पाहणें
१ पुत्र्यां लिहिण्याची रीति यद ३
१ ब्राह्मणतीर्थप्राशनीं आश्रयवचनें
१ रारायंत्र
१ म्लेंछविवाहवाक्य
१ साधुमाहात्म्य कवि खासे कथा १
१ गणेश उपनिषद्
१ पंचीकरणमहावाक्य ज्ञानेश्वर संमत
प्राकृत यद ८
१ पंचीकरण समर्थांचें यद दुपट ४
१ सत्वोत्पत्ति पिंडोत्पत्ति खंड ४ पत्रें
२ ब्राह्मणाचीं
१ सपल्लव सबीज यंत्रोक्त मंत्र मन्युचा
१ धर्मराज कुतर्क्याचें भांडण
१ स्वानंदचूर्ण सिद्धाचें
१ गुरुकवच
१ विवाहगधर्वपद्धति
१ ज्ञानेश्वराचा खेळ चौऱ्यासीचा
१ हस्तामळ संस्कृत
१ दक्षिणामूर्तिस्तोत्र
१ गुरुसहस्रनाम
१ गुरुस्तोत्र
१ गुरुपद्धतिनमस्कार
१ द्वादशमंजरी आचार्यस्वामी
१ श्रीरामलघुमानसपूजा
१ दशावतार श्लोक १०
१ रावणाची आदि वनपर्व
१ भरतभेटी पट्टाभिषेक वही
१ नामसुधा वामनस्वामीची
१ सरस्वतीस्तोत्र
१ रामगीता
१ नामसुधांकित स्तोत्र
१ रामधराभाणिक स्तोत्र

श्लोकबद्ध वही घायटी
१ सुंदर प्रकाश वोयी ११६
१ गुरूचा वोंदानिरूपण अभंग
१ द्रौपदीधांवा
१ गरुड आख्यान वही
१ गीता फकिरायांची
१ वैद्यदेव
१ मुद्राधारण स्तोत्र
१ द्वादशतिलक स्तोत्र

मठाची परंपरा:—श्रीकल्याण-रामाजीबुवा, पुण्यतिथी श्रावण व. १३-अनंतबुवा, पु. ति. भाद्रपद वद्य १२ (बहुधा शके १६९५, मागील बाडाव ५५ पहा)—अनंतबुवा ऊर्फ बापु पु. माघ व. १-रामबुवा पु. कार्तिक शु. १५—रघुबुवा पु. माघ शु. ७-अनंतबुवा विद्यमान. मठाला उत्पन्न थोडें आहे, सरासरी दोनशेंचें.

## पांयरी मठांतील उपलब्ध संग्रह

## २४० ] १ [१००

पृ. स. ६४ × २ × २ = २५६.

श्रीसमर्थ कृत चौदा शतकें व स्फुट ओव्या पैकीं पहिले ४१ अभंग मिळून हें सबंध बाड होतें. श्री रामदासी ग्रन्थमालेतील तिसऱ्या भागात ही कविता आपण छापली च आहे.

बाडाच्या पहिल्या पानावर कोरी जागा पाहून तुकाराममहाराजांच्या निर्याणाचा अभंग सहज लिहिलेला आहे :

शालिवाहन शके पचराशे येकाहत्तर। विरोधी संवत्सर उत्तरायण ॥ १
फाल्गुन वद्य द्वितीया दिवस सोमवार। प्रथम प्रहर प्रात काळीं ॥ २
तये दिवशीं तुका कीर्तन करितां। म्हणे मज आतां निरोप द्यावा ॥ ३
तुका म्हणे माझें नमन संतपायां। ऐसें म्हणोनियां गुप्त जाला ॥ ४

## २४१ ] २ [२००

पृ. स. १७६ × २ = ३५२.

या बाडात (१) वामन कृत गोपीगीत व (२) हरिविलास, (३) एकनाथ कृत कौसल्येचे डोहळे, (४) वामन कृत श्रीरामजन्म, (५) अपूर्ण मार्तंडअष्टक, (६) तुकाराम कृत बाळक्रीडेचे १०२ अभंग व (७) मनाचे श्लोक १ ते २८ अपूर्ण, अशीं प्रकरणें आहेत.

# २४२ ] २ [ १११

पृ. स. १०६ × २ = २१२

( १ ) श्रीसमर्थ, अमृतेश्वर, अनंत ( हे बहुधा याच मठाचे असावेत, याच्या एका पदात मैलार येथील खंडोबाचा व दुसऱ्या एका पदात कृष्णा उत्तरवाहिनी होऊन तिच्या तटाकीं असलेल्या बदरीग्रामाचा उल्लेख आला आहे ), जगज्जीवन ( याच्या मधून मधून रामनवमीच्या कथा आहेत), रंगनाथ, येकनाथ, शिवराम पूर्णानंद, मुद्गलस्वामी, वेणी, शेखमहमद वगैरेंचीं पदपदातरें

( २ ) श्रीसमर्थांच्या अप्रकाशित पाच भूपाळ्या

( ३ ) श्रीसमर्थकृत–हरिजन या श्रीहरिभजनें जन तारनि आपण तरले ॥ ध्रु०

( ४ ) शिवदिनकेसरीकृत–रामदास सद्गुरु अविनाशी हृदयी जपना ॥

( ५ ) रंगनाथ कृत–रामदास चतुराक्षरि मंत्र जप वारंवार ।

( ६ ) जगज्जीवन कृत अजनीसंवाद, ओवी ६८, शेवटीं :

शके १७४१ प्रमाथीनाम सवत्सरे ... आषाढमासे कृष्ण पक्षे अष्टम्यां तिथौ ... सौम्यवासरे तासगाव ग्रामे लेखनसमाप्त ॥ विद्यमान गोविंदराव सोवनि पेठ सोमवार ॥ सन १२२९ रमजान छ २१ बुधवार

( ७ ) नतर कल्याणस्वामींचीं पदें, अभंग व श्लोकाष्टकें मिळून ८२ आहेत व शिवाय स्फुट श्लोक ४४ आहेत आणि शेवटीं :

शके १७४१ . . श्रावणमासे शुक्लपक्षे द्वितीया मदवारे ... ॥ विद्यमान गोविंदराव व व्यंकटराव सोवनी . .

( ८ ) नतर जगज्जीवन कृत गणपति आख्यान, ओवी ६०, असून त्याच्या शेवटीं शके १७४२ वृषनाम सवत्सरे चैत्र शुद्ध १४... विद्यमान पांडुरंग नरसिंह मेहेंदळे...

# २४३ ] ४ [ १५०

पृ. स ८० × २ = १६०.

( १ ) अनतनदन, रगनाथ, राम कवि, श्रीधर, सुरदास, येकनाथ, रामदास ( कृत हनुमत भेट, ओवी ६८ ), नरहरि माळी, अमृतेश्वर, आनदतनय, अनंत, नामा, तुका, इत्यादिकांचीं पदपदातरें.

( २ ) सहदेव भाडळी, ज्योतिष, मंत्रयंत्रें वरीं च आहेत.

( ३ ) शेवटचीं ३० पृष्ठें धन्वंतरी म्हणून ग्रन्थ आहे, त्यांत अनेक रोगांवर औषधें दिलीं आहेत.

( ४ ) मध्यें च एका ठिकाणीं दोन सुभाषितें आलीं आहेत, एक संस्कृत आणि दुसरें प्राकृत. त्यांपैकीं दुसरें असें :

कांतारीं विटपा तळीं गिरिदरीगर्भी रहावें सुखें ।
त्याहूनी मरणें पशादिक मुखें त्यांचीं पहावीं मुखें ।
हें देवा मज मानलें परि नको ऐसे स्थळीं राहणें ।
जेथें भूपतिला मनुष्य न कळे धीमंद कीं प्राहणें ॥ २

२४४ ] ५ [ १००

पृ. सं. ४३ × २ × २ = १७२. शिवाय प्रारंभींचीं, शेवटचीं आणि मधलीं वरीं च गहाळ. फार महत्त्वाचें आहे.

( १ ) यांत श्रीसमर्थ, केशव, तुकाराम, येकनाथ यांची कविता वरी च आहे. श्रीसमर्थांची कांहीं अप्रकाशित हि आहे. शिवाय कल्याण, श्रीधर महानंद, उद्धवचिद्घन, रामराज कल्याण, जगज्जीवन, स्वामीदास, दत्तात्रय किंवा दत्तात्री ( दोघे बहुधा एक च ) नामा, चिंतामणी, राघव, चिन्मयनंदन, कृष्णदास, जनीजनार्दन, शिवदिनकेसरी, पुरुषोत्तम ( कृत कल्याणांची आरती ), अनंत, निंबक, निंबराज नरहरि, मृत्युंजय, जनजसवंत यांचीं हि थोडीं फार पदपदांतरें आहेत.

( २ ) वेणाबाई कृत

( १ ) तुझ्या नामेंवीण मन कंठेना ।
( २ ) सेवकसाभिमानी राम कोदंडपाणी ।
( ३ ) स्वरवर्णव्यक्तिरहित ।
( ४ ) मन कां रावर्वी आरेना ।
श्रवणकीर्तनविष्णोस्मरणी हेत कां धरीना ॥ १
उदरीं गर्भवास सोसिले नवमास तें दुःख कां स्मरेना ॥ २
वेणी म्हणे हें कैसें अभाग्य दुर्से हें सरेना ॥ ३

( ३ ) राघव हे कल्याणांचे बंधु शिरगांवमठपति दत्तात्रय यांचे पुत्र व शिष्य दिसतात. त्यांचा उल्लेख बाडांक १३७ त व इतरत्र आलेला आहे. त्यांचीं जीं पदें आहेत, त्यांतील तें एक पद पुराव्यासाठीं सबंध देऊन ठेवणें इष्ट वाटतें.

भक्तासी बुद्धि देउनि तारणें । आचार शीद्र पावन करणें ।
स्वधर्मासाठीं दुर्जना संहारणें । येवढें माझ्या स्वामीचें करणें ॥ ध्रु०

स्तंभेंविण उभारी अवनी । उत्पत्तीयोग चाळवी जीवनीं ।
आत्मत्वकळा विचरे भुवनीं । व्यापकपणें आपण जनीं वनीं ॥ १

कर्माधेन जीव सर्व केले । देहात्मयोग भूतान्वयो चाले ।
त्यामध्ये कोणी स्मरणीं टागले । आपुलें पद देउनी स्थापिले ॥ २

स्वामी सज्जनपर्वतनिवासी । तारकब्रह्म अव्यय सुखरासी ।
सद्गुरुरूपें नमूं दत्तात्रयासी । स्मरणमात्रें तारिले राघवासी ॥ ३

( ४ ) शिवदिनकेसरींची श्रीसमर्थभक्ति प्रसिद्ध आहे. अशी अशी स्वानुभवी मंडळी जें उपदेशितात तिकडे दुर्लक्ष कसें करावें !

बोला रे बोला श्रीरामनाम वाचे बोला ॥ ध्रु०
हातें करवी टाळि वाजवा । भावें करुनी देव रिझवा ।
नामाचा मुखीं गजर गाजवा । प्रेमानंदें डोला ॥ १
या तनुचें भीषण सांडुनी । सद्गुरूसी शरण जाउनी ।
काया वाचा मन देउनी । स्वसुख ज्योति उजळा ॥ २
साधा बरवें हें चि साधन । बोले केसरीचा शिवदीन ।
मी कोण हें ठाईं पाडुन । भवभय अवघें टाळा ॥ ३

( ५ ) केशवस्वामी भागानगरचे हे श्रीरामदासपंचायतनांतील होत. श्रीरामदासी संग्रहांत सर्वत्र त्यांचीं हजारों पदें सांपडावीं, यांत नवल नाहीं. हैद्राबादेस रंगारी लोकांत त्यांचा शिष्यसंप्रदाय फार होता व अजून हि तेथें त्यांचे अभिमानी त्या च लोकांत सांपडतात. त्या लोकांत आज हि बारकाईनें तपास केल्यास त्यांच्या कवितेचीं बाडें आढळतील. रंगारी शिष्यांना उद्देशून केशवस्वामी एका पदांत म्हणतात—

आम्ही रंगारे रंगारे । रामनामें रंगलों या रे ॥ ध्रु० ॥
रामरंगें रंगा आलों । आम्ही रंगारे पै जालों ॥ १
म्हणे केशव मी रंगारा । रंगविला जन सारा ॥ २

( ६ ) त्यांचें आणखी एक छोटें पद देतों. जांबेला श्रीसमर्थांपाशीं गेलेलीं माणसें वेडीं कां होतात, त्याचें कारण या पदावरून उमगतें :

वेडियाच्या गांवा गेलों । मी हि वेडा होउन ठेलों ॥ १
आतां बोलों नका कांहीं । आम्हा माणुसपण नाहीं ॥ २
केशव म्हणे जवळी याल । तरी तुम्ही वेडे व्हाल ॥ ३

तेव्हां जांबेला जाणारांनीं विचार करून च गेलें पाहिजे.

( ७ ) या बाडांत मध्यें च एका ठिकाणीं " अनंतबावाची वही आमच्या मठाची वही " असा मजकूर मोडींत आहे.

# २४५ ] ६ [ १५०

पृ. सं. ५६ × २ = ११२. जमाखर्चाच्या आकाराची वही.

( १ ) श्रीसमर्थ, ज्ञानदेव, तुका, नामा, नरहरि माळी, एकनाथ, केशव, त्रिंबक, अमृतेश्वर, चिन्मयनंदन, कृष्णदयार्णव, रंगनाथ निजानंद, आनंदात्मज, शिवदिनकेसरी, आदिनारायण, यांचीं कांहीं पदें.

( २ ) गोसावीनंदन, आनंदतनय व बाळदास मिळून ताटिकावध-धृणिका, पृ. १

( ३ ) हरि कृत चंद्रावळीचे श्लोक, पृ. ९

( ४ ) मुकुंदराज कृत परमामृत, संपूर्ण, ओवीसंख्या ११४, पृष्ठें १९ ते २८

( ५ ) स्वरोदय, नाडीभेद, तत्वनिर्णय इत्यादि प्रकरणें पृष्ठें १४ ते १८, रामजानकीसंवाद विहंगमाची कथा पृ. २८ ते ३१, पद्मपुराणांतर्गत सिद्धान्तसार, कपिलगीता वगैरे पृ. ३५ ते ४७ व श्रीदत्तात्रयभगवत्कृते वेदांतशास्त्रे गुरुशिष्यसंवादे स्वात्मसंवित् पृ. ४८–५६ हीं सारीं प्रकरणें संस्कृतांत आहेत.

२४६ ] ७ [ १५०

पृ. सं. २२ × १ × २ = ८८.

( १ ) श्रीसमर्थ, मध्वमुनेश्वर, दासी जनी, तुकाराम, एकनाथ, जगजीवन यांचीं पदपदांतरें

( २ ) तुकाराम महाराजांचे श्रीरामचरित्रपर २५ अभंग, बहुधा अप्रकाशित.

( ३ ) विक्रमशालिवाहनयुद्धकथा, अपूर्ण, ओवी १२१, त्यामुळें कोणकृत हें पटकन् सांगतां येत नाहीं.

तेथें जाउनि परियसी । आदरें भेटावें विक्रमासी ।
म्हणावें तुम्हां नमरपुरीसी । बोलाविलें ईंमें ॥ २५

हातीं घेउनिया ताळ । उर्वसी नाचे उतावेळ ।
तव गोमासी भूपाळें । सोडिली घरीं ॥ ५०

मग पैठण नाम नगरी । तेथें शालिवाहन जन्मला अवधारीं ।
द्विज वडवाचे कुमारी । पासूनि जन्मला ॥ ७५

तो पुत्र आणि कुमारी । दोघे खेळती बाहेरी ।
मग वेताळ पुसे उत्तरीं । तयातें जाणा ॥ १००

मग पार्तिकें जाउनी । रायासी सांगती वचनीं ।
तुम्ही यावें सिद्ध होऊनि । संग्रामा पै ॥ १२५

( ४ ) नाममहिमा ओवी ६२ ते ८४, बहुधा नाथकृत.

आसन ध्यान परिश्रम । न करूनि म्हणे राम राम ।
तेणें कोटिजन्माचा हरे श्रम । उत्तमोत्तम ते प्राणी ॥

( ५ ) ब्रह्मांडपुराणांतर्गत गणपतिस्तोत्र.

२४७ ] ८ [ २००

पृ. ११ × ४ = ८४, उसवलेलें, कित्येक पृष्ठें नष्ट.

हें ज्योतिषाचें बाड आहे. चोरप्रश्न, नष्टप्राप्ते उपायः, द्रव्यव्यवहार, संक्रांतिसाम्य, गृहप्रवेश, विवाहे वर्ज्यकर्माणि, घाटचक्र, वास्तुप्रकरण, ग्रामचक्र,

रुद्रपट, ग्रहपट, तिथीविचार, वारविचार, नक्षत्रविचार, मासफळ, दिशापरत्वें गृहें स्नानपानशयनाआदि, कलशवास्तु, गृहप्रवेश, नूतन वस्त्रधारणें, स्वामी-सेवेस मुहूर्त, हरपली वस्तु पाहणें, रोगमुक्तस्नान, नांगरास मुहूर्त, पेरणीस मुहूर्त, नक्षत्ररत्वें ज्वरमर्यादा, रोप लावावयास मुहूर्त, सर्वार्थसिद्धियोग, वेळामुहूर्त, गुरुशुक्रास्तीं वर्ज कर्म, राहुकेतूचीं फळें, शिल्पकलास मुहूर्त, इत्यादि अनेक प्रश्नांचा संस्कृतवचनाधारें प्राकृतांत विचार केला आहे.

# २४८ ]

१. [११४

पृ. सं. १६ × २ × २ = ६४. महत्त्वाचें.

( १ ) अन्वय व्यतिरेक, आकाशाचीं तीन रूपें, चत्वार देह, पंचीकरण, उभारणी संहारणी इत्यादि विषयांचें गद्यांत विवेचन करून श्रीसमर्थांच्या ओवींत सार काढलें आहे कीं,

एवं काय पाहाणें तें येथें चि पाहावें ।
कैसें तें येथें चि समजावें ।
सूक्ष्माचीं चौदा नांवें । येथें चि शोधावीं ॥

तात्पर्य, या एका ओवीचें स्पष्टीकरण या बाडाच्या आरंभींच्या ५२ पृष्ठांत केलेलें आहे आणि माझ्या मतें हें स्पष्टीकरण श्रीवेणाबाईचें असावें, तें जर बरोबर असेल तर हें सारें विवेचन एकवार प्रसिद्ध झालें पाहिजे. विवेचनाचा शेवट वेणाबाईच्या एका पदानें केलेला आहे आणि म्हणून हें सारें विवेचन त्यांनीं च केलेलें असावें, असें मला वाटतें. तें पद :

पाहतां पाहतां द्वैत सरलें वो वो ।
सेखीं पाहणें मात्र चि उरलें वो वो ।
उरलें पुरलें वृत्तिस्फुरणाचें वोहें ।
हें हि माय आतां हरलें वो वो ॥ १
आतां सांगणें खुंटलें बाइये वो ।
आजि सांगतां चे ऐसें काहीं चे वो ।
सांगणें ऐकणें मनाचिये वोहें ।
हें हि माते आतां हरलें वो ॥ २
रामदासयत्न राम चि आलें वो वो ।
जैसें सागरीं लवण मिळालें वो वो ।

मावाळेंगें ऐसीं तिथें चार पाहाटीं ।
समर्थांला अद्भुत वाटे विशांठीं ॥ २
देखोनि डोळां दृढदृढ सुखाचा । तो खोटला पर अपार साचा ।
केला नमस्कार वहीड पुत्रें । आनंदलीं पाहुनि सर्व गात्रें ॥ ३

(५) एकनाथी भागवतांतील आणि रामायणांतील कांहीं प्रसंग.

(६) समर्थ, तुकाराम, ज्ञानदेव यांचे उतारे असलेलें ओवीबद्ध गजेंद्रमोक्ष प्रकरण

(७) तुकाराम कृत पक्षिणीचें आख्यान

(८) विठल कृत श्लोकबद्ध अहिल्योद्धार श्लो. ५८

वाल्मीकिचें प्रमेय संस्कृत गोड याचा ।
सीतास्वयंवरकथा उठया तयाचा ।
स्वर्गं द्वितीय रघुराजचरित्र वाणी ।
विप्रज्ञ विठल म्हणे परिसोत कर्णीं ॥ ५८

उठया = रूपांतर, भाषांतर.

(९) राघव कृत ओवीबद्ध गणपती आख्यान, ओ. ६३

हा गणेशपुराणींचा इतिहास । स्वयमेव वदती वेद विद्वांस ।
ऐसिया ऐकिले कथेस । म्हणोनी संतोषें राघव वदे ॥ ६३

(१०) कल्याण कृत शुक्र आख्यान, श्लो. १८

(११) जगन्नाथ कृत रावणाची आदि

(१२) माधव कृत हनुमंतचरित्र. हे माधव कण्हेरीमठाच्या वासुदेवांचे शिष्य दिसतात.

(१३) अनंत कृत श्लोकबद्ध हनुमंतभेट

(१४) राघव कृत दुग्धशीजारोपण आख्यान, ओ. ५५

(१५) वामन कृत लोपामुद्रासंवाद

(१६) वाल्मीकिचरित्र, कोण कृत न कळे, ओ. ५८

(१७) वेणीस्वामी कृत अति गोड कौलाचे श्लोक

(१८) संतमालिका, कोण कृत न कळे, ३२ श्लोक. श्रीसमर्थांच्या वाट्याला आलेला ९९ वा श्लोक :

देहीपरत्र तृणवत मानी । प्रीति सदृढ श्रीरामध्यानीं ।
ज्याची सत्कीर्ति त्रैलोक्य वानी । धन्य धन्य तो रामदास ज्ञानी ॥

१८५४ फाल्गुन व. १

२५१ ] १२ [ १५०

पृ. सं. ३९ × २ = ७८ शिल्लक, शिवाय आरंभींचीं १० व शेवटचीं ३० नष्ट.

या बाडांत एक च प्रकरण आहे, पण त्याचा आद्यंत नसल्यामुळें प्रकरणाचें नाव व कर्त्याचें नांव पटकन् कळण्याला मार्ग नाहीं. शिल्लक असलेल्या पृष्ठांत ७५ ते ६३४ इतक्या ओव्या येतात. हें प्रकरण कोणतें आहे, हें ज्यांना आज हि सांगता येईल किंवा पुढें मागें उमगेल, त्यांना ओळख पटावी म्हणून कांहीं ओव्या उतरून ठेवतों —

सवती करावी आपणासी । हा हेत आहे मजपासी ।
राजेश्वराच्या मनासी । समरससी तुवा द्याला ॥ १०१

तत्वज्ञानार्थ जगजेठी । पुढ नेम नेमिला अष्टी ।
आवतरेल कृतमाळा पयस्विनीतटीं । कुपारष्टी पाहुनीया ॥ १०५

कैसा चाळउनी नेला भगागोंदीला रामराजान ।
तेथ आमुचा मानुदास गेला आणिला सोडऊन ॥ ४५३

श्री राम जय राम जय जय राम ।
माझे कठीं भूषण अक्षरें तेरा हो ॥ ४७१

देहु गावींचा तुकाराम भगवद्गुणाते वाणी ।
वाणी सरत्री जाहाली पचमवेदाची ते वाणी ॥ ५११

कल्युगांत जन्म जाले चवसष्ट पासष्टी ।
पुढें हि सांगसील गौडवगाटयाची गोष्टी ॥ ५४८

आमुचा जन्म नेमला कृतमाळा पयस्विनीतटाकीं ।
तेव्हा सांगसील कीं गौडवगाटयाची सोडवण करावी ॥

काये यती परितोसी राजेश्वरा जन्मासी आल्याला ।
जग पावन करण्याचा अधिकार वाल्या आल्याला ॥ ५७९

२५२ ] १३ [ १५०

पृ. सं. २८ × २ = ५६, शिवाय कांहीं गहाळ.

( १ ) मुकुंदराज विरचित परमामृत — अपूर्ण

( २ ) एकनाथ कृत गुह्यपंचक — अभंग समाधीचे ५
( ३ ) तुकाराम कृत गुह्यसप्तक — अभंग समाधीचे ७
( ४ ) ज्ञानदेव कृत गुह्यपंचक — अभंग समाधीचे ५
( ५ ) शिवदिन कृत एक कटाव

वृक्षावरता पक्षि बैसला क्षणभर येऊन ।
राहिना जाईल उडून ।
नाहि भरवसा पक्षि निघेल हा कुडितुनि प्राण ।

( ६ ) येकनाथ, ज्ञानदेव, जनी, नामदेव, तुकाराम, केशव आणि निवृत्ति याचे काहीं अभंग.

२५३ ] १४ [ ११

पृ. सं. ४९ × २ = ९८, पैकीं एकाद दुसरें पत्र गहाळ.

या बाडात आरंभापासून तों शेवटपर्यंत हंसस्वामी कृत संकेतकुरडी हा ग्रन्थ आहे.

( १ ) पारखी पचाईत न करता, मिळेल तें प्रकरण, शुद्धाशुद्ध न पहाता वाटेल त्याच्या नावावर छापण्याचा, परवा परवापर्यंत महाराष्ट्रानें दंडक घालविला असल्यामुळें हें प्रकरण पूर्वप्रकाशकानीं श्रीसमर्थांचें म्हणून अशुद्ध छापलेलें आढळतें. हें प्रकरण आहे हंसस्वामींचें. ते हंसस्वामी शके १७२० ते १७७७ या काळात होऊन गेले. असें असता श्रीसमर्थांच्या समग्र ग्रन्थात श्रीसमर्थांचें म्हणून तें बेधडक छापलेलें आढळतें !

( २ ) प्रस्तुत बाडात या प्रकरणाचा रचनाकाल आढळतो, तो असा :

सतरासे येकसष्टी शक । सवछर विकारी नामक ।
शुक्लपक्ष ज्येष्ठाधिक । द्वादशी मदवासर ॥ २०-४४

म्हणजे शके १७६१ च्या अधिक ज्येष्ठात शु. १२ स शनिवारीं या प्रकरणाची समाप्ती झाली.

( ३ ) प्रस्तुत प्रतीचा लेखनकाल शेवटीं दिला आहे, तो असाः

शके १७६२ ॥ अश्विन वद्य चतुर्दसी लेखन समास ॥ शार्वरी सवछरी तासगाव मार्गे प्रात मिरज

( ४ ) अशुद्ध छापण्याचा मासला म्हणून २०-४४ च्या वरची च एक ओवी घेऊ. ती छापली आहे असा :

उतरावया चचळ सागर । दासबोध झाला थोर ।
साधक पावती पैल पार । कुबडी तेथें होडगें ॥ २०-४३

या ऐवजीं प्रस्तुत प्रतींत शुद्ध आणि म्हणून यथार्थ आणि चित्तास प्रसन्न करणारा पाठ आहे, तो असा :

उतरावया चंचळ सागर । दासबोध जाहाज थोर ।
साधक पावती पैलपार । कुबडी तेथ होडगें ॥

## २५४ ] १५ [ ६६

पृ. सं. ८५ × २ × २ = ३४०

( १ ) हरिराज माणकेश्वर मुद्गल कृत सटीक रामार्या

( १ ) मृत्युंजय कृत श्रीसीताबोध ( विहंगमाची कथा )

( १ ) मुकुंदराज कृत परमामृत

( १ ) मालो, मुकुंदराज, केशव, भानुदास, रंगनाथ, अमृत, ज्ञानदेव, कवि त्रिमल, श्रीधर, मुक्तेश्वर ( भजा रे भजा रे माझ्या येकनाथासी ), कल्याण, उपदाचिद्घन, सज्जनरंजन, येकनाथ, नामदेव, खेचर विसा, गोरा कुंभार, मुकुंदमुनी, तुकाराम, गोसावीनंदन, मुक्ताई, जनी, इत्यादिकांचीं निवडक ८४ पदपदातेंं

( १ ) शिवरामपूर्णानंद कृत आचार्यकृत मनीषापंचक सटीक

( १ ) आचार्यकृतम् श्रीदत्तात्रयस्तोत्रम्

## २५५ ] १६ [ २५०

पृ. सं. सुमारें ४००. शिवाय कांहीं पृष्ठें गहाळ

श्रीसमर्थ कृत युद्धकांडाची ही एक सुंदर प्रत आहे. कागद सुंदर आहे, अक्षर सुंदर आहे. प्रत्येक पृष्ठावर तीन तीन श्लोक लिहिलेले आहेत. त्या काळीं या संप्रदायांत लेखनक्रिया किती आस्थेनें चाले याची साक्ष देणारीं जीं अनेक बाडें आहेत, त्यापैकीं हें एक बाड होय. काळाचा आणि नंतरच्या उपेक्षेचा त्याच्यावर मग च परिणाम घडलेला असला तरी तें प्रेक्षणीय आहे.

२५६ ] १७ [ १०२

पृ सं. ५२ × २ × २ = २०८. शिवाय कांहीं नष्ट.

( १ ) वामन कृत भागवतांतर्गत सटीक गोपीगीत

( २ ) या बाडांत तुकाराममहाराजांचे खरे च अभंग आहेत. त्यांच्या अभंगांचा विचार करतांना हे खरे अभंग पहावे लागतील.

( ३ ) चिंचवडचे मोरदेव व तुकोबा यांच्या भेटीचे 'अभंग' आहेत.

( ४ ) रामेश्वरचरित्र-कोण कृत न कळे

( ५ ) श्रीसमर्थ, रंगनाथ, अमृतेश्वर, ज्ञानदेव, शिवदिनकेसरी, कल्याण, जयरामात्मजसुत ( कृत कटाव ) यांचीं पदपदांतरें

( ६ ) गागापंडित कुसमुसी मनीं ।
म्हणे स्त्रियांची कथा नायकाची श्रवणीं ।
तयाचे अंतर जाणोनी ।
मग उत्तर वहिणी देतसे ॥ १

( ७ ) श्रीसमर्थ व तुकाराममहाराज यांच्या भेटीचा अभंग
समर्था समीप येऊनी त्वरित । तुकाराम घाली दंडवत ।
रामदास उठोनी त्वरित । प्रेमें भेटती तेधवा ॥ १
देशावरी आलो आतां । लाभ कोणता याहुनी ॥ १
प्रेमें चित्तीं आनंद जाला । जीव धाला दर्शनें ॥ २
भाग्यें जाली दासभेटी । आवड पोटीं दुणावे ॥ ३
तुका म्हणे श्रम केले । तितुके आले फळासी ॥ ४

२५७ ] १८ [ २२५

हें बाड आणि मागें उल्लेखिलेलें १२६ वें बाड अशीं दोन्हीं बाडें सारखीं आहेत. निम्या भागापर्यंत एका बाजूस पृष्ठांक दिलेले आहेत. एकंदर पृष्ठसंख्या ७० × २ × २ = २८० आहे, पैकीं पहिलीं ३ × २ = ६ पृष्ठें व शेवटचीं बहुधा तितकीं च गहाळ आहेत.

स्फु. प्र. २ × १० पासून पृष्ठ चवथें सुरू झालें आहे. स्फुट प्रकरणें संपल्यावर या हि बाडांत षड्रिपु, पचीकर्णयोग, चतुर्थमान, मानपंचक, पंचमान व स्फुट श्लोक हीं प्रकरणें क्रमशः आलीं आहेत. म्हणजे हे सबंध बाड आपल्या मालेंतील तिसऱ्या भागात आलें आहे.

स्फु. प्र. २ आणि ३ यांच्या दरम्यान

चंदनें घर्षिला रेडा गधडा हि त्यासमागमें ।
माकडा घुवडा माळा । कोंनडा सुमनी पुजा ॥ १

श्वाना परमान्न मानेना शूकरा कस्तुरी नको ।
कावळा सोवळा जाला बगळा आगळा म्हणे ॥ २

स्फु. प्र. ५१ यें या बाडात आणि १२६ व्या बाडांत सारखें च अकरा अकरा श्लोकांचें आहे. १२६ व्या बाडाप्रमाणें हें हि बाड एकसारखें सुंदर अक्षरानें लिहिलेलें आहे.

तुके बहु घडी घडी । या श्लोकानंतर या बाडात भीमरूपी महारुद्रा । हें स्तोत्र आहे.

बाड प्रेक्षणीय आहे.

**२५८ ]** १९ [ १५०

पृ. सं. ९१ × २ = १८२

( १ ) गोरक्षलीला ( मछींद्रगोरखसंवाद ) ग्रन्थसंख्या ४२
( १ ) श्रीगोरक्षकंथाबोध, प्र. सं. ३४
( १ ) मृत्युंजय कृत विहंगमाची कथा, ओवीसंख्या १२०
( १ ) श्रीशंकराचार्यविरचितं मठाम्नायस्तोत्रम्
( १ ) निवृत्ति अवधूत कृत परमप्रकाश, ओवीसंख्या ८५
( १ ) ज्ञानदेव कृत ललोटा
( १ ) नामदेव, जयराम कृष्ण, तुका, गोपाळनाथ यांची किरकोळ कविता

**२५९ ]** २० [ १५०

पृ. सं. सरासरी २००, पण त्यांपैकीं २५।३० पृष्ठें घड असतील नसतील. जमाखर्चाच्या वहीसारखी उभी वही असून ती दोन

ठिकाणीं दुमडली होती, त्यामुळें घड्या पडून बहुतेक पृष्ठांचे ¼ किंवा ⅓ भाग गळून गेले आणि बाडाची दुर्दशा झाली.

यांत वामन कृत सीतास्वयंवर होतें व श्रीसमर्थांचीं

( १ ) उठा रे कीर्तन आलें आलें लक्षित ।

( १ ) महाराजके दरबार दवंडी बाजत है ।

हीं दोन पदें व इतर हि श्रीसमर्थांचीं व माळो, अमृतेश्वर, अनंतप्रभु, रंगनाथ, आत्मारामी, सदाशिव, आनंदतनय, एकनाथ, वामन, गंगानंदन, उद्धवचिद्धन, तुकाराम, विष्णदास नामा, जगजीवन,केशव, यांचीं पदपदांतरें आहेत.

२६० ] २१ [ १००

पृ. सं. २९ × २ = ५८ पूर्ण लिहिलेलीं, पैकीं पहिलीं १० हरवलेलीं.

( १ ) अमृत कृत गुह्याख्यानाचे ७३ श्लोक, पैकीं पहिले ३५ श्लोक हरवलेल्या १० पृष्ठांत गेले

( २ ) वेणीस्वामी कृत कौल, २६ श्लोक

( ३ ) गोसावीनंदन कृत चार अष्टकें श्लोकबद्ध

( १ ) मज होय प्रसन्न शिवे जननी ॥ ९ श्लोक

( १ ) शरण तूज मी पाव रेणुके ॥ ९ श्लोक

( १ ) सदा राहे ध्यानीं जय जय भवानी भगवती ॥ ९ श्लोक

( १ ) श्री रेणुके भगवती वर दे भवानी ॥ ८ श्लोक

( ४ ) श्रीधर कृत परीक्षिती आख्यान, ओवीसंख्या ५८

( ५ ) ज्ञानदेव कृत मुंगी उमगा मुंगी उमगा ।
मुंगीचे तोंडीं त्रिवेणी गंगा ॥ ध्रु ०

( ६ ) एकनाथ कृत गोरसवेचन गोरसवेचन चली है
मथुरा गोरसवेचन ॥ ध्रु ०

२६१ ] २२ [ १५०

पृ. सं. ५४ × २ = १०८, शिवाय सुमारे ३० फाटलेलीं.

( १ ) श्रीसमर्थ आणि केशव यांचीं पदें वरीं च आहेत. त्यांत कांहीं अप्रकाशित आहेत. शिवाय उद्धवचिद्घन, कल्याण, नामदेव, चिंतामणी, राघव दत्तात्रय, एकनाथ, श्रीधर, रंगनाथ, तुकाराम, जगज्जीवन, अमृत, गोसावीनंदन, उद्धवसुत यांचीं पदपदातरें.

( २ ) केशवांचीं पदें फार गोड असतात. या सर्वांची निस्सीम गुरुभक्ति पाहून मोठें कौतुक वाटतें. शुद्ध गुरुभक्ति ही च त्यांच्या यशाची किल्ली होय.

मज करणें कांहीं च नाहीं उरलें ।
गुरुरायाचीं वंदिन पाउलें ॥ ध्रु०

गुरुरायाचे पदक्षेत्रवासी हो । सर्व भावें होईन त्यांची दासी हो ॥ १
गुरुभक्त नांदती जिये देशीं हो । तो मी देश ध्याईन अहर्निशीं हो ॥ २
गुरुदासांचे आश्रमीं राहीन । सर्व सुखाचें निजफळ लाहीन ॥ ३
गुरुभक्तीचा कुळधर्म ज्याचे घरीं । त्याच्या मूर्ती पूजीन मी वो अंतरीं ॥ ४
गुरुवेगळें दैवत ज्यासी नाहीं । म्हणे केशव लोळण त्याचे पाईं ॥ ५

( ३ ) कांहीं ज्योतिषप्रकरणें व गजगौरीव्रतकथा.

# २६२ ] २३ [ १००

पृ. सं. ४९ × २ = ९८, पैकीं आरंभीचीं ३ × २ = ६ नष्ट.

यांत श्रीसमर्थांचीं सुमारें ५०, केशवाचीं सुमारें १०० व एकनाथ, तुकाराम, मुकुंदराज, जनाबाई, वेणाबाई यांचीं कांहीं पदपदातरें आहेत.

पृ. ३१ वर श्रीसमर्थ आणि कल्याण यांचीं प्रश्नोत्तरें आहेत.

टीप—या बाडाचें लेखन अशुद्ध आहे व श्रीसमर्थांच्या नांवावर लिहिलेलीं पदें त्यांचीं च आहेत कीं काय, अशी मला किंचित् शंका आल्यामुळें या बाडांतील श्रीसमर्थांचीं पदें तादून पदरणात आलेलीं नाहींत.

# २६३ ] २४ [ १७५

पृ. सं. ७५ × २ = १५०, आरंभीचीं कांहीं नष्ट.

या बाडात ( १ ) श्रीमद् भगवद्गीता, अ. ९ ते १८, ( २ )

श्रीगुरुकवच, ( ३ ) श्रीगुरुगीता हीं तीन प्रकरणें पूर्वीचीं असून नंतर कांहीं पानें मागाहून लिहून तीं मूळच्या बाडाच्या शेवटीं डकविलेलीं आहेत. त्यांत आरंभीं रामरक्षा होती पण तीं पानें गहाळ झालेलीं दिसतात. नंतर

या मठाच्या परंपरेंत जे अनंतबुवा होऊन गेले त्यांच्यावर ८ आणि ९ श्लोकांचीं मराठींत दोन अष्टकें आहेत.

२६४ ] २५ [ १५०

पृ. सं. ४९ × २ = ९८.

( १ ) वामन कृत श्रीमत् भागवते तृतीयस्कंधे कपिलदेवहुतिसंवादे सटीक सगुणध्यान, श्लोक १४ व शेवटचा पंधरावा श्लोक असा :

हे ध्यानपद्धति चतुर्दशरत्नमाळा ।
पाहूं समर्पिली तया पुरुषोत्तमाळा ।
पद्मासि पत्र निघती स्तुति वामनाच्या ।
वृत्ती तदात्मक करी अवघ्या मनाच्या ॥ १५

( २ ) श्रीमत् भागवतांतील निरनिराळ्या स्कंधांतील मूळ कांहीं भाग

( ३ ) पांडवगीता, संस्कृत, श्लोक १०१

( ४ ) श्रीदासवर्मे वंशानुकीर्तनम्, श्लोक ६२

( ५ ) जनार्दन आणि एकनाथ यांच्यांतील समाधिविषयक संवादाचे ५ अभंग.

२६५ ] २६ [ २५०

पृ. सं. ५७ × २ = ११४ पैकीं आरंभींचीं ९ × २ = १८ हरवलेलीं. शेवटचीं दि बहुधा हरवीं च नष्ट.

( १ ) रामसुतात्मज कृत द्रौपदीवस्त्राहरण, श्लोक २६५, पैकीं पहिले ६० श्लोक आरंभींच्या १८ पानांत गेले ! हें प्रकरण ठाण्याच्या महाराष्ट्र काव्यग्रंथांपैकीं ९ या ग्रंथ, स्फुटग्रंथ, यांत प्रथम छापलें गेलेलें आहे. पण त्यांत २२४ च श्लोकांत तें पूर्ण झालेलें आहे. परंतु या बाडांत तें २६५ श्लोकांचें आहे. शिवाय नित्याप्रमाणें तें अशुद्ध छापलें गेलें आहे तें निराळें. त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत हें प्रकरण गिरिधरांचें च म्हणून सुरुवातीस मानण्यांत आलें आहे.

या वाक्यावरून असें दिसतें कीं कवि रामसुतात्मज हे ऋग्वेदी ब्राह्मण. त्यांचें नांव विश्वनाथ असावें, वडिलांचें नांव विनायक आणि मातुःश्रीचें नांव यशोदा असावें व आजोबांचें नाव राम असावें. गोत्र वसिष्ठ असावें. ग्रन्थरचनाकाल १५३४ श्रावण शुद्ध २ शुक्रवार असावा.

( २ ) नंतर पुन्हां वस्त्राहरण नांवाचें दुसरें प्रकरण आहे. त्याचे श्लोक ६१ च आहेत. पहिला श्लोक :

भावार्थे लाधो मरवा सनाळा । प्रार्थूनि मागे वर वामनाळा ।
त्यानंतरें प्रार्थिन देवराया । सौंसारसिंधूप्रति उतराया ॥ १

यावरून हें प्रकरण वामनाचें असावें, असें वाटतें.

# २६६ ] २७ [ १५०

पृ. सं. ५० × २ = १००

( १ ) विठ्ठलकवि कृत रुक्मिणीस्वयंवर, संपूर्ण, सात सर्ग, श्लोक ३५३

( १ ) देवदास कृत कृष्णावतारीं हनुमंतभेट, श्लो. ३२

( १ ) वामन कृत भामाविलास, श्लो. ४८

( १ ) वामन कृत कृष्णजन्म, श्लो. २५

( १ ) गोपाळ कृत रामाची आरती

( १ ) ज्ञानेश्वर कृत ललिताची आरती

# २६७ ] २८ [ १२८

पृ. सं. ३८ × २ = ७६, शिवाय पहिलीं ७ × २ = १४ नष्ट.

महामुद्गल कृत श्रीरामार्यावर श्रीधर कृत टीका, श्लोक ११०, पैकीं पहिले २२ पहिल्या चवदा पानांत गेले. काव्य उत्कृष्ट आहे. टीका अप्रकाशित आहे, असें वाटतें. लेखनकाल वगैरे :

शके १७२७ क्षयनाम संवत्सरे आषाढ शुद्ध १२ शुक्रवारी लेखन समाप्त । राजेश्री चिमाजीराव देशमुख पांगरकर याचे सोयरे याचे अनुष्ठानात समाप्त । हस्ताक्षर नरसो अनंत ज्योतिषी पांगरकर मठातील याचें असे ॥

२६८ ] २९ [ १२५

पृ. सं. ११७ × २ = २३४.

( १ ) रामगीता, मूळ संस्कृत श्लोक ६२ व त्यावर कोकिळ कृत ओवीबद्ध टीका ७००. ही टीका अप्रकाशित आहे, असें वाटतें.

( २ ) रामहृदय, संस्कृत, श्लोक ५८

२६९ ] ३० [ १००

पृ. सं. ५३ × २ = १०६. या बाडांत पुढील प्रकरणें असून तीं सर्व संस्कृतांत आहेत.

( १ ) जटायुमोक्ष, ( २ ) श्रीरामकवच, ( ३ ) रामसहस्रनाम, ( ४ ) रामस्तवराज व ( ५ ) अनुस्मृति.

२७० ] ३१ [ १५०

पृ. सं. ४४ × २ = ८८.

( १ ) विप्रदास कृत श्रियाळचरित्र, ओवीसंख्या ९९, हें प्रकरण अप्रकाशित असावें. विप्रदास यांचें हि नांव पूर्वी ऐकण्यांत नव्हतें.

रचनाकाळाची ओवी :

रक्ताक्षी नाम संवत्सर । उत्तम श्रावण रविवार ।
शुद्ध पक्ष प्रथम प्रहर । श्रियाळचरित्र संपूर्ण ॥ ९१

यांत तिथी दिलेली दिसत नाहीं. प्रतिपदा च मानल्यास शक १६६६ येतो.

पुढील चार ओंव्या महत्त्वाच्या वाटतात. मला त्यांचा बरोबर उलगडा होईना. वाचकांची मदत व्हावी म्हणून त्या सादर करितों :

संदेयाचा ज्येष्ठ कुमर । जन्मनाम त्याचें ज्ञानेश्वर ।
येकनाथ भक्त ज्ञानसागर । तरला दुस्तर हरिस्मरणें ॥ ९६
तयाचा कनिष्ठ सहोदर नूतन । विप्रदास बहु अज्ञान ।
पंगुमतस्तव श्रियाळकथन । सिद्धीस जाण पावलें ॥ ९७

जैसें स्फटिकलिंग सोज्वळ । जेवी जान्हवीजळ निर्मळ ।
तैसें दिंगरजकराचें कुळ । जन्म सुफळ त्या वशीं ॥ ९८
जनार्दन श्रोता वक्ता । जनार्दन ध्येय ध्याता ।
जनार्दन जननी जनिता । मोक्षदाता जनार्दन ॥ ९९

( २ ) राघव कृत भवानीची आरती

( ३ ) हरिभक्तांची कथा, कोण कृत न कळे, ओंवी ४२, कोणा दुर्बळ भक्ताच्या स्त्रीचें बाळंतपण भगवंतानें केल्याची कथा या प्रकरणात आहे.

( ४ ) तुकाराम, उद्धवचिद्धन, केशव, गोसावीसुत, मुकुंदराज, गणेशनाथ यांचीं पदपदांतरें.

## २७१ ] ३२ [ १५०

पृ. सं. १५ × २ = ३०.

( १ ) शिवराम पूर्णानंद कृत निजबोध, पदें बारा, कडवीं बावट. ( मागील बाडांक २३९ पहा. )

( १ ) सहा शास्त्रें, अठरा पुराणें, अष्ट तीर्थें आणि अष्ट भोग यांचीं नावें.

## २७२ ] ३३ [ १५०

पृ. सं. ४० × २ = ८०

या बाडात केशव स्वामींचीं ८५ पदें आहेत.

## २७३ ] ३४ [ १००

पृ. सं. ६२ × २ = १२४

( १ ) वामन कृत भामाविलास, श्लोक ४७ व राधाभुजंग, श्लोक ५६

( १ ) दामोदर कृत ज्योर्तिलिंगें, श्लो. १२

( १ ) देवनाथ कृत स्तोत्रें, पदें, वगैरे

( १ ) ध्रुव आख्यान व तुकारामाचे काहीं अभंग.

२७४ ] ३५ [ १००

पृ. सं. ३२ × २ = ६४.

( १ ) स्कंदपुराणांतर्गत गुरुगीता, संस्कृत, श्लोक १४७

( १ ) श्रीसमर्थ, जगज्जीवन, कबीर यांचीं कांहीं पदें

२७५ ] ३६ [ १७५

पृ. सं. ४८ × २ = ९६, शिवाय पहिलीं आणि शेवटचीं कैक पानें गेलीं.

कृष्णदाससुद्रल कृत रामायणाच्या पहिल्या प्रसंगाच्या ४७ व्या ओवीपासून तों तिसऱ्या प्रसंगाच्या १२२ व्या ओवीपर्यंतचा भाग.

२७६ ] ३७ [ १२५

पृ. स. ३५ × २ = ७०, शिवाय कांहीं नष्ट.

( १ ) जगज्जीवन कृत जांभुळ आख्यान, ओं. ७०

( १ ) श्रीसमर्थ, मानपुरी, कबीर, जगज्जीवन, मल्लनाथ, अमृत, निपट निरंजन, रमावल्लभदास, मुद्रल यांचीं पदपदातें

२७७ ] ३८ [ १००

पृ. स. ४२ × २ = ८४, शिवाय ९ × २ = १८ आरंभींचीं व बहुधा तितकीं च शेवटचीं नष्ट.

( १ ) जगज्जीवन कृत बाळकांड, ओवी ४६ से १७१, अर्थात् पहिल्या ४६ ओव्या आरंभींच्या फाटलेल्या पानांत गेल्या.

( २ ) श्रीसमर्थदासचरित्र, अपूर्ण प्रकरण ॥ १ ॥ मागील बाडांक ८३ त आहे व जें आपण श्री सांप्रदायिक विविध विषयांक ४७ त छापलें आहे, तेंच हें.

( १ ) शेवटचीं दोन पानें रघोत्तम वाल्मीकीचे श्लोक, अपूर्ण

# २७८ ] ३९ [ १००

पृ. सं. २२ × २ = ४४.

( १ ) श्रीसमर्थ कृत पाच सहा प्रकाशित आरत्या

( १ ) अनंतस्वामींची आरती

( १ ) पुरुषोत्तम कृत कल्याणाची आरती

( १ ) राघवदास कृत पांडुरंगाची आरती

( १ ) कल्याण कृत दासबोधाची आरती

# २७९ ] ४० [ १५०

पृ. सं. १८ × २ = ३६

( १ ) रुद्रयामळे पचीकरण सटीक, मूळ श्लोक ११, टीका ओवी ६८

( २ ) शिवराम कृत पचीकरण महावाक्य

( ३ ) वज्रसूचि उपनिषद्। ब्राह्मण कोणाला म्हणावें व मोक्ष कशास म्हणावें, याचा विचार या उपनिषदांत सुंदर केला आहे.

( ४ ) गायत्रीचा अर्थ, ( ५ ) ज्ञानेश्वर कृत पंचमुद्रा, ओ. २५

( ६ ) श्रीसमर्थ, मुक्ताबाई, गोरा कुमार यांचे अभंग.

# २८० ] ४१ [ २००

पृ. सं. ३० × २ = ६०

फकेश्वर कृत सुदामचरित्र, श्लोक १०१. मूळचा च प्रसंग गोड आहे.

# २८१ ] ४२ [ १००

पृ. सं. ३२ × २ = ६४, शिवाय काहीं नष्ट.

किरकोळ बाड, तथापि त्यांत विंचवाचा मंत्र व रंगनाथ, विठ्ठलनाथ, येकनाथ, केशव, ज्ञानदेव यांचीं पदपदावर्तें आहेत, येकनाथाच्या अभंगात मानभावाचा गडबडगुंडा वर्णिला आहे.

२८२ ] ४३ [ ८८

पृ. सं. ७ × २ = १४

दासबोधाचें मुखवस्त्र, ओवी ७९.

लेखनकाल— " भाद्रपद शुद्ध १५ सके १७६७ " पुढें लेखकाचें नांव, गांव दिलें असून तें खोडलें आहे, तें असें—" हस्ताक्षर राजाराम कृष्ण पोळ नाशीककर याचे असे "

२८३ ] ४४ [ १७५

पृ. सं. १२ × २ = २४.

योगस्य तपसश्चैव न्यासस्य गतयोऽमलाः ।
महर्जनस्तप सत्यं भक्तियोगस्य मद्गतिः ॥ २४-१४

या भागवतांतील चोविसाव्या अध्यायांतील चवदाव्या श्लोकावरील श्री एकनाथ महाराजांची टीका.

टीकेंत आणि मूळ संस्कृत श्लोकांत सुद्धां प्रकाशकांनीं पाठभेद करून ठेविले आहेत, किंवा शुद्ध पाठ शोधून काढण्याची तसदी घेतलेली नाहीं.

२८४ ] ४५ [ १८०

पृ. सं. १०८ × २ = २१६.

( १ ) विठ्ठलकवि कृत रुक्मिणीस्वयंवर, संपूर्ण, ( चाटांक २६६ पद्य ). मूळ काव्य १५९६ तील. ही प्रत १६७५ तील. प्रतीच्या शेवटीं नांव, गाव वगैरे आहे तें :

" सके १६०५ श्रीमुख नाम संवत्सरे कार्तिक मास वद्य रविवारीं ऐरन समास ॥ हस्ताक्षर भगवंतराव उदय देशपांडे मा फलटण ॥ हाली पस्ती मार्हे मा उंदरतपा ॥ पुस्तक भैराव्हंतेपु परउपकारार्थ लिख्यते ॥ "

( २ ) रुद्रयामळे शमिपत्रोपनम्, शिवाष्टोत्तरशतनामस्तोत्रम्, चंद्रा-चार्यस्वामिप्रसंवादः

२८५ ] ४६ [ १५०

पृ. सं. ६६ × २ × २ = २६४, आरंभींचीं एक दोन पानें गेलेलीं, चिमकुलें बाड, पानाचा आकार ४" × ३"

( १ ) पहिलें पृष्ठ जें आहे त्यावरील अक्षरें पुसट्न गेलेलीं आहेत. त्यावरील कांहीं भाग लागला तो असा :

तईपासुनी रामवरदायेनी तुकाई तुळजापुरी ।
आदि माईमाया नेमुनी सीखरीं राहिली दक्षिण पारीं ।
उदय उदय येसे बोले फणीचरी ।
सीतारामी भेट जालीयावरी जन्ममृत्या कैची उरी ॥ ८
परिसा कथा अनुभवाची । सरिता ज्ञानपीयूषाची ॥ ध्रु०

( २ ) वामन कृत गजेंद्रमोक्ष, श्लोक १०, उलूखलबंधन, श्लो. २३, भीष्मशरपंजर, श्लोक २७, बळी आख्यान, श्लो. १५, गोपीगीत, श्लो. ५१

( ३ ) तुकोबा कृत शिवचरित्रपर अभंग

( ४ ) रामविजयांतील अहिल्योद्धार वगैरे भाग

( ५ ) जनुभटजी कृत गंगापार्वतीभांडण

( ६ ) वरींचवीं संस्कृत सुभाषितें

( ७ ) श्रीसमर्थ, सज्जनरंजन, नामा, तुका, रंगनाथ, अमृतेश्वर चिन्मय ( तुळजादेवीवर ), ज्ञानदेव यांचीं पदपदांतरें

( ८ ) मध्यें च एका पानावर पुढील श्लोक आहे. त्याचा अर्थ करावयाचा आहे :

सप्तांकभूप १६९७ युजी मन्मयवत्सरे वै
राधासिते यमतिथौ धरणीतनुजः ।
श्रीमन्मुकुंदगुरुभक्तिपरायणाग्यः
सच्चित्सुखार्णवपदे विमले निमग्नः ॥ १ ॥

२८६ ] ४७ [ १५०

पृ. सं. ३६ × २ × २ = १४४. शिवाय वरी च नष्ट.

( १ ) मुकुंद कृत श्रीहरीची नामावळी, श्लोक २५

ऐसी जपा परम सुंदर नाममाळा ॥

( २ ) गोसावीसुत कृत शंभुध्यान, श्लो. ५

असा शंभु ध्या हो सकळ तुमचे दोष हरती ॥

( ३ ) कालियामर्दन-अपूर्ण

( ४ ) श्रीस्तुती-ज्ञानउद्बोधु, ओवीसंख्या १०८

( ५ ) दत्तात्रय अवधूत कृत मूळस्तंभ, ओवी ३६७ ते ५०१

२८७ ] ४८ [१५०

पृ. सं. २२ × २ = ४४

( १ ) मोरेश्वरसुत कृत चंद्राची आरती

( २ ) नीळकंठसुत कृत देवा नाम तुझें । मल्हारी ॥

( ३ ) गरुडाख्यान, श्लोक ५४, अपूर्ण

२८८ ] ४९ [१२५

( १ ) या सोळा पृष्ठांच्या बाडांत आरंभीं ३ + ८ + ३५ + ७ = ५३ अभंग श्रीसमर्थांचे असून नतर मुकुंद, केशव, तुकाराम सुरदास, येकनाथ, विठ्ठल या प्रत्येकाचा एक एक अभंग देऊन शेवटीं पुन्हां एक अभंग श्रीसमर्थांचा आहे.

( २ ) अगदीं आरंभीं जे तीन अभंग आहेत, त्यांत

ऐक बा परयाणा हित उपदेश ॥ व

सांग बा परयाणा तुझी स्थिती मज आतां ॥

असे दोन अभंग बोधपर आणि प्रश्नात्मक असून

गुरुरूप जालों तुमचिया पादसेवे ।

परयाण माझें जालें रंगलों सोहंभावें ॥

असा समाधानपर उत्तरात्मक तिसरा अभंग आहे. हे तिन्ही अभंग पूर्वी हि एका बाडांत आलेले आहेत.

( १ ) या बाडांतील बहुतेक अभंग अप्रकाशित आहेत. ते मला अति महत्त्वाचे वाटतात. ते स्वतंत्रपणें एकापुढें एक छापण्याविषयीं माझा जीव कासावीस होतो ! पण मी तळमळून काय उपयोग, ते अभंग वाचण्याविषयीं महाराष्ट्र वाचकांना उत्कट इच्छा होऊन त्यांनीं प्रकाशनाची आशा केली पाहिजे. सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांत एकांतांत श्रीसमर्थ टाहो फोडतात तो ऐका.

श्रीसमर्थांचा टाहो

जानकीरमणा मनाच्या मोहना । जिवाच्या जीवना । आत्मारामा ॥ १
शंकराच्या ध्येया निजबोधाच्या निलया । वेदाचिया गुह्या । आत्मारामा ॥ २
सिद्धाचिया सिद्धा निजबोधाच्या बोधा । अनादि प्रसिद्धा । आत्मारामा ॥ ३
अयोध्येच्या राणा हनुमंताचा स्वामी । प्रगट अंतर्यामीं । होय माझ्या ॥ ४
माझ्या सर्व मवाळगीं नाश करीं । बुडालों सागरीं भवसिंधूच्या ॥ ५
त्रितापें तापलों बहुत जन्मीं शीणलों । बहुकाळ अंतरलों स्वामी तुम्हा ॥ ६
विधीचिया घाया तळीं सांपडलों । वरपडा जालों सुखदुःखा ॥ ७
धांव आतां स्वामी तूं च माझा गुरु । तूं च माझा तारूं दास म्हणे ॥ ८

२८९ ] ५० [ १५०

पृ. सं. २१ × २ = ४२. लहान बाड ४″ × ३″.

( १ ) बाळकराम कृत कबीरचरित्र, ओ. ५९

( २ ) तुकारामांचे तेरा अभंग.

२९० ] ५१ [ १००

पृ. सं. १०० × २ = २००, पैकीं आरंभींचीं ९ × २ = १८ नष्ट.

( १ ) श्री श्लोक मनाचे, २८ ते ११९

( २ ) कल्याण कृत संतमाळा, श्रीसांप्रदायिक विविध विषयांक ५१ यांत ती आपण छापली आहे.

( ३ ) श्रीसमर्थ, तुकाराम, हरिसुत केशव, तुलसीदास, होनाजी बाळ, गुरदास, सदाशिव, आत्माराम, माधव, अमृत, निरंजन, देवनाथ, उद्धवसुत,

महिपती, मीरा, कबीर, यशवंतसुत, ते च बहुधा भीम (शिरगांव मठाच्या यशवंतांचे पुत्र व शिष्य, श्रीसमर्थांचे एक चरित्रकार), शिवदिन केसरी, भानुदास, यांचीं पदपदांतरें

(४) (१) प्रातःकाळीं उठोनी वसा। श्रीरामाचे स्मरणीं असा॥

(१) उठोनिया प्रातःकाळीं। वदनीं वदा चंद्रमौळी॥

(१) पराधीन नाहीं ऐसा कोण आहे। विचारुनि पाहे सर्व जन॥

अशीं हीं तीन पदें श्रीसमर्थांचीं च आहेत कीं काय याचा विचार करणें.

२९१ ] ५२ [१००

पृ. सं. ४७ × २ = ९४. आकार २″ × २″.

हनुमत् कवच व हनुमंतवडवानळस्तोत्रम्

२९२ ] ५३ [११०

पृ. सं. ११३ × २ = २२६. शिवाय आरंभींचीं ८ व शेवटचीं ५।५० पृष्ठें गहाळ.

(१) शकुनवंती. एकंदर १०४ शकुन दिलेले आहेत. शेवटीं लेखनकाल वगैरे आहे, तो असा :

इति श्री ब्रह्मांडपुराणे ईश्वरपार्वतीसंवादे शकुनवंती समाप्त। शके १७२५ रुधिरोद्गारी नाम संवत्सरे मार्गेश्वर वद्य १२ रविवारी चतुर्थ प्रहरी समाप्त केले। हें पुस्तक रामचंद्र अनंत जोसी कसबे पांगरि याचें असें यास कोण्ही सुजाहिम कोन्ही न होणे। हे विनंती॥

(२) श्रीधर कृत हनुमंताचा जन्मकाळ, २५ कडवीं, व जगजीवन आणि शिवदास यांचें एक एक पद.

(३) श्रीसमर्थ कृत ओव्याशतकापैकीं शतक तिसरें.

२९३ ] ५४ [१२१

पृ. सं. ३२ × २ = ६४, शिवाय आरंभींचीं ४ हरवलेलीं.

(१) वामन कृत अपरोक्षानुभूतीची समश्लोकी टीका, ग्रन्थसंख्या १४७

शेवटीं लेखनकाल दिला आहे, तो असा : " शके १७३४ अंगिरानाम संवत्सरे । श्रावण शुद्ध ८ शनिवारी दोन प्रहरा समाप्त ॥ "

( २ ) आर्यावद्ध गोहरण ३०, सुभद्राहरण ४१.

( ३ ) पोटांत एक जुना कागदाचा तुकडा आहे, त्यावर श्रीसमर्थांच्या व कल्याणस्वामींच्या कांहीं महंतांचीं नावें दिलेलीं आहेत :

श्रीरामसमर्थ

| समर्थांचे महंत | कल्याणस्वामींचे महंत |
|---|---|
| १ अनंत गोसावी मनेरगुडीकर | १ रामाजी दादा |
| १ अनंत गोसावी मेथवडकर | १ केशव गो |
| १ मनेरकर वासुदेव गो (कनेरकर पाहिजे होतें असें वाटतें ) | १ जानाबा गो |
| १ पिलाजी गोसावी | १ अनंत गो सेणवी |
| १ बाजी गो सिराळकर | १ अनंत गो |
| १ बहिणाजी गो तिसगांवकर | १ संभाजी गो |
| १ श्रीस्वामी | १ सिवाजी गो |
| १ संतु गो सावंताचे वाडीकर | १ बहिरव गो |
| | १ कृष्णाजी गो तिकसेकर ( तिकसेकर शब्द खोडला आहे ) |
| | १ आपाजी गो नासिककर |
| | १ रामाजी गो रेवडे |
| | १ नारायण गो वाईकर |
| | १ गोविंद गो पनाळकर |
| | १ सुंदर जयराम |

२९४ ] ५५ [ १००

पृ. सं. २० + १३ = ३३ × २ = ६६

( १ ) भर्तृहरिशतक, मूळ श्लो. ६४, मराठी समश्लोक १७,

( २ ) भारतीकथा अपूर्ण, ( ३ ) श्रीसमर्थ, वेणी, विठ्ठल, कबीर, अनंत, जगजीवन, श्रीधर, निपट यांचीं पदपदांतरें.

२९५ ] ५६ [ १५०

पृ. सं. ४३×२=८६, शिवाय आरंभींचीं २४ × २ = ४८ व इकडी व शेवटचीं नष्ट.

( १ ) श्रीसमर्थ, नामा, तुका, सज्जनरंजन, सीताराम ( गोंधळ ), रंगनाथ, आत्मारामस्वामी, चिंतामणिसुत मुद्गल, वहिरा पिसा, शिवदिन केसरी, जनी ( १६ अभंग ), आनंदतनय, नरहरि, ज्ञानदेव ( हरिपाठ ), उद्धवचिद्घन ( छकडाणा ), मानपुरी, येकनाथ ( अर्जदास्त ), निंबराज, मुकुंदमुनि, इत्यादिकांचीं पदपदांतरें.

( २ ) दासतुका कृत डांकुळता पद, फडवीं ६. डाकुलता म्हणजे भविष्यवादी. पदाचें ध्रुवपद व कांहीं चरणें :

डांकुलता मी डाकून सांगे हरिगुरुनाम जागा मा ।
कठीण काळ युग नष्ट विपयसंग त्यागा मा ।
सोहंभावें सद्गुरुचरणीं सावध होउनि लागा मा ।
अलक्ष अविनाशी अक्षयी पदवी मागा मा ॥ ध्रु०
गैबी सिद्ध बोलुन गेला बहुत नाश होईल जी ।
असत्याच्या राशी सत्य राई इतुकें नसेल जी ।
जप तप क्रिया स्नान संध्या कर्ममार्ग बुडेल जी ।
अस्त्री पुरुप लंपट भारी विषयडोहीं पडतील जी ॥ १
विनाशकाळ विपरीत बुद्धि संतछळ होतील जी ।
ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र येके ठाईं खातील जी ।

डाकुलत्याचें भविष्य खरें होण्याचा काळ समीप येत चालला !

( ३ ) अभिमानी पूर्ण श्रीदाचा दासाचा लाड पाळी ॥ ध्रु०
अभिमानें भरली हुंडी मेहत्याचे लज्जेसाठीं ।
जीवविली यो पद्मावती जयदेवा केली भेटी ।
बोलविला वेद रेड्या ज्ञानेश्वरवचनासाठीं ।
नामदेव शिंपीयाच्या जेविसि बैसुनि ताटीं ॥ १
कबिराचे वैसोनि मागीं आटावें शेत राखी ।
सुरदास मिराबाई गुंतलास त्यांचे सार्की ।
पैठणीं हो येकनाथा गंधाचे श्लोके देसी ।
शबरीचीं उच्छिष्ट बोरें आवडिनें राम चाखी ॥ २
तुकोबाबोधल्याची दाविसि साक्ष जगासी ।
रामी वो रामदासा त्रिकाळ दर्शन त्यांसी ।
हे काय करणी साची सत्ता या महाराजाची ।
सत्ता या गोविंदाची ॥ ३

(४) हिरडीयाचें प्रकरण– अनुपानासह औषध

(५) रामायणापैकीं अपूर्ण भाग, ओ. १–१४१

२९६ ] ५७
पृ. सं. ४१ × २ = ८२, यिवाय कांहीं नष्ट. [२००

हें सबंध बाड तुकाराममहाराजांच्या अभंगांचें आहे. त्यांत एकंदर १ ते २२२ अभंग आहेत, त्यांपैकीं १८१ ते १९४ व २०० ते २०३ या अभंगांचीं पृष्ठें नष्ट झालेलीं असल्यामुळें ते अभंग नाहींत.

२९७ ] ५८
पृ. सं. २१ × २ = ४२ [१२४

या सबंध बाडांत प्रवृत्तिनिवृत्तिऐक्यतारत्नावली नांवाचें गद्यात्मक सुंदर, बोधप्रद प्रकरण आहे. तें प्रकाशनाला योग्य आहे. शेवटचा मजकूर :

> श्रीवेदव्यासकृपावलोकनबळें सकळ वेदांत सिधांत मथित करून सज्जन यासि निवेदिलें । ज्योसि गोपाळ महा भागवत व्यासशिष्यगण यथामति विचारसिंधुमथित प्रवृत्तिनिवृत्तिऐक्यरत्नावली समाप्त । शके १७११ माघ वद्य ७ हस्ताक्षर बाजि राम मोघे हातखंबेकर तरफ रत्नागिरि ॥

२९८ ] ५९
पृ. सं. २१ × २ = ४२ [१४४

दैवज्ञचूडामणि सर्वविद्याकुशल श्रीमत् चिंतामणि पंडित विरचितं रमलशास्त्रम् ।

शके १७११ सौम्यनाम संवत्सरे आषाढ वद्य १३ सोमवारी समाप्त । इदं पुस्तकं मल्हारभटस्य क्षेयं पांगरिकर ॥

२९९ ] ६०
पृ. सं. ३४. अगदीं किरकोळ बाड [१००

३०० ] ६१
९६ × २ = १९२. पैकीं ६५ वें व ९६ वें अशीं दोन पत्रें नष्ट [२००

ही मुक्तेश्वर कृत रामायणाची सुंदर पोथी आहे. दुर्दैवानें शेवटचें च पृष्ठ नष्ट झाल्यामुळें लेखनकाल नक्की सांगता येत नाहीं.

जुने ग्रन्थ छापताना हजारों चुक्या सहज लीलेनें करून ठेवावयाच्या, हा जो महाराष्ट्राचा दंडक तो हें रामायण छापताना सुटलेला नाहीं! एक उदाहरण :

मुखीं राम त्या धाम कैवल्य लाभे। घरीं नृत्य तो भृत्य होऊनि राबे॥ अशीं चरणें छापणारानें छापलीं! नृत्य ऐवजीं भृत्य पाहिजे.

३०१ ] ६२

पृ. सं. २८५ × २ = ५७० [ २००

त्रिवेणी गीता—मूळ गीतेचा श्लोक आणि मग वामनाचा समश्लोक, तुलसीदासाचा दोहरा व मुक्तेश्वराची ओवी,

एव तिन्ही हे मिळतां त्रिवेणी। करी जना मुक्त जशी त्रिवेणी॥

अशी या ग्रन्थाची रचना कोणा त्र्यंबकानें केलेली आहे.

त्र्यंबकानें ग्रन्थाला बारा श्लोकांची प्रस्तावना जोडली आहे, परंतु प्रतीचें पहिलें पृष्ठ नष्ट झालेलें असल्यामुळें पहिल्या चार श्लोकांना आपण आचवलों आहों. प्रतीचा कागद अति ठिसूळ झाला आहे, इतका कीं, प्रतीला हात लावला कीं दर खेपेस कागदाचा थोडा थोडा भाग झडतो. मूळ प्रतीचीं शेवटचीं पाच पृष्ठें हरवलेलीं असून त्या पृष्ठावरील मजकूर निराळीं पाच पृष्ठें घालून कोणी लिहून ठेवलेला आहे.

३०२ ] ६३

पृ. सं. ५१ × २ = १०२ [ १२६

ज्ञानदेव विरचित उत्तरगीता, मूळ श्लोक १३९, ओव्या ५५१, येकूण सख्या ६९०. लेखनकालादि :

शके १७१९ प्रवर्तमाने पिंगलनामसंवत्सरे फाल्गुन कृष्ण अष्टम्यां स्थिरवासरे श्रीभीमसेनसंनिधौ उमदि त्र्यंबकेशसुत कृष्णेन लिखित गुरुपतस्य दत्त परोपकारार्थ दत्त॥

३०३ ] ६४

८+६+१७+२+५+१३=५१×२=१०२ [ ११९

( १ ) अंतर्भाव, ( २ ) जनस्वभाव गोसावी, ( ३ ) सप्तसमासी, ( ४ ) भूपाळ्या—१ उठि उठि या रघुनाथा ॥ २ उठि जागृत निद्रिस्ता । परमात्मया श्रीरघुनाथा ॥ ३ यात्र येळ मिजलासी । जाग जाग रे बापा ॥ हस्ताक्षर नरसिंह भट जोशी पांगरकर, ( ५ ) श्रीसमर्थ कृत ओवीबद्ध सुंदरकांड-हनुमंतानें ख्याती केली । ओवीसंख्या ४०, ( ६ ) मानसपूजा, मानसपूजेच्या शेवटीं लेखनकाल वगैरे आहे तो :

सन बाराशे १२२४ श्रावण वद्य अष्टमी मंगळवार.. पोथी रामबावाची... गुर राम कल्याण सेवा कराया । महारुद्रनामें धरी दिव्य देह । भजन अति प्रितीनें लागलें नित्य नेमी । नमस्कार साष्टांग श्री महारुद्र स्वामी ॥...

३०४ ] ६५ [ १२५
पृ. सं. २३ × २ = ४६

या पोथींत श्रीसमर्थकृत एकापुढें एक असे फुट ग्रन्थ म्हणून वीस समास दिलेले आहेत, ते असे :

( १ ) येकवचनी देव येक । ओवीसंख्या १७
( २ ) श्रीमूलमाया जगदेश्वर । ओ. सं. ८
( ३ ) देह जड आत्मा चंचळ । „ „ २५
( ४ ) प्रसंग निघाला स्वभावें । यांमेमध्यें काय लावावें । १८
( ५ ) यादी इमारतीकारणें । २६
( ६ ) जळ स्थळ काष्ठ पाषाण । ११
( ७ ) तुरंगासी चालवणें । ४
( ८ ) पंचाननाचा पडानन । ५
( ९ ) यथायोग्य धालावें वय । १२
( १० ) ऐका प्रपंचविचार । ४२
( ११ ) सुचित करूनि अंतःकरण । ऐका राजकारण । १३
( १२ ) सकळ तीर्थांचें सार । सत्य स्वरूप निर्विकार । ९
( १३ ) सकळ तीर्थांचें माहेर । सकळ गुणाचें मांडार । १०
( १४ ) सकळ गुणाची निधी । ११
( १५ ) सकळ तीर्थांची फळश्रुति । ३५
( १६ ) निश्चयाचा महा मेरु । बहुत जनासि आधारु । १५

ही मुक्तेश्वर कृत रामायणाची सुंदर पोथी आहे. दुर्दैवानें शेवटचें पृष्ठ नष्ट झाल्यामुळें लेखनकाल नक्की सांगतां येत नाहीं.

जुने ग्रन्थ छापतांना हजारों चुक्या सहज होऊन ठेवावयाच्या, हा जो महाराष्ट्राचा दंडक तो हें रामायण छापताना सुटलेला नाहीं ! एक उदाहरण :

सुखीं राम त्या धाम कैवल्य लाभे । घरीं नृत्य तो भृत्य होऊनि राबे ॥
अशीं चरणें छापणारानें छापलीं ! नृत्य ऐवजीं मृत्य पाहिजे.

३०१ ] ६२

पृ. सं. २८५ × २ = ५७० [ २००

त्रिवेणी गीता—मूळ गीतेचा श्लोक आणि मग वामनाचा समश्लोक, तुलसीदासाचा दोहरा व मुक्तेश्वराची ओवी,

एवं तिन्ही हे मिळतां त्रिवेणी । करी जना मुक्त जशी त्रिवेणी ॥
अशी या ग्रन्थाची रचना कोणा त्र्यंबकानें केलेली आहे.

त्र्यंबकानें ग्रन्थाला बारा श्लोकांची प्रस्तावना जोडली आहे, परंतु प्रतीचें पहिलें पृष्ठ नष्ट झालेलें असल्यामुळें पहिल्या चार श्लोकांना आपण आंचवलों आहों. प्रतीचा कागद अति ठिसुळ झाला आहे, इतका कीं, प्रतीला हात लावला कीं दर खेपेस कागदाचा थोडा थोडा भाग झडतो. मूळ प्रतीचीं शेवटचीं पांच पृष्ठें हरवलेलीं असून त्या पृष्ठांवरील मजकूर निराळीं पांच पृष्ठें घालून कोणी लिहून ठेवलेला आहे.

३०२ ] ६३

पृ. सं. ५१ × २ = १०२ [ १२६

ज्ञानदेव विरचित उत्तरगीता, मूळ श्लोक १३९, ओव्या ५५१, येकूण संख्या ६९०. लेखनकालादि :

शके १७१९ प्रवर्तमाने पिंगलनामसंवत्सरे फाल्गुन कृष्ण अष्टम्यां स्थिरवासरे श्रीभीमसेनसंनिधौ उमदि त्र्यंकटेशसुत कृष्णेन लिखितं गुंडोपंतस्य दत्तं परोपकारार्थ दत्तं ॥

३०३ ] ६४

८+६+१७+२+५+१३=५१×२=१०२ [ ११९

**३०८ ]** ६९ [ १५०

पृ. सं. ५४ × २ = १०८

कल्याणमहाराज कृत महावाक्यपंचीकरण ग्रन्थ.

अज्ञानामुळें कल्याणमहाराजांविषयीं महाराष्ट्रानें ज्या कल्पना करून घेतल्या होत्या त्या आतां साफ बदलल्या पाहिजेत. ग्रन्थ अभंगात्मक आहे. त्याचीं सात शतकें आहेत. ग्रन्थसंख्या ७७१ शेवटीं नमूद आहे. दुर्दैवानें पहिल्या शतकाचीं शेवटचीं पानें व सातव्याचीं आरंभीचीं पानें हरवलेलीं आहेत. तिसऱ्या शतकाच्या १०४ ओव्या आहेत. दुसऱ्या, चवथ्या, पांचव्या आणि सहाव्या शतकांच्या प्रत्येकीं १०१ ओव्या आहेत. शतकें म्हटलीं असलीं तरी सातव्या शतकाच्या ६४ च ओव्या आहेत. यावरून पहिल्या शतकाच्या १९९ असल्या पाहिजेत. संपूर्ण ग्रन्थ केव्हां तरी मिळाला पाहिजे आणि छापला गेला पाहिजे. शेवटच्या अकरा ओव्या :

सद्गुरुप्रसादें ज्ञान हें निर्मळ । जन्म हा सफळ स्वामीकृपें ॥ ५४
ऐसें महावाक्य गुरुशिष्या ऐक्य । सद्गुरुसुवाक्यबोधें जालें ॥ ५५
अहं ब्रह्म अयं महावाक्य साचा । सोहं हंसा साचा वेदांत हा ॥ ५६
नामरूप गेल्या स्वस्वरूपज्ञान । लक्ष्यांशें तूं पूर्ण ब्रह्म सत्य ॥ ५७
या नांव विवेकप्रळये बोलिजे । स्वानुभवें सुखें आपें आप ॥ ५८
शिष्य तो सुलीन आनंद निर्भर । नेणे आप पर स्वामीबोधें ॥ ५९
सुटलें बंधन मायेअविद्येचें । ज्ञानाविज्ञानाचें मौन्य आलें ॥ ६०
समर्था सद्गुरु नाहीं उत्तीर्णता । पूर्णत्वें पदार्थी ठाव नाहीं ॥ ६१
रामभक्ति पूर्ण तेणें सत्य ज्ञान । केलें निरूपण संकळीत ॥ ६२
परोपकारार्थ बोलिलें स्वभावें । याच्या शोधें व्हावें ब्रह्म पूर्ण ॥ ६३
रामदासकृपें बोलिलें कल्याणें । श्रोतीं न्यून पूर्ण क्षमा कीजे ॥ ६४
इति श्री महावाक्य पंचविवेकप्रळय विमळब्रह्मनिरूपण नाम संपूर्ण ॥
ओव्यासंख्या ॥ ७७१ ॥

**३०९ ]** ७० [ १००

पृ. सं. ९ × २ = १८

मोरोपंत कृत गंगास्तुति–आर्या १०१

**३१० ]** ७१ [२००

पृ. सं. सुमारें २००

एकनाथ कृत रुक्मिणीस्वयंवर–अपूर्ण जीर्ण प्रत

**३११ ]** ७२ [११६

पृ. सं. ७९ × २ = १५८

एकनाथ कृत हस्तामलक–ओवीसंख्या ६६९.

प्रतीचा लेखनकाल : जीर्णोद्धार जाला शके १७१९ ईश्वराब्धे श्रावण कृष्ण द्वादसी रविवार क्षेत्र श्रीपंढरीस समाप्त ॥

**३१२ ]** ७३ [२००

१३ + ११ = २४ × २ = ४८

एकनाथ कृत भावार्थरामायणापैकीं किष्किंधाकांडांतील बाराव्या आणि तेराव्या असे दोन प्रसंग

**३१३ ]** ७४ [१०७

१० × २ = २०

ओंकारगीता–संस्कृत, ६५ श्लोक

लेखनकाल : शके १७४८ व्ययनाम ... आषाढे मासे शुक्लपक्षे प्रतिपत्तिथौ सोहने फडके ह्स्वुपनामक बाळभट्टेन लिखितं ॥

**३१४ ]** ७५ [१६६

३४ × २ = ६८

पंचीकरणमहावाक्य किंवा महावाक्यपंचीकरण

नवीन ग्रन्थ आहे. नवीन म्हणजे नव्यानें पुढें येणारा, अप्रकाशित. त्याचीं सात प्रकरणें असून अनुक्रमें ओव्या ७१, १४, ११, १३, ७, १२, १९ मिळून १४७ ओव्या आहेत. ग्रन्थकारानें आपलें नांव दिलें नाहीं. श्रीगणाधिपतये नमः। श्रीसरस्वत्यै नमः। श्रीगुरुभ्यो नमः। यापलीकडे नमनाच्या भरीस न पडता एकदम

शुद्ध निखळ ब्रह्म। तेथें चैतन्य इच्छा आगम।
महत्तत्व माया उगम। ॐ उद्भवला ॥ १ × १

या ओवीनें आरंभ करून

जैसें अंजन सुदलिया डोळा। भूमि फोडोनि निधान देखे डोळा।
तैसी परतु देखलिया डोळा। व्यवसाय नाहीं ॥ ७ × १९

या ओवीनें ग्रन्थाचा शेवट करण्यांत आला आहे.

शेवटीं लेखनकाल दिला आहे : स्वस्ति श्री नृपशालिवाहन शके १६८७ पार्थिव नाम संवत्सरे । ज्येष्ठ शुद्ध ६ रविवासरे लिखितं समाप्तमस्तु ॥ श्रीलक्ष्मीवेंकटेशार्पणमस्तु ॥ मुकुंद विठल ॥

३१५ ] ७६ [१५०
१७ × २ = ३४

द्रौपदीधांवा – कोण कृत न कळे. ओवीसंख्या ८० बाडांक १५९ त (३) त जें वस्त्राहरण प्रकरण आहे, तो च हा धांवा आहे, पण यांत त्यांतील निवडक ओव्या घेतल्या आहेत, असें दिसतें.

३१६ ] ७७ [१००–२००

सर्वसंग्रहात्मक दप्तर-(१) चतुर्थयोग म्हणजे च आपलें छापलेलें चतुर्थमान. यांत प्रत्येक योगाचें किंवा मानाचें नांव दिलेलें आहे : सर्वात्मविवरण योग प्रथम, स्वरूपविवरण योग द्वितीय, विवेकलक्षणनिरूपण योग तृतीय, प्रबोधलक्षणनिरूपण योग चतुर्थ, (२) चतुर्थयोग, दुसरी प्रत, (३) षड्रिपु, (४) मोरोपंत कृत मन्त्ररामायणा पैकीं कांहीं भाग, (५) हनुमंतसहस्रनाम, अपूर्ण, (६) गीतगोविंद, पृ. सं. ८०, मधलीं गहाळ, (७) संस्कृत मारुतीस्तवन, (८) शंकरपार्वतीसंवादरूप ॐ चें वर्णन, अपूर्ण, (९) अथर्वणवेदे कलिसंतरणोपनिषद्, (१०) चारी महावाक्यांचें व्याख्यान, मराठी, श्रीभारतीतीर्थविद्यारण्यमुनिवर्यकिंकरेण रामकृष्णेन, (११) मोरोपंतकृत सन्मणिमालेंतील कांहीं आर्या, (१२) देह त्यागिल्यावर केलेला अभंग-माझी काया गेली खरें । इत्यादि, (१३) बोले रामासी वैदेही । आहे रामायण देहीं ॥ १ – ऐसें देहीं रामायण । दास सांगतसे खूण ॥ ६२, मधल्या २६ ते ४१ नष्ट, (१४) दास कृत रामा तुझें पद चांगलें । (१५) विसरूं कसा मी गुरुपादुकेला । ८ श्लोक, (१६) चेणाबाईच्या आजारपणाच्या ओव्या २३ व एक पद, (१७) श्री ज्ञानेश्वरकृत हे शकुनावळी ग्यार । करूनि रचिली प्रगटार्थ रम्या । येथें जरी पर असेल विरुद्ध कर्णीं । गोविंदसुत म्हणवो मज बोल नाणीं ॥ ६५, अपूर्ण, शके १७१२ पौष कृष्ण ११ रवौ अनंतनाईन दरजागानखद्र किल्ला धारवाड प्रांत कर्नाटक तेथें लिहिलें असे । (१८) अनंतचारावर अष्टक, (१९) केदार-

खडे व्यासयुधिष्ठिरसंवादे दुःखदारिद्र्यनाशनस्तोत्रम्, संस्कृत, ( २० ) तांब्याचें सुवर्ण होय, ( २१ ) श्रीसमर्थ कृत काही पदपदांतरें, ( २२ ) पांडवगीता अपूर्ण, शिवदिनकेसरी—उद्धोधरचित काळरात्रीस्तोत्र व भुवनेश्वरीस्तोत्र पूर्ण व नृसिंहसरस्वतींचें अष्टक अपूर्ण, ( २३ ) सच्चिदानंद बाबा बोधिला। तैपासुनी राजयोग प्रगटला। बोधे दैवे आधिला। म्हणे निवृत्तिनाथ ॥ ६ ॥ इति योगसार । महाविद्याविचार। सांगे ज्ञानेश्वर । गुरुपुत्रासी ॥ ७ ॥ इति पंचमुद्रा ॥ केशवभटजोसी पागरकर लिखितम्। ( २४ ) दास कृत रामा राघवेंद्रा यो ॥ ( २५ ) एकनाथी भागवताची आरती

आरती भागवता । महाराजा दीनानाथा ।
तुजविण ज्ञानदाता । नाहीं त्रिभुवनीं पाहतां ॥ ध्रु०
वेदशास्त्रसंमतीचा । अनुभवी राहाता ।
श्रीगुरुप्रचीतीसी । ऐक्य करूनि पाहाता ॥ १
श्रेष्ठ हें भागवत । ह्या हि माजी उद्धवगीत ।
तुवा प्रवर्तावे तेथ । वक्ता ( अंसे भ ) भवंत ॥ २
येकनाथें कृपा केली । तिहि ( जागृ ) ति जाली ।
मानवदेह जड जीव । उद्धरुनि गेले आता ॥ ३
उद्धवाचा प्रश्न होता । भगवंता हर्ष मोठा ।
तुज सम नाहिं कोणी । फिरवि मुखावरुनि हाता ॥ ४
येकनाथ म्हणतीता । येकपणा नुरे वार्ता ।
येथीं येक मिळुनिया । नाथपण नाहिं आता ॥ ५

( २६ ) दासी काशी कृत आत्माराम सद्गुरूची आरती, ( २७ ) दासबोधाचें मुखपत्र, अपूर्ण, हृचचर्चा लेखांक १११ त दिलें आहे त्याची च प्रत, ( २८ ) आत्मरक्षा, ( २९ ) विश्वनाथसुत कृत नारायणस्तुति, अपूर्ण, ( ३० ) श्रीसमर्थ कृत निर्गुणध्यान, ( ३१ ) भोईतरवट्याच्या औषधाचा कागद, ( ३२ ) बहुधा कृष्णदासमुद्गलकृत रामायणाचा भाग, ( ३३ ) रत्नाकर कृत उपदेशरत्नाकर, ओव्या २४०, ( ३४ ) कोणी वेद कृत तीन पदें, ( ३५ ) श्रीसमर्थकृत दोन अभंग, (३६) रघद, दामाजीचरित्र, ( ३७ ) ब्रह्माण्डपुराणे श्रीरामजानकीसंवादे परमतत्त्वबोध आत्मज्ञान ध्यान, ओव्या २१७, दस्ताक्षर देवत रामाजी बोकील मौजे येवली प्रगणे दोकी, शके

१७१२ फाल्गुन शु. ५ सोमवार, ( ३८ ) सोपान कृत प्राकृतगीता, अपूर्ण, ( ३९ ) गर्भोपनिषद्, ब्रह्मोपनिषद्, निरालंबोपनिषद् यांचीं कांहीं पत्रें, ( ४० ) पचीकरण महावाक्य, बाडांक ११४ त जो ग्रंथ आहे तो च, पण दोन्ही प्रतींत थोडथोडा फरक आहे व या प्रतींत प्रत्येक प्रकरणाचे शेवटीं ' ज्ञानदेव कृत ' म्हटलेलें आहे. या प्रतीचा लेखनकाल वगैरे : शके १७१३ माघ शु. १ भौमे । इदं पुस्तकं मल्हार भट्ट जोशि पागारिकर तस्य अस्ति ॥ ( ४१ ) सुमारें २०० वर्षांपूर्वीचा एक कागदाचा तुकडा, त्यावर पुढील तीन शकाची नोंद आहे : " समर्थांचा जन्म ॥ शके १५३० तारण नाम सवत्सरे चैत्र शुद्ध ९ माध्यान्हीं ॥ ग्रंथ केला ॥ शके १५८२ प्लव नाम संवत्सरे ॥ समाधिस गेले ॥ शके १६०३ माघ वद्य ९ शनिवार दोन प्रहरां दुर्मति नाम सवत्सरे ॥ " परंतु १५३० ला कीलक संवत्सर होता, तारण १५०६ ला होता व १५८२ ला शार्वरी संवत्सर होता, प्लव १५८३ ला होता. ( ४२ ) हरिहर कृत १२१ जय जय राम, ( ४३ ) रामीरामदास कृत भक्तिरहस्यापैकीं येकविशावें येकादशी प्रकरण, ( ४४ ) पुष्पदंतविरचित महिम्नस्तोत्राची श्याम शंकर कृत समश्लोकी टीका, श्लोक ४०, ( ४५ ) शिवरामपूर्णानंद कृत रामतुळशी अष्टोत्तर शत, ओंव्या ११०, प्रकाशना योग्य, शिवाय तुका, एकनाथ व हरि यांचीं कांहीं पदें, ( ४६ ) श्रीसमर्थांचा गुरुवध, ओ. २७, श्रीसमर्थांनीं तुकारामाना आपला गुरुवध निवेदिल्याचा अभग, अभग महत्त्वाचा आहे पण तो श्रीसमर्थकृत असावा असें मला क्षणभर हि वाटत नाहीं, तो दुसऱ्या कोणी केलेला असावा, ( ४७ ) हीं एका बाडांतील १९२ ते २०१ अशीं पानें आहेत, त्यात भागवत अष्टम स्कदांतील गजेंद्रोपाख्यानावर रघुनाथकृत समश्लोकी टीकेचा कांहीं भाग आहे, (४८) मठात एके काळीं असलेल्या पुस्तकाची यादी, ( ४९ ) हीं एका बाडाचीं मधलीं च बारा पानें आहेत, त्यात सुमारेंबावजा सुंदर ओव्या आहेत, ( ५० ) संस्कृत श्रीरामदासचरित्राचें एक पान, ( ५१ ) सुंदर कटावबद्ध शुकचरित्र, अपूर्ण, (५२) गळांठा, यांत एकादें पृष्ठ इकडचें एकादें तिकडचें असा सर्व च गळाठा आहे, पण तो हि निरुपयोगी नाहीं, त्यात हि अनंत, शिवदिनकेसरी, रगनाथ, मध्वनाथ, निपटनिरंजन, कृष्णदासमुद्गल, आनंदसुत, गोविंदसुत, शिवराम, महिपति, केशव इत्यादिकांचीं पूर्णापूर्ण पदपदार्तें आढळतील.

जीर्ण मठांतील उद्ध्वस्त झालेल्या ग्रन्थसंपत्तीचा हा अवशिष्ट भाग पाहून एकीकडे हृदय विदीर्ण होत असलें, तरी मठाच्या मूळ स्वरूपाची कल्पना होऊन कौतुक वाटल्यावाचून राहत नाहीं.

## ३१७ ]

७८ [२००

पानापुढें पान अशीं तीस पानें डकवून केलेलें एक वेटोळें. त्याचीं पहिलीं ४ पानें हरवलेलीं आहेत. त्यांत बेदरची पातशाही, हुसेन गगु, बाबाजी अनंत याची बखर आहे. ती कोणा रघोजीनें लिहिलेली आहे.

## ३१८ ]

७९ [१४१

कागदपत्रें, एकंदर ४५ आहेत. जुनीं पत्रें म्हणजे शके १७१४ तील आहेत. तीं पंतप्रधान, सचीव, निंबाळकर, शिंदे यांचीं, विजापूर-प्रांतांतील होसूर, होर्ती, तिकोटे, होनवाड, चादकवठे या गावांबद्दल आहेत. शिष्यवर्गाकडून आलेलीं कांहीं पत्रें ओवीबद्ध आहेत. ओवीबद्ध पत्रें लिहिण्याची पद्धति बऱ्याच मठांत होती, असें पाहण्यांत आहे.

येथें प्रमाणें पागरी मठांतील समर्थांचें स्वरूप आहे. दोन तासांत पागरी मठांतील कार्य उरकून लागलीं च वार्शीस गेलों. वार्शीहून पुण्यास व पुण्याहून मसूर स्टेशनवरून वैशाख वद्य ८ शके १८२६ (ता. ८-५-१९०४) रोजीं चाफळास जाऊन पोचलों. चाफळास यापूर्वीं गेलों होतों तें दर्शनासाठीं, पण या खेपेस गेलों तें संशोधनासाठीं होय. त्याप्रमाणें संशोधनास सुरवात झाली, पण तें एका च खेपेंत संपलें असें मात्र नव्हे. त्यानंतर अनेक वेळां चाफळखोऱ्यांत संशोधनार्थ व दर्शनार्थ गेलों होतों. जाब ही जशी श्रीसमर्थांचें जन्मभूमि किंवा टाकळी जशी तपोभूमि, त्याप्रमाणें

### चाफळखोरें

ही त्याची कर्मभूमि होय. १५६६ त तीर्थाटण संपवून श्रीसमर्थ प्रथम शहापुरमसूरचंद्रगिरी या भागांत आले. त्यांचें पुढील सर्व चरित्र विचारांत घेतलें तर स्थूल मानानें असें म्हणतां येईल कीं, वाटेल तेव्हां त्यांचें सर्वत्र पर्यटन होत असतां हि १५६६ ते १५६९ त्यांचें मुख्य ठाणें (Head quarters) शहापुर येथें, १५७० ते १५७६ चाफळास, १५७७ ते १५८६ शिंपतरच्या घळींत, १५८७ ते १५९४ हेळवाकच्या घळींत व १५९५ ते १६०३ सज्जनगडावर असें. १५५४ ते १५६६ तीर्थाटणाच्या काळांत सर्व भरतखंडभर संचार होत असतां, देशाची जी भयंकर स्थिति

झाली होती ती अवलोकनांत आली होती, धर्म कसा संकटांत सांपडला होता याची कल्पना झाली होती, स्त्रियादिकांच्या अब्रूचे जे धिंडवडे निघत होते त्यानें हृदयाचा थरकार होत असे, देवालयें आणि त्यांतील देव यांची काय अवस्था होई ती ठिकठिकाणीं नजरेस पडे, कुटुम्बवत्सल लोक आणि गोरगरीब देशोधडीला लागलेले पाहण्यांत येत, तेव्हां ही सारी स्थिति पालटून पुनरपि या पवित्र भूमींत रामराज्याची स्थापना कशी व्हावी, काय करावें, याचें मनाशीं सारखें चिंतन १५६६, १५६७, १५६८ या काळात चाले, या च काळात हेळवाकच्या खालीं घाटांत चिपळुणाजवळ परशुरामाच्या दर्शनास गेले असतां परशुरामाची तरी ही च प्रार्थना केली कीं, अरे मी तुमच्या च गोत्रांतला, तुमचा असतां तुम्ही माझा मुळीं च समाचार घेऊं नये, माझी विचारपूस करूं नये, मला कोणता हृद्रोग जडला आहे त्याची काळजी करू नये, माझे मनोरथ पुरवूं नयेत, हें काय तुम्हास शोभतें ! तुम्ही चिरंजीव असतां आणि मी तुमचा असतां तुम्ही माझी उपेक्षा करावी, किंवा हा वेडा आहे, कांहीं तरी भलतें च मागतो आहे, म्हणून तुम्ही उदासीन असावें व माझा तुम्हांस कांहीं च अभिमान वाटू नये, हें काय तुम्हांस योग्य वाटतें ! कां, परशुरामा, तुम्ही चिरंजीव असून हि युगपरत्वें तुमचें सामर्थ्य नष्ट झालें आहे, असें मी समजूं ! काय करावें, कोणाला शरण जावें, कोणाला आळवावें, याची सारखी विवंचना चाले ! ( करुणाष्टक २० वें ) अंतरी कल्पना केली । मैत्रीतीं बोलिलो बहु । आणि

## रक्षिता देव देवांचा

त्याचा उपाय दृष्टिला ॥ चाफळास १५७० त श्रीसमर्थांनीं श्रीरामाची स्थापना करून उत्सव सुरू केला. सबंध चाफळखोऱ्यातील भूमि पवित्र आहे. जाऊन पहा. घाटेल तिकडे पहा, समर्थांची साक्ष पटेल ! त्यांनीं च वर्णन केल्याप्रमाणें चौफेर डोंगराचा घेर असून मध्यें देवाचें शिखर आहे. अकरापैकीं तीन मारुती या च खोऱ्यांत आहेत, चवथा हि माजगांवचा जवळ च आहे, दास डोंगरीं राहतो । यात्रा देवाची पाहातो । ती समर्थांची बसण्याची दोनमजली घळ मागील डोंगरांत च आहे, आणि तिच्या जवळ च कुबडतीर्थ असून थोडे पलिकडून पाटणकडे उतरण्याची वाट आहे. याच वाटेनें १५६६ च्या चातुर्मासानंतर श्रीसमर्थ हेळवाकहून घोड्यावर बसून चाफळास आले होते ! १५७१ त श्रीशिवराय, बाळाजी

आवजी चिटणीस, निळो सोनदेव इत्यादिकांस अनुग्रह झाला तो या च खोऱ्यात ! असें हें ऐतिहासिक आणि पारमार्थिक दृष्ट्या महत्त्वाचें आणि पवित्र खोरें आहे. तें महाराष्ट्रीयाचीं मनें नेहमीं आकर्षून घेऊन त्यांना अखंड स्फूर्ति देत राहील, याविषयीं शंका नाहीं. या खोऱ्यात श्रीसमर्थांचा मुख्य मठ तर आहे च, पण शिवाय उपाध्ये, देशपांडे, यावर देशमुख, दवळे, मेढे इत्यादि ऐतिहासिक घराणीं आहेत. त्यांच्या काहीं शाखा आज बाहेर हि पसरल्या आहेत. खोऱ्यात आणि खोऱ्याबाहेर त्यांच्या कडून वेळोवेळीं बरा च संग्रह मिळाला. त्या सर्व संग्रहाला

## चाफळखोऱ्यांतील संग्रह

म्हणून संबोधून त्याचा आपण आता परामर्श घेऊं.

**३१९ ]** [१६४

रामीरामदास ऊर्फ श्रेष्ठ कृत श्रीमत् भक्तिरहस्य ग्रन्थ. या च प्रतीवरून सदरहु ग्रन्थ श्री रामदासी ग्रन्थमालेंत चवथ्या भागात प्रथम च छापला गेला. प्रत सुंदर आणि संपूर्ण आहे.

**३२० ]** पृ. सं. २४ × २ = ४८ [१५०

ग्रन्थराज दासबोधापैकीं फक्त एकोणिसावा दशक. मुखपृष्ठावर दशकाचें नाव शिकवणनाम न देता सगुणपरीक्षा असें दिलेलें आहे.

**३२१ ]** [१५६

श्रेष्ठ कृत सुगमोपाय ग्रन्थ. हा हि या प्रतीवरून मालेंतील चवथ्या भागात छापला आहे.

**३२२ ]** पृ. सं. सुमारें ५०० [१५०

श्रीसमर्थ कृत सुंदरकांड आणि युद्धकांड

सुंदर आणि प्रेक्षणीय बाड, प्रदर्शनात ठेवण्याला योग्य. पृष्ठाचीं लांबी रुंदी ८½″ × ६″ आहे. दोन्हीं कांडें मिळून १४६२ श्लोक आहेत. प्रत्येक पृष्ठावर तीन तीन श्लोक लिहिलेले आहेत. पृष्ठाच्या चौफेर समासाची जागा पिंवळ्या रंगानें रंगविलेली आहे व वेष्टन हि पिंवळें च आहे. कौतुकास्पद.

## ३२३ ]

पृ. सं. १६३ × २ = ३२६ [ ४२

गंगाधर नारायण खानवलकर कृत श्रीरामदासचरित्र. ग्रन्थ आर्यावृत्तांत आहे. ग्रन्थाचे अध्याय २५ असून आर्यांची संख्या ११९७ आहे. महिपतीच्या संतविजयाच्या आधारानें ग्रन्थरचना झालेली आहे. ग्रन्थकार विष्णुरदीघर ऊर्फ गंगाधरराव नारायण यांनीं हें चरित्र गुलबराईस शके १७९८ श्रावण शु. १५ स रचविलें. त्यानीं तें सांगितलें व बळवंतराव मोपटकर यानीं तें लिहिलें. हें बळवंतराव मोपटकर म्हणजे आपले भास्कर बळवंत व लक्ष्मण बळवंत याचे वडिल च कीं काय कोण जाणे ? बहुधा ते च असावेत कारण आपणास श्रीसमर्थांचें वेड आपल्या आईनें लावलें असें लक्ष्मण बळवंत ऊर्फ आण्णासाहेब एकवार मजजवळ बोलले होते. ही प्रत १८११ पौष शु. १५ ची आहे. चरित्रकारानें आपली परंपरा दिली आहे ती अशी : श्रीसमर्थ-दत्तात्रय-राघव-यशवंत-लक्ष्मण-परशुराम-राजाराम-गंगाधर.

## ३२४ ]

पृ. सं. ३१ × २ = ६२ [ ७५

ज्ञानबोध नांवाचा ओवीबद्ध ग्रन्थ. मुखपृष्ठावर समर्थरामदासकृत म्हटलें आहे, परंतु ग्रन्थ श्रीसमर्थकृत असावा असें वाटत नाहीं ग्रन्थ सांप्रदायिक आहे, श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाला तो धरून आहे, पण तो श्रीसमर्थांचा नसावा. एकाद्या शिष्याचा असावा. त्याचे अकरा अन्वय म्हणजे समास आहेत व ओवीसंख्या ५०८ आहे. प्रत्येक अन्वयाचे शेवटीं "इति श्री ज्ञानबोधे देवदाससंवादे..." असें आहे. त्यावरून तो दादेगांवमठपति श्रीसमर्थशिष्य देवदास याचा असेल कीं काय, अशी कल्पना मनांत येते. ग्रन्थाचें प्रकाशन होणें इष्ट आहे. सहाव्या अन्वयांतील कांहीं ओंव्या देतों :

ऐक सांप्रदायनेम । तुज सांगतो उत्तम ।
जेणें चित्ताचा भ्रम । दूर होइजे ॥ ६-२४

ध्यान सगुणाचें करावें । मनें भगवंतासी पूजावें ।
नाम घेतां असावें । मन एकाग्र ॥ २६

गुरुतीर्थसेवन । तेणें होय पापक्षाळण ।
अज्ञानमूळहरण । ऐसें हें वचन ॥ २७

होता, पण १७५५ च्या सप्तमीस सोमवार होता. तेव्हां १६४५ च्या जागीं १७४५ पाहिजे होतें.

( ३ ) २५१ पृष्ठाच्या पाठीमागें श्रीरामदास स्वामींचीं चौदा नांवें दिलीं आहेत तीं : रामीरामदास, रामदास, दास, समर्थ, कीर्तिवंत, भक्त, विनय, महंत, भीम, वदे, फकीर, सज्जन, जयवंत, कवि.

( ४ ) २५२ पृष्ठाच्या पाठीमागें व पृ. २५३ वर "श्रीसमर्थांचे किल्ल्याचीं आक्षरें" दिलीं आहेत. या किल्ल्याचा फोटो आणि वर्णन मागील पृ. ९८ वर आलें आहे.

( ५ ) पृ. २५४ पासून पुढें पूर्णानंदांच्या शिवरामांचीं सात पदें आहेत.

( ६ ) पृ. २५७ वर "श्रीकल्याणस्वामींचे समाधीवरील श्लोक" दिले आहेत. ते आपण रामदासी ग्रन्थमालेंतील तिसरा भाग, श्रीसमर्थांची कविता, या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत याच बाडावरून उतरून घेतलेले दिले आहेत.

३३० ] बाड पृ. सं. २१ × २ = ४२ [१००

काय करावें या दुर्दैवाला ! या ४२ पृष्ठांशिवाय या महत्वाच्या बाडाचीं आरंभीचीं ९ × २ = १८ व शेवटचीं ६ × २ = १२, मिळून ३० पृष्ठें गहाळ !

रामदासी मालेंतील भाग दुसरा श्रीसमर्थांचीं दोन जुनीं चरित्रें, पैकीं दुसरें चरित्र जें तंजावरमठपति भीमस्वामी यांनीं लिहिलेलें तें या बाडांत आहे व यावरून च तें आपण अपूर्ण स्वरूपांत त्या भागांत छापलें आहे.

३३१ ] पोथी – पृ. सं. ४ × २ = ८ [१००

श्रीसमर्थ कृत पूर्वारंभ. ४७ ओव्यापर्यंत च आहे. शेवटचें एक पृष्ठ हरवलें आहे.

३३२ ] पोथी – पृ. सं. ११ × २ = २२ [१००
श्रीसमर्थ कृत निर्गुणध्यान

३३३ ] पंचीकरणाच्या तीन प्रती [१००

एक चेंडाळें, दुसरें १६ पृष्ठें, तिसरें १० पृष्ठें

**३३४ ]** बाड – पृ. सं. ४० × २ = ८० [१००

श्रीसमर्थकृत अभंग वगैरे. पृष्ठें ५ ते १४ पंचीकरण आहे.

**३३५ ]** बाड. पृ. सं. ५ ते ५३
पहिलीं ४ व शेवटचीं कांहीं नष्ट [१००

चाफळखोऱ्यांत बाळनाथ म्हणून कोण होऊन गेले कोण जाणे. त्यांचे गुरु अनंत व दया, सरा व मैना अशा त्यांच्या शिष्यशिष्यिणी होत्या.

या बाडांत बाळनाथांचीं ४०–५०, दया व सरा यांचीं दोन दोन व मैना यांचीं २२ पदपदांतरें आहेत. हीं सर्व मंडळी नवीन आहेत. प्रत्येकाचा एकाद दुसरा अभंग कल्पनेसाठीं देतों :

(१)

सद्गुरवाचुनी नाहीं दुजा देव । म्हणुनिया भाव धरा पाईं ॥ १
साधनाचें सार श्रीगुरुचिंतन । न लावावें मन दुजे ठाईं ॥ २
विश्वास अंतरीं धरूनिया प्रेमें । उच्चारावें नाम वेळोवेळा ॥ ३
बाळनाथ म्हणे अनंताचे नामीं । साधनाची उर्मी जिरे तेथें ॥ ४

(२)

सर्व साधनाचें सार । मन राखी दृढतर ॥ १
मनामागें वा न जावें । गुरुवाक्यातें स्मरावें ॥ २
अहो विवेकाच्या बळें । मन करावें पांगुळ ॥ ॥ ३
नाथ अनंताच्या पदीं । ठेवी मन निजछंदीं ॥ ४
बाळनाथ म्हणे आतां । मन मारुनी हो परता ॥ ५

(३)

ऐसी करी रे बापा संध्या । जेणें पातक जाय सद्यां ॥ ध्रु०
त्रिपद त्रिगुण आचमन । करी वा तुर्येच्या साक्षिणे ॥ १
करी रे अंतर बा घोसाळ । मंत्र स्नान हें निर्मळ ॥ २
जाल्या मनाची निवृत्ती । पाप इंद्रियें नाचरती ॥ ३
शुद्धी नामाच्या मर्यादीं । पापरूपा जागा नाहीं ॥ ४
हें चि नित्य प्रायश्चित्त । घडल्या होणें जीवन्मुक्त ॥ ५

दया म्हणे आदिनाथें । संख्या निरूपिली आम्हातें ॥ ६

(४)

तूं माझी माउली मी तुझें लेकरूं । नको पान्हा चोरूं गुरुनाथा ॥ १
मोघडे दे बोल मानुनिया घ्यावे । कृपेनें पाहावें मजकडे ॥ २
माळनाथापदीं मैना एकियाळ । खेळविजे बाळ कौतुकेसी ॥ ३

(५)

श्रीगुरुवाचुन दुजा नाहीं देव । म्हणुनिया भाव धरियला ॥ १
सर्व हि साधन श्रीगुरुचरण । आणिक मी ज्ञान नेणे कांहीं ॥ २
सप्रेम अंतरीं ठसावलें ध्यान । तेणें देहभान उरलें नाहीं ॥ ३
माळनाथपदावाचुनी मयना । आणिक नेणे कोणा दुजीयासी ॥ ४

(६)

उडी घाली माझे आई । आतां पाहातीस काई ॥ १
गुरुमाये तुजवीण । मज आतां आहे कोण ॥ २
कां गे निष्ठुर जालीसी । काय जालें सजविसी ॥ ३
मैना म्हणे माळनाथा । मज सांभाळावें आतां ॥ ४

३३६ ] बाड पृ. सं. २६ × २ = ५२ [१५०
पहिलीं ४ नष्ट

मुक्तेश्वर कृत भारतकथेपैकीं सावित्री आख्यान, जयद्रथ-विटंबना व जयद्रथवध

३३७ ] पृ. सं. ४२ × २ = ८४ [६७

२०५ मनाच्या श्लोकांची सुंदर वही. शके १७८८ अधिक ज्येष्ठ कृष्ण २ रोजीं श्रीतंजपुरस्थप्रह्लादीरंगनायेन लिखितम् ।

३३८ ] बाड पृष्ठ सं. ४० × २ = ८० [१००

(१) मनाचे श्लोक–पृष्ठ ७० पर्यंत
(२) पृ. ७१ ते ८० निर्याणसमयाचें श्रीसमर्थचरित्र, अभंग ५ व वोव्या २४.

# ३३९ ] पोथी–पृ. सं. १०० × २ = २०० [ १९

## ज्ञानदेवविरचित अनुभवामृत, संपूर्ण

सत्कार्योत्तेजक सभेच्या संग्रहात ज्या काहीं अपूर्व वस्तु आहेत, त्यांत य पोथीची गणना होते. रूप्याज दासबोधाच्या पहिल्या हात दशकाची जन्मभूमि जी शिवतरची घळ त्या घळींत ही पोथी लिहिली गेली आहे. तिच्या शेवट जो मजकूर आहे तो असा :

> इदं पुस्तकं दिवाकरणेन ज्ञानदेवविरचितें अनुभवामृत ग्रंथ शिवथरचे घळयेस फाल्गुन वद्य दशमी मंदवार तद्दिनि ग्रंथ संपूर्ण लिख्यते ॥... दुर्मति संवत्सरे तद्दिने विवरणार्थ लिख्यते ॥

१६०३ हा दुर्मति संवत्सर होता व तो च या पोथीचा लेखनकाल असत तर दिवाकर म्हणजे श्रीसमर्थशिष्य पहिले दिवाकर असते, पण १६०३ च्या फाल्गुन वद्य १० ला शनिवार नसून मंगळवार होता. तेव्हां १६०३ हा या पोथीचा लेखनशक नसून त्यानंतरचा म्हणजे १६६३ चा दुर्मति संवत्सर असला पाहिजे. १६६३ च्या फाल्गुन वद्य १० ला शनिवार हि होता. लेखक दिवाकर कोण ? पहिले दिवाकर १६३१ त समाधिस्त झाले, त्यांचे चिरंजीव भैरव १६४८ च्या पूर्वी च गेले व नातु १६८० पर्यंत तरी होते च. तेव्हां या प्रतीचे लेखक दिवाकर हे पहिल्या दिवाकराचे नातु होत. ( रामदासी माळेंतील नववा भाग–श्रीसांप्रदायिक कागदपत्रें–याची प्रस्तावना पहा. ) या प्रतीवरून दुसरी एक गोष्ट सिद्ध होते ती अशी कीं, शिवथरच्या घळींत श्रीसमर्थांच्या वेळीं तर लेखन चाले च, पण त्यांच्या पश्चात् हि साठ वर्षेपर्यंत तरी तें चालत असे.

# ३४० ] कागदाचा एक तुकडा [ १५०

अनंत कवींचे श्रीसमर्थांवर सहा श्लोक प्रसिद्ध आहेत, त्यांत आणखी हे तीन सामील केले पाहिजेत. ते अनंतकवीचे च आहेत कीं त्यांच्या पद्धतीचे दुसऱ्या कोणी केले आहेत, याची खात्री करून घेतली पाहिजे, ते या कागदाच्या एका तुकड्यावर आहेत :

श्रीराम

जेणें राघवमूर्ति सांडवसुतेचीये तिरीं स्थापिली ।
जे ध्यानीं विधिशक्रादिहृदयीं हृत्पंकजीं भाविली ।
तींचें ध्यान घटनियां गिरिवरी जो गुप्त राहातसे ।
ऐसा सद्गुरु जो अनंतकविचा यद्दास तारीतसे ॥ १
जेणें रुद्र दहा मनोहर जगीं येकागळे स्थापिले ।
प्रत्येकीं अकरा विधे नृपतिच्या मुद्रांकिती अर्पिले ।
त्या त्या नागरिका जना नवविधा भक्तीसि लावीतसे ।
ऐसा सद्गुरु जो अनंतकविच्या यद्दास तारीतसे ॥ २
उच्चाहस्थळ चाफळीं परि महा घळयेत जो कीं वसे ।
शाहाजीसुत भोसला गडपती राष्ट्रासि पाळीतसे ।
बुद्धीचा उदधी महाजळनिधी कार्यासि केला असे ।
ऐसा सद्गुरु जो अनंत कविचा यद्दासि तारीतसे ॥ ॥ ३

तिसऱ्या श्लोकातील तिसरा चरण दिवाकर गोसावी याना उद्देशून आहे, हें वाचकांच्या ह्रदयात येईल च, कारण त्याना ठाउक आहे कीं दिवाकर हे महाबळेश्वरचे राहणारे असून त्याची " बुद्धि हि महाबळ " आहे, असें खुद्द एकदा श्रीसमर्थ च बोलले होते. राजाकडे जाण्यायेण्याचें काम श्रीसमर्थांनीं त्याच्याकडे सोंपविलें होतें, तें उगीच नव्हें. श्रीसमर्थांच्या व्यापाच्या अनेक शाखा होत्या असें मानल्यास राजकारण सात्यावरील मुख्य मंत्री दिवाकर गोसावी होते, असें म्हणता येईल.

३४१ ] पोथी ए स. २६९ × २ = ५३८ [२००

अंशाच्या भक्तिरहस्य ग्रन्थाची एक जीर्ण, मधून मधून फाटलेली खाहेली, अपूर्ण प्रत. मूळ ग्रन्थाचीं एकदर प्रकरणें ७७, पैकीं ६८ यांत आहेत, पुढचीं हरवलीं

शिवाय एक स्वतंत्र कागद आहे, त्यावर प्रत्येक प्रकरणाचें नाव, वोविया, पत्रें नमूद आहेत. ' येकत्र संख्या वोविया ५८१३ ' व ' येकत्र संख्या पानें ७१४ ' आहेत.

१८५५ ज्येष्ठ शु ११

# ३४२ ]

पोथी [ १८७

कृष्णदाससुद्गल कृत युद्धकांड रामायण

प्रतीचा लेखनकाल वगैरे : ' शके १६६८ क्षय नाम संवत्सरे भाद्रपद मासे शुक्लपक्षे त्रयोदसी रविवार ते दिनी पुस्तक समाप्त जालें मोकाम सातारां हें पुस्तक दादाजी रामजी व चीमाजी रामजी व दवलतराव रामजी व आपाजी रामजी ॥ खोपकर यांचें असें ॥ वोव्या सुमार ९४५३ ॥ समाप्त...'

# ३४३ ]

पोथ्या [ १००-१५०

श्रीसमर्थ कृत पुढील प्रकरणें :

( १ ) पूर्वारंभ, ( २ ) पूर्वारंभाची त्याहून जुनी प्रत पण अपूर्ण, १४ व्या ओवीपासून शेवटपर्यंत, ( ३ ) पंचसमासी, ( ४ ) आत्माराम, ( ५ ) अंतर्भाव, ( ६ ) चतुःसमासी, ( ७ ) पंचीकरणयोग, ( ८ ) पंचीकरणयोगाची त्याहून जुनी प्रत, ( ९ ) त्याहून हि आणखी पंचीकरणयोगाची जुनी प्रत, पण अपूर्ण, १३ पत्रांपैकीं फक्त पहिलीं २ च पत्रें.

# ३४४ ]

पोथी पृ. सं. २१ × २ = ४२ [ २००

श्रीसमर्थ कृत आत्माराम, लहान आकाराची आणि जुनी प्रत, न जाणों श्रीसमर्थकालीन असेल. दुर्दैवानें शेवटचें मूळचें एक पत्र हरवलें असून त्या ऐवजीं नंतर कोणी लिहून दुसरें घातलें आहे.

# ३४५ ]

पोथी पृ. सं. १७ × २ = ३४ [ २००

श्रीसमर्थ कृत पंचसमासी, वरील प्रमाणें लहान आकाराची जुनी प्रत, पण उजव्या बाजूचा वरचा कोपरा कसरीच्या मस्यस्थानीं गेलेला असल्यामुळें कांहीं पत्रांचीं अक्षरें गेलीं आहेत.

# ३४६ ]

पोथी पृ. सं. १५ × २ = ३० [ २००

श्रीसमर्थ कृत पंचमान, वरील प्रमाणें सर्व बाबतींत.

३४७ ] पोथी–पृ. सं. ४० × २ = ८० [१५०

यतिमाल्या सहिता भक्तिरत्नावलिः, संस्कृत ग्रन्थ. रचनाकाल वगैरे : ' महायज्ञशरप्राणदानांकगुणिते शाके । फाल्गुने शुक्लपक्षस्य द्वितीयायां सुमंगले ॥ धाराणस्यां महेशस्य संन्निधौ हरिमंदिरे । भक्तिरत्नावलिः सिद्धा सहिता यतिमाल्यया ॥ ' महायज्ञशरप्राणशशाक = १५५५

३४८ ] पोथी – पृ. सं. २३ × २ = ४६ [१५०

संस्कृत ग्रन्थ

श्रीकृष्णचंद्रगोपिस्वामिना कृतः सारसंग्रहः ।

३४९ ] अगदीं फिरफोळ पाठ [१००

पृ. सं. ९ × २ = १८

यालीवाक्र अपूर्ण, जटायुचरित्र अपूर्ण. रामदास, रंगनाथ, सुरदास, जनजसवंत, उद्धवचिद्धन, गोविंद कवि ( गिरिजे को भुलकिस त्याला पंचमुखें ज्याला । ), मध्वमुनेश्वर, तुका, यांचीं पदपदांतरें.

३५० ] पोथी–पानें १३५ × २ = २७० [३००

आरंभींचीं २ × २ = ४ नष्ट

निवृत्तिदेव कृत सटीक भगवद्गीता–अध्याय १ ते ८.

ही अपूर्व पोथी आहे. निवृत्तिनाथांनीं गीतेवर टीका केली असल्याचें आतापर्यंत महाराष्ट्रास ठाऊक नव्हतें. या बाबतींतला अगदीं अलिकडचा प्रमाणभूत ग्रन्थ श्री. लक्ष्मणराव पांगारकर यांचा मराठी वाङ्मयाचा इतिहास-खंड पहिला–ज्ञानेश्वरनामदेवांचा काल. पण त्या हि ग्रन्थांत निवृत्तिनाथांच्या हकिकतींत निवृत्तिनाथांनीं केलेल्या या टीकाग्रन्थाचा पत्ता नाहीं.

पोथीचा कागद अति ठिसूळ आहे. ती जीर्ण झाली आहे. लिपी व भाषा तीनशें वर्षांपूर्वींची आहे. दुर्दैवानें पहिलीं दोन पत्रें गहाळ असल्यामुळें पहिल्या १४ ओव्यांना आपण दुर्तें मुकलों आहोंत. तसें च या प्रतींत पहिले फक्त आठ च अध्याय असून, ग्रन्थाचा जरी नव्हे, तरी या प्रतीचा तेथें शेवट केल्यासारखें दिसत आहे. निवृत्तिनाथांकडून च ग्रन्थ पुरा झाला नव्हता, कीं ही प्रत अपूर्ण आहे, याचा निर्णय झाला पाहिजे. निवृत्ति-

येकनाथ, कल्याण, लीलाविश्वंभर यांचें एक कूटात्मक पद आहे, त्याचें शेवटचें कडवें :

> ऐसें धीप सात तातरीं घेतां गुजली असवार ।
> घरांतुनी बाहेरि येतां चालतां हदरे घर ।
> टेकणालागी घेतले मुसळ मोडुनि जाले चकचूर ।
> लीलाविश्वंभर ऐसें विस चाख तरि राघेल पन्नास द्वार ॥५

जसवंत, चिन्मयनंदन, इत्यादिकांचीं पदपदांतरें

(२) भक्तिरहस्य–प्रकरणें ३५, ३६, ३३

(३) शक्तिभेद–श्लोक ६१, (४) मुक्तेश्वर कृत घोषयात्रा

(५) मुसलमानी ११ फीरमे किंवा सवाल

(६) श्रीसमर्थसंप्रदायांतील एक नवीन च कवि या बाडावरून प्रथम कळत आहेत. विजय, वैजनाथ, भजनाथ, येजो, कृष्णांकित, अशा नांवाखालीं रचलेलीं दहा बीस पदें या बाडांत आहे. त्यांवरून असें दिसतें कीं, कल्याणांचे कोणी कृष्ण शिष्य होते, त्यांचे हे विजय शिष्य होत. बाडांक ५७ त कल्याणस्वामींच्या महंतांचीं जीं नांवें दिलीं आहेत, त्यांत कृष्णाजी गोसावी वामसेकर आहेत, ते च विजयाचे गुरु कीं काय, कोण जाणे. तसें च विजय हे कोठले वगैरे कांहीं कळत नाहीं. संशोधनाला एक नवीन जागा झाली. या बाडांत जीं त्यांचीं पदें आहेत, त्यांकडे पुन्हां कोण केव्हां लक्ष देणार, अशी सोद्विग्न शंका वाटते, म्हणून त्यांपैकीं तीन चार पदें उतरून घेण्याचा मोह होतो. त्यांवरून परंपरा हि कळेल.

[ १ ]

> भज श्रीरामदास रे । अविनाश रे ॥ ध्रु०
> अहंममता सरे । तारी पतितास रे ॥ १
> अज्ञाननाश रे । ज्ञान स्वप्रकाश रे ॥ २
> सर्व कल्याणास रे । दे कृष्णांकितास रे ॥ ३

[ २ ]

> ध्याई गुरु पावन रामदास रे ॥ ध्रु०
> तन मन धन अर्पण करोनी । होई पाई अनन्य उदास रे ॥ १
> कल्याणदायक कृष्णस्वरूपें । वैजनाथांतरीं विजन्यास रे ॥ २

३५४ ] पोथी–पृ. सं. २०५ × २ = ४१० [ १५४

फक्त पहिलें पत्र हरवलेलें

एकनाथ कृत रुक्मिणीस्वयंवर

प्रतीचा लेखनकाल १७०१ विकारीनाम संवत्सरे फाल्गुन शु. ७ असा शेवटीं स्पष्ट दिलेला आहे. मूळ ग्रन्थ नाथांनीं १४९३ त केला.

शके चवदाशें त्र्याण्णव । प्रजापति संवत्सराचें नांव ।
चैत्र मासाचें वैभव । पर्व अपूर्व रामनवमी ॥

अशी शेवटच्या अध्यायाची ८३ वी ओवी पाहिजे व ती या प्रतींत आहे हि. पण आश्चर्य असें कीं ' चवदाशें त्र्याण्णव ' ऐवजीं ' सत्राशे शाहाण्णव ' अशीं अक्षरें पडलीं आहेत.

प्रतीच्या शेवटीं निराळ्या अक्षरांत ' बाबाजि जनार्दन जोशी कसबे कोरेगांव प्रांत वाई ' असें नांव गांव दिलेलें आहे.

शेवटच्या पानावर अध्यायवार ओवीसंख्या देऊन शेवटीं बेरीज दिली आहे, ती ९८, ५४, ५४, ७२, १००, १००, ७७, ७७, ६६, ९९, ७१, १५२, ८५, १३७, १६०, १६३, ३९, ८४ = १६८९.

प्रतीचा कागद धुरकट्न जीर्ण झालेला आहे.

३५५ ] बाड–पाठपोठ पत्रें ८६ [ २१२

आरंभीचीं २ व शेवटचीं ३ नष्ट

( १ ) या बाडांत आरंभीं पत्र ३३ पर्यंत ज्ञानेश्वरींतील नववा अध्याय व पत्र ३७ ते ८२ तेरावा अध्याय असे दोन अध्याय आहेत.

( २ ) पत्र ५ वर मथळ्याचे जागीं " श्री मल्हारि गोस्वामि सदाव्रती नाहोलिकर ॥ " असें नांव आहे.

( ३ ) पत्र ३३ ते ३७ व पत्र ८२ आणि ८३ वर संशोधकाला थोडें खाद्य आहे. शेवटचीं ३ पत्रें गेलीं त्यात कांहीं खाद्य गेलें च, त्यास आतां इलाज नाहीं. ३३ ते ३७ चार पत्रें व ८२, ८३ दोन पत्रें मिळून सहा पत्रांत मल्हारी ऊर्फ मल्हद यांचीं पदपदांतरें व कांहीं माहिती आहे. ३३ व्या पत्रावर नवव्या अध्यायाचे शेवटीं मजकूर आहे तो असा :

" शृपनाम संवछरे दक्षिणायेने श्रावणमासे शुद्ध सप्तमी बुधवासरे स्वातिनक्षत्रे घर्टीनी दुर्गायाहि कृष्णातीरे रायबागविलाति ग्राम स्थळि मग्गोपंत कुळकर्णि मौजे गाव ईचळकरंजी त्याचे घरीं लक्षिले ॥ मौजे माहोलि पा कन्हाड ते स्थळिचा गोसांवि यानि अध्याय लिहिला ॥ श्रीमल्हारि गोस्वामि सांप्रदावि लिख्यते ॥ "

यावरून व पत्र ५ वरील नांवावरून मल्हारी हे माहोलीचे दिसतात. माहोलीच्या गोसावियानें इचलकरंजीस मग्गोपंत कुळकर्ण्यांचे घरीं हा नववा अध्याय लिहिला, याचा अर्थ हें लिखाण स्वतः मल्हारी यांच्या हातचें आहे असें मानावें, का त्यांच्या संप्रदायांपैकीं एकाद्याच्या हातचें आहे, तें ठरविलें पाहिजे. १६८३ च्या किंवा १७४३ च्या श्रावण शुद्ध ७ स बुधवार नव्हता, तो १६२३ च्या होता, यावरून या लेखनाचा काळ १६२३ होय.

( ४ ) काव्यसंग्रहांतील लघुकाव्यमाला, भाग तिसरा, यांत या महाकवीचें भरसमेट काव्य छापलेलें आहे, पण त्यावरून कवीच्या जन्मभूमीचा किंवा काळाचा निर्णय होत नव्हता, तो वरील उल्लेखावरून दोन्ही बाबतींत होऊं शकेल, असें वाटतें. या उल्लेखाशिवाय या बाबांत मल्हारीकवीची पुढील स्फुट कविता आहे :

( १ ) पुनर्जन्म देवा नको रामचंद्रा ॥ हें दहा श्लोकांचें अष्टक, दहावा श्लोक :

म्हणे संत मल्हारि हस्ता सुबुद्धी । नको दूरि ठेऊं पुरें थावय मानी ।
करी दूर तापत्रयाची अभद्रा । पुनर्जन्म देवा नको रामचंद्रा ॥ १०

( २ ) श्रीकृष्णावेणीची आरती. एक कडवें :

महाबळजटोद्भूते मुनिमानस तोये । सागरगामिनी माते तारक उभयास्ये ।
श्रुतिगम्ये अनुपम्ये जगदोद्धरयेवे । मल्हारबाळक पायीं करुणाघनलेशें ॥ ३

( ३ ) भागीरथीची आरती. एक कडवें :

कूर्मसुवाहिनी अंबे जगदोद्धरमूर्ती । वर्णित वेदां न कळे अगणित तव कीर्ती ।
दर्शनमात्रें न पवति जन पुनरावृत्ती । मल्हार सेडकि पावत दस्तात्वीं मुक्ती ॥२

( ४ ) ' स्मरारि ' अष्टक, ( ५ ) श्रीकृष्णाष्टक,

( ६ ) म्हणे संत मल्हारि या उत्तमातें ।
स्मरा तें सदा राम नाम प्रमातें ॥ ८

( ७ ) म्हणे मुख्य मल्हारि गोष्टीस पावा ।
प्रभाते स्मरा शंकरा देवदेवा ॥ ८

( ८ ) तेतीस कोटी सुरराजयाचें। सोडीव जो बंधन मोक्ष याचे।
मल्हारि बोले हित हें जिवाचें। श्रीरामसंकीर्तन गर्जे वाचे॥ ८

( ९ ) नसे नाम रेखा कुळाकूळगोत्रा ।
जया ठाव तो जाण सर्वां विधात्रा ।
म्हणे भक्त मल्हारि शब्दीं विचित्रा ।
जपे रे मना रामनामेति मंत्रा ॥ ८

३५६ ] बाड पृ. सं. २४ × २ = ४८ [ १५०

( १ ) या संपूर्ण बाडांत माळो यांचे अभंग आहेत. १०७ अभंग अष्टाक्षरी व २४ अभंग बाविसाक्षरी मिळून १३१ अभंग आहेत. हे सारे अभंग अप्रकाशित आहेत. कल्पना यावी म्हणून चार अभंग देतों :

[ १ ]

भक्तकाजा तो निर्गुण । धरी स्वरूप सगुण ॥ १
सेन्यासाठीं झाला न्हावी । रूप यवनासी दावी ॥ २
दामाजीचा पाडेवार । मीदासाठीं दीनोधार ॥ ३
माळो म्हणे भीमातटीं । पाहे त्यासी भावभेटी ॥ ४ ॥ ७६

[ २ ]

युगायुगीं अवतार । भक्तकाजा दीनोध्दार ॥ १
बाहेरबाहे आंतरीं । स्तंभीं प्रगटला हरी ॥ २
मत्स्यरूप तो राघवी । नाना वेष लीळा दावी ॥ ३
माळो म्हणे तो प्रगट । भाव ज्यासी तैसा भेटे ॥ ४ ॥ ८२

[ ३ ]

जया संकष्टचतुर्थी । इच्छाफळ तया प्राप्ती ॥ १
उपोषण दिवसासी । पूजा चंद्रउदयासी ॥ २
विधीयुक्त सेवा भावें । केल्या विघ्नहर पावे ॥ ३
माळो म्हणे मीदासाठीं । भक्त रक्षील संकटीं ॥ ४ ॥ ५५

[ ४ ]

अनुभवावीण वैराग तो वाया । कष्टविल्या काया पुन्हा-नपे ॥ १
इच्छा होय न उपजे अंतकाळीं उरे । चौऱ्यासी तो फिरे भोगावया ॥ २
म्हणोनिया आधीं स्वहित करावें । गुरुकृपा या भाव सर्व काहीं ॥ ३
माळो म्हणे येका सद्गुरुवांचून । भवाब्धी हा जाण पार नोव्हे ॥ ४

( २ ) माळो यांच्या चरित्रावर कांहीं प्रकाश पाडतील असे दोन अभंग वाटतात, ते दाखल करणें इष्ट होय :

[ १ ]

धन्य करवीरेश्वर । क्षेत्र नाम हे चि सार ॥ १
कुडुमसी कृष्णावेण्या । संगम वाहे गरुडगा ॥ २
हरीपूर पूर्वी तेथें । सोमवंशी सिंपीयात ॥ ३
दैत्यनिवारणी माये । माळो सेवका तूं साहे ॥ ४ ॥ १०६

[ २ ]

शुक्लाश्रय विष्णुपुत्र । पुरोहीत विश्वामित्र ॥ १
गोत्र कौशिक निश्चित । उपनाम भागवत ॥ २
परशुराम हे मेदिनी । केली निःक्षत्री म्हणोनी ३
मगदाळस्य कर्णेश्वर । केला कृत उपकार ॥ ४
माळो म्हणे सये येक । सिंपी जाहाले निर्भक ॥ ५ ॥ १०७

# ३५७ ] फिरकोळ बाड-पृ. सं. १२ × ४ = ४८ [ १००

( १ ) चिंतामणीसुत कृत सोमवारव्रत ओ. सं. ११८
( २ ) वामन कृत वामनचरित्र, श्लो. संख्या १९
( ३ ) तुका, मध्वमुनेश्वर, केशव, विष्णुदास नामा, नामा, ज्योती, रामा, यांचीं पदपदांतरें. हे रामकवि कोणी नवीन दिसतात.
( ४ ) बाडाचे शेवटीं 'कृष्णाजीराव पाटणकर यांची वेई' असें आहे.

# ३५८ ] बाड-पृ. सं. १३० × २ × २ = ५२० [ १६७

मदराचें बाड

( १ ) आद्य दिवाकरांचे नातु जे दिवाकर त्यांच्या हातची शके १६६३ तील २३९ वी पोथी आपण पाहिली च. त्या नातु

दिवाकरांचे चिरंजीव रामचंद्र यांच्या हातचें हें प्रचंड बाड आहे. तें प्रेक्षणीय आणि-त्या हि पेक्षां विशेष अभ्यसनीय आहे. पहिल्या च पृष्ठावर "शके १६८८ व्ययनाम संवत्सरे आश्विन शुध पंचमी तद्दीनी वही सीवली स्वहस्तें श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥" अशी नोंद आहे. पांचव्या पत्रावर "यादि वहि ल्याहावयास प्रारंभ शके १६८८ व्ययनाम संवत्सरे आश्विन शुध दशमी हस्ताक्षर रामभट उपाध्ये श्रीरशामी..." अशी नोंद आहे. नंतर वेळोवेळीं जें जें प्रकरण ज्या ज्या मितीला लिहून संपलें ती ती मिती त्या त्या प्रकरणाच्या शेवटीं दिलेली आहे. कोठें 'रामाजी दिवाकर' नांव आहे, तर कोठें 'रामचंद्रेण लिखितं' किंवा 'दिवाकरात्मजरामेण लिखितं' असें आहे. मधून कांहीं प्रकरणें दुसऱ्याच्या हातचीं हि दिसतात. एकंदर लेखन पांच सहा वर्षांतलें आहे.

(२) या बाडाचा एक विशेष असा पाहिला कीं, पुढें बाडांत कोणकोणतीं प्रकरणें उतरून घेतलीं आहेत, त्यांची अनुक्रमणिका आरंभीं दिलेली आहे. अशी अनुक्रमणिका दिलेलीं बाडें क्वचित् च आढळतात. अनुक्रमणिका हा आपला अलिकडचा शब्द आहे. या बाडांत जी अनुक्रमणिका दिलेली आहे तिच्या मथळ्यावर "याद लिहिणे येकंदर जमा" असा उल्लेख आहे. नंतर प्रकरणांचीं नांवें दिलीं आहेत. त्यांत श्लोक आणि ओव्या अशी प्रकरणांची विभागणी केलेली आहे व प्रत्येक प्रकरणाच्या नांवाच्या आधीं ग्रन्थसंख्या दिलेली आहे.

(३) एक प्रकरण संपलें आणि पृष्ठावर जागा उरली तर संस्कृत किंवा मराठी सुभाषितें दिलेलीं आहेत. केव्हां केव्हां या सुभाषितांनीं पानेंच्या पानें आडविलीं आहेत. अशीं शेंकडों सुभाषितें या बाडांत आहेत. अनुक्रमणिका देऊन प्रकरणाना आरंभ करण्यापूर्वी जीं चार पांच पानें कोरीं किंवा पूर्वी लिहिलेलीं पृष्ठोपपत्रजा सोडलेलीं होतीं, तीं हि आज आपणांस महत्त्वाचीं झालीं आहेत. त्या कोऱ्या पानांवर हि कांहीं सुभाषितें, कांहीं श्रीसमर्थवचनें नंतर किंवा आरंभीं च लिहिलेलीं आहेत. अशा पहिल्या पानाच्या पाठीमागें बारा सुभाषितें आहेत, तीं सर्व देणें कठीण शक्य आहे ? पण त्यांतल्या एका सुभाषितात थोडा इतिहास आहे. १६८८ पर्यंत व्यंकोजीराजाविषयीं महाराष्ट्राची काय कल्पना होती, ती या सुभाषितांत व्यक्त झालेली आहे. तें सुभाषित असें :

सूर्याला शनि विष होय सागराला ।
व्यासाला सुत धृतराष्ट्र अंध जाला ।
ऐसा हा सुत अगुणी गुणाद्भुताला ।
येकोजी नरपति शाहु भोसल्याला ॥

पुढें बाडांत हा च श्लोक एका ठिकाणीं आला आहे, तेथें ' सागराला ' ऐवजी ' शंकराला ' असा पाठ आहे.

( ४ ) ह्या चार पांच पानांपैकीं पूर्वी लिहिलेलीं जीं पानें आहेत, त्यावर अडलेल्या लिखाणांत मोडी लिपींत पुढील मजकूर आढळतो :

श्री

मुख्य मठ चाफळचा रामदासस्वामीचा ॥

रामदासस्वामी होते पुण्यवंत । त्यांच्या पुण्यास नाहीं मित ।
त्यांच्या सांगात सेवित होता हानमंत । होता भुकेला भक्तीचा ॥ १
भक्त होता येकनिष्ट मोटा धीट । देव धर्म त्याचे केदेत ।
असकरा ( ? ) त्याच्या पुण्याचा ॥ २
रामदासस्वामीनीं स्थापिले अकरा हानमंत ।
त्यांची भार कीर्त । नवस पावती भक्ताच्या ॥ ३
रामदासस्वामीनीं येकी कीर्त भारी ।
त्यांच्या पुण्याने गाव होतात घरचेवरी ।
कासीवा गोसावी त्यास कारभारी ।
त्यानी कारभार आटपला भारी । सनदापत्रांचा ॥ ४
बावाचे घरीं बाबुभट आहेत कारभारी ।
त्याजवरी बाईची कृपा हुतारी । भाऊ धनपाळ देवघरीं ।
त्यावरी बाईची प्रीत भारी । सांभाळ करतात भारी ।
ऐका पवाडा स्वामीचा ॥ ५

( ५ ) आतां आपण बाडांत प्रवेश करूं. त्यांत क्रमशः प्रकरणें आहेत तीं :

( १ ) मिल्ली आख्यान, आनंदनंदन कृत, श्लो. २२
( २ ) जयद्रथविटंबना, मुक्तेश्वरकृत, ओवी संख्या ८७
( ३ ) शतमुखरावणाख्यान, मुक्तेश्वरकृत, ओ. सं. १३२
( ४ ) पत्रचकुंडलें हरण, मुक्तेश्वरकृत, ओ. ६०
( ५ ) भीष्मप्रतिज्ञा, वामनकृत, श्लो. २२

( ६ ) भीष्मशरपंजर, श्लो. ८

( ७ ) कृष्णचरित्र, उद्धवाचिद्घनकृत

( ८ ) रामार्याटीका, हरिराजकृत, श्लो. १०८

ही टीका शके १८०८ त म्हणजे ४७ वर्षांमागें, जनार्दन बाळाजी मोडक यांनीं काव्येतिहाससंग्रहांत छापली होती. या याद्याशीं ताडून पाहतां तींत पुष्कळ अशुद्धें आढळलीं, पण हंसूं यावें अशी एक मजेदार वाचण्याची चुकी, वाचकांच्या मनोरंजनासाठीं येथें देतों. अशा चुक्या मधून मधून दाखविण्यांत पूर्वजांना नावें ठेवण्याचा आमचा यत्किंचित् हि हेतु नसतो. कोणी गैरसमज करून घेऊं नये. पूर्व पिढींत होऊन गेलेले ते दीर्घोद्योगी, व्यासंगी पुरुष कोणीकडे आणि कोणीकडे रामदासी मासिकाच्या संपादकाचा अल्प प्रयत्न आणि तुटपुंजें ज्ञान ! पूर्वजाच्या चरणीं या संपादकानें अखंड लोटांगण घातलेलें असतें, हें वाचकांनीं निश्चित समजून चालावें. ही जी मी आज येथें चुकी दाखवीत आहे ती पाहण्याला काव्येतिहाससंग्रहाचे संपादक असते तर इतर वाचकांबरोबर त्यांची हि करमणूक च झाली असती. हा विनोद आहे. अशा गंमती दाखविण्यांत कोणाचा उपमर्द करण्याचा कोणाचा केव्हां हि हेतु नसतो. जनार्दन बाळाजी मोडकांनीं या टीकेच्या उपसंहारांतील दुसरा श्लोक वाचला आणि म्हणून छापला तो असा :

> सावुत्र त्याचा हरिराज नामें । करी न विद्या न विधान नेमें ।
> करूनि आर्याद्वय अर्थ त्याणें । समर्पिला रामपदीं सुप्राणें ॥

जुन्या काळीं बाळबोधींत पुष्कळदां र हें व्यंजन मोडी न सारखें काढीत. वाचणारा सावध नसला तर र चे न वाचून जातो. तसें मोडकांचें या श्लोकांत झालें. त्यांनीं र ऐवजीं न वाचला आणि च्या चें वा वाचायाला त्यांना कांहीं च कठीण गेलें नाहीं. पण परिणाम मात्र अर्थाचा अनर्थ झाला. ' न विद्या न ' ऐवजीं ' रविध्यान ' वाचावयास पाहिजे होतें. म्हणजे दुसरें चरण असें पाहिजे :

> करी रविध्यान विधान नेमें ।

( ९ ) गोविंदस्तुति, वामनकृत, श्लो. ५२

( १० ) मंदोदरीनीत, श्लो. २४

( ११ ) मंदिरदर्पणांतील प्रकरण ४० में

( १२ ) राधाकृष्णविलास, आनंदनंदनकृत, श्लो. ४२

( १३ ) गजेंद्रमोक्ष, वामनकृत, श्लो. १०
( १४ ) भक्तिरहस्यांतील प्रकरण ३४ वें व ४५ वें
( १५ ) जयद्रथवध
( १६ ) अहिल्योद्धार, विठ्ठलकृत, श्लो. ४३
( १७ ) सुभाषितें, संस्कृत प्राकृत, श्लो. १०५
( १८ ) शिवकवच, संस्कृत प्रकरण
( १९ ) फणिवर उठवीला, श्रीसमर्थकृत अष्टक
( २० ) भीमरूपी महारुद्रा, श्रीसमर्थकृत
( २१ ) चंद्रावळी आख्यान, ( २२ ) कैकेयीप्रार्थना
( २३ ) ध्रुवाख्यान, श्रीधरकृत, श्लो. ३०
( २४ ) हिंदुस्थानी दोहरे, ( २५ ) भारती फुट, मुक्तेश्वरकृत
( २६ ) मेस्तक, श्लो. ७९, ( २७ ) कौल, वेणाबाईकृत, श्लो. २६
( २८ ) पुन्हा भारती फुट, ( २९ ) आरत्या–श्रीसमर्थकृत
( ३० ) मृत्तिकाभक्षण, वामनकृत ( ३१ ) रुक्मिणीपत्रिका व
( ३२ ) पत्रिकेचें उत्तर, ( ३३ ) सुभाषित, संस्कृत, श्लो. ७५
( ३४ ) भरतभाव, वामनकृत, श्लो. ८९
( ३५ ) राधाभुजंग, वामनकृत, श्लो. ५८
( ३६ ) रामजन्म, वामनकृत, श्लो. ५०
( ३७ ) भामाविलास,
( ३८ ) सुदामचरित्र, आनंदनंदनकृत, श्लो. ४१
( ३९ ) राधाकृष्णसंवाद, श्लो. ७,
( ४० ) पंचविषय, आनंदनंदनकृत श्लो. ६

पांचा ही विषयांस जो नर भुले त्याला गती कोणती ॥

( ४१ ) बाळचरित्र गाऱ्हाणीं, वामनकृत श्लो. ९६
( ४२ ) वेणुसुधा, वामनकृत, ( ४३ ) विल्हणचरित्र, विठ्ठलकृत,
( ४४ ) कृष्णजन्म, वामनकृत, श्लोक २८
( ४५ ) सूर्यनारायणस्तोत्रम् ( ४६ ) प्रेतप्रारब्धसंवाद, श्रीसमर्थकृत बारावें शतक, (लेखनकाल १६९४ नंदन पौष शु. १)
( ४७ ) अष्टक भवानीचें गोसावीनंदनकृत
( ४८ ) पांडवगीता, संस्कृत

(४९) संस्कृत प्राकृत सुभाषितें, सुमारें ३०० वया वर
(५०) युद्धकांड, प्रसंग १३, १४, १५, कृष्णदासमुद्गलकृत, ओ. ३१७
(५१) ताटिकावध, (५२) 'श्री बोध्या फुट स्वामींच्या,'
(५३) कथा मारुती, विष्णुदासनामाकृत, ओ. ३१
(५४) बिभीषणभेटी, कृष्णदासमुद्गलकृत, ओ. ९८
(५५) वामनचरित्र, वामनकृत, श्लो. ३२
(५६) पुन्हां 'फुट बोध्या मारुती' ओ. ४९०
(५७) पद्मपुराणे वेदव्यासेन विरचित श्रीविष्णुशतनामावळी
(५८) यमगीता, संस्कृत, (५९) रासक्रीडा, वामनकृत
(६०) भजा रे भजा विश्वमाता भवानी ॥ ५
(६१) शिवदिनकेसरी कृत तो हा सदा रामदास गुरु अविनाशी ॥
(६२) यादी इमारतीकारणे, श्रीसमर्थकृत
(६३) प्रभू रामदासासि कल्याणकर्ता ।
सुरे सर्वथा पादतां भेदवार्ता ।
अनंता अखंडा निजज्ञान सिद्धा ।
नमस्कार माझा तया दासबोधा ॥ ८
(६४) डोहळे कौसल्येचे, भावार्थरामायणांतर्गत
(६५) घर्ले दुर्मुजी०, अनंतकविकृत
(६६) आरती दासबोधाची, कल्याणकृत

असें हें प्रचंड, सर्वसंग्राहक, उपयुक्त बाड आहे. त्याच्या संगतींत एकाद्याला वेळेचें भान न राहून रात्रीचे दोन वाजले तर त्याचें आश्चर्य वाटावयास नको.

## ३५९ ]

बाड पृ. सं. १४४ × २ × २ = ५७६ [ १६१

(१) पाठकनामा हा अश्वमेध, प्रसंग, १, २, ३, ६ ते ९, १२, १३, २०, २१, २८ ते ३८, ९० ते ९३. पैकीं ३८ व्या प्रसंगाच्या शेवटीं 'शके १६९३ खर नाम संवछरे श्रावण मासे' असा लेखनकाळ दिला आहे.

(२) माधवनदन जोसी कृत मुरली आख्यान. याच्या शेवटीं 'शके १७०७ पैठण बापु मो नीळगे' अशी नोंद आहे.

( ३ ) पाठक नामा कृत चंद्रहास्य आख्यान, प्रसंग १, २, ३, अनुक्रमें ओवीसंख्या १७१ + १७५ + १२९ = ४७५. याच आख्यानाचे शेवटीं लेखकाचें नाव, गाव व लेखनकाल हीं दिलेलीं आहेत : 'स्वस्ति श्री शालिवाहन शके १७०० श्रावण शु. ८ समाप्त हस्ताक्षर भीमाजी रघुनाथ माजगाव.'

( ४ ) गोरक्षकुमारचरित्र–अपूर्ण

( ५ ) तिसगांवकर मेघश्याम याचीं लक्ष्मण महाराजावर केलेलीं दोन पदें, एक सज्जनगडावर केलेलें पद व एक मारुतीवर, अशीं चार पदें आहेत. शिवाय त्यानीं आपल्या परंपरेचे चार श्लोक दिले आहेत त्यावरून श्रीसमर्थ–गंगाधर–लक्ष्मण अशी त्याची परंपरा दिसते. या परंपरेच्या श्लोकात त्यांनीं आपल्या तिसगावाचा उल्लेख केलेला आहे. स्वानुभवदिनकराच्या *प्रस्तावनेंत दिनकराची वंशावळ दिली आहे, तीवरून हे मेघश्याम दिनकराच्या* बंधूचे नातु होत असें दिसतें.

( ६ ) कवि हैनवी कृत ॐ वर पद

( ७ ) बाजी गोपाळ याचें एक पद :

पूर्ण ब्रह्म नाथ सद्गुरु गोपाळ ।
बाजी सर्वकाळ गातो गीतीं ॥ ७

( ८ ) या बाडात मधून मधून स्मरणार्थ कांहीं नोंदी करून ठेवल्या आहेत, त्यापैकीं कांहीं :

( १ ) शके १६९१ विजयनाम संवत्सरे ज्येष्ठ वद्य चतुर्थी भोमवासरे ते दिन सखुबाई पारेगावकर कैलासवासी

( १ ) रामचंद्रबाबा आर्वेत वैशाख वद्य द्वादसीस

( १ ) शके १७०० विलंबीनाम संवछरे मार्गेश्वर वद्य त्रयोदसी बुधवार मातुश्री बाई देवरा कैलासवासी

( १ ) शके १७०७ वैशाख सोमावती पाईन्या

या चार नोंदी एका जागीं एकापुढें एक आहेत. पुढील नोंदी दुसरीकडे आहेत.

( १ ) शके १६९९ आषाढ शु. ७ शुक्रवार सौ मातुश्री सकुबाईस पुत्र

( १ ) तीर्थरूप माउ शके १६९५ फाल्गुन शुध ६ बुधवारी कैलास

३६० ] पोथी-पानें २८, पैकीं [२५०

६, ७, ८, १०, ११, १६, १७,१८ नष्ट

भक्तिराज किंवा भक्तराज

अति महत्त्वाचा, प्रकाशना योग्य ग्रन्थ, पण दुर्दैव कीं त्यांतील कांहीं पानें गहाळ आहेत. प्रकरणाची एकंदर ओवीसंख्या ३०३ आहे.

कै. गोविंद काशीनाथ चांदोरकर यांच्या संतकविकाव्यसूचींत हा ग्रन्थ श्रीज्ञानेश्वरांचा म्हणून नोंदलेला आहे. पण त्यापुढें प्रश्नचिन्ह घालून तो त्यांचा च आहे कीं काय, असा चांदोरकरांनीं हि संशय दर्शविला आहे. ग्रन्थकारानें आपल्या नांवाचा उल्लेख केलेला नाहीं, पण तो ज्ञानेश्वरांचा असावा, असें मात्र मला वाटत नाहीं. किंबहुना तो त्यांचा नाहीं, असें निश्चयानें म्हणतां येईल. ग्रन्थारंभीं नमनाचे तीन स्वतंत्र श्लोक आहेत ते असे :

॥ श्रीमदानंदगुरवे रामदासाय नमः ॥

चिन्मयानंदरूपाय जनार्दनस्वरूपिणे ।
स्वप्रकाशाय शुद्धाय येकनाथाय ते नमः ॥ १

मायातीताय नित्याय मायागुणप्रकाशिने ।
व्यक्ताव्यक्तस्वरूपाय आचार्याय नमोनमः ॥ २

निवृत्तिज्ञानदेवादि एकनाथं दिगांबरं ।
मुकुंदराजप्रमुखान् वंदे कीर्तनसिद्धये ॥ ३

शेवटच्या दोन ओव्या अशा :

गीताज्ञानदेवादिका । संस्कृतींची आइका ।
कृष्णें अर्जुनासी देखा । हें चि निरोपिलें ॥ ३०२

ग्रंथा नाम भक्तराज । सन्द्वारा जाला सहज ।
भक्तिभावें चिंतन तुज । अखंड हृदईं असावें ॥ ३०३

ग्रन्थ वाचला आणि मनात आलें कीं, जसा दासोपंतांचा ग्रन्थराज ग्रंथ श्रीसमर्थांच्या अवलोकनांत होता, तसा हा भक्तिराज ग्रंथ श्रीसमर्थांच्या पूर्वींचा असल्यास तो हि त्यांनीं पाहिला असावा. ओळखीसाठीं कांहीं :

हे पाखा ऐंसारीची । पुनरपि न लभे ऐसी चि ।
सापासी सापडली कैसी । जाणिजेना ॥ १२६

कन्हीं अवतार आले । तरी ते नाहीं आले ।
येक येके भोगुनी गेले । येथुनियां ॥ १२७

तैसे च आपीक होती । परी गेले ते गेले ॥ १२९

हे चाले तो चि नवल जाणा । लाहो घेणें क्षणक्षणा ।
हा दो दिसांचा पाहुणा । जाईल शेवटीं ॥ १५२

मनुष्यजन्माची घडी । मागुती न ये वेचितां कोडी ।
हे माहां पुण्याची जोडी । जोडिली असे ॥ १५५

पूर्वी कितीयेक होउनी गेले । परी मागुती नाहीं आले ।
पुण्यें पुरुषार्थे उरले । अद्यापि तयाच्या ॥ १५६

ऐसे गेले असंख्यात । तया काये करूं गणित ।
सदा लक्ष होत जात । नित्य जेथें ॥ १६१

ग्रन्थराज ग्रन्थाप्रमाणें हा भक्तराज ग्रन्थ हि दासोपंतांचा च तर नसेल ना, अशी कल्पना आमच्या मनांत उद्भवली, तों च तिचा निरास झाला. नमनांतील तिसऱ्या श्लोकांतील 'दिगांबर' म्हणजे च दासोपंत होत. तथापि या कल्पनेच्या अनुरोधानें प्रमाणांतरें पाहून जास्त विचार व्हावयास पाहिजे. आज सवड नाहीं. आज नुसती कल्पना व्यक्त करीत आहे. निर्णय केव्हां तरी होईल च. ग्रन्थ कोणाचा हि असो, तो सुंदर आहे, त्याचें प्रकाशन झालें पाहिजे. त्याची संपूर्ण प्रत या च पोथ्यांत मिळालेली आहे. यथाक्रम उल्लेख होईल च.

३६१ ] पोथी-पत्रें ४४ [१५०

नंतरचीं कांहीं गहाळ

कृष्णदाससुद्गल कृत युद्धकांडापैकीं अहिरावणमहिरावण-चरित्र-अपूर्ण

३६२ ] पोथी-पत्रें ११ [१५०

अपूर्ण-ओ. सं. १०४

गृहस्थाचार-कोण कृत न कळे

आद्यंतीं ब्रह्म मध्यें भासलें कर्म । तें तन्मय च हें बोधमर्म ।
तन्मय महामुक्त क्रिया कर्म । तो च आतां परिसावा ॥ १०

पूर्वं प्रकरणीं वर्णिलें शीळ । आतां बोलिजे नित्यकर्म केवळ ।
ब्रह्मचर्य निरोपिलें निश्चळ । गृहस्थाचार परिसावा ॥ ११

**३६३** ] पोथी–पर्ने १०१, पैकीं
२ ते ८, १० ते १९ व १०१ एवढीच उपलब्ध [२००

भागवताच्या द्वितीय स्कंधांतील नवव्या अध्यायावर म्हणजे चतुःश्लोकी भागवतावर श्री एकनाथांची टीका. श्लोक ४४, वोविया १०३७.

**३६४** ] जमाखर्चाच्या वहीसारखें बाड–श. शे. १०४२
= १८० पैकीं जा. शे. १०।२० नष्ट [१२५

(१) या बाडांत आरंभीं यात श्लोकांत निरनिराळ्या रागांचीं नावें देऊन पुढें त्या रागांतील निरनिराळ्या कवींचीं पदें दिलीं आहेत. त्यांत श्रीसमर्थ, विठ्ठल, भुजंगनाथ, सूरदास, तुलसीदास, अमृतेश्वर, यदिरव (भैरव) नदन, रंगनाथ, मानपुरी, वेणी, आनंदतनय, वामन, भास्करराव मंत्री, चिमदिनकेसरी, केशव, कमाल, फकीर, मालोपंत यांचीं पदें आहेत.

(२) नंतर श्रीसमर्थ, तुका, नामदेव, ज्ञानदेव, सदानंद यांचे कांहीं अभंग आहेत. आणि नंतर पुढील प्रकरणें आहेत.

(३) वेलामालिका, संस्कृत प्रकरण, २२ श्लोक,

(४) पालीची कारिका,

(५) गुह्यपंचक समाधी बोलणें, ५ अभंग, जनार्दनकृत

(६) हनुमज्जन्म, मोरेश्वर दीक्षित कृत, श्लो. २८,
'हस्ताक्षर आबाजि नारायण बाळिंदे कुमटेकर मुकाम ठाणें हसलापुर'

(७) शकुंतला आख्यान, धुंडीसुतकृत, श्लो. १२०,
हस्ताक्षर वरीलप्रमाणें बाळिंद यांचें

(८) अष्टपदी, जयदेवकृत

(९) राधाविलास, भास्करतनय गोपाळकृत, श्लो. ८१

आरा हारी हरीची म्हणउनि यदुली वैराती आर्य वाणी ।
जो कीं गोपाळ नामा परम (चि) परमा ग्रंथ रूपासि आणी ।
नाहीं दीक्षा कवीची म्हणउनि यमका भेद होती सवाई ।
बोले तो भास्कराचा तनय विनय जो श्रीगुरुराजपाई ॥ ८०
जागा येथ प्रभावळ म्हणतसे सह्याद्रिभागीं पहा ।
तेथें भास्कर आमरेश्वर अशा नामें विराजे महा ।

तत्पुत्रें सगुणें यथा स्वमतिनें अंबाप्रसादें असे ।
एक्यांसी हरिपादपद्मिं सुमनें हे श्लोक अर्पीतसे ॥ ८१

( १० ) गजेंद्रमोक्ष, वामनकृत

( ११ ) सीतास्वयंवर, निरनिराळ्या कवींचीं पदें, श्लोक, चूर्णिका

( १२ ) सीतास्वयंवर, वामनकृत, श्लोक १०७

( १३ ) नळदमयंती आख्यान, संपूर्ण श्लो. १८९

( १४ ) कंसवध, श्लो. २४, ( १५ ) तुकारामांचा एक अभंग :

आम्ही दैवाचे शके पंधराशांत । नियावें अशांत येथुनिया ॥ १
दया क्षमा शांती नाहीं हो राहणार । यांचून करणार काय आम्ही ॥ २
शके सोळाश्यांत भक्ती राहील थोडी । जगण्याची गोडी काय मग ॥ ३
तुका म्हणे ऐसी आहे याची मीत । सप्राश्याची मात बोलूं नये ॥ ४

मग आतां १८५५ तील गोष्ट च काढावयास नको !

( १५ ) भीष्मपर्वांतील आख्यान, श्लो. १८, शेवटचा श्लोक :

काशीति नाम जननी जनकाभिधानी । श्री विश्वनाथ मम दैवत कृष्णवेणी ।
श्रीमन्मुनीश अघमर्षण अन्वयाई । दासानुदास हरि यादव सेवु पाई ॥ १८

३६५ ] बाड–पृ. सं. ३९ × २ = ७८ [ ११०
दिवाय दोन्ही बाजूंचीं १०।१५ नव

विद्यमान पहिल्या च पानावर ' शके १६९५ विजयनाम संवत्सरे ज्येष्ठ शुध्द नवमी रविवारे...' असा बाडाचा लेखनकाल दिलेला आहे. कांहीं बाकळ कविता या बाडांत आहे ती वगळली म्हणजे पुढील उपयुक्त भाग त्यांत आहे :

( १ ) द्रौपदीच्या हातून कांहीं दोष घडला तो तिच्या कडून युक्तीनें कबूल करुन घेऊन कृष्णानें तिला कसें दोषमुक्त केलें, एतद्विषयीं **श्रीधर ब्रह्मानंद** कृत पद. शेवटचें कडवें :

ऐसा स्वामी ब्रह्मानंद । श्रीधरवरद आनंदकंद ।
छेदी भक्तांचे अभिमानदोषबंध । छायी आपुला सर्वदा निजछंद ।
शरण त्या रिघावें सर्वभावें ॥ १६

( २ ) यादव माणिक जाधव कृत रणछोडजीची आरती. शेवटचें कडवें :

साहेब वनमाळी तम गजगणिकातारी।
शरणागत प्रभु वच्छल कुविजा उधारी।
बाहेर भीतर देखुं तुमकुं बनवारी।
यादव माणिक जाधव तेरे पग धारीं ॥ ३

( ३ ) आनंदनंदन, दासतुका, नामदेव, गोसावीनंदन यांचीं पदें

( ४ ) कांहीं ज्योतिषविषयक प्रकरणें

( ५ ) देवदास कृत प्रार्थनाशतक म्हणजे च व्यंकटेशस्तोत्र

## ३६६ ]

वाड-पृ. सं. २१ × ४ = ८४ [ १५०

( १ ) धनको नाम रामाजी नाईक भिडे, हरभट वैद्य, रामभट काशीकर भागवत, गणेशभट वैद्य व रिणको नाम केसो गोविंद पुसाळकर, बाळाजी नारायण भुसकुटे, गणोबा नाईक खरखुडे, त्रिंबक बल्लाळ धारप, शिवराम नारायण देवस्थळी, बावा दीक्षित आठले, बाळाजी गोविंद आंबरडेकर, जगजीवन गोविंद, गोपाळ सभाजी साडेकर, खंडोबा नाईक सराफ व धोंडोबा नाईक सराफ यांच्यांत शके १६४४ ते १६७५ पर्यंत झालेल्या हजारो रुपयांच्या व्यवहाराचे दस्त. पधरा कर्जरोखे या बाडांत उतरलेले आहेत. शिवाय १६६७ ते १६७१ तील कांहीं खातीं उतरलेलीं आहेत. प्रचीतगड व मौजे लाल ( का ) वसते, भीरकोंडे, सोलगाव ता संगमेश्वर या ठिकाणाचा उल्लेख आहे. व्याजाचा दर, मोहराचा भाव, रुप्याचा भाव, कोण कोठले इत्यादि बोध होणार आहे.

( २ ) श्रीसमर्थ कृत सुंदरकांड पूर्ण, युद्धकांड अपूर्ण

## ३६७ ]

वाड पृ. स. १७ × ४ = ६८ [ १५०

( १ ) अगदीं आरभीं परमार्थपर १४६ श्लोक आहेत. प्रकरणाचें नांव वगैरे नाहीं. १४६ व्या श्लोकानें प्रकरणाचा शेवट झाला आहे, असें हि निश्चयानें म्हणता येत नाहीं. १२५ व्या श्लोकात कवीचें नाव सहज आलें आहे, म्हणून प्रकरण कोणाचें हें कळण्याला तरी मार्ग झाला, नाहीं पेक्षां त्यांचें नाव हि कळलें नसतें. वाचकाच्या ओळखीसाठीं श्लोक देतो :

गुरुदया फळली मजलागुनी। म्हणउनी न दिसे भव लोचनीं।
तरि मनीं भव माधव चोंदला। निजगुरें मन मादन रोपला ॥ १

सदा शांत त्याचे घरीं भक्ति खेळे । सदा शांत त्याचे पदीं मुक्ति लोळे ।
सदा शांत तो सच्चिदानंद पाहीं । सदा शांत तो भेटता जन्म नाहीं ॥६
निराश्रमीं आश्रम आजि केला । वर्णाश्रमाचा श्रम सर्व गेला ।
विमुक्त जालों बरवा निवालों । अवाच्य तें मीं गुज केवि बोलों ॥ ८
दयाघना सत्वर आजि येईं । येऊनियां मंगळ लाभ देईं ।
देऊनिया आत्मपदासि नेईं । नेऊनिया सर्व हि तू चि होईं ॥ १६
अनन्य भावें गुरुदास्य केलें । तात्काळ तेणें भवदु:ख गेलें ।
हा मत्ययो संतजनासि आहे । याल्यागिं तें बोधित हें चि पाहे ॥ ३१
घेऊनियां मंगळ माळ आणा । तया सदा मंगळ रामराणा ।
लाभे तया मंगळ धाम त्याचें । निरंतरीं मंगळ होय त्याचें ॥ ६०
ऱ्या साधुचा संग परा च केला । याकारणें द्वैतविकार गेला ।
जालों घनानंद मुकुंद योगीं । बोले कवी केशवराज योगी ॥ १२५

( २ ) शावतामाळीचरित्र, श्लो. २५, कोण कृत न कळे
( ३ ) भीमरूपी महारुद्रा
( ४ ) नामा, तुका, केशव याचे किरकोळ अभंग
( ५ ) सद्गुरुअष्टक, श्लो. ९, कोण कृत न कळे

गुरुसेवनें दोष भूमी धरीतो । गुरुदास्य केल्या हरी उद्धरीतो ।
गुरुचिंतनें जोडती पुण्यराशी । गुरुवीण तो पातकाची मिराशी ॥ १

३६८ ] बाड–पृ. स. १९ × ४ = ७६ दोन बाडें एकत्र शिवलेलीं आहेत [ १५०

( १ ) श्रीसमर्थ कृत सुंदरकांड, ( २ ) श्रीसमर्थांचीं दोन पदें
( ३ ) श्रेष्ठ कृत भक्तिरहस्यातील १० वें प्रकरण

३६९ ] चिमुकलें बाड १८ × २ = ३६ पैकीं आ. व शे. ६।६ पानें गेलीं [ १५०

( १ ) रामरक्षास्तोत्र अथवा वज्रपंजरकवच, श्लो. ५७
( २ ) भीमरूपी महारुद्रा ( ३ ) श्रीराममानसपूजा, संस्कृत

३७० ] पोथी – ८ पत्रें श्रीसमर्थ कृत जुनाट पुरुष, श्लो. ५५ [ १५०

३७१ ] गड्‌ठा [१००-२५०

त्यांतील कांहीं सुवर्णकण :

(१) विचित्रवीरहनुमंते मालामंत्र, (२) 'पंचीकर्ण श्रेष्ठाचें' एक च पृष्ठ, (३) एक बाड, त्यांत भर्तृहरीच्या शतकांतील श्लोक, दशरथलग्न, डोहळे, सुभाषित ओंव्या, उद्धव आख्यान, श्रावणवध, असा भाग आहे. (४) श्रीसमर्थसमाधिपरक व श्रीशिवराज्याभिषेकपरक यांचे दोन श्लोक, (५) शिवरायाला पाठविलेल्या पत्राचा कांहीं भाग, (६) शके १७४७ त चाफळच्या रामाचें वर्णिलेलें ध्यान व दादेगांव मठाची परंपरा (७) दादेगांवमठाच्या इकिगतीचा कागद, (८) महारुद्रस्वामींचे श्रीशाहुराजे छत्रपति यांस पत्र, (९) श्रीसर्वउपमायोग्य श्रीमान् केशवाच्चारियां प्रती श्यामजी नासे, (१०) ग्रन्थांची यादी पृष्ठ २ रें, (११) शकुनवंती आणि ज्योतिष, (१२) पूर्वारंभ–अपूर्ण, (१३) अमृतराय यांचीं तीन पदें, (१४) आनंदात्मज यांचें एक पद व कविशेकरसुत यांचें एक, (१५) शिष्यधर्माचा क्रम व समर्थ, केशव आणि शिवरामकल्याण यांचीं पदें, (१६) कणिवर उठवीला, (१७) संकल्पपूर्वक नित्य नियमाचा कागद, नित्य पांच नियम चालवावे–सगुणपूजा। जप। मानसपूजा। अद्वैतग्रंथश्रवण। सद्गुरूचें तीर्थ॥ (१८) परमार्थक्रम, (१९) समर्थ, तुकाराम, रंगनाथ यांच्या पदांचा कागद, (२०) एकाचा बाडाची विस्कळित कांहीं पानें, त्यांत शकुनवंती असून कोणा गोपाळ रघुनाथाचीं पिंगळा, दिवटा व डांकुलता अशीं तीन प्रकरणें; त्यांत पैकी दिवटा पूर्ण असून शेवटीं काळ दिला आहे : "शके १६२० बहुधान्य संवत्सर अधिक वद्य ८ सोमवार", (२१) 'सकळ तीर्थाचें माहेर' इत्यादि श्रेष्ठांना लिहिलेलें जें पत्र प्रकाशित आहे, तें च पण त्यांत पुष्कळ च फरक असलेलें पत्र, (२२) ललिताची एक अगदीं अलिकडची वही, (२३) श्रीसमर्थकृत मारुतीची आरती व एक पद अशीं नवीन असलेला एक कागद, (२४) सूर्यवंशावळी राजे जाले भूमंडळी। दास कृत, (२५) रामा विसरला प्राणी। रामीरामदास कृत, (२६) आका गांवा गेली। वेणाबाई कृत, (२७) नामामध्यें उत्तम राम नाम। रामदास कृत, (२८) विठ्ठल कृत दोन पदें, (२९) एक सुंदर अध्यात्मपर प्रकरण, त्याचीं २८ पत्रें होतीं, पण दुर्दैवानें २०, २१

आणि २४ ते २८ पर्दे हरवलीं आहेत, त्यामुळें प्रकरणाचा शेवट नाहीं. ओळख पटण्यासाठीं पहिला आणि मधला च असे दोन श्लोक देतों :

> श्रीराम आनंदरसैककंदु । मयोधकर्ता रविरंगइंदु ।
> ऐकतया व्यापक आदिमूर्ति । तो नाम मी भाविन नित्य चित्ति ॥ १
>
> यथार्थ दोरा कळल्यावरी पुन्हा । गेली अैसी च भुजंगभावना ।
> तैसे अधिष्ठान स्वरूप जाणतां । प्रपंच तेथें न दिसे चि सर्वथा ॥ १७

( ३० ) रंगनाथ कृत रामदास चतुराशरि मंत्र जप वारंवार । वगैरे.

# ३७२ ]

बाड–पृ. सं. १२९ × २ = २५८
शिवाय आ. १४ व शे. ३८ नष्ट [१४२

( १ ) श्रीसमर्थ कृत निर्गुणध्यान, जुनाटपुरुष, पूर्वरंग व अंतर्भाव हीं प्रकरणें

( २ ) श्रीसमर्थ कृत भोंवतां डोंगराचा फेर ।, धर्मं भुललासी ।, बळें सर्व संव्हारिले० ।, असंख्यात ते भक्त होऊनि गेले ।, भीमरूपी महारुद्रा ।, फणिवर उठवीला ।

( ३ ) श्रीसमर्थ कृत अभंग, क्रमश: १ ते २१०. हे सर्व तासून पाहणें आहेत. "हस्ताक्षर धोंडो माणकेश्वर कुळकर्णी मौजे शाहापुर शके १७१२ विरोधकृत् मार्गेश्वर शुध ५"

( ४ ) श्रीसमर्थ, अमृत कवि, उद्धवचिद्घन ( म्हणे उद्धवचिद्घन महाराजा । रामदासाचि संग घडो माझा ॥ ३ ), गणेशदास, शिवराम पूर्णानंद, तुकाराम, आनंदनंदन, मध्वमुनेश्वर, मुक्ताबाई, अनंत कवि ( ज्याची पूर्ण समाधी० ), रंगनाथ, माली, केशवसुत, दीन यादव, त्रिमलसुत, गोसावीनंदन, यादव माणिक, सज्जनरंजन, येकनाथ, कृष्णदास जयराम, यांचीं पदपदांतरें

( ५ ) कल्याण कृत श्रीसमर्थांवर पद :

> कृष्णावेण्यातिरवासी । सज्जनपर्वतनिवासी ।
> सुरवर वांटिती देवासी । कल्याणदायक सर्वांसी ॥ ३

( ६ ) शाका गांवा गेली । वेणाबाईचें पद

( ७ ) मृत्युंजय आनंद कृत कर्मविपाक, अप्रकाशित ग्रन्थ, प्रकाशना योग्य, प्रसंग तीन, ओ. सं. २५३. शेवटीं लेखनकाल दिला आहे तो :

" शके १७१४ आश्विन शुध ५ पंचमी गुरुवार "

( ८ ) मध्यें च एका पानावर नोंद केलेली आहे ती :

" श्रीस्वामींचा जन्मकाळ तारण नाम संवछरे शके १५३० चैत्र शुध नवमी दोन प्रहर ॥ दासबोध ग्रंथ केला शके १५८२ ॥ प्लव नाम संवछर ॥ स्वामींचा देह समाप्त शके १६०३ दुर्मती नाम संवत्सरे माघ वद्य नवमी समाप्त ॥ ७ ॥ ग्रंथ केला ते समइ गतकली ४७६० ग्रंथात वचन आहे ॥ "

यांत १५३० ला कीलक संवत्सर होता, तारण १५०६ ला होता. प्लव १५८३ ला येतो, १५८२ ला शार्वरी संवत्सर होता. शक बरोबर आहेत. नावें चुकलीं.

( ९ ) गुरुपरंपरेचा एक श्लोक :

नारायणाख्यमुनिना विधाता । धाता वशिष्ठाय च ज्ञानदाता ।
वशिष्ट बोधी रघुराजबाला । दासासि तो सद्गुरु राम जाला ॥

( १० ) शिवकल्याण कृत लीलाविग्रहें अवतार लोकीं जाला ।

हें स्थानचें श्रीसमर्थचरित्रपर प्रकरण. तें डोमगांव मठांतील एका बाडावरून श्रीसांप्रदायिक विविध विषयांक ५७ त आपण पूर्वी छापलें च आहे.

**३७३ ]** बाड पृ. सं. २७ × ४ = १०८ [ १५०
आ. दो. काहीं हरवलेलीं

( १ ) श्रीसमर्थ, ज्ञानेश्वर, तुका, अंबाजी, कृष्ण केशव, एकनाथ, आनंदसुत, उद्धवचिद्घन, वरालिंग, माधो, लीलाविश्वंभर, विठ्ठल दीक्षित, अमर, मधुरेश्वर, गोसावीनंदन, भानुदास, विष्णुदास नामा, केशवराज, कैवल्यनंदन रंगनाथ, जयराम द्विजदास, इत्यादिकांची कृष्णपर पदपदांतरें

( २ ) एकनाथ कृत बाळक्रीडा, दशमस्कंध, ओ. ४२

( ३ ) यदुपा वामनराम कृत गोपिकास्तुति श्लो. २० व जयद्रथवध, श्लो. २५

( ४ ) प्रल्हादचरित्र, कीचकवध, वालीवाक्य व विराटपर्व, ही अपूर्णं मात्रें.

( १ ) आनन्दनंदन कृत सुदामचरित्रपर श्लो. ३८

( १ ) वामन कृत समश्लोकी गीतेंतील काहीं श्लोक

**३७५ ]** बाड पृ सं. २१ × ४ = ९२ [२००
काहीं पृष्ठें हरवलेलीं

( १ ) कृष्णदासमुद्गल कृत युद्धकांड रामायण, प्रसंग ६३, ६४, ६७, ६८, ७१, ७२

( २ ) दासबोधातील वाल्मीकिस्तवन, ( ३ ) काहीं सुभाषितें

( ४ ) दास बाळसुत म्हणजे च दास मल्हारी कृत शुकरंभा-संवाद, संपूर्ण, ओवीसंख्या ९३. हे दास मल्हारी आणि मागें ३५५ व्या बाडांत उल्लेखिलेले मल्हारी एकच का निरनिराळे, कोण जाणे. शेवटच्या तीन ओंव्या :

> हें उत्तम शुक आख्यान । दिवसरात्रीं करितां श्रवण ।
> संपूर्ण तुटे भवबंधन । म्हणे दास बाळसुत ॥ ९१
> शुकरंभेचा संवाद । ऐकतां आनंद विनोद ।
> पावतील परमानंद । श्रोते वक्ते भावार्थी ॥ ९२ ॥
> भावार्थे केलिया श्रवण । तुटे संसाराचें बंधन ।
> हरती पातकें दारुण । म्हणे दास मल्हारी ॥ ९३ ॥

( ५ ) उद्धवचिद्घन कृत शुकरंभासंवाद ओ. १५

( ६ ) वामन कृत भूगोलरचना, संख्या १०. लेखकाच्या नावाची नोंद : " लीखिते मलार निश्रर "

**३७६ ]** बाड-पृ सं. ४० × २ = ८० [२००
महत्त्वाचें बाड

( १ ) श्रीसमर्थ कृत पूर्वारंभ व काहीं पदें

( २ ) अज्ञान सिद्ध नागनाथ कृत वासुदेव

राम राम जपे पापा दोन्हीं अक्षरें गोमटीं ।
हरें काढिलीं निवडूनियां मथन केलें लक्ष कोटी ।
महादेवें परम प्रीति कैसी धरिली कंठीं ।
हलाहल शांत जाला तेणें निवाली सृष्टी ॥ १

× × × × × × × × ×

संत गुरु नागनाथु सिद्ध अज्ञान ज्ञाता ।
अनंतें कृपा केली कीर्ति काये वर्णूं आतां ।
बीजमंत्र तत्त्वमसि निजदान तत्त्वता ।
ह्या दानें पूर्ण जालों जन्मा न ये मागुता ॥ ५

( ३ ) नागेश कृत एक पद व गौळणी

( ४ ) आत्मगोपाळ यांचीं दहा वीस मराठी व हिंदुस्थानी पदें. हे कवि नव्यानें च पुढें येत आहेत. म्हणून एक पद देतों :

काय देईल मनुष्य देणें नैश्वर्य खोटें नाणें ॥ ध्रु०
आजी दिरहे उदिया गुरे । काय करावें हीरा रे ॥ १
गुरु देईल तें चि खरा रे । रिधीसिधीचीं भांडारें ॥ २
मलगे कोणाचा दान मान । गुरुप्रसाद परिपूर्ण ॥ ३
गुरु दाता देवाधिदेव । आम्हां नाही आन उपाव ॥ ४
आत्मगोपाळपणें स्फुरावें । हें चि धालेपण जाणावें ॥ ५

( ५ ) तसे च कोणी आलमखान म्हणून कवि प्रथम च या बाडांत प्रगट होत आहेत. त्यांचें एक च पद आहे, पण तें आलमखानांची ओळख पटविणारें आहे. शिवाय पुढें केव्हां छापलें जाणार ? म्हणून देतों :

संताची खूण संत चि जाणती । येरां न पडे ठावें रे ॥ ध्रु०
बेहिऱ्याच्या जरी गांवा गेलया । ज्ञान श्रवणें सांगावें रे ॥ १
आंधळ्यानें आंधळ्यास डोळा जो घातला । तेथें कोणें तें पहावें रे ॥ २
पांगळांचा जरी मिळाला पोहर । तेथें मार्ग कोणें लंघावे रे ॥ ३
मुकेयानें जरी स्वप्न चि देखिलें । तरी काय बोली बोलावें रे ॥ ४
वांजेच्या पुत्राचा विवाह होतो । आले चित्रीचे भूपाळ सर्व रे ॥ ५
आलमखान म्हणे तेथें कांहीं च नाहीं । तें च आपण व्हावें रे ॥ ६

पोहर म्हणजे मेळा.

( ६ ) याशिवाय रामानंद ( सद्गुरु सहजानंदें आंगिकारलें रामासी ॥ ), भद्राचळ गोपाळ, जनजसवंत, सुरदास, केशव, नामयाची जनी, दादु यांचीं पदपदांतरें

( ७ ) पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर आणि ऊर्ध्व अशा पांच मठांचें वर्णन

( ८ ) सटीक गर्भगीता, अपूर्ण, श्लो. १५ व टीकेच्या ओव्या ६१. अपूर्ण असल्यामुळें टीका कोणाची तें सांगतां येत नाहीं. तिघांच्या टीका उपलब्ध आहेत, त्यांतील दोघांच्या प्रकाशित आहेत, त्यापैकीं ही टीका आहे कां चवथ्याची च आहे हें ठरवितां यावें, म्हणून ओळखीसाठीं चार ओव्या देऊन ठेवतों :

साधु सज्जनीं कृपा केली । मती तेणें प्रकाशली ।
स्वसुरस सांगों आदरिली । विस्तारली वागेश्वरी ॥ १
ब्रह्म जाणे तो ब्राह्मण । ब्रह्मरूप चि आपण ।
स्वयें ब्रह्म परिपूर्ण । अग्नी जैसा ॥ २९
काष्टा आंगीं अग्नी पाहें । स्वयें काष्टासी ग्रासुनी राहे ।
तैसें कर्म चि ब्रह्म होये । कृपा श्रीगुरुची ॥ ३०
जीं जीं कर्मे तूं करिसी । तीं तीं समर्पी श्रीगुरुसी ।
मी कर्ता ऐसें न म्हणसी । तरी पावसी मोक्षपद ॥ ३५

३७७ ] बाड पु. ढं. ७३ × २ = १४६ एक एक दोन दोन पानें गेलेलीं [ २००

( १ ) एकनाथ कृत बाळकांड, अध्याय ८ ते १४, यांत विश्वामित्रागमन, तारिकानिर्दलन, अहिल्योद्धरण इत्यादि जो कथाभाग आला आहे, त्याचा संक्षेप करून, एकनाथाच्या च शब्दांत तो कोणी तरी १०६ ओव्यांत आणला आहे.

( २ ) श्रीसमर्थ कृत कांहीं पदें व ( १ ) भोंवता डोंगराचा फेर । मध्यें देवाचें शिखर ॥, ( २ ) आतां राहों द्या गडदला । महादेव उमासि चालिला ॥, ( ३ ) ऐसा हनुमंतु वीर । विख्यातु सेवक श्रीरामाचा ॥ हीं छोटीं प्रकरणें

( ३ ) या बाडाचें विशेष महत्त्व असें कीं, त्यांत रामरंग यांचीं ८३ पदें, अभंग वगैरे आहेत. हे रामरंग कोण, याचा आज निःसंदिग्ध बोध होत आहे. मालेंतील नववा भाग, श्रीसांप्रदायिक कागदपत्रें प्रसिद्ध करतांना पालीमठाचे अधिपति श्रीसमर्थशिष्य रंगनाथ म्हणजे च रामरंग, असें समजून मी चाललों होतों. ' रामरंग ऊर्फ रंगनाथ, मठ पाली ' असें त्या भागाच्या प्रस्तावनेंत म्हटलें हि आहे. पण ती चूक आहे. त्या चुकीमुळें कागदपत्रांतील लेखांक २८४ व २८५ याचा काल शक १६०५ ठरविण्यांत आला, तो हि बहुधा चुकला असावा. रामरंग आणि रंगनाथ एक च नसून रामरंग हे रंगनाथाचे शिष्य होत. या ८३ पदांपैकीं दोहोंत रामरंगानीं तसा स्पष्ट उल्लेख केला आहे. पैकीं एक पद येथें देतों. तेणें करून त्यांच्या कवितेचा मासला हि वाचकांना पदायास सांपडेल.

रामरंगांची एक भुपाळी

माझा स्वामी रंगनाथ । त्याणीं केलें हो सनाथ ।
दाखविला मोक्षपंथ । केलें सत्य अभिन्न ॥ ध्रु०

सद्गुरुकृपें सर्व जालें । अहं राम हें मावळलें ।
अनुभवें प्रकाशिलें । गलद् गेलें अज्ञान ॥ १

अविनाश घर चुकलों । मायाप्रपंचें भ्रमलों ।
सोहं स्मरणासी विसरलों । मार्गे गेलों कोहंच्या ॥ २

चवऱ्यासी लक्ष योनी । फिरतां सोसिली जाचणी ।
त्रिविध तापांची आटणी । नाहीं सिराणी मोक्षाची ॥ ३

स्वामी दृष्टीनें पाहिलें । आत्मस्थिती घाटविलें ।
बोधा हातीं मन दिधलें । भाग्य विचलें परिपूर्ण ॥ ४

शांतीसुखासनीं पातलें । अभिन्न छत्रासी दिधलें ।
सहज पसनातें टाकलें । अभेद ठेलें रामरंगीं ॥ ५

---

रामरंग यांचें नांव रामाजी असून त्यांनीं आपल्या नांवापुढें गुरूचें नांव जोडलें असावें, असें वाटतें. कागदपत्रांतील लेखांक २४५ त रंगनाथस्वामी-विषयीं म्हटलें आहे कीं, " ठेवा व॥ चाफळ येथें स्वामीचे शिष्य होते रा॥ रामाजी गोसावी व निरंजन गोसावी व गोपाळ गोसावी... " यांतील रामाजी गोसावी म्हणजे रामरंग च होत, हें भान ठेवावें.

३७८ ] बाड–पृ. सं. ८० × २ × २ = ३२० [१९७
आरंभींची व शेवटची कांहीं गेलेलीं

(१) मुक्तेश्वर कृत सभापर्व, अध्याय १ ते ७, ओवीसंख्या ९२८ " हस्ताक्षर मळवंतराव नारायण मोटे "

(२) मुक्तेश्वर कृत आदिपर्वांतील बकाख्यान व वनपर्वांतील प्रसंग ४ व आणखी एक प्रसंग अपूर्ण

(३) श्रीसमर्थ कृत कांहीं पदें

(४) यादव कृत ग्लांती अष्टक, श्लो. ९, हे यादव कोण सांगतां येत नाहीं, पण अष्टक मात्र अशुद्ध असलें तरी सुंदर आहे. ग्लाती = खंती, दुःख, पश्चात्ताप.

रघूनाथ वैकुंठधामासि गेले। तदा मारुती दास हे नीरवीलें।
रघूनाथकळासकाळा प्रसंगें। सख्या मारुती पाव रे लागवेगें॥

ही मारुतिरायाला श्रीरामचंद्रानीं केलेली शेवटची आज्ञा विचारांत घेऊन यादवानीं या अष्टकांतील पहिल्या आठ श्लोकांत आपली गाऱ्हाणीं सांगून प्रत्येक श्लोकाच्या चवथ्या चरणांत मारुतीला श्रीरामाची शपथ घालून विनविलें आहे :

आहे श्रीरघुराजआण तुजला पावें त्वरें मारुती॥

हे आठ श्लोक लिहून होतात तों मारुती पाठीमागें उभे होते च, ते पुढें होऊन यादवास म्हणतात, मला स्मरण आहे, पर हात पुढें, हें घे वचन, काय मागणें तें माग. तो ९ वा श्लोक असा :

ग्लांती अष्टक यादवेस लिहितां पुष्टीस ऊभा असे।
आलों टाकुनि रामध्यान हृदई हाकेस ओ देतसे॥
आहे श्रीरघुराज आण मजला मागे मनःकामना।
देतों भाक प्रमाण हात पसरीं इच्छीत जे कामना॥ ९

(५) मागील बाडांक ३६० त उल्लेखिलेला भक्तराज किंवा भक्तिराज ग्रन्थ. तेथें ३०३ ओव्या होत्या, येथें ३०१ आहेत. येथें शेवटीं ' ज्ञानदेवविरचित भक्तिराज ग्रंथ संपूर्ण ' असें म्हटलेलें आहे. असेल हि त्यांचा. होईल केव्हा तरी निर्णय. शेवटीं लेखकाचें नांव, गांव वगैरे आहे, तें असें :

" नळ नाम संवछरे पौष वद्य दशमि मंदवार तद्दिनि भक्तराजग्रंथ संपूर्णमस्तु श्रीरामार्पणमस्तु ॥ हस्ताक्षर मल्हार गणेश उपनाम दवळे गोत्र वासिष्ट सूत्र आश्वलायन वास्तव्य चाफळ ॥ "

सांप्रदायिक कागदपत्रांतील २४५ व्या लेखांकांत रंगनाथस्वामींचे जे गणेश गोसावी आहेत त्यांचे हे मल्हार पुत्र दिसतात. हा १६५८ चा नळ संवत्सर असावा.

३७९ ] बाड–पृ. सं. ८० × २ = १६०
शिवाय आ. व शे. २६।२६ गेलेलीं [१५०

( १ ) मनाचे श्लोक, ४१ ते २०५, शेवट : " शके १६७७ युवा नाम संवछरे मार्गेस्वर शुध ९ भृगुवासरे पूर्व प्रहरे लेखन समाप्त "

( २ ) दास विठ्ठल, धोंडीजी, दास तुका, मानपुरी, शामळी, यांचीं पदपदांतरें

( ३ ) एकनाथ कृत चेंडुफळी, प्रसंग १, २, ३, एकूण ओवीसंख्या १५१ व अर्जदास्त

( ४ ) तुकाराम कृत दामाजीपंतांचें चरित्र

( ५ ) नरसीमेहत्याची हुंडी–अपूर्ण

या बाडाची एक विचित्र तऱ्हा अशी पाहिली कीं, पानावर जे पृष्ठांक घातले आहेत ते शेवटून आरंभाकडे घालीत आणले आहेत.

३८० ] बाड–पृ. सं. ३२ × ४ = १२८
शिवाय किंत्येक नष्ट [१००

( १ ) श्रीसमर्थ, रंगनाथ निजानंद, शिवक, दत्तात्री, तुकाराम, एकनाथ, केशव यांचीं पदपदांतरें

( २ ) एकनाथी रामायण, बाळकांड, प्रसंग ४, ५, ६

( ३ ) दशरथ विश्वामित्राचे स्वाधीन रामलक्ष्मणास करितात, श्लोक ४९

( ४ ) ओवीबद्ध प्रल्हादचरित्र, अपूर्ण ओ. सं. २१२

३८१ ] लहान आकाराचें बाड
पृ. सं. ४८ × २ = ९६ [१५०

( १ ) श्रीसमर्थ पुत्र शेरेचेवे अभंग, ते यतुतेक मार्टेंतील

दिसऱ्या भागांत आलेले आहेत. नंतर पोथीचे आरंभीं वंदूं विनायेक । या आरंभीच्या पांच ओव्या वगळून ओव्याशतकापैकीं तेरावें शतक आहे.

( २ ) गोपिकास्तुति, करुणामृत, अक्षरस्तुति अशीं तीन छपून प्रकरणें व मधून मधून गोसावीसुत आणि केशवराज यांचीं पदपदातें आहेत.

३८२ ] लहान बाड–पृ. सं. सुमारें ७० [ २००

या बाडाची इतकी दुर्दशा झाली आहे कीं, आपल्या निष्काळजीपणाचा एक पुरावा म्हणून व केवळ त्याचें जतन करावयाचें. त्यांत त्रिंबकसुत किंवा त्रिंबकतनुज यांची अभंगाईं, महादेव यांच्या घर पदें होतीं. होतीं, असें म्हणण्याचें म्हणावयाचें कीं, तपूर्ण लागेल असें क्वचित् व एकादें पद असेल. हे त्रिंबकसुत म्हणजे पारगांवमठपति रंगनाथस्वामी याचे शिष्य, सोन्यांतील घफळ्याचे पूर्वज, जे त्रिंबक गोसावी आणि गणेश गोसावी, त्यांपैकीं त्रिंबकाचे पुत्र असावेत.

याशिवाय या बाडांत एकनाथ, अनंत कवि, परशुराम यांचीं पदें व श्रीसमर्थ कृत रामायणापैकीं कांहीं भाग, अशी कविता होती.

आपल्या थोर पूर्वजांच्या पारलौकिक वैभवाची हि आपण कशी उपेक्षा केली, या दृष्टीनें हें बाड प्रदर्शनांत ठेवण्यासारखें आहे.

३८३ ] बाड–१६ पत्रें, पैकीं पहिलें एक लिहिलेलें, बा. दोन कोरीं नष्ट [ १८४

नामदेव कृत ज्ञानदेवाची आदि

" शके १६७१ शुक्र नाम संवत्सरे चैत्र मासे शुद्ध पक्षे नवमी गुरुवारे रामजयंती तद्दीनि लिखिते ॥ "

३८४ ] पृ. सं. ९५ × २ = १९० महत्त्वाचें बाड [ २००

( १ ) या बाडांत श्रीसमर्थ कृत कांहीं अभंग व पदें व बऱ्याचशा आरत्या आहेत. आरत्यांपैकीं कांहीं आजपर्यंत प्रसिद्ध न झालेल्या आहेत.

( २ ) याशिवाय या बाडांत श्रीसमर्थकृत पुढील महत्त्वाचीं स्फुट प्रकरणें आहेत. हीं एकदांच प्रकरणें निवडून कोणी एकत्र लिहावीं, यांचें हि

मला महत्त्व वाटतें. एकदर प्रकरणें नऊ आहेत, तीं अशीं :

(१) दासबोधीं ज्ञानदशक । कोणे समासी कोण विवेक ॥ ओवीसंख्या ९. वृत्तचर्चेच्या १३४ व्या लेखांकात (मासिकाचा अंक १२६ वा) हें प्रकरण आपण दिलेलें आहे. त्या वेळीं शंका होती, पण आज असें वाटतें कीं, इतर श्रीसमर्थकृत प्रकरणांबरोबर हें प्रकरण आलेलें आहे तेव्हा तें हि श्रीसमर्थकृत च असावें. शिवाय ही हि बाब विचारात घेण्यासारखी आहे कीं, नेमक्या सातव्या आणि आठव्या च दशकाचा संकेत दिलेला का असावा. आठवा दशक स्वतंत्रपणें लिहिला गेला होता हें सर्वमान्य आहे, पण सातवा दशक हि एकटा च लिहिला गेला असावा ही कै. रा. तळवळकर याची कल्पना, न जाणों, खरी हि असेल.

(२) यथायोग्य पाहातां दय । अन्वय प्रसंग चुकों नये ॥ ओ. सं. १२. हें हि प्रकरण पूर्वी श्रीसांप्रदायिक विविध विषयांक ८२ यात निराळ्या बाडावरून देण्यात आलें होतें.

(३) लोकांचा भरंवसा न धरावा । आपला आपण विचार पहावा ॥ ओ. सं. ११

(४) कृपाळुपणाची मूस । साक्षात्काराची माहुस ॥ ओ. सं. १८. मागें बाडांक ६४ त हें प्रकरण आपण छापत देऊन त्याचा कांहीं सांकेतिक अर्थ असावा काय, अशी कल्पना सुचविली होती.

(५) परंतु येरूयचनी देव येक । तेणें सोडिले देव अनेक ॥ ओ. सं. १७. हें प्रकरण माल्तील तिसरा भाग—श्रीसमर्थांची कविता—याच्या प्रस्तावनेंत दिलेलें असून, यापूर्वींच्या हि कित्येक बाडात तें आलेलें आहे. तें आम्हांस अत्यंत प्रिय असून श्रीसमर्थ आणि श्रीशिवराय यांचा परस्परसंबंध दर्शविण्याचे कामीं या प्रकरणाचा उपयोग अनेक प्रवचनांतून आम्ही करीत असतों.

(६) मूळमाया पंचभुतेश्वर । शिवशक्ती जगदेश्वर ॥ ओ. सं. ८ हें प्रकरण पूर्वी कोठें प्रसिद्ध झाल्याचें नाहीं, असें वाटतें

(७) पड पड काट पाषाण । येथें करनि अतकर्ण ॥ ओ. सं. ११. या प्रकरणाच महत्ताचा कांहीं उघड निरूपण आहे.

दरे दरें पर्वत । वाहात आडचणी सर्वोचित ।
येथें राहतां उचित । मठवासी ॥ ६

आधी मठ चि करावा । मग भीम प्रतिष्ठावा ।
येश जपोनि योजावा । त्रिकाळरूपी ॥ ७
नेमस्तपणें असावें । जपध्यान करीत जावें ।
सिद्ध होय तों न भेटावें । कोणीयेकासी ॥ ९

ही नववी ओवी पाठातली आहे, त्यामुळें हें प्रकरण पूर्वी प्रकाशित झालेलें आहे कीं काय, अशी शंका येते. यापूर्वीच्या बाडातून तें आलेलें आहे, पण प्रकाशित नसावें.

( ८ ) सुचीत करुनि अंतःकरण । आतां ऐका राजकारण ॥ ओ. सं. ३३. हें राजकारणपर प्रकरण पूर्वीपासून च सर्वश्रुत आहे.

( ९ ) अखंड सावधान असावें । दुश्चीत कदापी नसावें ॥ ओ. सं. २१. हें हि प्रकरण, श्रीशंभाजी महाराजांस श्रीसमर्थांनीं लिहिलेलें पत्र म्हणून प्रसिद्ध आहे. या बाडांत या प्रकरणाचे शिरोभागीं 'पत्र संभुराजा' असा मथळा च आहे.

या एकंदर नऊ प्रकरणांपैकीं पहिलें प्रकरण औपचारिक म्हणून बाजूस सारिलें, तरी पुढच्या आठ प्रकरणांत निदान चार प्रकरणें उघड राजकारणपर आहेत, त्यामुळें बाकीच्या प्रकरणांत हि काहीं संकेत असावा की काय, असा जो पूर्वी एकएकटें प्रकरण वाचून नुसता संशय येत होता, तो जाऊन आतां खात्री पटते कीं, हीं सर्व प्रकरणें राजकारणपर च लावलीं पाहिजेत. श्रीसमर्थांचीं लघु काव्यें, म्हणून जो आपणास मालेंतील अकरावा भाग काढावयाचा आहे, त्यांत हीं सर्व प्रकरणें देऊं.

( ३ ) नंतर मधून कोठें पाळीच्या रचनाचें किंवा आनंदसुताचें एकादें पद, भागवतादि ग्रन्थांतील सुभाषितें, वामनपंडितकृत श्रीसमर्थस्तवनपर श्लोकपंचक, प्रभुचरणीं ज्याचें चित्त नसतें, प्रभुगुणाचे ठायीं जे अनुरक्त नसतात किंवा प्रभुलीला श्रवण करण्यास जे उत्सुक नसतात, अशांना

धिग्तान् धिग्तान् धिग् एवं वदति सततं कीर्तनस्थो मृदंगः ।

अशीं विनोदपर सुभाषितें, तर कोठें वैश्वदेव, मणिमल्ल आख्यान, इत्यादि विविध प्रकरणें अधून मधून अनंत कवि यांचीं पदें, श्लोक, आरत्या आहेत. कै. वामन दाजी ओक यांनीं इ. स. १८९६ सालीं काव्यसंग्रहांत अनंतकविकृत कवितेचा भाग प्रसिद्ध केला आहे. पण त्यांत दोन चार निरनिराळ्या अनंतांच्या कवितेचें मिश्रण झालें आहे, असें आम्हांस वाटतें. पूर्ण निज रंग

अनंत हे एक, अनंत देव हे दुसरे, श्रीसमर्थशिष्य अनंत कवि हे तिसरे आणि, न जाणों, आणखी एखादे चवथे, अशा तीन चार अनंतांना त्या भागांत एकत्र केलेलें दिसतें. श्रीसमर्थशिष्य अनंत हे आपणांस बहुधा अनंत कवि म्हणवीत. क्वचित थोडें तरी त्याचें तारतम्य असे. श्रीसमर्थप्रतापांत अनंतकवी सह्याद्रिशिखरीं । समर्थप्रताप वाणी वैखरी ॥ असें त्यांचें वर्णन आहे. दिवाकराचे बंधु अनंत होते, ते च हे होत, असा माझा ग्रह झालेला आहे.

(४) या बाडांत अनंत कवींची जी कविता आहे तींतील श्रीसमर्थ-स्तवनपर सहा श्लोक एवढे च प्रसिद्ध आहेत. बाकी सर्व अप्रकाशित आहे. तिचें प्रकाशन झालें पाहिजे. या कवितेपैकीं एक तेरा श्लोकांचें प्रकरण मला विशेष महत्त्वाचें वाटतें. त्यांत तत्कालीन थोडा इतिहास दिसतो. मला तो पूर्ण उमगला नाहीं. त्याकडे लक्ष जाऊन कोणास तरी तो उलगडेल, या आशेनें त्या तेरा श्लोकांसाठीं थोडी जागा अडविली.

सह्याद्रिचा निकट भाग कृतोपकारी ।
जो क्षेत्रदायक परा अति सौख्यकारी ।
नामें प्रसिद्ध गड भैरव हा शिवाचा ।
तेथें महोत्सव करी सुत भार्गवाचा ॥ १

झाला राजसु यज्ञ थोर तरि तो येके च संदीं वसे ।
अंबेचा नवरात्र यज्ञ नव ही संवत्सरीं होतसे ।
या संदीं उपमा महोत्सवगणा या भार्गवाच्या नसे ।
संतोषें अनुरक्त अनंतकवि हा सत्कीर्ति वर्णीतसे ॥ २

त्या यज्ञीं शिशुपाळ अग्रपुजनीं पूर्णाहुतीला पडे ।
जेथें शुंभनिशुंभ शक्तिवदनीं त्रैलोक्य जेणें पिडे ।
तेथें व्यास महाकवी नवरसें यज्ञास वर्णीतसे ।
येथें त्याहुन वर्णिता शतगुणें मार्कंड जाला असे ॥ ३

जयो शंकराच्या असो उत्सवाला । तथा रामचंद्राचिया उत्सवाला ।
जयो भार्गवाच्या असो उत्सवाला । जयो विठ्ठलाच्या असो उत्सवाला ॥

शिवारामचंद्रास कोदंडपाणी । तथा भार्गवालागि अंबा भवानी ।
पुजा विठ्ठलीं घेतसे चक्रपाणी । कजी अंतरीं शंकराची सिराणी ॥ ५

नाना चित्रविचित्र दिव्य मखरें शाळा अळंकारिली ।
पुण्याहवाचन पूर्वबोध करुनी अंबा घटीं स्थापिली ।

तेथें ऋत्विज रामरंग मुनि हे यज्ञपतीसारिखे ।
यज्ञीं श्रीधर म्हाळसाधिपतिच्या यार्थी सभा ढारिखे ॥ ६
आचार्यांयुत रामरंग मुनि जे सादरय त्यातें दिजे ।
जेणें श्री धरिली वराब्जसिरसीं अध्वर्यु तेणें किजे ।
भक्तामाजि सयुक्त भार्गव मुनी महत्त्व त्यातें ठसे ।
विद्यासागर धुंडिभट्ट सहजीं सर्वोपद्रष्टा असे ॥ ७
आले छपन देशिचे द्विज बहू विद्वान पट्शास्त्रिचे ।
ऋग्वेदादिकरून सामकयजुः शाखा अथर्वेदिचे ।
केल्या अद्भुत वेदघोष सकळीं पुण्यें सिमा सांडते ।
अंबा ब्राह्मणभोजनें बहुत घी संऋतिनें डोलते ॥ ८
आले अनेक गुणसागर पुण्यरासी । गधर्वतुल्य गुणि पंढरिचे निवासी ।
त्यांमाजि खड्गधर दोनि निपूण योगी । प्रेमा विशेष धरि भार्गव रामरंगीं ॥९
श्रीरामदासी आणि येकनाथी । आनंद चैतन्य अनेक पंथी ।
ज्ञानेश्वरादी अति पुण्य योगी । प्रेमा धरी भार्गव रामरंगीं ॥ १०
जे रंगले मानव अंतरंगीं । ते या भवाचे तरसी तरंगीं ।
कथामृतें दैवत पुष्करंगी । प्रेमा धरी प्रेमळ भक्तरंगीं ॥ ११
या भार्गवाचे गृहि दस्तवासी । आदया अभ्यस्त चि पुण्यरासी ।
हे दाटले पंढरिचे निवासी । तेथें कवींची गति होय कैसी ॥ १२
अंबा दिवासहित शोभतसे सुरंगीं । होती सवेग जप अद्भुत अंतरंगीं ।
नृत्यांगना सुरस नाचति रागरंगीं । प्रेमा अनंतरचिचा रघुराजरंगीं ॥१३

**३८५ ]** बाड–पृ. सं. १६ × २ = ३२ [२००
मोठ्या बाडाचा अवशिष्ट भाग

या बाडांत फक्त माधव केशव यांचीं पदें, अभंग, आरत्या, श्लोक आहेत. ते अंबेचे उपासक दिसतात.

**३८६ ]** पृ. सं. २० × २ = ४० [१५०
एका मोठ्या बाडाचा अवशिष्ट भाग

( १ ) अनंत सुत गजगौरीचोवसा. चोवसा = व्रत

( २ ) श्रीसमर्थ, तुका, सहजबोध, अमृतराय, केशव, रंगनाथ, मध्वमुनेश्वर यांचीं पदपदातरें

---

१ 'भास्कर' चें 'भार्गव' केलें आहे.

( ३ ) रावणमंदोदरीसंवाद, श्लोक २४, कोण कृत न कळे

( ४ ) विश्वामित्रांचें आगमन, श्लोकबद्ध, अपूर्ण

( ५ ) कृष्णराम कृत श्रीसमर्थांवर पद. हे कृष्णराम नवीन दिसतात. ते कोण असावेत, हें लक्षांत येत नाहीं. तें पद :

श्रीरामदास

रामदास गुरु अंतरिं स्मरा मुक्तीच्या मंदिरा। ज्ञेयोपवैरागरा ॥ ध्रु०
मूळ गिरासी जंबुग्रामीं अवतरले श्रीहरी। पावन गंगातिरीं।
सूर्याजिपंताची भक्ति पाहुनिया बहु बरी। जन्मले त्या उदरीं।
कोदंडाभिराम रामें दिधला साक्षात्कारा ॥ १

भीमदेवळीं निद्रा येली सांचित निज मानसीं। आदयोगि देवाजीसी।
कैवल्याचा दाता राम लावण्याची राशी। पाचारी आदरेसी।
मस्तकिं हस्तक ठेउनि मंत्र सांगे कर्णद्वारा ॥ २

राम राम हा छंद लागला अखंड निज मानसीं। त्यागोनि संसारासी।
लग्न लावितां संगळ अष्टक सावध म्हणति जोशी। ते खुण निज मानसीं।
जाणुनि मायिक प्रपंच सांडुनि आले कृष्णातीरा ॥ ३

दासबोध हा ग्रंथ निर्मुनि बोधित साधक जना। विध्वंसि दुर्वासना।
श्रवणें मननें निजध्यास तो साधी भाविक मना। राघवउपासना।
नवविध भक्ति करुनि मुक्ति आणिली निजघरा ॥ ४

राघवमूर्ति चाफळिं आणुनि स्थापिली बहु बरी। से कीर्ति दिगांतरीं।
सगुण भजनें निर्गुण अनुभव आणुनि दे अंतरीं। महाराज निर्विकारी।
कृष्णराम त्या वंदित भावें जोडुनिया द्वय करा ॥ ५

३८७ ] बाड पृ. सं. ४६ × २ = ९२ [ १५०
पाही नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, आनंदनंदन, वरवलिंग यांचीं पदपदांतरें

( २ ) भागवतांतर्गत गजेंद्रोपाख्यान, अध्याय २, ३, ४, शिवस्तोत्र, जयदेव कृत गीतगोविंद, पांडवगीता, ज्योतिर्लिंगें अशीं संस्कृत प्रकरणें

( ३ ) दहा अवतारांचे श्लोक अकरा—कोण कृत न कळे

( ४ ) विश्वनाथ कृत अंबेची आरती

( ५ ) नामापाठक कृत भरतभेट, ओवीसंख्या २२४

( ६ ) श्रीरंगानुजतनुज कृत रत्नमालिका—अपूर्ण

(७) वामन कृत भामाविलास, श्लो. ४८ " हस्ताक्षर आपाजी बल्लाळ "

(८) मध्यें एक नोंद आहे. " बाळाजी रघुनाथ गर्ध्ये संगमेश्वरकर पोतदार मौठ बंदर याश पुत्र जाला पिंगळ संवत्सर मार्गशीर्ष माश शुद्ध (१) अमवास्या रात्रौ प्रथम घटी १० वार गुरु जन्म गात्र बाळापुर कसबा घरी राजेश्री केशव नरसींह पटेल "

३८८ ] बाड–पृ. सं. ९३ × २ = १८६ [८०
सिवाय काहीं नष्ट

हें सबंध बाड मोडी लिपींत लिहिलेलें आहे. बखरी किंवा हकिकती मोडींत असतात, पण कविता क्वचित् च मोडींत लिहिलेल्या आढळतात. महत्त्वाचें असें या बाडांत काहीं नाहीं. त्यांत मनाचे श्लोक १४ ते २०३ (आपला २०५ वा श्लोक या बाडांत २०३ रा म्हणून असून ' इति श्री मनाचे श्लोक दोनशे तीन संपूर्णमस्तु ' अशी इतिश्री केलेली आहे), सुदामचरित्र, भारती कथा, कौल, तुकाराम एकनाथाचे काहीं अभंग अशी कविता असून येवटीं " रुल १८२७ चा कायदा ४ " दिलेला आहे.

मनाचे श्लोक शके १७५० त लिहिलेले आहेत. व ही वही शिवराम बापुजी फाटक चाफळकर याची असल्याचा लेख शके १७७५ तील आहे.

३८९ ] पोथी–पत्रें १८ [१५०

किरकोळ राजधर्मसमास अथ वर मथळा असलेलीं हीं काहीं पत्रें आहेत, त्यांत श्रीसमर्थ कृत (१) समाध बागेचा, (२) यादी इमारतीकारणें, (३) बहुधा गोसावी–अपूर्ण, (४) मानपंचक-अपूर्ण, अशीं प्रकरणें आहेत.

३९० ] संपूर्ण मोडी बखर–पानें २० [१००
एकापुढें एक जोडलेले

(१) सिद्धान्तशिरोमणीच्या आधारें चतुर्युगें, शककर्ते, आयुष्यमान यांविषयीं माहिती. लेखनकाल :

" शके १७५५ विजय नाम संवत्सर आश्विन शु. १४ रोज रविवार श्री क्षेत्र करवीरीं लिहिली आहे. " नंतर थोडी जागा सोडून

(२) भारती सेना-पांडवाकडील सात व कौरवाकडील अकरा मिळून अठरा अक्षौहिणी सेनेचा तपशील दिला आहे. शेवटीं "येक अक्षौहिणीची संख्या उद्योगपर्वी व्यासानी वर्णिली त्या वाक्यावरून सदरी लिहिले आहे त्यावरून अठरा अक्षौहिणी चतुरंगसेनेचा तपशील वर लिहिला" असें म्हटलें आहे.

# ३९१ ]

पोथी शिवलेली-पत्रें १०३ [१५०

मुकुंद, मुकुंदराज, मुकुंदराजयोगी किंवा मुकुंदमुनी यांचा विवेकसिंधु ग्रन्थ, प्रकरणें १ ते १२

# ३९२ ]

पोथी-पत्रें २५ [१५०

शामराज कवि कृत रेणुकामहात्म्य

या कवीचा हा ग्रन्थ नवीन आहे. तो श्लोकबद्ध असून त्याचे पांच अध्याय आहेत. पण या प्रतींत पाचव्या अध्याय अपुरा च सोडून 'समाप्त' अशी अक्षरें शेवटीं कोणी लिहिलीं आहेत. मग ही प्रत अपुरी राहिली, कां कवीनें च पांचवा अध्याय पुरा केला नव्हता, कोण जाणे. पहिल्या अध्यायांतील शेवटचे दोन श्लोक :

> शामाराध्यकवीश्वरें मधुनियां व्यासोक्ति चित्सागरा ।
> सारांशामृत हे सुधा निवडिली हृत्तापरूपागरा ।
> ते सेवोनि सुखें सदां बुधजनीं ध्यावी जगन्माउली ।
> संसाराकेंकरें प्रपीडित जना कर्ती दयासाउली ॥ ३७

> अध्याय आदि रचिला कवि शामराजें । आराध्यवंशकमळार्क सुखें विराजे ।
> श्रीरेणुकावर रयावरि वसुनीयां । काव्यप्रकाश करितो मनुयातळीं या ॥३८

शामराजकवींचें आडनांव आराध्ये दिसतें व

> श्रीपांडुरंगनगरस्थित श्री अराध्या ।

असा एक चरण चवथ्या अध्यायाच्या शेवटीं आला आहे, त्यावरून ते पंढरपुरचे राहणारे असावेत, असें वाटतें.

# ३९३ ]

बखर-बंद १६ [१५०

भोसले कुळाची वंशावळ-बखर अपूर्ण आहे. सोळावे बंदाचे शेवटीं "मग (बडाजी महाराज) थवी फौज पांच हजार घेऊन

निघाले एमागमे जिनाउ ची गधेदर सात मदिऱ्याची शिवाजी राजे याचे येळेस होती " येथवर मजकूर आला असून पुढील किती यद गहाळ झालेले आहेत, कोणी सागावे !

# ३९४ ]

पोथी–पत्रे ८१२ [३५०

## एकनाथी भागवत

( १ ) महाराष्ट्राला एकनाथी भागवताच्या ज्ञात असलेल्या प्रतींत इतकी जुनी प्रत दुसरी नाहीं. निर्णयसागरनें छापलेली प्रत शक १६५२ मधील एका प्रतीवरून छापली असें म्हटलें आहे, पण ग्रन्थ छापताना शब्दाचीं तत्कालीन रूपें न ठेवता त्याना विद्यमान काळातील पेहराव चढविण्यात आला आहे. एकनाथकालीन शब्दाचीं जशीं रूपें होतीं व त्याच्या मुखातून जसे शब्द निघाले, तीं तशीच्या तशीं रूपें व ते तशेच्या तसे शब्द कायम राखले पाहिजे होते. त्यात जी गोडी असते, ती रूपातरांत येत नाहीं. शिवाय निर्णयसागरनें छापलेली प्रत व ही प्रत ताडून पाहता असें निदर्शनास आलें कीं, एक छोटासा अध्याय खेरीज करून बाकीच्या सर्व अध्यायाच्या ओव्यात वाढ झालेली आहे.

( २ ) मूळ श्लोक सुमारें चवदाशें पचरात्रीं, ओवीसख्या सुमारें वीस हजार, मिळून सावया दहाशेपाचा तिप्पट मोठा ग्रथ होतो, पण एवढा मोठा प्रबंध ग्रन्थ असून हि तो किती सुदर आणि आस्थेनें लिहिलेला आहे. प्रत अति जीर्ण झाली आहे. कागद इतका ठिसूळ झाला आहे कीं, एकदा पोथी सोडली आणि बाधली म्हणजे दर खेपेस कागदाचा थोडा थोडा भुसा खालीं पडतो. ग्रन्थाचे एकदर अध्याय ३१, त्यात पक्त चवदावा अध्याय मुळीं च नाहीं, अध्याय ११, १२, १३, १५, १६, १७, १८, १९ आणि २७, २८ याची कसरीनें फार दुर्दशा केलेली आहे. कागदाची लाबी रुदी ९½" × ४¾" असून प्रत्येक पानावर १३ पासून १७ पर्यंत ओळी आहेत. समासात ग्रन्थाचें नाव, अध्यायाचा अक, प्रत्येक अध्यायाचा निरनिराळा पृष्ठाक व पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पृष्ठापासून शेवटपर्यंत अखेरचा एकदर पृष्ठाक अशीं दिलेलीं आहेत. तिघानीं मिळून प्रत लिहिलेली आहे त्यांचे आपणावर उपकार आहेत. त्रिये हि आश्चर्यकारक होते. अध्याय ५ च्याच्या शेवटीं ' दस्तखत तुकोजी कुळकर्णि मौजे कळबण

तपे कांठि व मौजे पदगालि समत मादाडि,' १२ व्याच्या शेवटीं ' लिखीतें राघोजी माहादेव,' १५ व्याच्या शेवटीं ' हें हस्ताक्षर दादो येकनाथाचें ' व ३१ व्याच्या शेवटीं ' लिखीतें हस्ताक्षर राघोजी माहादेउ श्रीगुरुप्रसादें पुर्ण केला ' असा चार ठिकाणीं लेखकांनीं आपल्या नांवागांवाचा उल्लेख केलेला आहे. ३१ व्या अध्यायाच्या शेवटचें वरील लिखाण ८११ व्या पत्राच्या अगदीं तळाशीं आलेलें आहे. पुढचें आणखी एक पत्र असावें व त्यावर लेखनकाल वगैरे असावा, पण दुर्दैवानें तें पत्र नष्ट झालेलें दिसतें. तथापि

( ३ ) प्रतीचा काळ ठरविणें मुळीं च अवघड नाहीं. एकंदर लिपी श्रीसमर्थांच्या पूर्वीची आहे. तींत विकल्पानें पृष्ठमात्रांचा उपयोग केलेला आहे, जसें, साचोकारा। तुं ह्मासि॥, नामादर हुज साज।, द्रख, रजा, संवाद, इत्यादि. हे पृष्ठमात्रेचे शब्द होथि, णजे, देख, जो, संवादे असे वाचावयाचे. या पृष्ठमात्रांचा प्रचार एकनाथमहाराजांच्या पर्यंत होता, पुढें तो बंद झाला. श्रीसमर्थांच्या वेळच्या लिखाणांत पृष्ठमात्रा आढळावयाच्या नाहींत.

( ४ ) अशी ही सुंदर, प्रदर्शनीय, प्रेक्षणीय प्रत आहे.

( ५ ) तिचा आपणांवर आणखी एक उपकार आहे. अध्यायांना जीं वेष्टणें असतात, ज्यांना तपलक म्हणतात, तीं बहुधा सुताचीं असतात, पण या प्रतीतील अध्यायांना तीं कागदाचीं होतीं. चार पांच इंच रुंदीचा व तेरा चवदा इंच लांबीचा कागद घ्यावयाचा, तो उभा फाडावयाचा, प्रत्येक तुकड्याची वीतभर रुंदीची घडी करावयाची व त्याचीं दोन्हीं टोकें खुबीनें अडकवून त्याचें वेष्टण बनवावयाचें. शिवकालीन कागदपत्रांचें आज आपणांस महत्त्व आहे, त्या वेळच्या लोकांची ती रद्दी होती. अशीं शिवकालीन कागदपत्रें फाडून त्यांचीं वेष्टणें केलेलीं कित्येक अध्यायांना होतीं. तीं उलगडून पुलवून वाचण्यांत येत आहेत. फार काय पण वरचें आणि खालचें अशीं दोन्हीं जाड पुठिपत्रें, तत्कालीन कागदपत्रें एकमेकांला डकवून च तयार करण्यांत आलीं आहेत. तीं पत्रें फाटल्यावांचून एकमेकांपासून सोडविण्यास कठीण जात आहे. खटपट वाटते, तथापि देवाचें नांव घेऊन त्यात हि डोकावून पाहवां सवा आणि अमान अंबेन अलफ या सनांतील म्हणजे शक १५६८ आणि १५६९ तील जमाखर्चाचे तुकडे, कागदपत्रें वगैरे आढळतात. तीं हि लावण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

१८५५ आषाढ शु. १३ ( कल्याणस्वामींची पुण्यतिथि )

# ३९५ ]

कागदपत्रें ३७, पृष्ठिपत्रें २ [ ३५०

( १ ) वरील वाडांक ३९४ यांतील निरनिराळ्या अध्यायांना जीं वेष्टणें होतीं तीं. कागदाचे एकंदर तेवीस तुकडे व ऐतिहासिक टिपण ८ वें यांत छापलेल्या सात पत्राचे चवदा तुकडे मिळून ३७ तुकडे. यांपैकीं कांहीं कागद श्रीशिवकालीन आहेत, कांहीं पूर्वकालीन आहेत व कांहीं उत्तरकालीन आहेत.

( २ ) त्या च बाडांकाला वर आणि खालीं असलेलीं दोन पृष्ठिपत्रें. श्रीशिवकालीन कागदपत्रें एकमेकाला डकवून हीं तयार केलेलीं आहेत. त्यांत मौजे उपलावी ता हवेली मामले परींडा गांवच्या जमाखर्चाचे सना किंवा समान अर्बैन अलफ सनातील कांहीं तुकडे व इतर कागद आढळतात.

# ३९६ ]

गळाठा [ १००-२००

यात दोन पुडकीं आहेत : एक जास्त उपयुक्त कागदांचें व दुसरें त्याहून कमी. दोन्ही मिळून पावशहायें कागद आहेत. त्यात अनेकांचीं पदपदार्तें, निरनिराळ्या काव्यग्रन्थाचीं मुद्रित पत्रें, भोसले घराण्याच्या व हनुमतस्वामीकृत श्रीसमर्थांच्या बखरींचीं पानें, असे विविध स्वरूपाचे कागद आहेत. हनुमंत स्वामीकृत बखरीचें स्वरूप प्रगट करणारा एक कागद अति महत्त्वाचा आहे. बखर छापताना यातील पानांचा उपयोग करणें अवश्य होईल.

# ३९७ ]

गळाठा [ १००-२००

( १ ) या हि गळाठ्यांत विविध स्वरूपाचे हजार दीड हजार कागद आहेत. त्यांत हि अनेकांचीं पदपदार्तें—श्रीसमर्थ, एकनाथ, जयराम कृष्णदास, मुद्गल, विठोबा, वामन, तुकाराम, नामदेव, अमृत, बाळकराम, गोसावीनंदन, शिवदिन केसरी, मध्वमुनेश्वर, कबीर, श्रीधर ब्रह्मानंद, आनंदतनय, जनी, शंकरसुत, कृष्णात्मज, इत्यादिकांचीं पदपदार्तें व निरनिराळ्या काव्यप्रकरणांचीं विस्कळित पत्रें आहेत. त्यात पोथ्यांतील ढवळे घराण्याचा वंशवृक्ष आहे व चार जन्मपत्रिकाचे अर्धवट

कागद आहेत : १६३७ त फाल्गुन व. १० स त्र्यंबक गोस्वामी यांची भार्या उभयकुलानंददायिनी लक्ष्मी यांना द्वितीय पुत्र झाला व १६४३ श्रावण व. १० स तृतीय पुत्र झाला, 'तं श्रीमत् गणेशगोस्वामिभिर्स्त्रीकृत: गृहीत्वा स्वतनय: कृत: ', १६७५ माघ व. १४ स सदाशिव यांना पुत्र विठोबा याचा जन्म झाला व १६८५ त सदाशिव गोसावी टकळे यांना दुसरी कन्या झाली.

( २ ) खर्ड्याच्या लढाईच्या श्लोकबद्ध वर्णनाचा एक कागद आहे. त्याचा मासला :

> दौलत्याचा अभिमान देव धरनी छोट्यास थांडी स्वयें ॥ २
> भैला हल्ला सवाई मंशु निज कटकें या तन्हे मार दिल्हा ।
> तेंव्हा पिल्ला परंदा जवल हि अवतां जाइला दूर पल्हा ।
> नाहीं मल्हा न पाणी यवन तलमळी या नभी यार अल्हा ।
> घोळे सल्ला करो जी अब हि गनिमसूं स्याहि सो देव जिल्हा ॥ ३

( ३ ) या कागदांत श्रीसमर्थस्तवनपर कांहीं कागद आहेत. उदाहरणार्थ :

> जगद्वंद्य तो सद्गुरु रामदास । सदा सर्वदा वृत्ति ज्याची उदास ।
> कृपादृष्टिनें देवसे सापदास । हरोनी भवादीक सर्वापदास ॥ ३
>
> सर्वां मतें सत्पथ रामदासी । दे संपदासी हरी आपदांसी ।
> हरुनि माया दृढ दे पदासी । दासी भवाच्या स्तविजे पदासी ॥ ४
>
> ब्रह्मचर्यव्रत चालवि नेमा । ब्रह्मरूप करि सर्व हि नेमा ।
> मारुती कलयुगीं अवतारी । होउनी सकळ ही जग तारी ॥ ५
>
> माया जड महा जगीं पळाया । केलें सुधाकाव्य भवाकळाया ।
> तो ग्रंथराजा जनिं दासबोध । श्रुत्यर्थ हृत्स्थें करीत बोध ॥ ७

येणें प्रमाणें चाफळ सोन्यांतील उपलब्ध संग्रहाचें स्वरूप आहे. हीं बाडें झालीं.

## कागदपत्रें

हि वरी च मिळालीं, परंतु सर्वत्र मिळालेल्या कागदपत्रांचा एकदम च शेवटीं परामर्श घेण्याचें योजिलें असल्यामुळें चाफळसोन्यांतील कागदपत्रांचा हि विचार तेव्हां च करूं. कै. विसुभाऊ राजवाडे यांना बाकेनिशी टिपण मिळालें तें हि या च सोन्यांत. या सोन्यांतील संशोधनाचें काम संपलें आहे, असें मी मानीत नाहीं. या सोन्यांतील च काय, पण कोठचें हि संशोधन पूर्ण झालें, आतां

त्या त्या ठिकाणी शोधावयाचे कांहीं राहिलें नाहीं, असें कधीं च म्हणतां यावयाचें नाहीं. कारण सहसा कोणी एकदम सर्व संग्रह दाखवीत नाहीं, किंवा कोणत्या हि गांवांतली सर्व च ठिकाणें तपासून झालीं, असें कधीं होत नाहीं. एका च ठिकाणीं निरनिराळ्या वेळीं जाऊन निरनिराळा संग्रह उपलब्ध झाल्याचें जर मी पहात आहे, तर कोठलें हि संशोधन संपूर्ण झालें, असें मला कधीं च म्हणतां यावयाचें नाहीं. खुद्द चाफळखोऱ्यांतील, शिवतरखोऱ्यांतील, परळी खोऱ्यांतील, सारळ खोऱ्यांतील आणि श्रीशिवसमर्थसंबंध आलेल्या इतर भागांतील खेडें आणि खेडें, घर आणि घर अजून धुंडावयाचें आहे व धुंडलें पाहिजे. मी धुंडीन किंवा अन्य कोणी तरी धुंडील, पण हें काम अजून व्हावयाचें राहिलें आहे, इतकें सर्वांनीं समजून चालावें. हीं सारीं खोरीं अत्यन्त रमणीय आहेत. त्यांत चाफळखोऱ्याची रमणीयता विशेष आहे, कारण ज्यांच्याशीं श्रीसमर्थ हितगुज करीत ते श्रीराम या खोऱ्यांत नांदतात.

## श्रीसमर्थ व श्रीशिवराय

यांच्या संबंधानें चाफळखोऱ्यातील एक गीत श्रीसांप्रदायिक विविध विषयांक ६५ यांत कै. राजवाडे यांनीं दिलेलें आहे. तें गीत कोणा रंगनाथगुरुबाई नामक कवयित्रीनें केलेलें असावें, असें त्या वेळीं त्यांना वाटून फक्त तें किती जुनें असावें, याचा त्यांना निर्णय करता आला नाहीं. श्रीरामदासी संशोधनाला आरंभ झाला त्या वेळीं गिरिधरांची जशी गिरिबाई बनविण्यांत आली होती, त्या च प्रमाणें आतां आपणांस सहज सांगतां येतें कीं रंगनाथ-गुरुबाई या कोणी कवयित्री नसून ते श्रीसमर्थशिष्य पाल्रीमठाचे अधिपति रंगनाथ होत. त्या गीताची मी जी १८२६ त नोंद केलेली आहे तींत,

पण घेऊनि सत्वर जाये । रंगनाथगुरुबाईला ॥

असा जो राजवाड्यांनीं पाठ दिला आहे त्या ऐवजीं

पय घेऊनि सत्वर जाय । रंगनाथविभुला वाही ॥

असा पाठ च आहे. अर्थात् हें गीत रंगनाथकृत होय. तें तत्कालीन आहे व श्रीसमर्थांसाठीं श्रीशिवरायांनीं प्रत्यक्ष वाघिणीचें दूध आणलें अशी जी कथा आहे ती यथार्थ होय, इतक्या गोष्टी सिद्ध होतात.

चाफळखोऱ्यातील श्रीरामदासी संस्मरणीय वस्तूंचें टांचण सांप्रदायिक विविध विषयांक ६६ या लेखांत कै. राजवाडे यांनीं केलेलें आहे, तें अवश्य पहावें. ज्येष्ठ शु. १ ला चाफळाहून सज्जनगडीं गेलों.

या वेळेस गडावर

## बापु रामदासी

यांच्याशीं बोलण्याची संधी मिळाली. बापु मराठे जातीचे असून या वेळीं त्यांचें वय सहज ७५।८० असेल. तत्पूर्वी ३०।४० वर्षें झाली होतीं, त्यांना कुत्रें चावलें होतें व श्रीसमर्थचरणतीर्थ घेऊन ते बरे झाले होते. तेव्हांपासून ते गडावर च राहिले. ते अकारण कधीं बोलत नसत. अहोरात्र रामदास एवढा एक च चतुराक्षरी मंत्र त्यांच्या मुखावाटे बाहेर पडे. रात्रीं अकरा वाजतां पहा कीं पहाटे चार वाजतां पहा, समाधीपुढील मुखारांत बापु 'रामदास, रामदास' म्हणून पुकारा करीत खादळावयाचे. एकेहाळी मठांतील दासविश्रामधाम ग्रंथाची बापूंनी तेव्हां मला माहिती दिली होती. आपचंद येथील शिवरामस्वामींचा मठ, येकेहाळीचा आत्माराम महाराजांचा मठ, भालकीचा नरसोबांचा मठ, इत्यादि मठांची हकिकत तेव्हां मला त्यांनीं प्रथम सांगितली होती. बापु आतां समाधिस्त झाले. त्यांची समाधि गडावर च आहे.

उन्हाळ्याची सुट्टी म्हणून वैशाखज्येष्ठांत व नाताळची सुट्टी म्हणून मार्गशीर्षांत कोठें ना कोठें संशोधनार्थ जाण्याचा क्रम सुरू झाला होता व कैक वर्षें पुढें चालला, त्यास अनुसरून पुढच्या मार्गशीर्षांत श्री क्षेत्र

## जांब येथें प्रथम जाणें

झालें. १८९९ च्या मार्गशीर्ष वद्याचा ३ सह ४ चा रविवारचा दिवस मला परम भाग्याचा वाटला, कारण त्या दिवशीं मला श्रीसमर्थांच्या जन्मभूमीचें प्रथम दर्शन घडलें. तेव्हांपासून आतांपर्यंत जांबेस, न जाणा, पांच पन्नास वेळां जाणें झालें असेल, पण प्रथम गेलों त्या वेळचा, जणूं, प्रत्येक क्षण मला स्मरत आहे. बाकीच्या गोष्टी सांगण्याची आवश्यकता नाहीं, पण एका थोर पुरुषाचें या निमित्तानें स्मरण होत आहे ती हकिकत सांगण्यास हरकत दिसत नाहीं. त्या च दिवशीं कै. दयाराम गिडुमल सुट्टीमुळें कोठें चालले होते. त्यांची चाळीसगांवीं भेट झाली, कोठें चालला म्हणून त्यांनीं विचारिलें. जांबेस जातों. तेथें काय आहे? तेथें श्रीरामदासस्वामींचें जन्मस्थान आहे. गाडीला अवकाश आहे, बसूं या बाकावर, सांगा मला श्रीरामदासस्वामींचं चरित्र! सांगितलें आणि तें ऐकून दयारामांनीं म्हटलें " जा, ज्या जागीं त्यांचा जन्म झाला त्या जागीं आसन घालून बसा आणि मला जें आतां सांगितलें त्या चरित्राचें एकाग्र मनानें तेथें चिंतन

फरा..." जांबेस जाऊन पोंचलों आणि पंचवटीचें ठिकाण, मारुती, वडाचें झाड, श्रीराममंदिर, श्रीरामपंचायतन, तुपाची घागर, श्रीसमर्थांची जन्मभूमि, कुळकर्ण्यांची विहीर, नदी, डोह, रामजी व श्यामजी यांच्या समाधी, देवमळा, पुरातन देवळें विहिरी वगैरे, इत्यादि पवित्र वस्तूचें दर्शन घडलें. अलिकडे श्रीसमर्थांच्या जन्मस्थानीं श्रीसमर्थमंदिर झाल्यापासून व स्यात १८५४ च्या श्रीरामनवमीच्या मुहूर्तावर श्रीसमर्थमूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेचा अपूर्व समारंभ झाल्यापासून जांब गांव जगप्रसिद्ध झालें आहे, त्यामुळें जांबेविषयीं जास्त लिहिणें नको. खुद्द जांबेस विशेषसा संग्रह नव्हता. कागदपत्राच्या ज्या नकला मिळाल्या त्या कागदपत्रांच्या नवव्या भागांत प्रसिद्ध करण्यांत आल्या आहेत व जी थोडीं बाडें मिळालीं त्यांचा आतां परामर्ष घ्यावयाचा. जांबेस थोडा च संग्रह मिळाला, त्यात कांहीं जोशी मंडळीकडील आहे व कांहीं कोठी मंडळीकडील आहे. पूर्वी जांबेस कोष्ट्यांचीं घरें पुष्कळ होतीं, त्याचा धंदा हि वर चाले. आतां धंदा साफ बसला, त्यामुळें घरें हि उठलीं. पूर्वी या मंडळींना ग्रन्थसंग्रहाची फार आवड होती, असें माझ्या निदर्शनास आलें आहे.

### जांबेचा संग्रह

**३९८ ]** बाड–पृ. स. ३५ × २ = ७० + ४३ × २ = ८६ मिळून १५६ [११२

( १ ) नामदेव कृत ज्ञानदेवनामदेवतीर्थावळी–अभंग ५८, कडवीं ४३२, लेखनकाल–शके १७५३ खरनाम संवत्सरे चैत्र शुद्ध १२

( २ ) नामदेव कृत ज्ञानदेवसोपानदेवसमाधि– अभंग ६१, कडवीं ७८५, लेखनकाल–शके १७५३ खरनाम संवत्सरे अधिक शुद्ध २

वैशाख महिना अधिक होता. बाड काळजीपूर्वक लिहिलेलें आहे, अक्षर सुंदर आहे.

**३९९ ]** बाड–पृ. स. ६५ × ४ = २६० पैकीं २४ आ. व २६ शे. नष्ट [१७५

( १ ) या बाडांत श्रीसमर्थांचीं पदपदांवरें पुष्कळ आहेत. त्यांत हिंदुस्थानी पदांचा विशेष भरणा आहे.

हम वैरागी गुरुके चेले निल्य निरंजन रोळों येंठले ॥

हीं सर्व ताडून पहावयाचीं आहेत. त्यांत पुष्कळ नवीन आहेत.

(२) श्रीसमर्थ कृत चौदा ओव्याशतकांपैकीं तेरावें, चौदावें, पांचवें, दहावें, पहिलें आणि अकरावें, हीं शतकें, या क्रमानें, मधून मधून आलीं आहेत. अकराव्या शतकाच्या शेवटीं आणखी सोळा कडवीं जास्त असून ' उभयता स्वामींचा संवाद ' असें त्या शतकाचें नांव दिलेलें आहे.

(३) शिवाय श्रीसमर्थ कृत सगुणध्यान, सरवदा, सप्तसमासी हीं पूर्वींचीं प्रकरणें असून कुळकर्णकथा–ओ. ४४ ( सहजीं सहज काजा। तुज वंदिले गणराजा ) व नाममहिमा–ओ. २७ ( ऐका सज्जन श्रीमंत। महिमा नामाचा अद्भुत ॥ ) हीं नवीन प्रकरणें आहेत.

(४) याशिवाय गोरखनाथ, जनपंडित, नरहरि, ईशसुत, अनंत, रंगनाथ, तुकाराम, उद्धवचिद्धन, मध्वमुनेश्वर, शिवराम, कल्याण, कबीर, केशव, जगजीवन, भगवंतसुत इत्यादिकांचीं पदपदांवरें आहेत.

४०० ] पोथी–पत्रें ८१ [२०२

ज्ञानदेव विरचित अमृतानुभव

सुंदर, संपूर्ण प्रत. पहिल्या मुखपृष्ठावर आणि प्रत्येक पत्रावर अमृतानुभव असें च नांव दिलें आहे, पण शेवटीं अनुभवामृत असें म्हटलें आहे. दोन्ही नांवें रूढ आहेत. लेखकाचें नांव व काल :

" शके १६५२ ॥ साधारणाब्दे दक्षणायने शरदृतौ आश्विने मासे शुक्लपक्षे प्रतिपदा गुरौ तद्दिने सोनदेवसुत राघवेन ग्रंथलिखितं समाप्तं श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ओवियासंख्या ॥ ८१० ॥ "

पहिल्या मुखपृष्ठावर सोनदेवसुत राघव यांनीं आपलें नांव घातलें असून हि निराळ्या अक्षरांत " इदं पुस्तक कानेटकरोपनामक कृष्णाजी सोनदेवस्य " असें हि लिहिलेलें आहे. राघव आणि कृष्णाजी बंधु दिसतात. हे कानेटकर कोठचे व त्यांची ही प्रत जावेकडे कां, केव्हां गेली, कोण जाणे.

४०१ ] पोथी–पत्रें २४९ [१५०

मुकुंदराज विरचित विवेकसिंधु

संपूर्ण, सुंदर प्रत. लेखकाचें नांव, गांव, काळ वगैरे, हीं महत्त्वाचीं आहेत, तीं अशीं :

" शके १७०५ शोभकृत नाम संवत्सरे मार्गेश्वर मासे येकादशायां मंदवासरे तद्दिने ग्रंथ समाप्त ॥ हस्ताक्षर यद्दिरो गोपाळ मौजे गुंज ॥ ग्रंथश्लोक झाडोजि यल्ल्द सोरणजि न्हावि याने लिहविले असे ॥ चिरायु कुशलमस्तु ॥ धनधान्यसमृद्धि अस्तु ॥ श्रीगुरुनाथार्पणमस्तु ॥ "

वद्य एकादशीला शनिवार होता. १७०५ ला शोभन संवत्सर होता व १७०४ ला शुभकृत् होता. हस्तदोष दिसतो, शोभन ऐवजीं शोभकृत अक्षरें पडलीं असावीं.

जांबेपासून तीन कोस गोदावरीच्या काठीं गुंज आहे. कौतुकाची आणि लक्षांत घेण्यासारखी गोष्ट ही कीं, एका न्हाव्यानें स्वतःच्या उपयोगासाठीं हा ग्रन्थ लिहविला होता आणि तो मला मिळाला जांबेस एका कोष्ट्याचे घरीं.

४०२ ] पोथी–पत्रें ३४ [ २००

पहिलीं दोन गेलेलीं

देवदास कृत त्र्यंबकेश्वरस्तोत्र

४०३ ] पोथी—पत्रें ३५ [ २००

मधलें च १७ वें पत्र हरवलेलें

देवदास कृत करुणामृतरस किंवा संतमालिका

मागील बाजूवर ६८ पद्यं. या प्रतींतील शकाची ओवी :

क्षय संवत्सरीं आषाढ मासीं । सोमवार तृतीयेचा दिवसीं ।
पूर्णता जाली ग्रंथासी । श्रोतयांसी विनवीतसें ॥ १४४

४०४ ] पोथी–पत्रें ४१ [ १८१

एकनाथ कृत येकादशी कथा

प्रतीचा लेखनकाल वगैरे : " सके सोळासें बाहात्तर ॥ प्रमोद नाम संवछर ॥ आश्विन शुद्ध अष्टमी गुरुवार ॥ प्रथम प्रहरी समाप्त ॥ ......हे पुस्तक ॥ श्रीमटात्मज भवानी जोसी आसनगाव हास्तक्ष्य आत्मकारार्थं ॥ परोपकारार्थं लिख्यते ॥ "

आसनगांव म्हणजे नारायणाचें ज्या गांवीं लग्न करावयाचें योजिलें होतें व जेथून ते पळाले तें गांव. जांबेपासून फार दूर नाहीं कोसभर आहे. आज त्या गांवीं ब्राह्मणाचें घर नाहीं. जांबेचे च जोशी आसनगाव वहिवाटतात.

जोशीबुवांनीं ग्रन्थ फार अशुद्ध लिहिला आहे. बाप्पाभट जोशी यांच्या कडे ग्रन्थ मिळाला. ग्रन्थाचे तीन प्रसंग असून ओवीसंख्या २३२ आहे.

**४०५ ]** लहान बाड–पृ. सं. ३० आ. बे. कांहीं पानें नाहींत [१७५

या बाडांत अंबिकास्तुतिपर १० ते ५४ श्लोक आहेत. ते अपूर्ण आहेत. ५२ व्या श्लोकाचा चवथा चरण

तुझे रंक मी दीन नागेश आहे ॥

असा आहे, त्यावरून हें प्रकरण नागेशाचें आहे असें म्हणतां येतें. प्रकरण अनुपलब्ध, अप्रकाशित आहे, असें वाटतें.

**४०६ ]** तीन पत्रें [१००–१५०

(१) हीं तिन्हीं पत्रें बाप्पाभट जोशी यांच्या घरच्या गठ्ठ्यांत सांपडलीं. तीं तिन्हीं महत्त्वाचीं आहेत. पैकीं एक हैद्राबाद रियासतींत इंग्रजांचा जो प्रवेश झाला तो दूर कसा करावा याच्या मसलतीचें आहे. दुसरीं दोन संबंध च येथें देतो.

१ ] श्री [ अ. मो.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दाजीराव स्वामीचे सेवेसी पो येशवंतराव काशी सां नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशललेखन करीत जावे विशेष राजश्री रंगोपंत दादा याणी श्रीरामदासस्वामीचे चरित्राचे बंद येकरो पासष्ट नवीन केले आहेत त्याव ते बंद आम्हास पाहावयास पाठवावे म्हणजे प्रती करून माघारी पाठऊन देऊ व दासबोधाचे दशक आम्हांपासी आहेत सोळापासून येकोणीसापर्येत च्यार पाठवून द्यावे त्याची प्रती करून पाठऊन देऊ बहुत काये लिहीणे लोभ कीजे हे विनती

चिरंजीव राजश्री नारोपंत नाना व रावजी याणी आशीर्वाद उपरी लिहिल्या प्रो पुस्तक पाठवावे म्हणजे प्रती करून पाठऊन देऊ लोभ कीजे हे आशीर्वाद

२ ] श्री [ अ. मो.

श्री कृपासागर राजमान्य राजश्री सखारामपंत बापु स्वामीचे सेवे

सो श्यामराव माहादेव टाणे वा गोवर्धन कृतानेक सा॥ नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वामींनी आपले स्वानंदवैभव लेखनाज्ञा केली पा॥ विशेष ऐसीयात आपणाकडोन पत्र येऊन सेवकाचा परामर्ष होत नाही तर ऐसे नसावें सदैव पत्रद्वारी संतोषवीत असावें यानंतर पेशजी आपण आज्ञापत्र पा॥ होते तेथ आज्ञा होती कीं श्रीमंत राजे महीपतराम बाहादुर यांचे फौजचा मुकाम गुंजमुरतीवर होते हे जे पावेतो आहे मग कुच होणार त्याजवरून सेवेसी विज्ञापना लिहिली आहे तर कृपावंत होऊन एथकडचे वर्तमान कुच होऊन कोणे मार्गे जाणार हे तपसीलवार आज्ञापत्र पेहून पा॥ सर्वपरी आपले मरवसीयावर आहीत बहुत काय लिहिणे कृपालोभ कीजे हे विज्ञापना

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री वैजो पंत दादा स्वामींचे सेवेसी सा॥ नमस्कार विनंति उपरी विशेष श्रीमंत बापुसा यासी विनंतिपत्र लिहिले आहे तर पत्राचे उत्तर तपसीलवार लेहून पा॥ मरवसा जाणोन सो लिहिले असे बहुत काय लिहिणे कृपालोभ कीजे हे विनंती

( २ ) हनुमतस्वामीकृत म्हणून प्रसिद्ध असलेली श्रीसमर्थांची बखर तयार करण्याचे कामीं रंगोपंत दादा यांचे श्रम विशेष कारणीभूत झाले हें बरील ले. २ पत्रावरून दिसतें व ऐतिहासिक टिपण आठवें यांत गुंज आणि मूर्ती अशी दोन्हीं नावें आलीं आहेत त्याचा त्या वेळीं बरोबर बोध झाला नव्हता, आता वरील ले. ३ वरून गुंज आणि मूर्ती जवळ जवळ तरी असावीत, किंवा गुंज गावाला च गुंजमूर्ती म्हणत असावेत, असें दिसतें.

**४०७ ]** गळांठा [१००—३००

( १ ) शेवटच्या पेशव्याच्या कालातील दोन पत्रें, ( २ ) सुंदर अक्षराचीं व मोठ्या आकाराचीं दासबोधाचीं कांहीं पत्रें, ( ३ ) श्रीसमर्थपूर्वकालीन पोथ्याचीं कांहीं पानें, ( ४ ) ओवीबद्ध सटीक गीतेचीं कांहीं पानें, ( ५ ) एकनाथकृत रुक्मिणीस्वयंवराचीं पानें, ( ६ ) अपरोक्षानुभूतीचीं पानें, ( ७ ) विवाह प्रकरणाचीं पानें ( ८ ) मुहूर्तचिंतामणीचीं कांहीं पानें, इत्यादि मुद्रित पत्रें या गळाठ्यात आहेत.

येणें प्रमाणें जांबेचा अल्प संग्रह आहे. पण त्यावरून व इतर मिळालेल्या माहितीवरून आतां असें दिसतें कीं, मोगलाईतील चारी मराठी जिल्ह्यात व

विशेषतः पैठणच्या सभोंवार पांच पन्नास कोसांच्या टापूंत संशोधनाला पुष्कळ च वाव आहे. गुंज, मातवत, साडेगांव, मंगरूळ, हिवरे वगैरे ठिकाणीं अवश्य शोध केला पाहिजे.

जांबेहून परततांना मार्गात वद्य ५ ला (२७-१२-०४) मालगांवीं गेलों.

## श्रीसमर्थशिष्य त्रिंबकराज

यांचा येथें मठ आहे. या मठाविषयीं त्रोटक माहिती श्रीसांप्रदायिक विविध विषय १५, १६, १७ आणि १८ यांत पूर्वी च आलेली आहे. ती अवश्य पहावी. गावापासून जवळ च डोंगरांत त्रिंबकराजांच्या समाधीचें वृंदावन आहे. वृंदावनावर जीं अक्षरें कोरलेलीं आहेत, तीं त्या वेळीं जितकीं लागलीं तितकीं विषयांक १५ त दिलीं होतीं, पण त्यानंतर पुन्हां १८४३ च्या मार्गशीर्षांत गेलों होतों तेव्हां, जीं पूर्वी लागलीं नव्हतीं तीं हि अक्षरें लागलीं. वृंदावन अगदीं उघड्यावर असल्यामुळें कालांतरानें सर्व च अक्षरें अस्पष्ट होतील. अक्षरांच्या दोन ओळी आहेत, त्या अशा :

॥ श्री आदिनारायण चतुरानन वपी
प्रमुनी रामचंद्र रामदास त्र्यंबकराज ॥

मठाची परंपरा वगैरे इतर माहिती वरील विविध विषयांकांत आलेली असल्यामुळें आपण आज मठांतील संग्रहाकडे च एकदम वळूं.

## मालगांव मठांतील संग्रह

४०८ ] पोथी–पत्रें ३१२ [२१४

### ज्ञानेश्वरी

सुंदर, संपूर्ण प्रत. कागदाचा आकार १२″ × ५३/४″. अक्षर सुंदर. प्रत्येक पानावर बरोबर अकरा अकरा ओळी आहेत. अक्षराचें वळण विशिष्ट प्रकारचें आहे. शेवटीं एकनाथमहाराजांच्या त्या प्रसिद्ध चार ओव्या आहेत. ३१२ व्या पत्राच्या बरोबर तळाशीं लेखनकाळासाठी संपूर्ण जागा आहे. त्यामुळें च बहुधा लेखकानें आपलें नांव गाव दिलेलें नाहीं. पण त्या पत्राच्या पाठीमागें मधोमध समाप्तीच्या आधीं समाप्ती करतांना समाप्तीच्या ओळींत च लेखकानें लेखनशक दिला आहे. ती ओळ अशी :

ज्ञानदेवी समाप्तिसगमत ॥ शके १६२१ प्रमाथिसंवत्सरे ॥

ही प्रत मालगांवीं मिळाली का अन्यत्र एका कोठें तरी मिळाली याविषयीं किंचित् शंका आहे. या दोन ठिकाणांपैकीं कोठें हि मिळालेली असली तरी ती पैठणच्या प्रतींतील आहे, हें निश्चित.

## ४०९ ]

पोथी–पत्रें १२ [ ४५

श्रीसमर्थस्तवनपर तीन संस्कृत स्तोत्रें, पैकीं एक १२ श्लोकांचें, दुसरें ११ आर्यांचें आणि तिसरें संस्कृत टीकेसह २१ श्लोकांचें.

## ४१० ]

बाड–पृ. सं. ३२ × ४ = १२८ [ १५०
पैकीं पाहिलीं १२ गेलीं

( १ ) आरंभीं श्रीसमर्थांचीं पांच पन्नास पदें आहेत. त्यांत एक च नवीन आढळलें, पण त्यांतला काहीं भाग कसरीच्या भक्ष्यस्थानीं गेला आहे.

( २ ) " पदें दासाचीं " म्हणून जगज्जीवनांचीं दहा पदें. यावरून ही बाडी मूळची वडवळेमठांतील असली पाहिजे.

( ३ ) पदें केशवस्वामीचीं. ही पदें नऊ आहेत. तीं सारीं गोड आहेत. अलिकडे आपण सारे जण उपजत च शहाणे आणि ज्ञानी असे जन्माला येतो व पदवमूर्ख होऊन मरतो ही पाश्चात्य संस्कृतीची कृपा होय, पण त्या काळच्या साधुसंतांची परमावधीची गुरुभक्ति पाहिली म्हणजे अपूर्वता वाटून क्षणासाठीं तरी जीव कासावीस होतो. त्या काळीं गुरुभक्तीची परम सीमा झाली होती.

चालती गुरुनाथ । पंथें त्या मी जाईन ।
उमटतील पाउलें । त्या मी धुळींत न्हाईन ॥

येथें गुरुभक्तीची हद्द झाली ! आणखी एक असें च पद देतों :

गुरु गुरु गुरु गुरु करितो मी । धाउनि चरण धरितो मी ।
मजला म्हणती हांडी हांडी । परि मी बाहाणा न सोडी ॥ ध्रु०
थापटुनीया निजहस्तें । अखंड सावध करि मातें । मजला० ॥ १
गुरुचा बाळक जालों मी । चिन्मयतीर्थें न्हालों मी । मजला० ॥ २
केशवस्वामी दातारा । स्वपदीं देईं मज थारा । मजला० ॥ ३

श्रीसमर्थांवरील केशवस्वामींचें तें पद या बाडांत आहे :

रामदास माउली ॥ ध्रु०

सच्चिद्घनसुख वरद प्रतापी । शांतीची साउली ॥ १

अनन्य जे नर शरण रिघाले । दयालागिं पावली ॥ २

केशवि केशव निजसुख सेवीं । आठवितां चि धांवली ॥ ३

श्रीसमर्थांना वगळून च आपण नेहमीं बोलत असतों. सर्व साधुसंतांच्या पदांत केशवस्वामींचीं पदें आम्हांस फार आवडतात. पण अशीं त्यांचीं हजारों पदें महाराष्ट्रानें आजतागाईत अप्रकाशित राहूं दिलीं आहेत. या च अर्थाचे उद्गार मागें हि काढले असावेत. पुन्हां बोलणार नाहीं.

( ४ ) तुलसीदासाचीं तीन, मीराबाईचीं दोन व अमृत, रंगनाथ निजानंद आणि रामराज यांचें एक एक, अशीं पदें आहेत.

( ५ ) शेवटीं अंगदशिष्टाईच्या ३५ आर्या व २० श्लोक आहेत.

४११ ] बाड–पृ. सं. २३ × २ = ४६ [७५

यांत श्रीसमर्थ, कल्याण, वगैरे कृत आरत्या आहेत.

४१२ ] बाड–पृ. सं. ५० × ४ = २०० शिवाय आ. शे. कांहीं नष्ट [२००

( १ ) पूर्णानंदानुचर शिवराम कृत समश्लोकी गुरुगीता

( २ ) नंतर या बाडांत अनेकांचीं पदपदांतरें आहेत. त्यांत श्रीसमर्थांचीं ७, भाळगांवमठपति श्रीसमर्थशिष्य त्रिंबकराज यांचीं १४, केशवस्वामींचीं १७, शिवराम पूर्णानंदांचीं ११, त्रिंबकराजांचे शिष्य हरिहर यांचीं ११, वामनांचीं २, कोणा भक्तांचीं २ व ज्ञानदेव, विठ्ठल कवि, रंगनाथ, यादव, मुधवा, गोशावीनंदन, या प्रत्येकाचें एक एक, अशीं पदपदांतरें आहेत.

( ३ ) दास विठा यांचें ' घाटे त्रिंबक पहावा ' हें पद

४१३ ] बाड–पृ. सं. २२ × २ = ४४ अति दुर्दशा पावलेलें बाड [२००

यांत विठ्ठल, केशव, जगज्जीवन केशव, चैतन्य, आनंदस्वामी,

ज्ञानदेव, जनार्दन, अनादिचिद्धन, मध्वमुनेश्वर, नामा यांचीं पदपदांतरें आहेत व विठ्ठलकवीचे काहीं श्लोक आहेत.

**४१४ ]** वाड. पृ. सं. २४ × २ = ४८ [१००

सुरथचरित्र ( सावर्णि मनु )—आर्यावृत्तात, सर्ग नऊ

**४१५ ]** एका मोठ्या बाडाचीं दोन्ही बाजूंचीं पानें गळून उरलेलीं पृ. सं. ८ × ४ = ३२ [२००

( १ ) श्रीसमर्थ, शिवदिन केसरी, लीलाविश्वंभर, उद्धवचिद्धन, गोसावीनंदन, तुका, जगजीवन यांचीं पदपदांतरें

( २ ) विष्णुदासनामा कृत कलियुगमाहिमा श्लो. ५४

( ३ ) मुकुंदराजाचीं हिंदुस्थानी पदें

( ४ ) जयदेव कृत पहिली अष्टपदी–जय जगदीश हरे

( ५ ) बाडें शिवताना कागद फाटूं नये म्हणून मध्यमागीं रद्दी कागदाची किंवा हरणाच्या कातड्याच्या तुकड्याची घडी करून ठेवतात व तीवरून टाके घेतात. अशी बाडें शिवण्याची सामान्य पद्धत असे. प्रस्तुतचें बाड उसवलें गेलें आहे, पण त्याचा तो घडी केलेला रद्दा कागद आणि दोरा कायम आहे. त्या रद्दी कागदावर पुढील श्लोक आहेत. पहिले दोन श्लोक गेले, तिसऱ्याचा थोडा भाग व पुढचे चार श्लोक आहेत, ते असे.

. . . . . . . . . . . . . . निया पेमरी ।
केला वास शिवें तळ्या उचालिल्या निर्दाळिले लांड हो। तो॰ ॥ ३
घेता हा अवतार दुष्ट दमुनी सद्भक्त सरक्षिले ।
गाई ब्राह्मण योग याग सकळी हे धर्म संस्थापिले ।
गाती भक्त ऋषीमुनीगण सदा सत्कीर्ति उदंड हो । तो॰ ॥ ४
प्रारभीं स्थळ पेमरी तदुपरी पाकीस आला असे ।
नळदुर्गी तिसरें विशेष चौथें हे जेजुरीचें दिसे ।
ऐसी योजुनि स्थानकें विचरतो पृथ्वींत नवखंड हो । तो॰ ॥ ५
ऐसीया कुळदेवतास नमुनी जो नित्य भावें भजे ।
त्याला काय उणें न मागत तरी अप्राप्त ते ही दिजे ।
दासा देइल भुक्ति मुक्ति सगळी वारुनि पाखांड हो । तो॰ ॥ ६

मार्तंडाष्टक जो पढेल अथवा ऐकेल अत्यादरें ।
त्याचें हो कळिकाळ दास्य करनी राहील हें हो खरें ।
तेथें शाश्वत रंगला निजसुखें नासूनिया बंद हो । तो० ॥ ७

# ४१६ ] बाड-पृ. सं. ६० × २ × २ = २४० [१५०-२००
शिवाय आ. सं. २४।२४ गेलेलीं

## दीन सदाशिव

( १ ) या बाडाचें थोडक्यांत वर्णन करावयाचें म्हणजे तें कोणी, " दीन सदाशिव " कवीचें बाड आहे. पण हे दीन सदाशिव कोण होते केव्हां होऊन गेले, त्यांचे गुरु कोण, याचा मात्र मला संबंध बाडांत सुगावा लागला नाहीं. हें बाड बहुधा त्यांच्या च हातचें असावें. त्यांत त्यांचीं स्वतःचीं ४०।५० पदेंपदांतरें आहेत व द्रौपदीचा धांवा-श्लोक ४७, गंधमादनपर्वत-भारती कथा-श्लो. ३९, अहिल्योद्धार-श्लो. २२ अशीं तीन प्रकरणें आहेत.

( २ ) याशिवाय श्रीसमर्थांचीं दहा पांच पदें असून दासबोधांतील २×८, २×९, १×२-३-४, १×५, १×६, ३×१, २×१०, ११×३, २×४, ११×५, १४×२ हे समास उतरलेले आहेत. २×१० त पढतमूर्खांचीं लक्षणें आहेत. तो समास देऊन सदाशिवांनीं नंतर आपलें एक पद दिलें आहे :

### पढतमूर्ख

त्याचे अंगीं दोनी वारे । मन स्वरूपीं कैसें थारे ॥ १
काय मूर्खाचें त्या ज्ञान । ज्ञान असोनी अज्ञान ॥ ध्रु०
सहज त्याचे तीन गुण । काये असोनी निपुण ॥ २
होये नेत्रीं तो आंधळा । न धरी पापाचा कंटाळा ॥ ३
श्रवणें होये तो बधिर । कामीं कदा न धरी धीर ॥ ४
पायेंकरुनि होये मुका । कोन्हीं न ये त्याच्या तुका ॥ ५
काये वाचुनिया गीता । नाहीं चित्ताची शुद्धता ॥ ६
काये ऐकोनी पुराण । ज्याचें स्वरूपीं नाहीं ध्यान ॥ ७
काये पूजुनी धातुमूर्ती । काये त्याची प्रेमभक्ती ॥ ८
ऐसा जाणा पढतमूर्ख । त्यासी प्राप्त येमलोक ॥ ९
सुटया येमाची यातना । करा सद्गुरुप्रार्थना ॥ १०
गुरुचेरणीं व्हा रे दीन । म्हणे सदासीव दीन ॥ ११

( ३ ) त्यांच्या पदांत विवेकसिंधु, अमृतानुभव, ज्ञानेश्वरी, नाथभागवत, दासबोध, रामविजय, हरिविजय या ग्रंथांचा मोठ्या आदरानें आणि अभिमानानें उल्लेख केलेला आहे. अर्थात् सदाशिव हे श्रीधरानंतरचे होत.

( ४ ) एकनाथांची आनंदलहरी यांनी उतरलेली आहे. छापलेल्या प्रतींत १५४ ओव्या आहेत, पण यांच्या १४७ आहेत. सात ओव्या कोणत्या जास्त आहेत त्या निवडून काढल्या तर असें प्रत्ययास येईल कीं, त्या मागाहून कोणी तरी दडपून दिलेल्या असाव्यात. एका ओवीविषयीं असें माझ्या मनांत आलें. आनंदलहरी उतरून नंतर सदाशिवांनीं नाथावर पद केलें आहे :

येकनाथ

येकनाथ येकनाथ हृदईं धरि माण्या छंद ।
येकबोलद्वये उध्धरतो जगिं तूं होसी निर्द्वंद ॥ ध्रु०

येकनिष्ठ तो भाव देखुनी भक्तीसी हरि ये ।
येकमानसे मेलुनी करितो बहु नीच कार्ये ।
येक हरी तो जाणुनी धरिली निजस्वरूपीं सोये ।
येम होउनी कंपित धरितो मनीं तो बहु भये ॥ १

करुणाकर निजदासा तो भवभयेहारक ।
करणी करुनी अद्भुत मानी सम राजा रंक ।
कपट कदापी न धरी जनासी दावी कौतुक ।
कमलोद्भव तुष्टोनि त्यावरी तो सुकवी येमलोक ॥ २

करुनी नाना ग्रंथ ते बहुविध तुष्टवी भगवाना ।
नामस्मरणें स्तविला त्यानी पंढरिचा राणा ।
नाम सार हें जाणोनि चरित्र वर्णितसे नाना ।
नाही संशय मुक्त तो वदती सा अठरा जाणा ॥ ३

थकीत होउनी मुनिजन त्याची केले समाथ ।
थयथयीत प्रेमाचा रस तो भागवतग्रंथ ।
थकल्या क्याच्ही वाचा वदवी ऐसा समर्थ ।
थकीत जाला दीन सदाशिव वंदी प्रतिष्ठाणनाथ ॥ ४

( ५ ) याशिवाय या बाडांत तुकाराममहाराजांचे तीस चाळीस अभंग आहेत, केशव आणि हरिहर यांचे थोडथोडे आहेत व नामा केशवाचा दास,

आनंदतनय, रंगनाथ, जनी, अमृत, नामा, ज्ञानदेव, मालो, चिन्मयनंदन यांचा एकादुसरा अभंग किंवा पद आहे.

४१७ ] बाड–पृ. सं. ६० × २ × २ = २४० [२००
पैकीं आ. व शे. ३१।३२ नष्ट

(१) हें संबंध बाड फक्त करुणाष्टकांचें आहे. सुटे कागद लिहि- णारानें लिहिले, जुळवून घडी घालून ठेवले, पण ते शिवावयाचे तसे च राहिले. लिहिणें च पुरें झालें नसावें, असें वाटतें. आहेत त्यांतील शेवटचीं दोन पानें कोरीं च आहेत. अर्थात् शेवटचीं जीं ३२ नाहींत तीं हि कोरीं च असलीं पाहिजेत.

(२) सभेनें छापलेल्या करुणाष्टकांपैकीं ७१ व्या करुणाष्टकाच्या चवथ्या श्लोकापासून आरंभ झाला असून अगदीं क्रमशः १३४ व्याच्या १७ व्या श्लोकापर्यंतचीं अष्टकें या बाडांत आहेत. ७१ व्या अष्टकाच्या पूर्वीचीं अष्टकें हरवलेल्या पहिल्या पत्तीस पानांत गेलीं. डोमगांवमठांतील कल्याणांच्या हातचें जें मुख्य बाड ५१ वें, त्यांत या अष्टकांचा जो क्रम आहे, तो च बरोबर या बाडांत व इतर हि बाडांत सांपडतो, ही बाब महत्त्वाची आहे. या बाडांत १३३ व्या अष्टकाच्या शेवटीं " कुट श्लोक येत १४१ " अशी संख्या नमूद आहे, ती च ५१ व्या बाडांत हि आहे व ती सभेनें छापलेल्या प्रतींत हि त्या ठिकाणीं दिलेली आहे.

४१८ ] बाड पृ. सं. २६ × २ = ५२ [२००
आरंभीचें व शेवटचें १।१ पत्र नष्ट

नागनाथ कृत (१) श्रीरामस्वर्गारोहण व (२) जांबुवंत- श्रीरामभेटी, अशीं दोन प्रकरणें या बाडांत आहेत. हीं दोन्हीं प्रकरणें अप्रकाशित आहेत. दोन्हीं सुंदर आहेत. तीं प्रकाशित झालीं पाहिजेत. परंतु या बाडाचें पहिलें पृष्ठ गेल्यामुळें पहिल्या प्रकरणाच्या पहिल्या ९ ओंव्या नाहींत व शेवटचें पृष्ठ गेल्यामुळें दुसऱ्या प्रकरणाच्या शेवटच्या दहा पांच ओंव्या नाहींत. पहिल्याच्या १० ते १११ ओंव्या व दुसऱ्याच्या १ ते १११ ओंव्या आहेत. संपूर्ण प्रकरणें मिळविलीं पाहिजेत.

४१९ ] बाड–पृ. सं. १५ × २ = ३० [१००

(१) ज्ञानदेव कृत हरिपाठाचे २७ अभंग, (२) तुकारामांचे

दोन अभंग, ( ३ ) 'भीमरूपी महारुद्रा' स्तोत्र, ( ४ ) 'आदौ देवकीदेव ०' हा श्रीकृष्णलीलामृताचा एक श्लोक व ( ५ ) 'आदौ रामतपोवनाधिगमनम्' हा रामायणाचा एक श्लोक.

४२० ] बाड–पृ. सं. २४ × ४ = ९६ शिवाय आ. दो. कित्येक गेलीं [ १५०

( १ ) केशव, उद्धवचिद्घन, आनंदनंदन, तुका, गणेशनाथ

करितां संसार जरी देव सांपडे । तरी कां जाले वेडे संतसाधु ॥१
संसारीं असतां जरी देव भेटता । शुकदेव कां जाता तपासाठीं ॥२
करितां घराश्रम जरी जोडे परब्रह्म । तरी कां आश्रम तजिले त्याणीं ॥३
यातीच्या आचारें जरी सांपडे सार । तरी कां निराकार जाले साधु ॥ ४
गणेशनाथ म्हणे सर्व हि सांडून । आलों तुज शरण देवराया ॥ ५

श्रीधर, शिवतनय, गोपालनंदन, इत्यादिकांचीं पदपदांतरें

( २ ) निवृत्ति अवधूत कृत ज्ञानबोध–ओ. सं. ८३. निवृत्ति अवधूतांनीं या प्रकरणाला नांव दिलेलें नाहीं. त्यांत प्रतिपादिलेल्या विषयांवरून मी ज्ञानबोध असें त्याचें नांव ठेवीत आहे. तें परमप्रकाश या नावानें सन १८९५ मध्यें काव्यसंग्रहांतील लघुकाव्यमालेच्या पहिल्या भागांत प्रकाशित झालेलें आहे. परंतु त्यांत आणि यांत पुष्कळ व महत्त्वाचे पाठभेद आहेत. शिवाय हें प्रकरण ज्ञानेश्वरबंधु निवृत्तिनाथ यांचें होय, अशी काव्यसंग्रहकारानीं आपली समजूत करून घेतली होती, ती हि बरोबर नव्हे. सदरहु प्रकरण पुनरपि प्रकाशित झालें पाहिजे. सुंदर आहे.

४२१ ] लहान बाड–पृ. सं. ११ × ४ = ४४ पैकीं पहिलीं ४ नाहींत [ १५०

( १ ) रामरक्षास्तोत्रम्–श्लोक ३६

( २ ) श्रीसमर्थ कृत 'आतां राहो या गलबला ।'–ओ. ३०

४२२ ] पोथी–पत्रें ११९ कसरीनें फार दुर्दशा केली [ ७६

दत्तदास कृत सीतास्वयंवर. पैठणच्या उत्तरेस दोन योजनें विंदरी म्हणून गांव आहे, तेथील कुळकर्ण्यांच्या घराण्यांतील हे दत्तदास होत. हा

ग्रन्थ त्यांनीं शके १७७९ आश्विन शुद्ध १० स संपविला. त्याचे १८ अध्याय आहेत. हें पिंपरी गांव आम्हीं अजून पाहिलें नाहीं. मालगांवच्या जवळपास च असावें.

## ४२३ ] दोन कागद [ १००

शकुनावलीचे दोन कागद. फांशावर ' नारायण ' हीं अक्षरें चारी बाजूस कोरून तें दान पडेल त्यावरून शकुन पाहण्याचे ४५ प्रकार या दोन कागदात दिले आहेत.

## ४२४ ] पोथी–पत्रें ९४ [ १७९

### मुक्तेश्वर कृत विराटपर्व

( १ ) मुक्तेश्वरविरचित आदि, सभा, वन आणि विराट हीं पहिलीं चार व पुढचें मघलें च एक अशा पांच पर्वांनीं कौतिक, एवढीं च पर्वें उपलब्ध असावीत व निरनिराळ्या ठिकाणीं जरी पर्वें मिळालीं, तरी पुन्हपुन्हां या पाचांतलीं च विशेषतः पहिल्या चारांतलीं च तीं असावीं, पण याकीच्या पर्वांचा अद्यापि पत्ता लागूं नये, हें मोठें आश्चर्य होय. त्याच्या आदिपर्वांत उद्योगपर्वांचा उल्लेख झाला आहे, यांत विशेष नाहीं, पण विराटपर्व संपवितांना ते अगदीं त्याच्या पुढच्या उद्योगपर्वांचा उल्लेख करीत असून हि तें उद्योगपर्व व नंतरचीं पर्वें या क्षणापर्यंत कां अनुपलब्ध असावीं, हें एक मोठें कोडें आहे.

पांडवा थापावे निजपदीं । ऐसी श्रीकृष्णाची बुधी ।
तया कार्यांचिये सिद्धी । विराटनगरीं राहिला ॥ ११७
तें चि निरोपण पुढारें । उद्योगपर्वीं सविस्तरें ।
श्रवण करिजे तें कां चतुरें । व्यासदेवें बोलिलें ॥ ११८

असें, लागलीं च सुरू होणाऱ्या उद्योगपर्वाकडे मुक्तेश्वर प्रत्यक्ष बोट दाखवीत असतां तें पर्व त्यांनीं लिहिलें नसावें, असें कसें मानावें ?

( २ ) विराटपर्वाचे एकंदर आठ प्रसंग किंवा अध्याय असून त्या प्रत्येकाची या प्रतींत ओवीसंख्या अनुक्रमें १२६, १००, १६२, ५४, १३४, १८०, १०१ व १२१ आहे, म्हणजे एकंदर संख्या ९७८ आहे.

( ३ ) प्रतीच्या शेवटीं मालकाचें व लेखकाचें नांव असून लेखनकाल दिला आहे तो असा :

"हें पुस्तक गुराप्पा बसवकर हालि वस्ती मौजे देवळगाव गावाच सौम्येश्वर संनिधौ ॥ हस्ताक्षर निरपा सिवलिंग थोरामने ॥ सके १६७६ भावनाम संवत्सरे फाल्गुन वद्य तीज ते दिने लेखन समाप्त ॥ श्रीशुभकल्याणमस्तु ॥"

# ४२५ ]

पोथी–पत्रें ६+१५=२१ [७५

संस्कृत स्तोत्रें

( १ ) श्रीरामचंद्रनिर्गुणसगुणस्तोत्रं रामायणकथासंयुक्तं श्रीरामकिंकरविरचितम् ॥ पत्रें ६

( २ ) श्रीरामकिंकरविरचितानि पंचस्तोत्राणि–पत्रें १५ परंतु या १५ पत्रांपैकीं १, २ व १२ ते १५ पत्रें आहेत, मधलीं ३ ते ११ गेलीं. पांच स्तोत्रें आहेत तीं : ( १ ) गुरुस्तोत्रम् अपूर्ण, ( २ ) हरवलेल्या पत्रांत गेलें, हें बहुधा गणपतीचें असावें, ( ३ ) श्रीरामस्तोत्रम् अपूर्ण, ( ४ ) श्रीकृष्णस्तोत्रम्, ( ५ ) श्रीशिवस्तोत्रम्.

# ४२६ ]

पोथी–पत्रें १७० [३५०

शेवटचीं कांहीं पत्रें गेलीं

एकनाथ विरचित रुक्मिणीस्वयंवर

अति जीर्ण, श्रीसमर्थकालीन प्रत. कागद अति ठिसूळ, वापरण्यास कठीण. दुर्दैवानें शेवटचीं कांहीं पत्रें गेल्यामुळें लेखनकाळ नक्की सांगता येत नाहीं.

# ४२७ ]

पोथी–पत्रें ४१७ [१११

श्रीमद्भगवद्गीतापदबोधिनीटीका

( १ ) ग्रन्थ अप्रकाशित आहे. महत्त्वाचा आहे. प्रत्येक श्लोकाचीं पदें पाडून दाखविलीं आहेत, अन्वय दिला आहे व गद्यांत अर्थ दिला आहे. शिवाय बहुतेक अध्यायाच्या आरंभीं किंवा शेवटीं त्या त्या अध्यायाचें रहस्य दाखविणाऱ्या ओव्या आहेत. ग्रन्थ प्रकाशनाला योग्य आहे. गीताविषयक ज्ञानांत भर च पडेल. दुर्दैवानें ५, ६, ७ या तीन अध्यायाचीं कांहीं पत्रें नष्ट झालेलीं आहेत. ग्रन्थाची आणखी एखादी शाबूत प्रत मिळवून गीतामंडळानें तो प्रकाशित केला पाहिजे.

( २ ) ग्रन्थकार कोणी सहजानंद गोसावी दिसतात व त्यांचे गुरु नारायणानंदमुनी दिसतात. हे सहजानंद व नारायणानंद कोण, सांगतां येत नाहीं. सहजानंद–पूर्णानंद ( यांचे पूर्वाश्रमींचें नांव नारायण होतें )–निजानंद-रंगनाथ ही परंपरा सर्वश्रुत आहे. पण हे नारायणानंदाचे शिष्य सहजानंद कोण त्यांचा शोध नाहीं.

( ३ ) गोदावरीची प्रदक्षिणा करीत असतां शके १६१६ त त्यांनीं हा ग्रन्थ पूर्ण केला. त्या ओव्या १८ वे अध्यायाच्या शेवटीं आहेत त्या अशा :

श्रीशालिवाहन शके । सोळासे सोळा चढपे ।
युवानाम संवत्सराचे देखे । उत्तरायेण ॥ ६७४
वैशाख मास शुक्ल पक्ष । द्वादसी पुण्यदक्ष ।
सिंहस्थीत प्रतक्ष । बृहस्पती न + + ॥ ६७५
काहीं येलिया जाणा । करितां गोदावरी प्रदक्षणा ।
नासीक + + + सुलक्षणा । संपूर्ण जाला ग्रंथ ॥ ६७६

हें शेवटचें पत्र इतकें जीर्ण झालें आहे की, या तीन ओव्या आज इतपत तरी वाचता आल्या, पुढें वाचण्याला अक्षरें राहतील व अशी खात्री नाहीं. अक्षरें आहेत खरीं, पण तीं सारखीं गळून पडत आहेत.

( ४ ) या प्रतीच्या लेखनाचा शक दिलेला नाहीं, पण कांहीं अध्यायांच्या शेवटीं मास, पक्ष, तिथि आणि वार ही दिलेली आहेत :

सहावा अध्याय–माघ वद्य द्वादशी सौम्यवासरे
अकरावा–मार्गेश्वर वद्य ७ भौमवा० रात्री दीड प्रहर
तेरावा–पौष शु. ३ भृगुवासर रात्री दोन प्रहर
चौदावा–पौष शु. ९ गुरुवासरे दोन प्रहरी
पंधरावा–पौष शु. १२ इंदुवासर रात्री दीड प्रहर
सोळावा–पौष वद्य १ गुरुवार रात्री अडीच प्रहरी
अठरावा–पौष वद्य चतुर्दशी सौम्यवासर

त्या च शकांतील पौषानंतरच्या माघांत सहावा अध्याय अठराव्याच्या मागाहून लिहिला गेला असेल तर या प्रतीचा लेखनशक १६३४ येतो, असें मला वाटतें.

**४२८ ]** एक कागद [१००

उद्धवचिद्घन कृत श्रीज्ञानेश्वरचरित्र

हें आपण श्रीसांप्रदायिक विविध विषयांक १५ यांत छापलें आहे.

**४२९ ]** पोथ्या–पत्रें ४४ [१००

स्तोत्रें

( १ ) श्रीहनुमंतवडवानलस्तोत्रं–बिभीषणकृत, पत्रें ४

( २ ) श्रीहनुमतदुर्गं–अथर्वणवेदमंत्रदेवीप्रोक्तम्, पत्रें ६

( ३ ) एकादशमुखहनुमदिव्यकवचमालास्तोत्रं–रुद्रयामले उमामहेश्वरसंवादे, पत्रें १२

( ४ ) त्रिमुखीहनुमत्कवचं–अथर्वणरहस्ये उत्तरखंडे, पत्रें ६

( ५ ) एकमुखीहनुमत्कवचं–अथर्वणरहस्ये, पत्रें ४

( ६ ) हनुमत्कवचं–ब्रह्मांडपुराणे अगस्तिनारदसंवादे, पत्रें १२

**४३० ]** पोथी–पत्रें १३ [१५०

( १ ) पंचमुखीहनुमत्कवचं–श्रीसुदर्शनसंहितायां रुद्रयामले सीताराम-संवादे तन्मनोहरं, पत्रें ७

( २ ) पंचमुखीहनुमत्स्तोत्रम्, पत्रें ६

**४३१ ]** पोथी–पत्रें १० [१०६

( १ ) एकादशमुखीहनुमत्कवचं–लेखनकाल :

"शके १७४९ सर्वजित् नामसंवत्सरे श्रावण कृष्ण ९ तद्दिने पुस्तक समाप्तं ॥ नेपूरग्रामकोपनामक नरहरात्मजबाळकृष्णेन लिखित ॥"

**४३२ ]** पोथी–पत्रें २९ [१५०

पैकीं १ ते १८ नष्ट

( १ ) श्रीरामस्तवराजस्तोत्रम्–श्रीसनत्कुमारसंहितायां नारदेनोक्तम् एकदर श्लोक १०१, पैकीं ६४ ते १०१

# ४३३ ]

पोथी–पत्रें सुमारें ३०० [१०८–२००

श्रीएकनाथमहाराज कृत रुक्मिणीस्वयंवर

ही मोठी विचित्र प्रत आहे. प्रतीचा आकार एक नाहीं, लेखक एक नाहीं, लेखनाचा काळ एक नाहीं. दहा वेळा पोथीचा आकार बदलला आहे व त्याहून जास्त वेळा लेखक बदलले आहेत. कांहीं अध्याय लिहून शंभर वर्षे झालीं असतील, तर कांहींना दीडशें दोनशें वर्षे झालीं असतील. तात्पर्य कोणी तरी निरनिराळ्या लेखकांनीं निरनिराळ्या काळीं लिहिलेले अध्याय मिळवून एक सबंध प्रत तयार केली व शेवटीं आशीर्वाद देऊन ठेवला कीं,

मंगलं लेखकस्यास्तु । मंगलं वाचकस्यास्तु ।
मंगलं पाठकस्यास्तु । रक्षकस्यास्तु मंगलम् ॥

शेवटचा आशीर्वाद, आज तरी, सफळ झाला आहे.

# ४३४ ]

पोथी—पत्रें ८, पैकीं ३१४ नष्ट [१२५
ओवीसंख्या ५२

लेखणी. शेवटीं ज्ञानेश्वरविरचित असें म्हटलें आहे, पण ५१ व्या ओवींत एकनाथांचा निर्देश आहे, तेव्हां हें प्रकरण ज्ञानेश्वरांचें कसें ? चांदोरकरांच्या संतकविकाव्यसूचींत श्रीज्ञानेश्वरांची कल्याणपत्रिका म्हणून नमूद आहे, तें व हें प्रकरण एक च.

# ४३५ ]

पोथी–पत्रें १८ [१५०

श्लोकबद्ध गुरुगीता—श्लोकसंख्या १२७ असून शेवटचें एकादशपत्रें व पद्य एकवटलेलें दिसतें.

गुरुरूपचें पाहणें ते चि काशी । गुरुरूप तें जान्हवी पापनाशी ।
गुरु तो चि विश्वेश्वर आन नाहीं । तयाची गिरा तारकब्रह्म पाहीं ॥ १८
माझा धनी सद्गुरुराज राणा । जगद्गुरु श्रीगुरु हा सुजाणा ।
आत्मस्वरूपें सकळां घटीं वसे । त्याहूनियां आवडि ते मला नसे ॥ ४३
ध्यानालागीं मूळ मूर्ती गुरूची । पूजामूळ पाउलें सद्गुरूचीं ।
मंत्रीं मूळ श्रीगुरुवाक्य साचें । मोक्षासी तें मूळ कारुण्य त्याचें ॥४४

*आदी अनादी गुरुराज माझा । जेणे चि मी स्थापिला देव दूजा ।*
ज्याचे गिरेला तुळणा च नाहीं । त्याहूनियां थोर नसे च कांहीं ॥ ४५

# ४३६ ]

पोथी–पत्रें १८८ [ १२५

## रत्नाकर कृत समओवी भगवद्गीता

अप्रकाशित आहे. आपल्या पूर्वजांनीं गीतेचे केलेले असे कितीक उलथे अप्रकाशित आहे. वास्तविक हे सारे उलथे प्रसिद्ध करणें महाराष्ट्राचें कर्तव्य होय. गीतेवर आपण नवीन टीका लिहित असतो व यापुढें हि लिहित राहूं, अशा वेळीं गीतेंतील वादग्रस्त किंवा महत्त्वाच्या श्लोकांचा पूर्वी होऊन गेलेल्या कवींनी व संतांनीं कसा अर्थ लावला होता हें जाणण्याची जिज्ञासा साहाजिक असावयास पाहिजे.

या प्रतींतील पहिलीं १३२ पत्रें एकानें लिहिलेलीं आहेत व पुढच्या पत्रांतील हस्ताक्षर अगदीं निराळें आहे. ग्रन्थाच्या शेवटीं काहीं ओव्या आहेत व गीतेची आरती आहे, तीं अशीं :

जो येकनिष्टें श्रवण मनन करी । तो तरेल संसारसागरीं ।
होती मोक्षाचे अधिकारी । हा वर श्रीहरि बोलिलासे ॥ १

शके १६२१ सोळासे येकवीस । विकृति संवत्सर पौष मास ।
शनिवार मकरसंक्रांति दिवस । अश्विनीकुमारी पूर्णतेस ग्रंथ आला ॥ २

*त्याचा नित्यनेम घेउनी । जो श्रद्धें याची प्रतिदिनीं ।*
*त्यासी नाना संकटीं चक्रपाणी । तत्क्षणीं तारील ॥ ३*

नाना विघ्नें ते ते निर्विघ्न होती । पावे ज्ञान वैराग्य भक्ती ।
कल्पित मनोरथ पावती । हे असे प्रतीती रत्नाकरा ॥ ४

ज्यासी आपुलें स्वहित करणें । तेहीं या शब्दरत्नातें कंटीं धरणें ।
चुकेल जन्ममरणाचें येणें[1] । गीतेचा जाणे सर्वार्थ ॥ ५

याचें पठण केलिया श्रद्धायुक्त । त्यासी संस्कृताचा अर्थ प्राप्त ।
तो आपण आपणाते जाणत । तुटे भ्रांति संसाराची ॥ ६

सातसे गीतेचे श्लोक । तितुके च प्राकृत जाले देख ।
हें सद्गुरुकृपेचें कौतुक । येणें अज्ञान लोक तरतील ॥ ७

---

१ प्रयाण, प्रवासांतला मुक्काम. २ आत्मज्ञान = पाहाणें आपणासी आपण ।

रत्नाकराचें रत्नकरपण । तो सद्गुरु जाला आपण ।
तेथें जालें ग्रंथकथन । जेणें पावन नरनारी होती ॥ ८
श्रीरामानंदाचे प्रसादें । बोले रत्नाकर आनंदें ।
भवबंधन तुटेल या संवादें । अईसा गोविंदें वर दिधला ॥ ९
शके १६ सोळासे ८५ पंचासी । सुभानु नाम आषाढमासी ।
कृष्णपक्षी येकादशी । लेखनसीमेसी मुहूर्त एक ॥ १०
उदयो होउनी गुरुवार । जाला गीतार्थ सविस्तर ।
येकादासाचें अक्षर । कृपाकर सद्गुरूचा ॥ ११

शके १७३० विभव नाम संवत्सरे ज्येष्ठासित नवम्यां
पुस्तकमिदं समाप्तिमगमत् लेखकपाठकयोः शुभं भवतु ॥

यांत १६२१, १६८५ आणि १७३० असे तीन शक व रत्नाकर, रामानंद आणि येकादास अशीं तीन नावें आलीं आहेत. रत्नाकर हे ग्रन्थकार, रामानंद हे त्यांचे गुरु आणि येकादास हे लेखक होत. १६२१ त रत्नाकरांनीं ओवीबद्ध टीका केली, १६८५ त येकादासांनीं प्रत केली व १७३० त प्रस्तुतची प्रत झाली, असा अर्थ मनांत येतो. १३२ पृष्ठानंतरचें सर्व अक्षर एक च आहे. ही १७३० तील प्रत कोणी लिहिली, कां येकादासांनीं च लिहिली, रत्नाकरांच्या नऊ ओंव्यानंतर १६८५ त येकादासांनीं दोन ओंव्या आपल्या त्यांत सामील केल्या कीं काय, इत्यादि शंका या तीन शकांच्या उल्लेखामुळें उद्भवतात.

## येकादास कृत गीतेची आरती

श्रीभगवान् अर्जुन संवाद जाला । अष्टादश अध्यायीं[1] निजबोध केला ।
सप्तशत श्लोक अनुभवीं आला । गीताग्रंथ नाव रूपें उपजला ॥ १
जयदेव जयदेव जय भगवद्गीता श्रीभगवद्गीता
आरती वोवाळूं आदी अव्यक्ता ॥ ध्रु०
विचरोनी सारासार अद्वय रूप तुजें । अकळ कळतां गेलें मीपणाचें वोझें ।
गुह्यातुह्य अंध्येहे सर्वत्र समजे । अनाद्यगोप्य पाहतां वीरालें दूजें ॥ २
इंद्रियचों करनी मनावी शोधिले । अनंग आंगी साधे द्दश्य निवटीलें ।
क्षराक्षरातीत परम सांपडलें । शब्दानिःशब्दी आटोनी गेलें ॥ ३

1 अध्याय

जे श्रवणें मननें पठें अर्थप्रचीती । देवोनी अक्षयी सौख्याभूचीनिवृत्ती । नानाचें विज्ञान जगीं दृश्यशाली । एरादासीं जालें मौन्य निश्चीती ॥ ४

४३७ ] एका मोठ्या बाडांतील
अवशिष्ट ६ पृष्ठे [२००

यात श्रीसमर्थ, रंगनाथ, जानजगत, अनंत, अमरदास, दत्तात्री व देवदास यांचीं पदें आहेत.

४३८ ] बाड-पृ स. १९ × २ = ३८
शिवाय आ १० व पे. ६ नष्ट [२००

अति जीर्ण बाड. हात लावण्याची सोय नाहीं यात देवदास कृत एका ओवीबद्ध स्तोत्राच्या १४ ते ८१ ओव्या आहेत.

४३९ ] बाडाची त्रुटित सुटीं पत्रें ४८ [२५०

श्रीसमर्थ कृत रामायण

हीं पत्रें महत्त्वाचीं आहेत, अशासाठीं कीं, तीं तत्कालीन आहेत. कागदाचा प्रकार आणि आकार हीं मागील बाडाक ३५ तील प्रकरणाच्या कागदाप्रमाणें आहेत. प्रत्येक पाठपोट पत्रावर बारा बारा श्लोक आहेत. रामायणाची एकदर श्लोकसंख्या १४६२ आहे. त्यावरून असें म्हणता येतें कीं, हीं अवघीं अ दर्शी मधलीं ४८ त्रुटित पत्रें मिळालीं, पण सुमारें ७१ पत्रें गहाळ झालीं असावींत. पत्रें प्रदर्शनीय आहेत. न जाणों, त्यातील हस्ताक्षर त्रिंबकाचें असेल !

४४० ] दोन सुटीं पत्रें [२५०

कागदाचा प्रकार आणि आकार वरील बाडाकाप्रमाणें :

एक–मालेंतील तिसरा भाग–श्रीसमर्थांची कविता–त्यांतील तेरावें स्फुट प्रकरण—धारा वारा वरा वारा सारा सबये घातकी ॥ यात दोन पाठांतरें महत्त्वाचीं आहेत निश्चळा निश्चळु म्हणे । ऐवजीं यात निश्चळीं निश्चळु नव्हे । असा पाठ आहे व “ वर्ता तो ” ऐवजीं “ वर्तवो ” असा आहे.

दुसरें–श्रीसमर्थ कृत या नमोजी सद्गुरुनाथा । मोक्षलक्ष्मीवंता समर्था ॥ ओवीसंख्या १७ व अठरावी अर्धी च. लिहिणें च अपूर्ण सोडलें आहे.

४४१ ]

पोथी–पत्रें २८

[ १५०

ओवीबद्ध गुरुगीता–ओवीसंख्या १३९ अपूर्ण शेवटचें एकादुसरें च हरवलेलें दिसतें.

जया भक्तराजा । अखंड गुरुची पूजा । देव न मनी दुजा । सद्गुरुविण ॥१०
गुरुचे चरणतीर्थासी प्याला । तो सकळ तीर्थी नाहला ।
कृतकृत्यार्थ जाला । भक्तराज तो ॥ १८
गुरुमूर्तीचें ध्यान । करावें गुरुस्तोत्रपठन ।
गुरुचें जें निवासस्थान । तें जाणणें निरास काशी ॥ २२
ऐसें असतां पार्वती । गुरुनिंदा जे करिती ।
ते घोर नर्क पावती । यावच्चंद्रदिवाकर ॥ ८०

४४२ ]

पोथी–पत्रें ९

[ १५०

( १ ) चिंतामणी कृत मारुती अष्टक–श्लोक ९
( २ ) शिवदिनकेसरी कृत शाकंबरी अष्टक–श्लोक ८
( ३ ) शिवदिनकेसरी कृत रामवरदायनी अष्टक–श्लो. ८ अशीं हीं तीन अष्टकें आहेत. पण या पोथींत अशीं आणखीं पुष्कळ अष्टकें होतीं व तीं हरवलीं असावींत, असें दिसतें. कारण प्रत्येक अष्टकाचा पत्रांक वेगळा असला, तरी एकंदर पत्राचा अंक हि प्रत्येक पत्रावर दिला आहे, त्याप्रमाणें वरील पहिल्या अष्टकाच्या पानावर १३, १४, १५ असे अंक आहेत, दुसऱ्याच्या पानावर ९०, ९१, ९२ आहेत आणि शेवटच्या अष्टकाच्या पानावर ९३, ९४, ९५ असे अंक आहेत. पत्रांना कसर लागलेली आहे, पण श्लोक सर्व लावता येतात.

४४३ ]

पोथी–पत्रें ६

[ २२६

राजमार्तंगेश्वरी

" सके १६२९ सर्वजित नाम संवत्सरे दक्षिणायने आश्विनमासे शुद्धपक्षे धारासिवक्षेत्रे नवरात्रे बुधवारे दीनमहरे द्वितीयां तद्दिने राजमार्तंगीपुस्तक मध्वाजिनागनाथपीत्यर्थं कालिदासेन स्वहस्तलिपीस्मरणार्थं दत्त ॥ "

# ४४४ ]

पोथी—पत्रें १०१ [ १५०
पैकीं फक्त ९४।९५ अशीं दोन पत्रें नष्ट

ज्ञानदेव कृत गीतासार—ओवीसंख्या ३५४

हे ज्ञानदेव वेगळे. त्यांनीं आरंभीं श्रीज्ञानेश्वरांना नमन केलें आहे :

होती अज्ञान अंध मूढी । परब्रह्म नेणती बापुडी ।
त्याचिया स्वरूपाची गोडी । कवण जाणे ॥ १-५
त्या व्यासरूपीचा प्रसादु । तेणें कथिला प्रेमबोधु ।
तो संस्कृत अर्थवादु । कळेना अल्पज्ञ,नियासी ॥ ६
म्हणोनी केले प्राकृत । पूर्वी व्यासाचें संस्कृत ।
त्यासाठीं उपकार बहुत । जाला जनीं ॥ ७
त्या उपकारास्तव नमस्कार । नमिला तो ज्ञानेश्वर ।
आतां नमूं श्रीगुरु उदार । जेणें अंधकार फेडिला ॥ ८

अठराव्या अध्यायाची शेवटची ओवी :

इति श्रीभगवद्गीता । व्यासदेवनिरोपिता ।
प्राकृत जाण आतां । म्हणे ज्ञानदेवो ॥ १८-२०

# ४४५ ]

गठ्ठा [ ५०-२५५

( १ ) माळगांव मठपत्रांच्या आरत्या व श्रीरामनामावली, ( २ ) पदपदांतरांच्या सूचीचें एक पान, ( ३ ) रामदासकृत " रामचंद्र बैसले सिंहासनीं, " वेणाबाईकृत कोल व विठ्ठकृत सीतास्वयंवर, हीं अपूर्ण प्रकरणें, ( ४ ) भीमरूपी महारुद्रा, ( ५ ) एकनाथकृत भावार्थरामायणांतील कांहीं भाग, ( ६ ) मुक्तेश्वरकृत वनपर्वांतील सावित्रीआख्यानाचा कांहीं भाग, ( ७ ) कोकिळकृत पदाचें एक पत्र, ( ८ ) ध्रुवाख्यान, ( ९ ) तत्कालीन अनेक बाडांचीं अत्यंत जीर्ण सुटीं पत्रें, त्यांत श्रीसमर्थकृत षड्रिपु, मनाचे श्लोक, स्फुट प्रकरणें व स्फु. श्लोक यांचीं कांहीं पत्रें आहेत, अनेकांच्या कविताचे अवशेष आहेत, नामदेव विसोबा खेचराकडे गेले असता ते शिवलिंगावर पाय ठेवून पडले होते वगैरे प्रसंगाचा अर्धवट अभंग यांत आहे :

नामा म्हणे माझा खेचर विसावा । सगुण दिधला देवा पांडुरंगें ॥ १९

त्यांत च एका पत्रावर

श्रीमत्सत्यस्वरूपनित्यनिखिलानंदैकबोधोदया ।
मिथ्या दृश्य प्रपंच अमरटळे न्यायें प्रकाशी दया ।
मीतूंभ्रांति हरूनि आत्मपदवी देवोनियां तारिलें ।
कल्याणाद्वयमूर्ति मुद्गलरूपें कीर्तीसि विस्तारिलें ॥ १

हा श्लोक आहे, कल्याण आणि त्यांचे शिष्य मुद्गल यांची ओळख वाचकांस आहे च, ( १० ) वैराग्यारामसीमा० इत्यादि श्रीसमर्थांवर अष्टक, ( ११ ) कान्होपात्राच्या चरित्राचे दोन कागद :

मंगळवेढ्या कान्होपात्रा अति सुंदर सुंदरा । जिनें मनीं वरिलें यो नंदकुमरा ॥ ध्रु०

( १२ ) मुकेश्वरकृत सभापर्वांतील बराचसा भाग, ( १३ ) दामाजीपंताचें चरित्र, ( १४ ) भिक्षेविषयीं आठ श्लोक

जो कां जाला दृढ कौपीनवंत । तो ची जाणा निश्चयें भाग्यवंत ।
हातीं झोळी घेतली कटिकारे । संसाराचे त्याजला कष्ट कां रे ॥ २
एश्वा पाहा सांडिली या जनाची । सेवा जेणें मांडिली सज्जनाची ।
भीवाळा तो महासूरें अपार । तो ची गेला या भवा पैलपार ॥ ३
मागे भिक्षा घेउनी जाण पात्रा । येमाचीयां फाडितो तो चि पत्रा ।
हातीं जेणें घेतला भोंपळा रे । सांगे दूतां काळ आतां पळा रे ॥ ४

(१५) औषधें,(१६) श्रीरामपूर्वतापिनी,(१७) कृष्णयाज्ञवल्कीकृत कथाकल्पतरूचें तत्कालीन एक च पृष्ठ, ( १८ ) सोपानदेवकृत प्राकृत गीतेचीं कांहीं पानें : इति श्री प्राकृत गीता । अर्जुनासी बोध केला तत्त्वता । ते सोपानदेव सांगे श्रोता । चित्त परमार्थी देउनी ॥ ( १९ ) तुकारामांचे संतगीत, ( २० ) मातापुरची रेणुका अंबाबाई, ( २१ ) गोरक्ष कृत योगांगें-ओवीसंख्या ४३, ( २२ ) श्रीमगावमठपति हनुमंत यांचे लक्ष्मणबावा यांस पत्र, ( २३ ) चिवदिनकेसरीकृत पद " रामदास सद्गुरु अविनाशी हरदमसो जपना । " ( २४ ) श्रीरामयंत्र, ( २५ ) रामराय किंवा रामाजी गंगाधर यांचे सुमारें वीस अभंग, ( २६ ) हरिहरस्वामींची आरती, ( २७ ) खंडेरायस्वामींवर पद, ( २८ ) रंगनाथ कृत उठि उठि वा पुरुषोत्तमा ।, ( २९ ) तुलसीदासांचे एहा दोहरे ( ३० ) त्रिंबकसुत परशरामकृत अपराधस्तोत्र-श्लो. १७, ( ३१ ) अजपाविवरण-शके १६९८ तील कागद, इत्यादि, इत्यादि.

याशिवाय श्रीसमर्थ, तुका, नामा, हरिहर, आनंदतनय, विष्णुदासनामा, सुरदास, जगज्जीवन, अनंत, कल्याण, श्रीधर, महानंद, केशव, एकनाथ,

चिन्मयनंदन, मोरोपंत, अमृतराय, मध्वमुनीश्वर, वेणी जनुभट, इत्यादिकांच्या पदपदावराचे अनेक सुटे कागद.

येणें प्रमाणें माळगावमठांतील उपलब्ध धमद्यांचें स्वरूप आहे.

त्या च शाळच्या भागांत मठावर मर्डेकर कै. अनंतबुवाचे बंधु कै. विश्वनाथ रामदासबुवा यांची भेट झाली होती. उभयता बंधु थोर होते, पण उभयतांना हि आयुष्य थोडें झालें

## मर्डे येथील मठ

माझ्या पाहण्यांत अजून आला नाहीं, पण बुवाकडून कांहीं कागदपत्रें व ग्रंथ मिळाले होते. कागदपत्रें, मालेंतील भाग एकोणिसावा–श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें द्वितीय खंड, यांत प्रकाशित करण्यांत आलीं आहेत, ग्रंथांचा विचार पुढें करूं.

१८९७ ची चैत्रवैशाखाची सुट्टी

## चंद्रगिरीचा डोंगर

व डोंगराच्या भोंवतालचा प्रदेश धुंडण्यांत खर्ची पडली. या चंद्रगिरीच्या डोंगरांत राहण्याचें श्रीसमर्थांचें एक गुप्त ठिकाण होतें त्याचें वर्णन आपण करण्यापेक्षा श्रीसमर्थांनीं च केलेलें दोन जुन्या चरित्रांपैकीं हनुमंतस्वामीकृत चरित्रांत आलेलें आहे, तें पहावें.

१८२७ च्या मार्गशीर्षपौषांत इंदुरबोधन व हैद्राबाद हीं दोन ठिकाणें घेण्यांत आलीं. मार्गशीर्ष व ३० स (२५–१२–'०५) इंदुर बोधनास जाऊन पोंचलों. इंदुर आणि बोधन अशी दोन निरनिराळीं गांवें आहेत. होळकराच्या इंदुराचा आणि तेलंगणांतील या इंदुराचा घोंटाळा होऊं नये म्हणून यास इंदुरबोधन म्हणत व आतां तर त्यास निजामाबाद हें नामाभिधान प्राप्त झालें आहे. हें तें ठिकाण जेथून जवळ च श्रीरंगपुर येथें अरण्यांत तळावाचे कांठीं ब्राह्मण पर्जन्यासाठीं अनुष्ठान करीत असतां श्रीसमर्थांचें आगमन झालें, जेथें त्यांनीं मारुतीची मूर्ति काढून देऊन तीस महारुद्राभिषेक करण्याची त्या ब्राह्मणांना विनंति केली आणि नंतर प्रचंड पर्जन्यवृष्टि होऊन सर्वत्र जलमय झालें. श्रीसमर्थांनीं नंतर तेथें उद्धवस्वामींची स्थापना केली.

## श्रीरंगपुर ऊर्फ सारंगपुर

हें ठिकाण इंदुरपासून दीड कोसावर डोंगरांत आहे. मारुतीचें स्थान अरण्यांत डोंगरांत निर्जन अशा जागीं आहे. आम्ही प्रथम गेलों तेव्हां रात्रीं मारुतीपाशीं

कोणी रहात नचे, परंतु आतां त्या ठिकाणांत किती तरी फरक पडला आहे. तेव्हां तेथें मठाच्या चार पडक्या खोल्या होत्या, आतां तेथें पांच पन्नास हजारांच्या दहा पांच मोठाल्या इमारती झाल्या आहेत, बागबगीचे झाले आहेत, आतां पुजारी रात्रंदिवस तेथें च रहतात व दहा पांच सेवेकरी नित्य येऊन जाऊन असतात. इंदुरचे श्रीमान् व्यापारी नरहा गौडा यांनीं ही भीमाधविराजाची सेवा केली, असें सांगतात. अति रम्य ठिकाण आहे. अनुष्ठानाची च जागा आहे, अनुष्ठानासाठीं राहण्यास योग्य आहे. श्रीसमर्थांच्या महंताचे माझ्या अवलोकनांत जेवढे मठ आले आहेत, त्यांत सृष्टिसौंदर्याच्या दृष्टीनें या ठिकाणाइतकें रमणीय ठिकाण दुसरें नाहीं. उद्धवस्वामींच्या वेळीं मठ या जागीं होता. कालांतरानें त्याचें

## इंदुरगांवांत स्थलांतर

झालें. या ग्रन्थाच्या अगदीं आरंभीं, संशोधनकार्यांतील अनुभवावरून काढलेले जे सिद्धान्त दिले आहेत, त्यांतील तिसरा सिद्धान्त, या मठांतील संग्रह मिळवितांना जो अनुभव आला त्यावरून काढलेला आहे. पहिल्या खेपेस संग्रह पहावयास मिळून तो शोधून त्यांतील निवडक बाडाचें गाठोडें बांधून त्याला गांठ मारून ठेवता आली, दुसऱ्या खेपेस १८२९ च्या कार्तिक शु. ४ स पुन्हां तेथें गेलों तों तुसतें गाठोडें हि नजरेस पडलें नाहीं, पण अखेरीस तिसऱ्या खेपेस १८३० च्या पौष शु. ४ स, आम्ही गांठ मारून ठेवलेलें गांठोडें जसेंच्या तसें आमच्या हातीं आलें आणि आता तर डोमगांवमठाप्रमाणें इंदुरचा मठ म्हणजे आमचें दुसरें माहेरघर च झालें आहे. महाराष्ट्राच्या पूर्ण परिचयाचे बोरगांवचे श्री. केशवबुवा उर्फ श्रीसमर्थदास हे १८५३ च्या अधिक आषाढ व. ५ पासून इंदुरमठाचे अधिपति झाले आहेत. सत्तावीस वर्षांपूर्वी श्रीसमर्थदास एकोणवीस वर्षांचे असतां गडावर त्यांची प्रथम गांठ पडली, तेव्हांपासून आम्ही त्यांना किंवा त्यांनीं आम्हांस परके असे लेखलें च नाहीं. आम्हांस श्रीसांप्रदायिक कार्यांत त्यांचें अनेक प्रकारांनीं आजवर साहाय्य झालें आहे.

इंदुरशोधन मठ, मठांतील संग्रह, मठाची परंपरा इत्यादि विषयीं त्रोटक माहिती श्रीसांप्रदायिक विविध विषय-प्रथम खंड-यांतील विषयांक ३२ आणि ३३ व द्वितीय खंडांतील विषयांक ८३ यांत आलेली आहे, ती समेस धरून च आज पुढें चालावयाचें आहे. त्यांत आत्मारामबुवापर्यंतची परंपरा दिली आहे. नंतर वामन ऊर्फ श्रीरामबुवा यांनीं

११ वर्षे व त्यांच्या नंतर रामारामबुवा यांनी ८ वर्षे आधिपत्य चालविलें व आतां श्रीसमर्थदास महाराज यांजकडे तें आलें आहे.

हा उद्धवस्वामींचा दुसरा मठ होय. त्यांचा पहिला मठ टांकळीचा. उद्धवस्वामी म्हणजे च शिवरामस्वामी होत यासंबंधीं साधार विवेचन या च ग्रन्थांत मागें टांकळीमठांतील संग्रहाची नोंद करण्यापूर्वी झालेलें आहे. तेव्हां आतां आपण कांहीं काळ या मठांतील प्रचण्ड संग्रहाच्या संगतींत च कंठू. समेच्या संग्रहांतील डोमगांव, इंदुर, बीड, शिरगांव, येहेळगांव, तंजावर इत्यादि ठिकाणचा संग्रह विपुल आणि महत्त्वाचा आहे, त्यांत हि इंदुरमठांतील संग्रहाचें महत्त्व विशेष होय. कसें तें आपण यथावकाश पाहूं.

## इंदुर मठांतील संग्रह

**४४६ ]** बाड–पृ. सं. ४७ × २ × २ = १८८ [१००

या बाडांत फक्त श्रीसमर्थकृत रामायण–युद्धकांड, प्रसंग ५ ते ९ आहेत. पहिल्या पृष्ठावर, ही दुसरी वही, असें लिहिलें आहे. त्यावरून १ ते ४ प्रसंगांची पहिली वही व १० ते १३ प्रसंगांची तिसरी वही असली पाहिजे.

**४४७ ]** २ बाड–पृ सं. ७१×२=१४२ [१००

( १ ) या बाडांत श्रीसमर्थ, मध्वमुनेश्वर, माणिकप्रभु, मुंडा केशव, केशव, माधवचरणीं वामन लोळे, अमृतराय, माधवदास, नाथ भुजंग, तुका, तुकया बंधु, निंबक, आनंदतनय, बालात्मज, देवनाथ, रंगनाथ, मानपुरी, अनंतसुतप्रभु गिरिधरनागर, गिरिजावल्लभप्रभुसुत श्रीधर, उद्धवचिद्धन, येकाजनार्दन, कबीर, तुलसीदास, सुरदास, ज्ञानदेव ( हरिपाठाचे अभंग ), निपटनिरंजन, गोविंद नानक, शिवराम पूर्णानंद, माळो, नामा, इत्यादिकांचीं पदपदांतरें आहेत.

( २ ) मनाचे सर्व १ ते २०५ श्लोक आहेत.

( ३ ) शिवराम पूर्णानंद हे बेदरप्रांतांतील कल्याणीचे राहणार. त्यांची अलोट ग्रन्थसंपत्ति कल्याणीस आहे. त्यांच्यातील एकपततांश हि प्रकाशित झालेली नाहीं. या बाडांत त्यांचीं बारा पदें मिळून बोधपासष्टी आहे. पांच पांच कडव्यांचीं अकरा पदें व शेवटच्या पदाचीं सात कडवीं आहेत. मिळून बासष्ट कडवीं होतात. पदें गोड आहेत. त्यांच्या वडिलांचें नांव नारायण व

मातुःश्रीचें नांव लक्ष्मी. नारायणानीं संन्यास घेतल्यावर त्यांना पूर्णानंद म्हणत. हे च पूर्णानंद निगडीकर रंगनाथाचे आजेगुरु होत. पूर्णानंदाचे गुरु सहजानंद; असो. या पदांपैकीं पहिलीं दोन पदें व शेवटच्या पदाचीं शेवटचीं दोन कडवीं येथें देतों :

बोधबासष्टी

[ १ ]

नमितां गुरुचे चरणा रे । तेणें केली करुणा रे ।
मग मरण चि आलें मरणा रे । जाली भवउद्धरणा रे ॥ १
सहजकुळीं अवतरला रे । सहजानंदें भरला रे ।
सहजसुखें भव हरला रे । सहजीं सहज स्फुरला रे ॥ २
पूर्णपणें भव शमवी गो । पूर्ण पदीं मज रमवी गो ।
पूर्ण सुखें मन सुमनी गो । पूर्णानंदु म्हणवी गो ॥ ३
निजरूपपाणीं असतो गे । घनकल्याण चि देतो गे ।
अकल्याण संव्हारितो गे । कल्याण चि जग करितो गे ॥ ४
लक्ष्मीपतीचें पद पाहूं । सुमनें तेथ सुमन वाहूं ।
जाउनिया उन्मनि राहूं । सहज शिवराम चि होऊं ॥ ५

[ २ ]

श्रवणीं सांगुनिया गुज रे । नेणों काय दिल्हें मज रे ।
तेणें डोळा ये निज रे । तें सुख काय वदूं तुज रे ॥ १
डोळा चोरुनि दाखवितो । श्रवण हिरूनी ऐकवितो ।
रसना गिळुनी चाखवितो । मीतूपणविण भेटवितो ॥ २
बाप दयानिधी गुरुनाथें । नेऊनिया निजसदनातें ।
श्रवणीं सांगुनि वचनातें । मेळविलें मज आपणातें ॥ ३
गुरुचे सदनीं रिघतां गे । निजधन आलें हाता गे ।
तें न ये चि देतां घेतां गे । मज तेणें गिळिलें आतां गे ॥ ४
लक्ष्मी नारायण वरचा । असतां काय आम्हा परचा ।
शिवरामीं भवनिधि वरचा । न करा उशिर उठा परवा ॥ ५

शेवट

गुरु करुणाघन वळला रे । म्हणऊनि हरि मज कळला रे ।
मोक्षतरुवर फळला रे । भवगिरि सगळा ढळला रे ॥ ६
बासष्टी पद बोधाचे । जीवन वरि जो जीवाचे ।
फळ हें श्रीगुरुकरुणेचें । तो शिवराम चि होउनि नाचे ॥ ७

१८५५ श्रावण वद्य ११

४४८ ] ३ [ २५०
बाड–पृ. सं. ९२ × २ = १८४

महत्त्वाचें बाड. मुखपृष्ठें दोन कोरीं सोडलीं आहेत. पहिल्या पृष्ठावर 'श्रीवंक भट त्याची वही', 'वही अष्टाक्षरी श्लोकाची' व दुसऱ्या पृष्ठावर "६८८ अष्ट अक्षरी ३०९ फुटश्लोक" असें लिहिलेलें आहे.

या बाडांत प्रथम, मालेंतील तिसऱ्या भागांत स्फुट श्लोक म्हणून जे अष्टाक्षरी श्लोक आहेत, त्यांपैकीं कांहीं आहेत, कांहीं नवीन हि आहेत ते निराळे उतरून काढले, नंतर करुणाष्टकांपैकीं २१४, २१५, २१६ आणि २१७ यांत आलेल्या ३१ अक्षरी सवाया आहेत आणि शेवटीं करुणाष्टकांपैकीं इतर हि कांहीं अष्टकें आहेत. त्यांत हि कांहीं नवीन आढळलीं. तीं हि उतरून काढलीं.

४४९ ] ४ [ १५०
बाड–पृ. सं. १३५ × २ × २ = ५४०

( १ ) विशेष महत्त्वाचें प्रदर्शनीय बाड. त्यांत मुख्यतः श्रीसमर्थांची कविता आहे.

प्रथम चौदा ओव्याशतें आहेत. त्यांपैकीं कांहींचीं मथळ्याचे जागीं नावें दिलीं आहेत. शत १ लें–गर्भवास, शत २ रें–संसारकथा, शत ३ रें–घोव्या संताच्या, शत ४ थें–उपदेशपद्धती, शत ५ वें–नवविधा भक्ती, शत ८ वें –सगुणनिर्गुणवाद, शत ९ वें–सर्वब्रह्मविमळब्रह्माचा वाद, शत १० वें-संत-मुमुक्षवाद, शत ११ वें-रहस्यवैराग्याचा वाद, शत बारावें-प्रेतप्रारब्धवाद

नंतर स्फुट ओव्या पैकीं बऱ्याचशा ओव्या आहेत.

नंतर मध्यंतरीं हनुमंतानें ख्याती केली। असें चाळीस ओव्यांचें सुंदरकांड आहे.

आणि नंतर अनेक पदपदांतरें आहेत. त्यांत अस्मानीसुलतानीचीं पदें आहेत, विवेक जालियां देवाचा योग । हें आज्ञापत्र आहे, हफगाणीं आहेत.

या ओव्यांत आणि पदांत कांहीं अप्रकाशित आहेत. तीं ताडून पाहून उतरून काढावयाचीं आहेत.

( २ ) उद्धवांचें नांव शिवराम होतें व तें नांव योजून त्यांनीं कांहीं कविता केली आहे. अशी त्यांची मोठी कविता या बाडांत आहे. या बाडांत

कांहीं कोरीं पानें सुटलेलीं आहेत. अशा कांहीं पानावरचें थोडें लिखाण दुसऱ्या कोणाच्या हातचें आहे, तें वगळून बाकीचें बहुतेक सर्व बाड उद्धवस्वामींच्या हातचें असावें, असें माझ्या मनानें घेतलें आहे.

( ३ ) शिवरामाप्रमाणें जनजसवंत, कबीर, गोसावीनंदन व सुरदास या सर्वांचीं मिळून दहा पंधरा पदपदांवरें आहेत.

( ४ ) शेवटीं शेवटीं तीन चार पानें श्रीसमर्थांच्या शिकवणीला धरून उद्धवांनीं घेतलेल्या टांचणांचीं ( Notes ) आहेत.

४५० ] ५ [ १५४
बाड–पृ. सं. १३ × २ × २ = १७२

आरंभीं एका कोऱ्या पानावर "वैशाख शुध दशमी १० रविवार संवछर विकारी नाम" असा बाडाचा लेखनकाल दिलेला आहे. त्यावरून व लिपीवरून हें बाड शके १७०१ तील आहे, असें म्हणतां येतें. या हि बाडांत फक्त श्रीसमर्थांची च कविता आहे, ती अशी :

( १ ) श्री श्लोक मनाचे १ ते २०५

( २ ) तिसऱ्या भागात आलेल्या स्फुट ओव्या किंवा अभंगांपैकीं २९ अभंग

( ३ ) मानपंचक–श्लोकसंख्या १२५

( ४ ) स्फुट समास– मन भीवणें निर्गुजलें । ओवीसंख्या २५

( ५ ) स्फुट समास–विद्यमानतत्त्वनाम– निर्गुण निर्विकार संचलें । ओ. सं. २९

( ६ ) स्फुट समास–बंदनिरूपणनाम–विशेष स्मरणें देव । ओ. २०

( ७ ) स्फु. समास–निःसंगनिरूपणनाम–विरंग नव्हे तो चि रंग।ओ.३४

( ८ ) स्फु. स.–अनादिनिरूपण नाम–नाना पदार्थ नाना काया।ओ.३२

( ९ ) जुनाटपुरुषाची कथा–ओवीसंख्या ५६

( १० ) म.रा तेरा आरत्या

( ११ ) दशावताराची भूपाळी–मन हो म्हणा रे श्रीहरी।

४५१ ] ६ [ १५०
बाड–पृ. सं. ८५ × २ = १७०

श्रीधर महानंद कृत मारुती कथा, ओवी ३७, लेरीज बाकी

सर्व भागांत श्रीसमर्थांची च कविता आहे, ती अशी :

( १ ) मनाचे श्लोक २८ ते २०५

( २ ) करुणाष्टक ६० येंग्पेचीं जिवें सांडुनि सर्व जावें ।

( ३ ) पंचसमासी

( ४ ) आत्माराम–ओवीसंख्या १७८

( ५ ) निर्गुणध्यान–ओ. सं. १७७

( ६ ) श्रीमत् दासबोधांतील समास १७×८, ७×९, ११×२, ११×४, ११×६, ४×८, ४×३ व २०×१०

( ७ ) पूर्वारंम–ओ. सं. ६०

( ८ ) जुना दासबोध–समास १, २, १५

( ९ ) अंतर्भाव

**४५२ ]** ७ [१५०

पृ. सं. १८८ × २ × २ = ७५२

( १ ) श्रीसमर्थांचीं बरीं च पदपदांतरें, त्यांत काहीं अप्रकाशित.

( २ ) श्रीसमर्थ, उद्धव, माधव आणि गोविंद यांच्या पुण्यतिथींचे श्लोक. शां. वि. वि. १२ त ते दिले होते.

( ३ ) श्रीसमर्थ कृत रामायण–सुंदर आणि युद्धकांड संपूर्ण

( ४ ) ज्ञानदेव, येकनाथ, कबीर आणि भक्त यांचीं क्वचित् पदपदांतरें.

**४५३ ]** ८ [१५०

पृ. सं. ७५ × २ × २ = ३००

( १ ) श्रीसमर्थ, आनंदतनय, आदिनारायण, शिवदिनकेसरी, राघवचिद्घन, मानपुरी, जनार्दनसुततनय, काकात्मज, शिवराम इत्यादिकांचीं पदपदांतरें

( २ ) श्रीसमर्थ कृत काहीं करुणाष्टकें, मनाचे श्लोक १ ते २०५, रघुनाथध्यान ओवीसंख्या ११८

( ३ ) आनंदतनय कृत सीतास्वयंवर, श्लो. ११ ते ८०

( ४ ) हिंदी मार्मिक कबिराख्यान, कडवीं १५

( ५ ) रामनाममहिमापर गिरिजाशंकरशिवसंवाद

(६) सारशोधयाचा प्रकार, सादी दास्त दाग, चंद्रज्योतीची दाग व मोहनवेलीची दाग

(७) रामकिंकर कृत ' प्रातःस्मरामि ' पंचक

(८) एक नोंद–" जयाशाईच जेन्मनाव टकाई हस्ता कन्या हंस ४ होरा चंद्राचा शके १६९९ हेमलंबी नाम संवत्सर भाद्रपद शुध ३ गुरुवार "

(९) पुढील एक पद श्रीसमर्थांवर दिसतें :

तो दास रामाचा हो दास

तो ज्ञानी पूर्ण समाधानी । शुध अंत करणी ।
दृश्य पदार्तें त्यागुनि करितो सारासार विचारुनी ॥ १
तो ईश । प्रत्यक्ष जगदीश । मह्मीचा जो अंश ।
शुद्ध सत्त्व निरामय निर्गुण निश्चळ त्या निरंजनी ॥ २
तो दास रामाचा हो दास । अखंड दृढ विश्वास ।
जैसें सागरीं लवण विरोनी येकरूप होय पाणी ॥ ३

(१०) शिवरामाची म्हणजे उद्धवाची जी कांहीं पदें आहेत, तीं केव्हा छापली जाणार असतील तीं जावोत. आज त्यातलें एक तरी पद देतों :

स्वामिराया !

नमूं स्वामिराया नमूं स्वामिराया ।
ज्ञानें चि निरसिली सर्व माया ॥ ध्रु०
वेदांत विवरणें । द्वैत तो पुरविणें ।
पचिकर्णं सुणें पावचीलें ॥
मी कोण निवडिलें ब्रह्मांड घुडविलें ।
थोतांड दृटविलें प्रत्ययानें ॥ १
अनुभवें पाहिलें । प्रत्ययें राहिलें ।
दृश्य हें दाहिलें ज्ञानतेजें ॥
स्वानुभवें खुणें । स्वविषी पावणें ।
हें चि देणें ह्मणे शिवरामा ॥ २

**४५४ ]** ९
पृ. सं. ४७ × २ × २ = १८८ [ १५०

( १ ) श्रीसमर्थ कृत कांहीं पदें, कांहीं स्फुट प्रकरणें, रघुनाथध्यान ओ. ११८, युद्धकांडापैकीं ११ वें शत

( २ ) बाळकराम कृत दामाजीची रसद-कडवीं १९

**४५५ ]** १०
बाड-पृ. सं. ९३ × ४ = ३७२ [ १५५

( १ ) या बाडांत श्रीसमर्थांची विपुल कविता आहे. तींत कांहीं नवीन आहे. ती अर्थात् आपणांस मालेंतील जो अकरावा भाग काढावयाचा आहे, त्यांत येईल पण या कवितेंत एका अष्टकांत स्वप्नांतील साक्षात्काराचा श्रीसमर्थांनीं उल्लेख केला आहे तो प्रसंग आणखी कमींत कमी दीड दोन वर्षे वाचकांना कळविल्यावांचून राहूं द्यावा ही कल्पना सहन होत नसल्यामुळें तें तेवढें अष्टक येथें देतों :

समर्था !

उदासीन स्वामी न व्हावें दयाळा। स्नेहाळु मनांतील साक्षी कृपाळा।
मला आजि योसंडितां दुःख वाटे। अवस्था बहू वाटतां कंठ दाटे॥ १
बहू गांजिलें या जनादुर्जनाहीं। अवस्था न ये सांगतां दुःख कांहीं।
किती भार म्या चालणें या समर्था। त्वरें धांवणें पावणें हो अनाथा॥ २
बहू क्षीण म्या सोशितां जन्म गेला। कितीयेक अन्याय उदंड जाला।
मनाचा मना प्रत्ययो सत्य आला। समर्थें बहूसाल सांभाळ केला॥ ३
हिणें कोटि त्याहूनि मी हीण आहे। दिनें कोटि त्याहूनि मी दीन आहे।
पतीतासि आधार कोण्ही च नाहीं। करूं अल्प ही हीत नेणों चि कांहीं॥ ४
समर्थें उदासीन उदंड केलें। कितीयेक हें पाप माझें उदेलें।
मला थार आधार कोठें चि नाहीं। वृथा जन्मलों मी नव्हे दास्य कांहीं॥५
मला जन्म माझा बहू जाड्य जाला। बहू जन्म याचा मला त्रास आला।
किती क्षीण सोसूं समाधान नाहीं। जनाचा मना नावडे संग कांहीं॥ ६
वियोगें तुझ्या झूरणी लागलीसे। मला स्वस्त कोठें चि कांहीं न दिसे।
बहू पोळलों या उपाधीसि दुखें। बहू फूटला प्राण हा दुखशोकें॥ ७

दयाळा दया सीघ्र आधीं करावी । करुणार्णवा बूडतां धांव घ्यावी ।
महूसाळ निर्मूळजळीं मोहजाळें । त्वरें धांवणी सीघ्र कीजे कृपाळें ॥ ८

अनाथा दिनाची समर्थासि चिंता । त्वरें बोळला राम आनंददाता ।
अकस्मात स्वप्नीं समाधान केलें । समर्थें दिनालागि आनंदवीलें ॥ ९

दिनाचा सदा सर्वदा भार वाही । न पाहे मनीं अल्प अन्याय कांहीं ।
क्षमा सर्व केलें मला येश दिल्हें । म्हणे दास हें प्रत्यया सत्य आलें ॥ १०

(२) शिवराम म्हणजे उद्धव, हें आतां केव्हां च विसरावयाचें नाहीं. या दि बाडांत शिवरामांची थोडी फार कविता आहे. पण त्यांत त्यांनी मेघाला उद्देशून दहा श्लोक केले आहेत, ते मला प्रासंगिक वाटतात. वाचकांस ठाऊक च आहे कीं, श्रीसमर्थ इंदुरास गेले होते, त्या वेळीं पाऊस उडाला होता व पावसासाठीं ब्राह्मणांनीं अनुष्ठान चालविलें होतें. श्रीसमर्थांनीं मारुतीवर अभिषेक करावयास सांगितलें आणि पाऊस आला. लोकांच्या आग्रहावरून तेथें उद्धवांना ठेवून श्रीसमर्थ संचारार्थ पुढें गेले. हा कथाभाग विचारात घेतला म्हणजे त्या प्रसंगाला उद्देशून शिवरामांचें म्हणजे उद्धवांचें हें अष्टक-खरें म्हणजे दशक-असावें, असें मनांत येतें. तेव्हां ते दहा श्लोक हि महत्त्वाचे होत. कोणी सांगावें, पुढें मागें छापले जातात, न जातात, म्हणून ते येथें च सादर करितों. थोडेसें दुर्दैव असें कीं हें बाड महत्त्वाचें खरें, पण त्याचें लेखन जरा अशुद्ध आहे. ते श्लोक :

श्लोक मेघाचे

तुजविण बहु कष्टी लोक हे फार जाले ।
न पवसि जगदीशा मेघ तां काय केले ।
तिळभरि स्थळ कांहीं अल्प ही भीजवीना ।
पळत विज सुमीचें पोट ही रीझवीना ॥ १

फलकलित फटाटी अंतरीं लोक मोठा ।
गलथळित मनाची सांडितो धैर्यवाठा ।
धुकधुक बहु पोटीं वाढती फार चिंता ।
म्हणत धि जन कैसें अन्न भेटेल आतां ॥ २

फण जरि अवनीचे रर्चले सर्व कांहीं ।
तरि मग जन पूढें येत्न योजील काई ।
धकपक सकळाची सर्व जायासि आली ।
हपहप बहु लोकां तूर्त आतां उदेली ॥ ३

भकभक बहु वाटे देखतां दीन मोठा ।
तपत उन्ह उन्हाळा दीसतो फार खोटा ।
गगन सकल नीळें नाथळे अभ्र कोठें ।
जळधर रुसला कीं थोर हो पाप मोठें ॥ ४

तडपड जिव जाती अश्व ते पश्वयाती ।
फडफडफड खाती जीव जीवां स्वयाती ।
निपट चि अवनीचें तोय आटोनि गेलें ।
हरद कुप तटाकें नीर नाहीं च जालें ॥ ५

निपट चि जरि कांहीं मेघ पूढें पडेना ।
तरि बहु नृपतीच्या चालती केंवि सेना ।
गजयज बहु पूरें पट्टणें होय कैसें ।
कठिण चि जगदीशें मांडिलेंसें चि दीसे ॥ ६

हर हर हर आतां काय कैसें करावें ।
मरमरमर पूढें मांडिलें काय देवें ।
खरखरखर चिंता लागली लोकचित्ता ।
त्वरित चि रघुनाथा धारणें थोर वेथा ॥ ७

अतिकरुणळया तूं पाहसी अंत कां तूं ।
सकळ चि जग तूं तूं होसि निष्ठूर कां तूं ।
म्हणविसि मज तूं तूं दीससी सर्व तूं तूं ।
सळगि वदतु आहे बोलिलें हें क्षमीतू ॥ ८

त्वरित चि घन वर्षी मेघ तो प्रतिवर्षी ।
अचुक चि न चुकावा नेम वर्षांनत्रर्षी ।
जरुर चि मज तां कां आणिले ये चि वर्षी ।
कठिणपण लजावें तूर्त मेघासि वर्षीं ॥ ९

विनवित दिन तूझा धीव हा रामपाई ।
त्वरीत मज कृपेनें नीपवावें उपाई ।
मग तुज करणें जें तां सुखें तें करावें ।
परि मज हिण दीना सारिखें नादरावें ॥ १०

( ३ ) याशिवाय या बाडांत ४५२ तील पुण्यतिथींचे श्लोक आहेत व जनजसवंत, कबीर, नरसिंह ( अपेल रक्षिता हरी । ) वेणी ( पाहातां पाहातां द्वैत सरलें वो । ) ' इत्यादिकांचीं पदपदारें आहेत.

( ४ ) तान्हाजी कृत अंगदशिष्टाई, श्लोकसंख्या ४२

( ५ ) कृष्णदासमुद्गल कृत युद्धकांडांतील प्रसंग १४ व १५

( ६ ) संस्कृत सुभाषित श्लोक पुष्कळ आहेत.

( ७ ) बाडांत शक १६९७ व १७०१ या दोन शकांचा उल्लेख आला आहे.

( ८ ) रामदास टेउनि नाम करिसी भगल उपाय ।
कवणाचें काय जाय । भगल तुझें तुज खाय ॥

भगल म्हणजे ढोंगीपणा. " रामदासी म्हणवितोस आणि ढोंगढोंग करतोस ! ठीक, आमचें काय जातें, पण हें तुझें ढोंग तुझ्या च नाशाला कारणीभूत होईल. "

४५६ ] ११ [ १५०
पृ. सं १२४ × २ = २४८

या बाडांत श्रीसमर्थांचीं ६०।७० पदें, अभंग वगैरे ; असून उद्धवचिद्धन, तुकाराम, बसवलिंग, एकनाथ, श्रीधर महानंद, मोहावीनंदन, नरहरि माळी, केशवराज, लीलाविश्वंभर, गंगाधरनंदन, चिन्मय माधव, नामा, शिवराम, मेरु ( परंधाम चिद्रूप व्यक्तीसि आलें । श्लोक ११ ), विठ्ठलसुत, योगप, इत्यादिकांचीं पदपदांतरें आहेत.

४५७ ] १२ [ १५०
लिहिलेलीं पृष्ठें ६१ × २ = १२२

हें पद्मुटक प्रायः बाड श्रीसमर्थांच्या पदपदांतरांचें आहे. मध्यें व दोन पृष्ठें केशव, मुक्ता यांचीं कविता आहे.

४५८ ] १३ [२५०
पृष्ठसंख्या १२३ × २ = २४६

अति सुंदर, प्रेक्षणीय बाड. त्यांत बहुधा उद्धवांच्या च हातचीं श्रीसमर्थांचीं पदें आहेत. मालेंतील पंचविसावा भाग–श्रीसमर्थ कृत पदपदांतरें–यांत हें सर्वच बाड आलें. त्या भागाच्या प्रस्तावनेंत व उपसंहारानें जागीं या बाडाचें सविस्तर वर्णन केलें आहे.

४५९ ] १४ [१२५
किरकोळ बाड–पृ. सं. ४१ × ४ = १६४

( १ ) श्रीसमर्थ, केशव व कबीर यांचीं कांहीं पदपदांतरें, ( २ ) वेणीस्वामींचे कौलाचे श्लोक २६, ( ३ ) पुण्यतिथींचे से चारी श्लोक, ( ४ ) कविराज्यानाचीं १५ कडवीं हिंदी, ( ५ ) श्रीधरकृत पारधीकथा, ( ६ ) पूर्वारंभ, ओ. १०

४६० ] १५ [२००
लिहिलेलीं पृष्ठ सं. ११० × २ = २२०

महत्त्वाचें बाड. यांत श्रीसमर्थ कृत ( १ ) रघुनाथध्यान, ओवीसंख्या ११८, ( २ ) निर्गुणध्यान, ओ. सं. १७७, ( ३ ) पंचसमासी व ( ४ ) आत्माराम, समास पाच, ओ. सं. १७८, अशीं चार प्रकरणें संपूर्ण आहेत.

४६१ ] १६ [१००
पृ. सं २८ × २ = ५६

शेवटच्या बाजूनें बाड उसवलें गेल्यामुळें शेवटचीं वरीं च पृष्ठें गहाळ.

( १ ) श्री श्लोक मनाचे २०५, ( २ ) दामाजीपंतांचा पोवाडा, ३० कडवीं, ( ३ ) गुंडा कृत विठ्ठलाची आरती.

४६२ ] १७ [१००
किरकोळ बाड, लिहिलेलीं पृष्ठें २९

यांत ९ वें करुणाष्टक, रामविजयांतील सुंदरकांडांतील २१४ ओव्या व ग्रन्थराज दासबोध द. १७ समास ८ व ९, अशीं आहेत.

४६३ ] १८
पृ. सं. ६४×४=२५६ शि. आ. शे. १०।१० नष्ट [ १००

( १ ) श्रीसमर्थ, तुकाराम, शिवदिनकेसरी, आनंदात्मज, मानपुरी, वामन, नरहरि, जयरामात्मजअंकित, केशव, शिवराम समर्थ, शिवराम पूर्णानंद, उद्धवचिद्धन इत्यादिकांची पदपदांतरें

( २ ) मधल्या च एका कोऱ्या पानावर

श्रीरामउपासक निर्मळ । जो भजनसरोवरीचा मराळ ।
तो रामदास माह्या केवळ । भक्ति प्रबळे लावी जना ।

अशी एक स्फुट ओवी आहे, ती कशांतली आहे, कां स्वतंत्र आहे थेरें ! मराळ म्हणजे हंस.

४६४ ] १९
पृ. सं. ५० × २ = १०० [ १००

( १ ) पहिलीं ५४ पानें संस्कृतांत मुहूर्तसारसंग्रह आहे, नंतर

( २ ) जनीचे १६, तुकारामाचे ५२, श्रीसमर्थांचे ५, नामयाचे २४, ज्ञानदेवाचे ५ व कृष्णदास, खेचरविसा, नरहरी माळी यांचा एक एक, असे अभंग आहेत.

४६५ ] २०
लिहिलेली पृ. सं. ७५ × २ = १५० [ १००

( १ ) गिरिधरप्रभु कृत व्यंकटेशनवरात्रोत्सव. हे गिरिधर श्रीसमर्थप्रताःकार दिसत नाहींत, निराळे दिसतात. प्रकरण हि अप्रकाशित दिसतें. तें मजेदार आहे. प्रथमतः काहीं ओव्या, मग श्लोक, पदें, पुन्हां ओव्या, नंतर श्लोक, पदें, अशी त्याची रचना आहे. फक्त ओव्यांना क्रम आहे. एकंदर ओव्या ४२ आहेत. श्लोक, पदें यांना क्रम नाहीं. पदें गिरिधरांचीं च आहेत, असें नाहीं. प्रसंगानुरूप दास गोपाळ, धीरेश्वर, महादेवसुत, उद्धवचिद्धन, केशवस्वामी, गोपाळसुत, दास, आनंदनंदन, भीमराय, लोलिंबराज यांचीं पदें समाविष्ट करून घेतलीं आहेत. तात्पर्य, प्रकरण प्रकाशित झालें पाहिजे.

( २ ) श्रीशंकराचार्य कृत ' भज गोविंदम् ' स्तोत्र

( ३ ) श्रीरामकिंकर कृत ' प्रातः स्मरामि ' श्लोकपंचक

( ४ ) कबीर कृत भया राम कहो रे । भवजल पार तरो रे ॥ ध्रु०

( ५ ) श्रीधर ब्रह्मानंद कृत राम-कृष्ण-भक्तसंवाद, ओ. ४३

( ६ ) अन्वयव्यतिरेक-अपूर्ण. अन्वयाचे तीन समास पूर्ण असून व्यतिरेकाचा चवथा समास अपूर्ण सोडला आहे. हें प्रकरण श्रीसमर्थांचें नसून श्रीसमर्थशिष्य सीताराम यांचें आहे, असें आरण मागें च ठरविलें आहे. असें असतां या बाडात प्रत्येक समासाचे अंतीं ' श्रीरामदासविरचित ' असें आहे, तें नवल होय. हें प्रकरण श्रीसमर्थांचें नवता हि तें त्यांच्या नावावर कधींपासून आणि का मोडूं लागलें, तें ठरविलें पाहिजे.

( ७ ) वामन कृत द्रौपदीवस्त्रहरण, श्लोकबद्ध, १ ते २१० श्लोक, अपूर्ण

( ८ ) पंचदशी-प्रथम प्रकरण सटीक. ही टीका गद्यांत असून ती सुबोध आहे. ती श्रीमहादेवभटात्मज श्रीनीळकंठगुरुविरचित आहे.

( ९ ) वेदासिद्धांत म्हणून गद्यात पंचीकरणनिरूपण आहे.

( १० ) यादवराय केशव, त्रिंबकतनय, रघुनाथ, आनंदनंदन व रंगनाथ यांचीं काहीं पदें.

४६६ ] लहान आकाराचें २१ महत्त्वाचें बाड [ ९५०
पृ सं. १३८ × २ = २७६

बाडांक ४५५ तील बरीचशी कविता या हि बाडात आहे. तें बाड अशुद्ध आहे, तर हें शुद्ध आहे. त्या बाडातील अशुद्ध कविता या बाडावरून लावता येईल.

( १ ) श्रीसमर्थ कृत बरींचशीं करुणाष्टकें व अष्टाक्षरी श्लोक व मनाचे श्लोक या बाडात आहेत.

( २ ) श्रीसमर्थ कृत आत्माराम आणि पंचमान

( ३ ) ४५५ व्या बाडांकात स्वप्नाच्या अष्टकातील शेवटच्या श्लोकात ' म्हणे दास ' आहे, त्या ऐवजीं या बाडात ' म्हणे भक्त ' असें आहे. " भक्त " नांव धारण करून श्रीसमर्थांनीं पुष्कळसा कविता केली आहे, ही गोष्ट मनात बागविली पाहिजे.

( ४ ) हिंदुस्थानी भाषेत गोपीचंद आख्यान-कडवीं १४

( ५ ) संस्कृत आणि मराठी बरेचसे सुभाषित श्लोक

( ६ ) बाडाच्या शेवटून दुसऱ्या पानावर एक महत्त्वाची नोंद आहे ती अशी : " शके सोळासे १६४० धीळंबी नाम संवछरी गोवातील मठ घांघोनी प्रथम नवमी जाली ॥ " अर्थात् १६४० च्या पूर्वी मठ सारंगपुर येथें मारुतीपाशीं होता. गांवांतलें श्रीराममंदिर भव्य आणि मजबूत आहे. तें १६४० त पूर्ण होऊन गांवांत पहिला श्रीरामजन्मोत्सव त्या साली झाला.

४६७ ] २२ लिहिलेली पृ. सं. १५४ × २ = ३०८ [ १२५

( १ ) श्रीसमर्थ कृत युद्धकांडांतील दोन शतकें

( २ ) श्रीनरहरीमालोसंप्रदायकिंकर माधव अनुचर कृत तत्त्वबोधसार वचनसुधा. हें गद्यात्मक प्रकरण असून त्यांत सद्गुरूंनीं शिष्याला आत्मस्वरूपाचा बोध केला आहे. प्रकरण प्रकाशनाला योग्य आहे.

( ३ ) एकनाथी भागवतांतील कांहीं ओव्या

४६८ ] २३ बाड-पृ. सं. ७२ × २ = १४४ [ १२५

( १ ) केशव, उद्धवचिद्धन, वामन, माधवराज, गोपाळ आणि सानाजीनंदन यांचीं मराठी पदें.

( २ ) नानक, अहमद, दीनानाथ, निपटनिरंजन, केशोदास, उधोश्याम, लछमनगिरी फकीर, रामराय, जयरामसुत, बिरबल, तुळशीदास, माधवदास, मानपुरी, शिवदिनकेसरी, अगरदास, कबीर, सुरदास, रोहीदास, मीराके प्रभु गिरिधर, उद्धवचिद्धन, जनजसवंत, कृष्णदास यांचीं हिंदुस्थानी पदें.

( ३ ) हिंदुस्थानी पांच पन्नास दोहरे

४६९ ] महत्त्वाचें बाड २४ कांहीं पृष्ठें नष्ट पृ. सं. ४८ + ४१ = ८९ × २ = १७८ [ २५०

( १ ) या बाडांत मुख्यतः श्रीसमर्थांची कविता—शें पन्नास अभंग, शें दोनशें पदें, बरेचसे श्लोक आहेत. नवीन कविता बरी च आढळली.

( २ ) या बाडांत स्फुट ओव्या अंक ७१ नंतर अंक २६७ च्या स्फुट ओव्या आहेत व त्या योग्य आहे. तसें च स्फुट ओव्या अंक १७ च्या आधीं पुढील श्लोक आहे :

भजन मज फळेना ज्ञान ते आकळेना ।
चपळपण पळेना वासना हे ढळेना ।
निरपण निवळेना देहबुधी गळेना ।
तुजविण रघुनाथा पुण्य काहीं फळेना ॥ १ ॥

( ३ ) शिवरामाचीं दहा पाच पदें आहेत व मीराबाई, वेणाबाई व जनजसवंत यांचें एक एक पद आहे.

( ४ ) असेल रक्षिता हरी । वरी करी दया यरी ॥ हे दहा श्लोक मी नरसिंहकृत समजतों.

४७० ] २५ [१५०

पृ. ७. ४० × ४ = १६०

( १ ) श्रीसमर्थांचीं पदपदावरें. त्यात काहीं नवीन आहेत.

( २ ) शिवरामाचीं दहा पाच पदें.

( ३ ) जन जसवंत, मीराबाई, कबीर यांचीं पदें

( ४ ) नारायणात्मजाचें एक पद व दासकिंकर यांचीं दोन पदें व जयराम व माधव यांचा एक एक श्लोक, अशीं आहेत, तीं सर्व प्रकाशनाला योग्य आहेत. हे कोण होते काहीं सांगता येत नाहीं. नारायणात्मजाचें पद व दासकिंकराचें एक पद येथें देतों

( १ ) तारी रामा रे

तारी रामा रे । रामा रे । मुनिजनमानसविश्रामा रे ॥ ध्रु०
तुझ्या नामाचा बडिवार । स्मरतां पातका संव्हार ।
जाला महुताला उध्धार । हा भवघोर सुटला रे ॥ १

तू चि सगुण निर्गुण । स्थूळ सूक्ष्म कारण ।
तू चि होसी महाकारण । तुर्या उन्मनी तू चि रे ॥ २

तू चि ज्ञेय ज्ञाता ज्ञान । तू चि ध्येय ध्याता ध्यान ।
नारायणात्मज तल्लीन । कर्पुरदीपकापरी रे ॥ ३

( २ ) जपा रामा रे

जपा रामा रे । रामा रे । रघुवीर सुखधामा रे ॥ ध्रु ०
तुझें नाम घेतां शंकर जाला विषाचा उद्वार ।
मग ध्यास तो सत्वर । गौरीस हि लागला ॥ १

शुकाचेसि म्हणतां वाणी गणिका बैसली विमानीं ।
ऐसें नाम हें निर्वाणीं । भक्तालागी तारीतें ॥ २

योग याग नलगे कांहीं धरा भाव याचे ठाईं ।
कलयुगीं महिमा पाहीं । याचा उदंड असे ॥ ३

जेहीं विश्वासें घेतलें । त्यासी याचें फळ जाहलें ।
बहु भक्तांला तारिलें । या रघुवीर नामें हो ॥ ४

ऐसा नामाचा विचार नाम बहुतांसी आधार ।
जन्हीं जाला ज्ञानी थोर । तेणें हि नाम स्मरावें ॥ ५

भक्ति करावी सगुणीं । अनुभव घ्यावा तो निर्गुणीं ।
सादर करा पिनाकपाणी । तेणें सर्व फळे हो ॥ ६

रामउपासनेचा वडिवार । ऐसा आहे पैं साचार ।
विनवीत दासांचा किंकर । तुम्ही परें विचारा ॥ ७

(५) श्रीसमर्थकालीन दुष्काळाचें वर्णन. ही प्रकरणें अस्मानी सुलतानी म्हणून श्रीसांप्रदायिक विविध विषयांक ४४ यांत पूर्वी छापलीं होतीं.

(६) विठ्ठल कृत श्लोकबद्ध सीतास्वयंवर, सर्ग १, २, ३, ४

(७) माभळभटाच्या सवाया २१ व शेंवराच्या सवाया १६

(८) " नक्षत्र पाहायाचा तोटका, मुहूर्तराज, पालीपडे, धीताचक्र, शिंकेचा शकुन, भरत हारपली तिचा प्रश्न "

(९) शेवटून दुसरे पृष्ठावर पुढील महत्त्वाचा श्लोक आहे. तो कोणी केला, कां केला, कांहीं सांगतां येत नाहीं :

बहुश्रुत हो न्यायनीतीसि जागा ।
जनीं भ्रष्टविद्या असे भट्ट गागा ।
कदा ही तुम्ही त्यासि मीळों नका हो ।
स्वधर्में चि जें बोलिलें तें करा हो ॥ १ ॥

४७१ ] २६ [१००
लिहिलेली पृ. सं. ३८ × २ = ७६

(१) जनार्दन–एकनाथ–राघव–राम–नागेश–दीनानाथ अशी आरंभीं परंपरा दिलेली आहे.

(२) वान्हाजी कृत अंगदशिष्टाई–श्लोक ४३

( ३ ) श्रीसमर्थ, शिवदिन, वामन, केशव, माळी, श्रीधर, अमृतराय, यादव कवि, शिवकसुत, आनंदतनय, रंगनाथ, गोसावीनंदन, भास्करसुत, सदानंदतनय, तुलसीदास, सज्जनरंजन, इत्यादिकांची पदपदार्तें

( ४ ) शिवराम कृत सटीप आर्यामराठुत्तलमरकृत-श्लो. १०८

( ५ ) शिद्धनागेशावर अमृतरायाचे पद

**४७२ ]** २७ [११३
पृ. सं. ३७ × २ = ७४

( १ ) देवनागरी लिपींत लिहिलेले परंतु तेलगु, तामिळ किंवा कानडी भाषेतील श्रीरामतारकशतक-ग्रंथसंख्या १०२

( २ ) वरीलप्रमाणे च जानकीशतक-ग्रंथसंख्या ९९

( ३ ) श्रीसमर्थ व तुकाराम यांचे थोडे च अभंग

( ४ ) केशव, माळी, आनंदतनय यांची पदपदार्तें

**४७३ ]** २८ [१५०
पृ. सं. ८४ × २ = १६८ शि. आ. ले. १०१५ नष्ट

( १ ) श्रीधर कृत रामविजय-प्रसंग १ ते ८

( २ ) दासमुकुंद कृत नारसिंहचरित्र-श्लो. सं. ५८

( ३ ) श्रीधर कृत हरिविजय-थोडा भाग

( ४ ) आनंद कृत श्लोकबद्ध उत्तरकांड-दोन सर्ग

**४७४ ]** किरकोळ २९ बाड [१००
पृ. सं. ९३ × २ = १८६ शि. काहीं नष्ट

श्रीसमर्थ, तुकाराम, उद्धवचिद्घन, केशव, आनंदतनय, विश्वनाथतनय, रंगनाथ, सज्जनरंजन, शिवकात्मज, तुळशीदास, शिवदिनकेसरी, गोसावीनंदन यांची पदपदार्तें

**४७५ ]** ३० [१२५
किरकोळ बाड पृ. सं. ४२ × ४ = १६८

*श्रीसमर्थांचे स्फुट श्लोक, दासबोधांतील काहीं समास, जुन्या दासबोधातील दुसरा समास.*

४७६ ] किरकोळ ३१ बाड
लिहिलेली पृ. सं. १२ × २ = २४ [ १२५

( १ ) श्रीसमर्थ कृत पदपदांतरें

( २ ) श्रीरामसमर्थचौशावळी–म्हणजे नमो आदिगुरु मुख्य विष्णु साधु । हा २६ कडव्यांचा अभंग. श्रीसमर्थ व श्रीतुकाराममहाराज यांनीं आपआपलीं चरित्रें परस्परांस सांगितलीं अशी जी दंतकथा आहे, तिला अनुसरून श्रीसमर्थांनीं म्हणून सांगितलेला हा अभंग होय. पण हा अभंग श्रीसमर्थकृत असावा, असें मला क्षणभर हि वाटत नाहीं. तो श्रीसमर्थांच्या कोणा तरी शिष्यानें केलेला असावा. न जाणों, तो उद्धवकृत असावा.

४७७ ] ३२
कि. बाड–पृ. सं. ६६ × ४ = २६४ [ ११८

( १ ) श्री श्लोक मनाचे–लेखनकाल “ छ १७ माहे शावान सन १२२५ फसली ” म्हणजे शके १७२७ आषाढ व. ४

( २ ) तुकारामाचे बेरचसे अभंग, एकाद दुसरा जयराम कृष्ण व केशव यांचा

( ३ ) शिवसुत कृत संतनामावळी

४७८ ] ३३
पृ. सं. ७० × २ × २ = २८० [ २००

( १ ) श्रीसमर्थांची बरीचशी कविता–अष्टाक्षरी, करुणाष्टकें, उदासीन स्वामी न म्हणें दयाळा । हें दशक, कांहीं पदें. कांहीं नवीन आहे.

( २ ) शिवराम कृत मेघाचे श्लोक

( ३ ) बाडाच्या आरंभीं व शेवटीं भावार्थरामायणांतील कांहीं प्रसंग

( ४ ) श्रीधर कृत भारतातील पारधीकथा

( ५ ) गोपीचंद आख्यान–हिंदुस्थानी, १४ कडवीं

( ६ ) दासांकित, शिवराम अंकित स्वामीचा, कानि किंकर, येणी ( रामनामेवीण मज कंठेना ), केशव ( श्रीगुरुराया रे सखया श्रीगुरुराया रे ), फकीर यांचीं पदपदांतरें

४७९ ] ३४
कि. बाड–पृ. सं. ३७ × २ = ७४ [ १००

( १ ) श्री श्लोक मनाचे ६१ ते २०५, ( २ ) ओव्या-शतकापैकीं पहिलें शतक, ( ३ ) श्रीसमर्थांचे कांहीं अभंग.

४८० ] लहान ३५ आकाराचें [१५०
वाड-पृ. ग. १०५ × ४ = ४२०

( १ ) श्री श्लोक मनाचे-६ ते २०५

( २ ) श्रीसमर्थ कृत रामायण-सुंदरकांड आणि युद्धकांडाचें शत १ लें. श्लोक मागें पुढें झाले आहेत.

एक एका पानावर एक एक श्लोक लिहिला आहे.

४८१ ] चार चार पृष्ठें ३६ आ. थो. गेलेलीं [१५०
पृ. ग. ३८ × ४ = १५२

हें सबंध बाड गुंडा याच्या अभंगाचें आहे. हे गुंडा नवीन आहेत. त्यांचें चरित्र काहीं एक माहित नाहीं. सुमारें ३००।४०० अभंग या बाडांत आहेत. नमुन्यासाठीं काहीं अभंग देतों. मला ते बेधक वाटतात.

[ १ ]

कोणी पढती वेद कोणी पढती शास्त्र । रामकृष्ण मंत्र आम्हांलागी ॥ १
वेदांत सिद्धांत योग ज्ञान सर्व । नामापुढे गर्वे मिरवू न सकती ॥ २
निश्चय वचनासी हरि पाठिराखा । जो गोपिकांचा सखा निर्गुणरूपी ॥ ३
गुंडा सांगे मना हृतासी कांये । परी नाम घेता होये जीवन्मुक्त ॥ ४

[ २ ]

विठो तुझ्या पाईं जडोनि गेलें मन । आतां कोठील कोण कोण पुसे ॥ १
निर्भयाचें स्थळ तुझे येक पाय । इतर मायामय जगज्जाळ ॥ २
बहुत तपी जाला तो विषयासी भ्याला । तुम्हां शरण आला तो निर्भय ॥ ३
गुंडा म्हणे योद्धू तुझ्या किती गोष्टी । सुख न माये पोटीं पांडुरंगा ॥ ४

[ ३ ]

जनामाजी ऐसा पिटिला डांगोरा । नाम घेतां खरा तारितो हा ॥ १
उपेक्षितां तुम्हां न दिसे बरें हरी । होईल चराचरीं अपकीर्ति ॥ २
नाम घेत होता कोठें मुक्त जाला । दुर्जन या बोला बोलतील ॥ ३
गुंडा म्हणे करीं मंद साच आतां । आपुले पंढरिनाथा दासासाठीं ॥ ४

रा. सं. ४८

[ ४ ]

तुझ्या भेटीसाठीं सोडिला संसार । नसतें देशांवर वसवीलें ॥ १
आतां तुज भ्यावें कवणाकडे जावें । सर्वां भूतीं देव तूं चि येक ॥ २
तुझें विश्वरूप पाहूं जातां डोळे । होताती आंधळे अमयोगें ॥ ३
गुंडा म्हणे धरा आतां जालों धीट । तुजपुढें नीट चालुन येतों ॥ ४

[ ५ ]

करी देवा तुझा दास । सोडुनिया आशापाश ॥ १
तुझ्या नामीं हेत लागो । हें चि देवा तुज मागों ॥ २
वारंवार हे चि चिंता । भेटी घ्यावी पंढरीनाथा ॥ ३
तुझ्या पायाची देखणी । गुंडा इच्छितसे ध्यानीं ॥ ४

४८२ ] लहान ३७ आकाराचें [ १५०
बाड–पृ. सं. ६१ × ४ = २४४

( १ ) श्री श्लोक मनाचे–१ ते २०५. या मठांतील संग्रहांत मनाच्या श्लोकाच्या प्रति फार आढळतात, ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत आली च असेल. सर्व च या श्लोकाच्या बाबतींत एक गोष्ट या संग्रहांत पाहण्यांत आली पण आतांपर्यंत नमूद करण्यांत आली नाहीं, ती अशी कीं, या श्लोकांचा शेवट करतांना " इति श्री श्लोक मनाचे भक्तिज्ञानवैराग्यनिरूपणं संपूर्णमस्तु ॥ " असें बहुधा म्हटलेलें आहे.

( २ ) श्रीसमर्थ कृत करुणाष्टकांतील श्लोक

( ३ ) श्रीमत् दासबोधांतील कांहीं समास

( ४ ) पुढील दोन श्लोक पूर्वींच्या हि कांहीं बाडांत होते, पण त्यांचें महत्त्व लक्षांत आलें नव्हतें, म्हणून पूर्वी ते उतरून घेण्यांत आले नाहींत. पण ते वारंवार आढळतात, या हि बाडांत आहेत, तेव्हां ते एकवार देऊन ठेवणें आवश्यक वाटतें :

मानभट्ट सोनभट्ट दोघे भट्ट नष्ट हे ।
राष्ट्रमे उद्दंड कष्ट दाविले चि पष्ट हे ।
देवदास्य तें नसे चि घेति ते अपेक्ष हे ।
पारखें चि तें नव्हे कार्यनाश मूळ हे ॥ १ ॥
चंद्रभान आणि भान थो द्रव्यासि सांगवें ।
चित्रहाक तों मुके तों चयापुढें चि राहणें ।

आमची तुम्ही फिकीर ते कदा न वाहणें ।
अरण्यवास तो अम्हांस देवदास्य राहणें ॥ १ ॥

श्रीसमर्थांच्या पश्चात् केवळ गैरसमजुतीमुळें जो कलह उत्पन्न झाला होता तो विचारात घेता या दोन श्लोकांत इतिहास असल्याचा भास होत आहे.

४८३ ] महत्त्वाचें ३८ पुस्तकें [ २५०
लघु प्रकरणें

या पुस्तकांत कांहीं प्रकाशित आणि कांहीं अप्रकाशित अशा तत्कालीन लघु प्रकरणाचा संग्रह आहे. मागील बाडांक २९ हें टाकळी मठातील होतें. त्याची नोंद करताना म्हटलें होतें कीं, तशीं आणखी बरीं च प्रकरणें गहाळ झालीं असावींत. त्यापैकीं कांहीं या पुस्तकांतील प्रकरणें होत. टाकळी आणि इंदुर हे दोन्ही मठ उद्धवाचे च. तेव्हां कांहीं संग्रह टाकळीस राहिला व कांहीं इंदुरास आला, आणि कांहीं गहाळ हि झाला असेल.

( १ ) जुना दासबोध. मुखपृष्ठावर हें नाव दिलेलें आहे. या प्रकरणाला च एकवीससमासी म्हणतात. प्रकरण संपूर्ण आहे. पण त्यांतील समास ४, ५, ६, ८ आणि १९ हे समास मूळचे लिहिलेले नसून मागाहून लिहिलेले आहेत.

( २ ) मानसपूजा, ( ३ ) षड्रिपु,
( ४ ) अंतर्भाव, ( ५ ) आत्माराम,
( ६ ) पंचसमासी, ( ७ ) निर्गुणध्यान,
( ८ ) जुनाटपुरुषकथा, ( ९ ) बहुधा गोसावी,
( १० ) सरवदा, ( ११ ) पूर्वारंभ, तीन मतें
( १२ ) मानपंचक, ( १३ ) निःसंगनिरूपण, स्फुट समास
( १४ ) संसार सांकडीसाठीं । ओवीसंख्या २६
( १५ ) स्फुट प्रकरणें ४ थें व १४ वें
( १६ ) सकळ जीवाचें जीवन । स्फुट समास
( १७ ) विशेष स्मरणें देव । स्फुट समास
( १८ ) नाना पदार्थ नाना माया । स्फु. स. पहिला
सदा सकळांहुनी विशेष । स्फु. स. दुसरा

(१९) पंचाध्यायी-संस्कृत प्रकरण, हिला च दासगीता म्हणून म्हणतात. हिच्या अनेक ठिकाणीं अनेक प्रती मिळून हि फक्त चार च अध्याय सांपडतात, पांचवा सांपडत नाहीं. या प्रतींत पांचव्याला आरंभ करून त्याचे दोन श्लोक हि लिहिलेले आहेत.

वरील सर्व १९ प्रकरणें श्रीसमर्थकृत होत.

(२०) हनुमत्कवच-संस्कृत, श्लो. ११

(२१) शनिश्चरस्तोत्रम्-श्लोक २५

(२२) श्रीरामसहस्रनामस्तोत्रम्-श्लोक १२१

४८४ ]

३९

पृ. सं. १००, शिवाय १५० नष्ट [ ११५

(१) श्रीसमर्थ, नामदेव, तुका, केशव, मध्वमुनेश्वर, कबीर, चेंडा नारा, मुक्ताई, मोहनगीर, रंगनाथ, राघवदास, मानपुरी, गोसावीनंदन, शोघला, कोकिळ, चिन्मयनंदन, माळो इत्यादिकांचीं पदपदांवरें

(२) कोणी देवदासाचा दास श्रीपति यांचें एक सुंदर पद आहे. त्यांत साधुसंतांचा उल्लेख असल्यामुळें त्याला ऐतिहासिक महत्त्व आहे, पण दुर्दैव असें कीं कागदाची एक बाजु फाटली असल्यामुळें सर्व पद छापणें शक्य नाहीं. जेवढा भाग वाचतां येत आहे, तेवढा च येथें उतरून घेणें इष्ट वाटतें.

पद

पतितपावन देव दयाघन करुणासागरमूर्ति ।
+ + दासे देवदासाचा दास श्रीपति ॥ १

+ हलुगिचा सुतार गोदा । नित्य स्मर + + + दा । दीन बोधिले योधा । गायके मा + + धंदा । ब्राह्मणास पीठ घाटावे । मा + + सोनि अल्या साधुसि भेटावे । सप्रेम + + त्याचे चरणासि चाटावे । पिकलें सेत यात्रेकरी-हाते लुटावें । त्याकारणे विठ्ठलमूर्ति । माहातुंसि रुक्मिणीपति । अद्यापि हो मूर्ति पाहासी । अद्भुत जया + पि कीर्ति । अरण्यभेंडिसि पातला । तेथें भक्त सावता माळि देखिला । वक्षरवेश नामा हुन्डुनि दाविला । ढवळि मनला पुणे विठ्ठ बोलिला । तेथें फाडुनिया उदर । सांठविला विश्वंभर । अभिमानाचे भटे

सर्व हि तुटलें। सहित कटावरि करकासि कासिला पीतांबर। नामयासी भरल यारलें। भक्तीचे बळे ऐसे विचित्र घाटलें। सप्रेमेदर्शनें भेटि दिधलें विठलें ॥ २

उउळिचा कूर्मदास। हाता मारितो देशास। सख्या तुझी धरली कास। हरिभजनीं विश्वास। तयासी म्हणते पाये वो। येईं विठ (ल धा) उनि माझे माय वो। तयाकारणे देव धाउ (नि) जाय वो। अद्यापि लउळिं मूर्ति विठो (बाची) आहे वो। ऐसे पवाडे अनंत। भक्तकैवा (री भ) गवंत। इंदुरांत साळोपंत। त्याची वी (तिं) गाती संत। दासाचें यारी सकट। स + + मानुनि रूप धरितो विराट। सांडुनि (छ) ज्या करितो भक्ताचे कष्ट ॥ ३

भक्ता (सा) ठि माहार जाला। रसद नेली येद्राला। रक्षी दामाजीपंताला। अविंदासी जोहा (र के) ला। दासाचें संकट वारिलें। विठो नाईक नाम त्या नाहीं चोरिलें। धनाजाटाचें सेत जाउनि पेरिलें। तुळसीदासाचें देवें कर्ज हि वारिलें। ऐसी महिमा वर्णूं किती। जड चालवि-या भिंती। मुक्ताबाई महा सती। ज्ञानराज महामूर्ति। विप्राचा गर्व हरिला। करूनि टीका अज्ञान लोक तारिला। नामस्मरणें अवघा संशय वारिला ॥ ४

निजभावें तुकितां तुका। अगोचर ब्रह्मादिका। देवाचा जो माणसला। का रि न चुके चि चुका। जळीं कागद कोरडे। वेदांतवाणी अभंग केले सावडे। कीर्तनीं वार्ता लागली देवासी गोड। देहासगट गेले गर्जत पवाडे। गोऱ्या कुंभाराचा भाव। मडकें घडित असे देव। जो का वैकुंठीचा राव। केव्हडी तयाची माय। कबिराचि + + के विनिवेतुबिरातानादासाचे सेव्द + + मळे। मानुनिया अमृतसागरीं ना + + +। संत निर्वाणीं ऐसे बहुतेक तारिले। नारायेणाचा धीरंग अद्भक्ताई अभंग। साक्षात्कार पांडुरंग। अनाथनाथ (प) तितपावन देव दयाघन करुणासागरमूर्ति जालासा देवदासाचा दास श्रीपती ॥ ५

(३) तशी च एक संतनामावळी आहे. ती तर ज्यानीं गायिली त्याचें च नाव पाटण्यात गेलें आहे. 'ममुताचो वाणी' अशीं अक्षरें आहेत जयरामसुताची म्हणून ती प्रसिद्ध च आहे.

## संतनामावली

हरिजन हे हरिगुरभजनें जन तारून आपण तरले ।
निजभक्त सुरें धववरले ॥ ध्रु०

तारक मार्ग दाविती लोकां । बोधें हरिती भेदभयशंका ।
जे संसारसागरीं नौका । नामें पावन त्यांचीं ऐका ॥

ब्रह्मा शंभु कुबेर प्रभंजन । इंद्र चंद्र यम भास्कर । पावक वाग्पति वरुण वशिष्ठ । परास ( र ) वाल्मिक । व्यास महाकवि । गौतम विश्वामित्र अगस्ति भार्गव । ऋषभदेव सनकादिक नारद । कपिल दाल्भ्य । कश्यप । अस्तिक । शु ( क या ) मदेव । श्वेतदेव शमिक । जडभरत द + + ऋषि । याज्ञवल्की । भृगु भारद्वाज । उप ( मन्यु ) कर्दम । पुंडरीक मुनि । मुद्गल कवि । हरि अंतरिक्ष पिप्पलायन । आविर होत्र । ( प्रबुद्ध ) चमसकरभाजन । द्रमिळ अत्रि । मैत्रेय + शौणिक शुकदधी । मार्कंडेय ध्रुव + + + वासदेव । द्विजसुदेव । संजय जयमि ( नी वै ) शंपायन । पड्मुज हरिश्चंद्र । मुक्ष + + मक चंद्रहास्य मुचकुंद मनो । ध्रुव श + + से । पृथु लक्ष्मण । गुहक भरत । भक्त रु ( क्मां ) गद । धर्मांगद । सुग्रीव । बिभीषण । जांबुवंत । + + + त । सुदामा जनक । बलि प्रल्हाद अजामेळ गणिका गरुड गजेंद्र पिंगळा विदु व्याध गंगासुत अर्जुन । धर्म भीम सहदेव । सुभद्रा नकुळ प्रिया गोपाळ । गोपिका उद्धव यद अक्रूर । परीक्षिती । दारा श्रियाळ । जटायु । (जा) नकी । सर्वांनिसेवर । अनसूया । सरस्वती । भागीरथी । मैत्रेय कमळज्या । अहिल्या अरुंधती । मध्यावळि । त्रिजटा । देवहुति । पांचाळी । रुक्मिणी । राधा ऋषिपत्नी । चंद्रावळी । उग्रश्रवसन वसुदेव देवकी कुब्जा नंद यशोदा ॥ १ ॥

जाले नित्य मुक्त निजज्ञानें । डावले बोधसुधारसपानें ।
वजिले कामक्रोध अभिमाने । त्यांचीं परिसावीं अभिधानें ॥

श्रीशंकराचार्य जगद्गुरु । भास्कर श्रीधर । मदसुदन हस्तामल मुकुंदराज नृप जैतपाळ । ज्योतिरानंद । मच्छींद्र मी ( न ) गोरक्ष भर्तृहरि । सदानंद येनी । चैरंगी ( क ) ज्ञानद्वयपावन । मध्वमहामुद्गल । नाराय ( ण ) श्रीनिवास । जयदेव निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान ( चां ) गया । मुक्ताई रेवणसिद्धेश्वर । मरळ सिद्ध ( जा ) लंदर । अच्युत दामोदर सारंग । सरस्वती ( नर ) सिंह । वडवानळ वटेश्वर । संतिदास । + + + + साळया । निर्पटचर्पट । चांग वोधला ( नर ) हरि घ ( रस ) अवाका । परमानंद विसोबा ( खेच ) र नामदेव हरिदेव भागवत परिसा + + ( पा ) ठक नामा । सिदीकार गोविंदा साव ( ता चोखा ) मेळा । पिसा वहेरा । जनामित पुरंध

( र वि ) दछ गोरा कुह्ळ । सेना कूर्मदास हरि + + + न्हया मलुकदास रोहिदास । त्रिलोचन + + + नरहरि सोनार । छतिका धना ज्याठ + + + महुर दामा । रामानंद उद्दासी । ना ( नक स ) हजानंद कबिरा । कमाल किसोर स + । सुरदास सुधवा तुळसीदास । पेपाजिसज्जन रामदास यशवंत वाजिदा । दाहुसेन सेना माधव । मासन प्रेमानंद । मदुळसा का ( न्हो ) पात्र । मिरा हरि । कृष्णा जनी यहेणी कर्मा ( ई ) ॥ २

> कोणही महानिष्ठ गुरुभजनी । योगी वीतरागी रत सगुणीं ।
> भाऊकनामकीर्तन मौनी । सज्जन श्रवण करावें श्रवणीं ॥

कनकदास अज्ञानसिद्ध । मायेश रेणुकानंद मौनी भानुदास विख्यात जनार्दन । येकनाथ गुरु गुरुभक्त रामया । पुरुषोत्तम लीला विश्वंभर । चिंतामणी । मुक्तेश्वर । मुद्गल कृष्णदास भवधूत दिगांबर । दासोपंत रमावल्लभ एोळिंबराज सतोपनिश्वरा । गंगाधर कोनेर । मुरारी शांतलिंग । श्रीकृष्ण योगिया । कृष्णदास जयराम तुकोबा रामदास आनंदमूर्ति । मल्हारी पूर्ण शिवराम योधला रघुपति । नागनिरंजन । केशव वि ( श ) नाथ । वामन विठ्ठल कवि रंगनाथ । कल्याण चंद्र । सखा मानपुरी । रुक्मणा चिद्धन । रामकृष्ण वासुदेव । माधव तुकयाबंधु । कुमार + + + न मध्वमुनेश्वर । निरट निरंजन पंढरीचा ( प्र ) ल्हाद । साधु जयराम । कासी गोसावीनंदन । कृष्णदयार्णव । हरि नारायण । राघवचिद्धन । ( श्री ) धर गुरु गोपाळ । अनंत महंत असे । बहुत + + जगी । किती गुप्त प्रगट जड मूढ पिशाच्च + + उन्मत्त विदेही । निरंकुश वर्णियले हरि + + ( च ) तुर्विध मुक्त विरक्त । मुमुक्षु उपासक । + + + णि जाले भगवत्पर । जात विजात म्हणोनि + + + ण पावन हे । सुष्ट ते सुकृते तेथें गात अ ( से ) ( जयरा ) मसुताची वाणी ॥ ३

हरिजन हरिभ ( ज ) ने तारून आपण तरले ।
निज गुरुभक्त ( मुखें अ ) वतरले ॥ ध्रु०

४८५ ] ४० [ १००

किरकोळ बाड

पूर्वारंभ—अपूर्ण

४८६ ] ४१ [ १००

किरकोळ बाड

श्री श्लोक मनाचे—१ ते २०५

४८७ ] दुर्दशा ४२ पावलेलें [ १३५
बाड–पृ. सं. ३८ × २ = ७६

( १ ) उद्धवचिद्घन, आनंदसुत, मध्वमुनेश्वर, अमृतेश्वर, केशव, तुकाराम, वामनात्मज, चिन्मयनंदन, मीराके प्रभु गिरिधर नागर, जनी, नारायणात्मज, विष्णुदासनामा, वामन, चिन्मय माधव, इत्यादिकाचीं पदपदार्तें

( २ ) शिवराम कृत समश्लोकी महामुद्गलविरचित आर्या–श्लोक १०८ ( बाडाक ४७१ पहा )

( ३ ) श्री श्लोक मनाचे–१ ते २०५

( ४ ) वामन कृत गोपीगीत–श्लो. ५१

( ५ ) शिवराम कृत बोधवासष्टी ( बाडाक ४४७ पहा )

( ६ ) जयरामसुत कृत वस्त्राभरण

( ७ ) अमृतेश्वर कृत द्रौपदीचा धांवा व सुदामचरित्र

( ८ ) नारदीयपुराणे हरिस्तोत्रम्

४८८ ] ४३ [ २००
महत्त्वाचें बाड पृ. सं. ११७ × ४ = ४६८

( १ ) श्रीसमर्थ कृत माहिम्नाचे श्लोक, कांहीं आरत्या, पदें, अभंग, अष्टकें, हुकमार्णी ( येथा हनुमंतवीर विख्यात। व। हनुमंतानें स्तुति केली ), मनाचे श्लोक ( भक्तिज्ञानवैराग्य निरूपणपर ) व ग्रन्थराज दास-बोधांतील पाच पचवीस समास. यांत कांहीं कविता नवीन होती, ती निराळी उतरून काढली.

( २ ) भावार्थरामायणातील कांहीं प्रसंग ( बा. ४७८ पहा)

( ३ ) श्रीधर कृत पारधीकथा ( बाडाक ४७८ पहा )

( ४ ) विष्णुदासनामा कृत उपमन्युचरित्र–ओ. ३७

पार श्रीहरि कृपाळु । भक्तांलागीं स्नेहाळु ।
पायरा न करी वेळु । स्मरणमात्र पेठिया ॥ ३६
विष्णुदास नामयाचा स्वामी । अखंड स्मरावा अंतर्यामीं ।
भेटी देईल ये च जन्मीं । ध्यान येथ न विसंबतां ॥ ३७

( ५ ) वेणीस्वामी कृत फील

( ६ ) वारी औषधें व गोपालनंदन, केशव व जनार्दन यांचीं पदें.

सदा माझा राम धरा रे धरा । सप्रेमें हृदयीं धरा ॥ ध्रु०
राम सुखाचा धडमी साचा । जर शिवाचा स्मरा ॥ १
जनार्दनाचा स्वामी त्रियाचा । नाथ रमेचा सारा ॥ २

## ४८९ ] ४४ [१५०

पृ. सं. २३ × ४ = ९२, ५।१० नष्ट

*श्रीसमर्थ आणि तुकाराममहाराज या प्रत्येकाचे पांच पन्नास अभंग, जनाबाईचे दोन, मध्वनाथांचे कांहीं व केशवाचे कांहीं*

## ४९० ] ४५ [१००

पोथी–पत्रसंख्या २६

केशवकृत श्रीएकनाथचरित्र–अध्याय २२, २३, २४ व २५. भागवतावर एकनाथांनीं मराठींत टीका केल्याचा घोर अपराध केल्याची वार्ता लागून शासनार्थ नाथांना काशीहून आलेलें बोलावणें, त्याचे काशीस जाणें, त्यांची कृति पाहून उलट तेथील पंडितांचें त्यांना च शरण येणें, गंगेनें नाथभागवत तारणें, भागवताची हत्तीवर सात दिवस मिरवणूक निघणें, नाथांचें पैठणास परत येणें, इत्यादि नाथभागवताच्या अपूर्व गौरवाचा कथाभाग या चार अध्यायांत असल्यामुळें तेवढे च चार अध्याय कोणी उतरले असावेत.

## ४९१ ] ४६ [१५०

पोथी–पत्रसंख्या ३२

ब्राह्मण मुंबोजी कृत प्रकाशदीप. पहिल्या च पृष्ठावर ग्रन्थाची ओवीसंख्या १/४०० व पत्रसंख्या १/४० अशीं दिलेलीं आहेत. ग्रन्थाचीं प्रकरणें पांच असून या पोथींत पहिलीं फक्त चार च प्रकरणें आहेत. शेवटचीं ८ पत्रें म्हणजे पांचवें प्रकरण हरवलेलें दिसतें.

## ४९२ ] ४७ [२००

पोथी–पत्रें ४३

मुकुंदराजविरचित परमामृत–ग्रन्थसंख्या ३२५. पहिलीं दोन पत्रें हरवलीं आहेत. मधून मधून पत्रें फाटलीं आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| ( १३ ) घडपना हे परा वाचा । | मं. सं. ५, | स्फु. प्र. | २७ |
| ( १४ ) संगीत गायनी विद्या । | ,, १२, | ,, | ३९ |
| ( १५ ) देहेंदेवाळ्यामध्यें । | ,, ३०, | ,, | ६८ |
| ( १६ ) विवेकें निश्चळ जाला । | ,, ९, | ,, | २९ |
| ( १७ ) आमुची बोळी देवाची । | ,, ३२, | ,, | ५५ |
| ( १८ ) श्रीराम देव देवांचा । | ,, ९, | ,, | ६४ |
| ( १९ ) दुखदारिद्रउद्वेगें । | ,, ५७, | ,, | ६७ |
| ( २० ) देसिली तुळजामाता । | ,, ११, | ,, | ३३ |

स्फु. प्र. ३३ तील बारावा श्लोक मागाहून समासात लिहिला आहे, अशी टीप तिसऱ्या भागांत आहे, तो श्लोक या पोथींत नाहीं.

| | | | |
|---|---|---|---|
| ( २१ ) रामदासें भक्तयोगें । | | | |
| ( २२ ) गिरीचें मस्तकीं गंगा । | ,, १०, | ,, | ६६ |
| ( २३ ) जगदात्मा जगदेश्वरी । | ,, ११, | ,, | ३२ |
| ( २४ ) जगदीश जगदात्मा । | ,, १०, | ,, | ५६ |
| ( २५ ) घरजा देवाळयें गुफा । | ,, १४, | ,, | ५७ |
| ( २६ ) आधारें दिसती नाना । | ,, २०, | ,, | ५९ |
| ( २७ ) गणेश पुजाचा आधीं । | ,, ११, | ,, | ६० |
| ( २८ ) संसारीं घातऊं कोणें । | ,, १५, | ,, | ६२ |
| ( २९ ) फिरणें बहुता ठाईं । | ,, १३, | ,, | ६३ |
| ( ३० ) बुद्धि नाहीं बुद्धि नाहीं । | ,, ५, | ,, | ४२ |
| ( ३१ ) नेणती जन्मलों आम्ही । | ,, २०, | ,, | २३ |
| ( ३२ ) धन्य ते धजनी माता । | ,, २४, | ,, | ४ |
| ( ३३ ) भीमरूपी महारुद्रा । | ,, ११, | ,, | ४३ |

हें स्तोत्र प्रख्यात आहे, सर्वांच्या पाठांत असतें, तें इतरत्र प्रकाशित आहे. पण आपणांत अजून तें प्रकाशित करावयाचें आहे. तें येथें च देण्याचें मनांत येतें :

भीमरूपी महारुद्रा । वज्र हनुमान् मारुती ।
वनारि अंजनीसुता । रामदूता प्रभंजना ॥ १

महाबळी प्राणदाता । सकळां उठवी बळें ।
सौख्यकारी शोकहर्ता । धूर्त वैष्णव गायगु ॥ २

दीनानाथा हरिरूपा । सुंदरा जगदांतरा ।
पाताळदेवताहंता । भव्य सिंदुरलेपना ॥ ३

लोकनाथा जगन्नाथा । प्राणनाथा पुरातना ।
पुण्यवंता पुण्यशीळा । पावना परतोषका ॥ ४

ध्वजांगें उचले बाहो । आवेशें लोटला पुढें ।
काळाग्नी काळरुद्राग्नी । देखतां कांपती भयें ॥ ५

ब्रह्मांड माईल नेणों । आवाळें दंतपंगती ।
नेत्राग्नी चालिल्या ज्वाळा । भ्रुकुटी ताहाठल्या बळें ॥ ६

पुछ तें मुरडिलें माथा । किरीटी कुंडलें बरीं ।
सुवर्ण कट कासोटी । घंटा किंकिणी नागरा ॥ ७

ठकारे पर्वता ऐसा । नेटका सडपातळु ।
चपळांग पाहातां मोठें । महा विद्युल्लतेपरी ॥ ८

कोटिच्या कोटि उड्डाणें । झेंपावे उत्तरेकडे ।
मंद्राद्रि सारिखा द्रोणु । क्रोधें उत्पाटिला बळें ॥ ९

आणिला मागुता नेला । येत आला मनोगती ।
मनासी टाकिलें मागें । गतीसी तुळणा नसे ॥ १०

अणुपासूनि ब्रह्मांडा । येवढा होत जातसे ।
तयासी तुळणा कोठें । मेरु मांदार धाकुटे ॥ ११

ब्रह्मांडा भोंवते वेढे । वज्रपुछें घालूं सके ।
तयासी तुळणा कैंची । ब्रह्मांडीं पाहातां नसे ॥ १२

आरक्त देखिलें डोळां । गिळिलें सूर्यमंडळा ।
वाढतो वाढतां वाढे । भेदिलें शून्यमंडळा ॥ १३

भूतप्रेतसमंधादि । रोग व्याधी समस्त हि ।
नाशती तुटती चिंता । आनंद भीमदर्शनें ॥ १४

हे धरा पंधरा श्लोकीं । लाभली शोभली बरी ।
दृढ देहो निःसंदेहो । संख्या चंद्रकळागुणें ॥ १५

रामदासीं अग्रगण्यु । कपीकुळासी मंडणु ।
रामरूप अंतरात्मा । दर्शनें दोष नासती ॥ १६

---

१ ' भलीं ' पाठांतर

( ३४ ) कोपला रुद्र जे काळीं । अं. सं. ६, स्फु. प्र. ११ वें
( ३५ ) माझें माझें तुझें माझें । „ १२ „ ७
( ३६ ) देहाचा भरंवसा नाहीं । „ ११ „ ९
( ३७ ) स्वर्गीचें सुख तें किती । „ ५ „ ८
( ३८ ) जनांत दिसते काया । अंतरें मार्ग सूचिला ।
ब्रह्मांडा घडता मेळा । राहिला तो निरंजनीं ॥ १
निर्गुणी येकला जातो । जातो येतो पुनः पुन्हा ।
भूमिका ते गतायाता । अध्यात्मीं बोलिलें असे ॥ २
प्रपंचीं दुःख तें मोठें । निर्गुणी लीन होतसे ।
विश्रांती पावते तेथें । भूमिका ते सुखीनता ॥ ३
साधनें बोलिलीं नाना । इत्यादि भूमिका धन्या ।
विचारें हेत तुटवा । हें मुख्य धर्म जाणिजे ॥ ४
घडेना धर्म जो ठाईं । तो कर्म सुकतें करें ।
सर्व संग सुटे ज्याला । त्याला तो योग साधला ॥ ५
( ३९ ) येकला सर्व कर्ता जो । प्र. सं. ४, स्फु. प्र. १६ वें
( ४० ) पोळली मस्त मस्तीचा । „ ६, „ १० वें
( ४१ ) तुतें व आसलों ठाउें । „ १० „ १२
( ४२ ) धारा धारा धरा धारा । „ ८ „ १३
( ४३ ) चंदनें चार्चिला देहा । „ २ बाडांक २५७ पद्य
( ४४ ) सुकतां होतसे वाला । „ ११ स्फु. प्र. १४
( ४५ ) धन्य कर्तार तो गेची । „ ११ „ १५
( ४६ ) आर्त तें तूतें तुतें हो । „ २२ „ ११
( ४७ ) स्नान संध्या टिळे माळा । „ १३ „ ५२

४९८ ] ५५ व ६८ [ २००
पोथ्या–पानें अनुक्रमें १४ व १३

श्रीसमर्थ कृत मानसपूजा–दोन प्रती. दुसऱ्या प्रतींतील पहिला समास नाहीं.

४९९ ] ५६ [ २००
पो. पत्रसंख्या ६

श्रीसमर्थ कृत चतुर्थयोग. मालेंतील तिसऱ्या भागांत हें प्रकरण छापलें आहे. तेथें त्याचें चतुर्थमान असें नांव दिलेलें आहे.

५०० ] ५७
पोथी—पत्रें ३८ ते ४८ = ११ [१००

बाडांक ४९७ चीं पत्रें ३७ आहेत. त्याच्या पुढचा अंक या पोथीच्या पत्रांना दिलेला आहे. त्यात फुटमानें ऊर्फ स्फुट प्रकरणें आहेत, तीं च या पोथींत पुढें चालू आहेत. त्या पोथीचें अक्षर आणि या पोथीचें अक्षर मात्र निरनिराळें आहे. या पोथींत असलेल्या मानाचा क्रम त्या बाडांकातील मानाच्या पुढें च चालू.

(४८) महती सुखाची नाहीं । येथें दुख उदड हि ।
उदड दुख लोकांचें । ऐकतां ऊर फुटतो ॥

लोक हे विकारी नाना । फार अन्याय वर्तती ।
पाहावें तं किती डोळां । ऐकावें श्रवणें किती ॥ २

क्षमितां ऊर तो दाटे । बोलतां वाणि खुंटते ।
सर्व्हीं ते मस्त मस्तीनें । वळितां वळती च ना ॥ ३

वळितां दुख मानिती । अन्यायें घात वेणती ।
सांगतां हित वाटेना । ऐकतां त्रास मानिती ॥ ४

झळणिती चंचणिती । फफणिती हटें हटें ।
हटें ते उद्धट होती । आपशुद्धी असेचिना ॥ ५

उद्धटें वर्तती क्रिया । उद्धटें शब्द बोलती ।
उद्धटें नास्ति मर्यादा । उद्धट नास्ति नम्रता ॥ ६

उद्धटें गर्व वर्तांवा । उद्धटें प्रीति नासती ।
उद्धटें आर्त सोडिती । उद्धटें प्रीति खंडिती ॥ ७

अखंड सर्व सोसावें । भलेपणाची कारणें ।
परंतु सुख तों नाहीं । कांहीं कांहीं क्वचित हि ॥ ८

क्षीण उदड होताहे । नेणत्या संगतीगुणें ।
जाणता संग भेटेना । दुःकाळ पडिला गमे ॥ ९

सज्जनें काये करावें । लोक मोठा अनावर ।
कीं त्यासी काय सांगावें । मनोतून कळेचिना ॥ १०

सज्जनीं फारसी निष्ठा । देव त्यासी च बोळतो ।
अन्याय वर्ततो सो तो । भ्रष्ट होतो अनावर ॥ ११

(४९) आरंभीं जन्मला प्राणी । ग्रं. सं. २०, स्फु. प्र. ४९
यांत हि या मानाचें इहलोकविवेक असें नांव दिलेलें आहे.

(५०) संसारीं वाढला प्राणी । ग्रं. सं. १०, स्फु. प्र. ४७
याचें नांव परलोकविवेक दिलेलें आहे.

(५१) फटफटी घटघटी प्राणी । ,, ११ ,, ५१
या मानाचे अकरा श्लोक आहेत, पण स्फु. प्र. ५१ त पहिले सहा च दिलेले आहेत. बाडांक १२६ पहा, त्यांत पुढचे पांच श्लोक दिले आहेत. पण सातव्या श्लोकाचीं पाहिलीं दोन चरणें

स्नान संध्या शुचि नाहीं । देवधर्म असेचिना ।

अशीं त्या बाडांत आहेत, त्या ऐवजीं या पोथींत तीं

तीर्थ नाहीं यात्रा नाहीं । नाहीं कथानिरूपण ।

अशीं आहेत. या पोथींत या मानाचें नांव " व्यर्थजन्म मान प्रथम " असें दिलें आहे. मागील बाडांक २५७ हि पहावें.

(५२) स्नान संध्या टिळे माळा । ग्रं. सं. ११ स्फु. प्र. ५९
या मानाचें नाव " धन्यजन्म मान द्वितीय " असें दिलेलें आहे.

(५३) मायाची माय तीची हि । ग्रं. सं. ६ स्फु. प्र. ४८

(५४) धमाचें सुख तें किती । प्रत्यक्ष पाहातां नसे ।
लागेना विषयो तैसा । देहे हा हि लगेचिना ॥ १

असोसी राहते पोटीं । ते चि जन्मासि कारण ।
असोसी सोसवेना रे । ध्यानीं देव धरा धरा ॥ २

ध्यान तें निर्गुणालागी । सगुणें दुख होतसे ।
सुख दुख नसे जेथें । मन तें शोधितां थरें ॥ ३

कल्पनातीत तो देवो । कल्पितां कल्पना नसे ।
उरेल तें सार जाणावें । आणावें प्रत्ययांतरीं ॥ ४

(५५) काळिका काळरात्री ते । काळ घाला संहारची ।
कुमारी दैत्य मारीते । कुळदेव्या सुमंडळीं ॥ १

खेचरी खेळवी लोकां । खड्गखेटकधारिणी ।
खुंटला यत्न लोकांचे । ते काळीं रक्षिते बळें ॥ २

गोंदळीं नाचती गावी । गुंतला लोक उगवे ।
गंगा भागीरथी माता । गांजितां धांवते बळें ॥ ३

घे घे घे दैत्य घेताहे । अघोरा घोररूपिणी ।
घुमारें घुमवीताहे । घोरसेघोनकारणी ॥ ४
चंचळा चपळा देव्या । चमके सचराचरीं ।
चुकवी लक्ष चौऱ्यासी । चालते पुरुषाकृती ॥ ५
चुकतां घालिते किती । तुझे राजे महाबळी ।
काकुस्थवरदा देव्या । इच्छिलें पुरवीतसे ॥ ६
जननी जान्हवी माता । जुनाट जगदेश्वरी ।
जुंझार जुंझतां मोडी । पाडिते संकटीं सदा ॥ ७
झटाळा दारुणी झोले । झोटिते बहुतांपरी ।
त्रैलोक्य झुलवीताहे । झोळें नेणती सुरें ॥ ८

(५६) माय तूं बाप तूं बंधु । गण गोत समस्त हि ।
तुजवीण मला नाहीं । भवानी भक्तवछ्ळे ॥ १
विदेशीं येकला आहे । तुजवीण निराश्रयो ।
कृपेनें सर्व सांभाळी । भवानी भक्तवछ्ळे ॥ २
संकटें वारिलीं नाना । वाढविलें परोपरीं ।
नेणतां चुकलों तुला । भवानी भक्तवछ्ळे ॥ ३
इछिलें पुर्विलें सर्व । कामना मनकामना ।
संकटीं रक्षिलें माते । भवानी भक्तवछ्ळे ॥ ४
त्रास मी पावलों तुझी । दास मी कष्टलों बहु ।
आनंदी नांव राखावें । भवानी भक्तवछ्ळे ॥ ५

(५७) व्याघ्र चोर भुजंगाचें । भय अत्यंत वाटतें ।
संकटीं पावते माता । भवानी भयनाशनी ॥ १
भूतप्रेतसमंधादि । देवतें बहुतांपरी ।
अंतरीं चिंतिजे माता । भवानी भयनाशनी ॥ २
गुप्त उद्वेग चिंतेचा । अंतरीं कातरा पडे ।
ते काळीं आठवावी ते । भवानी भयनाशनी ॥ ३
संसारीं वर्ततां धोके । वाटती बहुतांपरीं ।
दयाळु आठवा ध्यानीं । भवानी भयनाशनी ॥ ४
दयेनें पुर्विलें सर्वे । दासाची मनकामना ।
प्रचीती रोकडी आतां । भवानी भयनाशनी ॥ ५

(५८) कालिका कालिका ऐसें । ऐकिलें बहुतांपरीं ।

प्रलयी सांगती मोठा । पुरवी मनकामना ॥ १
उदंड ऐकिली कीर्ति । मूर्ति फार पराक्रमी ।
चित्त हें वेधलें माझें । पुरवी मनकामना ॥ २
प्रचीती रोकड्या येती । लोक कल्याण पावती ।
उभाउभी चमत्कारें । पुरवी मनकामना ॥ ३
फांकली कीर्ति ते मोठी । उदंड विश्वतो सुखी ।
धन्य धन्य जगन्माता । पुरवी मनकामना ॥ ४
सानीध्ये पावलों तुझे । चिंतितां पावसी वळे ।
आश्चीर्य वाटलें मोठें । पुरवी मनकामना ॥ ५
मनांत चिंतिलें जाणे । युग युगेंसि चालली ।
खरें चि सांगती सर्वे । पुरवी मनकामना ॥ ६
पूर्वीसी राहणें तुझें । पूर्ण सामर्थ्य घेतलें ।
पूर्व पुण्य फळा आलें । पुरवी मनकामना ॥ ७
आपुली कीर्ति सांभाळी । अद्भुत करणी करी ।
आनंदरूप तू माता । पुरवी मनकामना ॥ ८
दास मी रघुनाथाचा । सामर्थ्ये तुज बोलिलों ।
न्यून्य पूर्ण क्षमा कीजे । पुरवी मनकामना ॥ ९

( ५९ ) सर्वारंभीं सुळारंभीं । प्र. सं. १२, रकु. प्र. ५१ वें
( ६० ) याउली याउली माता । ,, १४ ,, ३७
( ६१ ) प्रपंचीं आसुचि कुळीं । ,, २० ,, ३६

# ५०१ ] ५८, ५९, ६०, ६२ [ २००
पत्रें अनुक्रमें ५, ४, ७, १४

( १ ) श्रीसमर्थ कृत बहुधा गोसावी–ओ. ७०
( २ ) श्रीसमर्थ कृत जुनाट पुरुषाची कथा–ओ. ५७
( ३ ) श्रीसमर्थ कृत अंतर्भाव–ओवी ११४, या प्रतींतील ५ व ६ वें अशीं दोन पत्रें नाहींत.
( ४ ) श्रीसमर्थ कृत आत्माराम–संपूर्ण

# ५०२ ] ६१ [ २००
पत्रें ७

( १ ) श्रीसमर्थ कृत इमारतीचा समास–ओ. २६

( २ ) श्रीसमर्थ कृत कारखाना-समास १ व २, ओ. १२ + १२

( ३ ) श्रीसमर्थ कृत बागेचा समास-ओ. ३१.

एक गोष्ट लक्षांत घ्यावयाची अशी कीं, श्रीसमर्थ प्रसंगोपात्त जे स्फुट समास लिहित त्यांचा शेवट हि बहुधा ' इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अमुक निरूपणं नाम समास ... ' असा करण्यांत येत असे. वरील बागेच्या समासाचा शेवट केला आहे तो : ' इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे । वनकरी निरूपण नाम समास येक ॥ १ ॥ '

५०३ ] ६३-६४ [२००

पत्रसंख्या अनुक्रमें १६ व ५

( १ ) श्रीसमर्थ कृत सप्तसमासी. हें प्रकरण अजून कोठें च छापलें गेलें नाहीं. मालेच्या अकराव्या भागांत तें छापण्यांत येईल च.

( २ ) पंचीकरणयोग. तिसऱ्या भागांत हें प्रकरण छापलें आहे, पण तेथें प्रत्येक योगाचें निरनिराळें नांव दिलेलें नाहीं. या पोथींत तीं नांवें दिलेलीं आहेत तीं, ( १ ) अंतर्कळायोग, ( २ ) ज्ञानयोग, ( ३ ) पिंडतत्त्वयोग, ( ४ ) ब्रह्मांडतत्त्वयोग व ( ५ ) स्वरूपनिर्णययोग, अशीं आहेत.

५०४ ] ६५ व ७२ [२५०,१५०

प. सं. अनुक्रमें ८ आणि १४

श्रीसमर्थ कृत निर्गुणध्यान-दोन प्रती, एक तत्कालीन आणि दुसरी नंतरची.

५०५ ] ६६ व ६७ [१५०

समासाचें नांव लिहून त्याचा स्वतंत्रपणा दाखविला आहे.

क्रमांक ८० चा शेवट 'इति श्रीदासबोधे । गुरुशिष्यसंवादे । नाना अनादि । निरूपण नाम । समास येक ॥ १ ॥' असा केला आहे.

त्यामुळें हा प्रत्येक समास स्वतंत्र आहे असें वाटून प्रत्येकास निराळा क्रमांक मिळाला. पण आतां हे उघड झालें आहे कीं, हे समास सप्तसमासी या प्रकरणाचे अनुक्रमें ३, ७, २, ६, ४ असे समास आहेत.

श्रीसमर्थ प्रसंगोपात स्फुट समास सांगत त्या वेळीं प्रत्येकाचा शेवट "इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे" असा च करीत याचा हा आणखी पुरावा होय.

५१० ]

७८

दोन पत्रें [२००

'इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे । देहात्मयोग नाम समास पहिला ॥ १ ॥' हा हि समास वरील पांच समासांच्या संगतींत होता, पण त्यास कोणत्या एकाद्या प्रकरणांत स्थान मिळालें आहे, असें वाटत नाहीं. तो स्वतंत्र च राहिला आहे. ग्रन्थराज दासबोधांत देहात्मयोगाचा विषय एक दोन समासांत आहे. पण त्याहून हा समास निराळा आहे.

५११ ]

८१

गळांठा [१००–२५०

(१) अन्वयव्यतिरेकाचीं कांहीं पानें. त्यांत 'श्रीमत् रामदासविरचित' असें म्हटलेलें आहे. विचार करणें, (२) निर्गुणध्यानाचीं कांहीं पानें, (चतुर्थयोग, पचीकरण योग, पंचसमासी, यांचीं कांहीं पानें, (४) पुन पुरुष, (५) रुक्मांगदाख्यान–संपूर्ण, ओवीसंख्या १६७, (६) दासबोध ष्टक, (७) राघोबाची भक्ति । ज्ञानाचें मंडण ॥ (८) रंगनाथकृत या नरदेहीं तरी च यें रे । (९) येकनाथकृत खेळे चिमणा घेटनि चं चिमणासा दांड । (१०) जुना दासबोध–पहिला समास, (११) शिवरामकृत पद तेतिस कोटीच्या सुरनरा । तुमचा आधार प्राणेश्वरा । रात्रंदिवस गंगाधरा । नांव पचणाचें घेता ॥ शंकरा मज हि सांगा बोलवि आदिमाता । शांभवा मज हि सांगा बोलवि आदिमाता ॥ ध्रु० ॥ ... (१२) मनाच्या श्लोकांची पोथी, (१३) तुळशीच्या बारा प्रदक्षिणा–पहिली करूं प्रदक्षिणा । हरिस घाटे माझे मना । पाप होतसे खंडणा । दोष माझे हरवील ॥ १ ॥ दुसरी करूं प्रदक्षिणा । इत्यादि, (१४) स्फु. प्र. ४ थें–नेणवां जन्मलों आम्ही ॥

( १५ ) निवक कृत–रामचंद्र चतुराक्षर मधुळ मंत्र जपा वदनीं । पाप ताप भय नासुनि सर्व हि पावेवि निजभुवनीं ॥ ध्रु० ॥ ( १६ ) कागदाचा एक तुकडा, वरचा कांहीं भाग उडाला, शिल्लक आहे त्यांत–मागे पुढें मारुती । मध्यें हा करुणानिधी विलसतो श्रीराम सीतापती ॥ १ ॥ शिवमानस-आराम तो हा दाशरथी राम जनीं वनीं पूर्णकाम मध्यभागीं शोभतो। रामनवमीची धमंड येथ होतसे प्रचंड यात्रा मिळते उदंड धींग फार माजतो । मिळतातो संत जन कथा होतसे गहन जेथ वाटे समाधान नयनासी पारणें । धन्य धाकळ सुग्राम तेथ माझा राजाराम निंबकाचें पूर्णकाम राम राम बोलणें ॥ २ ॥ ( १७ ) कोणा दीन स्मर्त्यांचीं दोन पदें, ( १८ ) रुक्. श्लो. ५२, ( १९ ) चिदिनकृत–रामदास सद्गुरु अविनाशी हर्दमरणें जरना ॥ ( २० ) नरसिंह म्हणून या मठाचे एक अधिपति होऊन गेले त्याचे अष्टक यो रामदासगुरुराजपदारविंद्रसामृताबुधिनिमग्नविशुद्धचेताः । श्रीचंद्रनाम-नगरस्थमठे निवासी त नारसिंहगुरुराजमहं भजामि ॥ १ ॥,

( २१ ) राम नाम बोल तूं वाणी ॥ ध्रु ०

घेउनी संतारा मांडुनि पसारा । भीषण नर्कांची खाणी ॥ १

साधूचा शेजार करनि साचार । रामध्वनी पडो कानीं ॥ २

रामदासस्वामी मोहन सुंदर । लाविले सदळ हि ध्यानीं ॥ ३

( २२ ) कोणा सयदुल्लाचें एक पद आहे—दुनिया रंगी दुनिया ढंगी दुनिया है दो रंगी । सयदुल्ला भवकर बोले दुनिया है बहुरंगी ॥ ६ ॥,

( २३ ) रमता नाथ फकीर वो दिन याद करोगे ॥ ध्रु०

छोटी तुबा लिये बगलमो । तीन लोक जाहगीर ॥ १ ॥ कौ०

माला मुद्रा कयाधारी । हातोंमे ज्ञानमंदिर ॥ २ ॥ कौ०

रामदास प्रभु भजन करत हाय । बाजेत ढोल मंदिल ॥ ३ ॥ कौ०

( २४ ) हरे राम० हा चवथा चरण असलेले हरिदासांचे ५० श्लोक, पण त्यापैकीं पहिल्या अक्षराचें पहिलें पान नष्ट. शेवटचा श्लोक—हरे राम ही मालिका साधका रे । जपे त्या नसे या भवाचा धका रे । हरे राम हे माळ घालूनि कंठीं । हरीदास हा सर्वदा कळ कंठीं ॥ ५० ॥ ( २५ ) रामार्चन चन्द्रिकेची अनुक्रमणिका, ( २६ ) बाडाचीं पानें, किरकोळ

पत्रें वगैरे— यांत श्रीसमर्थ, मध्वमुनेश्वर, नामदेव, आनंदतनय, रंगनाथ, तुका, एकनाथ, गोसावीनंदन, केशव, शिवराम, पूर्णानंद, देवीदास, महीधर शंकित, तुळशीदास, मालो नरहरी, निपटनिरंजन, नाथ भुजंग, इत्यादिकांचीं पदपदांतरें आहेत. त्यांत हि, आश्चर्य, श्रीसमर्थांचीं कांहीं कविता अप्रकाशित आढळली च. ती उतरून ठेवली.

## ५१२ ]

८२, ८३, ८४, ८५, ८६
प. सं. ग्र. ४, ५, ६, ९, १० [१५०

या पांच हि पोथ्यांना केव्हां तरी पाण्याचा स्पर्श झाल्यामुळें त्यांचीं पानें एकमेकांस चिकटलीं आणि फाटलीं आहेत. पुन्हां या पोथ्या हातीं घेणें झाल्यास काळजी घ्यावी.

( १ ) क्रमांक ८२ पूर्वारंभ, ओ. ९ ते ६०, पहिलें पत्र नष्ट

( २ ) क्र. ८३ चतुर्थमान—मान १, ३, ४

( ३ ) क्र. ८४ स्फुट प्रकरण ६७ वें—पाला या पोथींत मान ५ वें म्हटलें आहे.

नंतर कल्याण कृत मन्थराज दासबोधाची आरती, श्रीसमर्थांची आरती, अनंतदास कृत श्रीसमर्थांची आरती व जयरामकृत आरती, अशा आरत्या आहेत. पैकीं मन्थराजाची आरती प्रसिद्ध आहे, बाकीच्या तीन हि आरत्या रा. वि. वि. ३२ त दिलेल्या आहेत.

चतुर्थयोग, पंचीकरण योग, पंचसमासी, पांचीं
सुदन, ( ५ ) दत्तमागदाख्यान-संपूर्ण, ओवीसंख्या
१८६, ( ७ ) रायोमाची भक्ति । ज्ञानाचें मंडण ॥ ( ८
या नरदेहीं करी च यें रे । ( ९ ) येकनाथहन रोळे धिमणा घेंडी••—२५०
धिमणासा टांडु । (१०) पुना दासबोध-पहिला समास, ( ११ ) शिवरामकृ सागद
शेतित शेटीच्या सुरनरा । तुमचा आधार प्राणेधरा । रात्रंदिवस गंगाधरा ॥
नांव धधगाधें घेता ॥ बरुरा मज हि सांगा पोटधि आदिमाता । हांमवा
नन हि सांगा पोटधि आदिमाता ॥ ध्रु० ॥ ... ( १२ ) मनाच्या श्लोकांची
पोथी , ( १३ ) तुळशीच्या दारा मद धिगा—पहिली करूं मद्दशिगा । हरित
पाटें मारें मना । पारा होतसे बरुणा । शोभ गाढो हारीत ॥ १ ॥ दुसरी
करूं मद्दशिगा । इत्यादि, ( १४ ) रा. म. ४ पं—नेणजं जन्मडों आम्ही ॥

येथवरचा संग्रह पूर्वीं च मिळाला होता. त्यानंतर अलिकडे दोन वर्षांत जो थोडा संग्रह उपलब्ध झाला त्याचें टांचण करून इंदुरशोधन मठांतील संग्रहाचें वृत्त पुरें करून गेल्या अठावीस वर्षांत झालेल्या श्रीरामदासी संशोधनाचा हा पहिला खंड समाप्त करावयाचा आहे.

**५१४ ]** बाड-पृ. सं. ३६ × ४ = १४४ आ. व शे. कांहीं नष्ट [१००

(१) श्रीसमर्थ, एकनाथ, ज्ञानदेव, केशव, नामदेव, जगन्नाथनागा, उद्धवचिद्घन ( सद्गुरुदेवाचे हो आम्ही पाय वंदिले जी । ) यांचीं पदपदांतरें

(२) एकनाथांचीं पांगुळ, बालसंतोष, शकुन वगैरे लघु प्रकरणें

(३) केशवांचीं पदें नेहमींप्रमाणें सरस आहेत :

मंत्र यंत्र दीक्षा सांगती लय लक्ष ।
परी राम तो प्रत्यक्ष न करी कोण्ही ॥ १
प्रत्यक्ष राम दावी धरिन त्याचे पाये ।
आणिकाची काय चाड मज ॥ ध्रु०
सर्व कर्मीं राम भेटविती मातें ।
जीवभावें त्यातें वोवाळीन ॥ २

असें एका पदांत म्हणून दुसऱ्या पदांत केशव स्वामी सांगतात

" संतसंग भला श्रीराम देखिला । आनंदु विकला त्रिभुवनीं ॥ १
सुखाचा सुकाळु डोळियासी जाला । श्रीराम देखिला आजी माये ॥ ध्रु.
देखिला श्रीराम संशयो तुटला । पांग हि फिटला संसाराचा ॥ २
संसाराचें बिरडें क्षणांत फेडिलें । महावाक्यबोलें श्रीगुरूच्या ॥ ३
श्रीगुरूची कृपा धन्य माझा जन्म । सर्व कर्मीं राम भेटतसे ॥४
केशव म्हणे आम्हा अनुभवप्रचीती । जागृतीं सुषुप्तीं राम दिसे ॥ ५

अशीं रामस्वरूपदर्शनाचीं आणखीं त्यांचीं कित्येक पदें आहेत. तसें च एक सोनारीचा उल्लेख असलेलें आहे.

(४) कवेश्वर कृत सुदामचरित्र, श्लो. सं. १००

(५) उद्धवचिद्घन कृत शुकरंभासंवाद-कडवीं १४

(६) शिवदिनकेसरींचें श्रीसमर्थांवर पद—

तो हा वंदा रामदास गुरु अविनाशी ॥

५१५ ] लहान बाड–पृ. सं. १४ [ १००

रामभंत्राचे श्लोक ४९–हरे राम हा मंत्र सोपा जपा रे।

५१६ ] ल. बा. पृ. सं. ७२ [ १३५

( १ ) मंगलाष्टकाचे ८ श्लोक व ( २ ) उद्धवचिद्धन कृत भक्तमालिका, ओ. सं. ७३, सुंदर आहे.

५१७ ] किरकोळ बाड–पृ. सं. ८० [ १२५

वामन कृत श्रीरामचरित्रपर ४३ श्लोक

५१८ ] बाड–पृ. सं. ४५ × २ = ९० आ. व शे. मधीं च पानें नष्ट [ १५०

श्रीसमर्थांचे ५१५० अभंग, शिवाय नामदेव, जनाबाई, तुकाराम, केशव यांची पदपदांतरें. कोणी आत्माराम म्हणून नवीन च आहेत. त्यांचे काहीं अभंग आहेत.

५१९ ] बाड–पृ. सं. ३८ × ४ = १५२ आ. व शे. काहीं गेलेली [ १५१

( १ ) आरंभ—विक्रम राजा पाव्ही मजा करी मीना निसाजि।
भारतीचरित्र पाहों गेला पाव्ही धोंगडी पांघरजी॥

शेवट—भारतीचरित्र न कळे कवणा। महाविष्णु त्रिनयना।
हात जे डी तिच्या गुणां। कवी जनार्दना।
पिपरी ठिकाणा। राहातो ओढुन पिंपरीला।
राघो म्हणे भारती चरित्र न कळे देवादिकाला॥ ९

अशे नऊ कथ्यांचें प्रकरण आहे. भारती म्हणजे चतुरा अस्त्री म्हणजे स्त्री.

( २ ) श्रीसमर्थ, दिनकरनंदन, कान्हापाज, कोकिळ, आनंदसुत, गुरुदास यांची पदपदांतरें

( ३ ) कौलापे श्लोक अपूर्ण सोडले आहेत.

( ४ ) विठ्ठलदास कृत ज्ञानशीलपत्रकाचा काहीं भाग

(५) तत्कालीय भाषेंतील कांहीं कविता

(६) कचेश्वर कृत सुदामचरित्र

या बाडात शक १७०४ व १६८५ अशा दोन शकांचा उल्लेख आहे.

# ५२० ]

बाड–पृ. स. २० × ४ = ८०
आ. व शे. कांहीं नष्ट [१५०

(१) श्रीसमर्थ कृत ५१२५ पदें त्यांत

(श्री) परम सुंदर रूप देखियेलें ।
हासितवदनीं मन रमले वो ॥ ध्रु०

(रा) अलमपाजिमोव्यासमुंबाआलम ॥ ध्रु०

(म) जोहार मायबाप जोहार ।

अशीं तीन पदें नवीन दिसतात, पण अशुद्ध आहेत, म्हणून उतरून काढलीं नाहींत. दुसरीकडे कोठे शुद्ध न आढळल्यास यावरून च उतरावीं लागतील.

(२) याशिवाय शिवादिन, माली, केशव, पूर्णानंद, एकनाथ, गोवावीनंदन, आनंदतनय, कानेरनाथ, निश्चनाथ, मानपुरी, मीरा, उद्धवचिद्घन, कबीर, शिवराम, तुकाराम, अमृतराय, संत गोपा यांचीं पदपदांतरें.

(३) रोकडारामाचें श्रीसमर्थांवरील पद—
रामदास गुरु परम परात्पर पावन हें नाम ॥

(४) आनंदात्मज कृत–श्रीरामा जयरामा जयजयरामा ।
वेदविधीशिव स्तविती सुखिया नामा ॥

# ५२१ ]

जमाखर्चाच्या वहीच्या आकाराचें
बाड–पृ. स. ६० [१२५

(१) श्रीसमर्थ, तुकाराम, अमृतराज, प्रभुदास (गोपीगीत–सोडुनि आदि मनाची । हरि वेगीं दया करी ।), रमणात्मज, एकनाथ, चिन्मय नरहरी, गोविंदात्मज, श्रीधर, कबीर, चिन्मयनंदन, आनंदसुत (धन्य दशरथरायजी । त्रैलोक्यामाजी ।), पांडुरंग कवि इत्यादिकांचीं पदपदांतरें.

(२) वान्हाजी कृत श्लोकबद्ध अगदाशिष्टाई–श्लो. ४१

(३) मठाच्या परंपरेंतील रामचंद्र यांच्या कारकीर्दींत झालेले परंपरेंतील पुरुषावर श्लोक

( ४ ) या बाडांत शके १७२९ व १७३० या दोन शकांतील जमा-खर्चाचीं चार पानें आहेत.

५२२ ] पोथी–पत्रसंख्या १२ संपूर्ण [१००

( १ ) श्रीमत् शंकराचार्य विरचित देवीमानसपूजा–श्लो. ७२

( २ ) पोथीच्या वरील मुखपत्रावर ' ॥ हे पुस्तक देवी मानसपूजेची ॥ येशवंतराय दुबे याची असे ॥ ' असा मजकूर आहे.

५२३ ] चार पोथ्या–एकूण प. सं. १६ [१५०

( १ ) संतानगोपालमहामंत्र–पत्रें ४, ( २ ) अन्नपूर्णेश्वरीमंत्र–प. २, ( ३ ) देवीकवच–पत्रें ४, (४) त्रिपुरसुंदरी–पत्रें ६, अशीं चार संस्कृत प्रकरणें.

५२४ ] पोथी [२००

जुना दासबोध

पोथी जुनी आहे, पण तिची फार अवहेलना झालेली दिसते. 'जुना दासबोध' एवढें एक च नांव तिच्यावर आहे. समास २, ३, ७, ९ ते १३, १५ ते १९ एवढे च समास आहेत, बाकी गेले ! जे समास आहेत त्यांची हि फार दुर्दशा झालेली आहे.

५२५ ] पोथी–पत्रसंख्या ४१९ [१५०

दासबोध

लेखकाचें नांव नाहीं किंवा लेखनकाल दिलेला नाहीं. एकाच्या च हातची सर्वंध प्रत नाहीं. आकार हि एकसारखा नाहीं. पहिल्या दश दशकांचा आकार ५½" × ३½" व पुढच्या दहा दशकांचा आकार ६" × ४" आहे. प्रत्येक दशकाच्या मुखपत्रावर दशकाचें नांव, ओवीसंख्या व पत्रसंख्या हीं दिलेलीं आहेत. क्रमशः दशकांची ओवीसंख्या दिलेली आहे ती : ३२६, ४७०, ५८०, २९६, ५७२, ४०९, ५६४, ६४४, ४२७, ३५३, २८६, २९४, २९९, ४०६, ३३६, ३०२, २९७, २८८, २८६, ३०८. मिळून ओवी-

संख्या ७७४३ होते. प्रत प्रेक्षणीय आहे, असें नव्हे. सभेच्या संग्रहीं असलेल्या दासबोधाच्या प्रेक्षणीय प्रति अन्य आहेत.

## ५२६ ]

पोथी–पत्रें ९ [ २००

ग्रन्थाचें मुखवस्त्र–ओवीसंख्या ७९. हें ग्रन्थराज दासबोधाचें मुखवस्त्र कोणी केलेलें आहे, याचा अजून निश्चय नाहीं.

## ५२७ ]

पांच पोथ्या–एकूण पत्रें ७४ [ २००

श्रीसमर्थ कृत (१) षड्रिपुनामयोग सहा–पत्रें १३, (२) पंचीकरणयोग–पत्रें १४, (३) चतुर्थयोग–पत्रें १३, (४) मानपंचक–पत्रें १६, (५) पंचमान–पत्रें १८, अशीं हीं पाच हि प्रकरणें आपल्या तिसऱ्या भागांत प्रसिद्ध झालेलीं आहेत.

## ५२८ ]

पोथ्या–एकूण पत्रें ६१ [ २००

श्रीसमर्थ कृत (१) बहुधा गोसावी–पत्रें ७, (२) रघुनाथध्यान, ओवीसंख्या ११८–पत्रें १६. याला च सगुणध्यान म्हणतात. मुखपत्रावर रघुनाथध्यान असें नाव आहे व आंतल्या बाजूस पत्राच्या समासा-समासांत सगुणध्यान असें नांव दिलेलें आहे. (३) निर्गुणध्यान, ओ. सं. १७६–पत्रें २१, पण ही प्रत अपूर्ण आहे. हिचीं पहिलीं १२ पानें नाहींत. या प्रतींत १०७ पासून च ओव्या आहेत. (४) मानसपूजा, समास तेरा–पत्रें १७, अशीं हीं चार प्रकरणें आपणांस अजून छापावयाचीं आहेत.

## ५२९ ]

पोथ्या–पत्रें १२ [ २००

श्रीसमर्थ कृत (१) दिवटा, (२) सरवदा, (३) कारखाना समास १ व २, (४) श्रीभवानीस्तुति–रामवरदायनी । कामनादायनी ॥

## ५३० ]

पोथी–पत्रें १०६ [ २००

### फुटमानें

बाडांक ४९७ व ५०० यांत जीं स्फुट प्रकरणें आहेत तीं या पोथींत जवळ जवळ क्रमशः आहेत. या पोथीच्या पानांना अंक दिलेले आहेत. त्यांपैकीं १, २, ३, ६०, ६१, ६५ ते ६८, ७२, ७३ हीं पानें हरवलेलीं असल्यामुळें त्यावरील तेवढीं स्फुट मानें या पोथींत कमी आहेत. शेवटचीं दोन पत्रें १०५ आणि १०६ यांत बाडांक ५०७ तील भवानीस्तुती आहे.

बाडांक ४९७ तील सहावें मान–माग्यासी काये उणे रे – याच्या शेवटीं या पोथींत " इति श्री राजनीति शिकवण नाम मान येक " असें आहे.

## ५३१ ]

पोथी–पत्रें २७ + २० = ४७ [२००

( १ ) या पोथींत बारा समास आहेत. बहुतेकांचा शेवट " इति श्री दासबोधे० " असा केला आहे. पण दासबोधांत यांतला एक हि समास नाहीं. यांत सात समास सप्तसमासीपैकीं आहेत, ते असे : ( १ )ब्रह्म सकळां-हूनि विशेष । या समासाच्या इतरत्र २२ च ओव्या आहेत, पण यांत २९ असून १० वी ओवी अपूर्ण आहे. ( २ ) पांचाचे पंचवीस भेद । ओ. सं. ३६, ( ३ ) विशेष स्मरणे देख । ओ. सं. २०, ( ४ ) नाना पदार्थ नाना छाया । ओ. ३२, ( ५ ) बिरंग नव्हे तो चि रंग । ओ. ३४, ( ६ ) निर्गुण निर्विकार संचले । ओ. २९, ( ७ ) सकळ जीवाचें जीवन । ओ. २७

( २ ) बाकीचे पांच समास आहेत ते असे : ( १ ) देहे जड आत्मा चंचळ । ओ. सं. २५—देहात्मयोग नाम समास, मागील बाडांक ५१० त आहे तो च. ( २ ) करितां पंचीकरण विवरण । ओ. सं. ३०—निर्विकल्प-समाधी नाम ( ३ ) समास बागेचा, ओ. सं. ३१-ननकटीनिरूपण नाम, ( ४ ) बाळस्तंभकाष्टपाषाण । ओ. सं. २२-निर्विकल्पसमाधी, ( ५ ) जुनाट पुरुषाचा समास, ओ. सं. ५६.

## ५३२ ]

पोथ्यांचीं त्रुटित पत्रें ३६ [२००

( १ ) दासबोध, जुना दासबोध, स्फुट प्रकरणें, चतुर्थमान, मानसपूजा, पंचीकरण रामदासकृत, रघुनाथध्यान, सप्तसमासी, पंचसमासी, या प्रकरणांचीं विस्कळित पत्रें.

( २ ) त्यांतील एका पत्रावरील ओव्या :

हें किती म्हणोनि सांगावें । ज्यासी जें रुचे तें चि बरवें ।
परी केल्या कर्माचें फळ भोगावें । लागेल पुढें ॥ १४
ऐसें जाणोनि विवेकी । क्रिया करावी नेटकी ।
नेमक मनुष्यासी बहुचरी । कामा नये ॥ १५
कैसी आली पापस्थळी । पतिव्रतेसी हांसे मोकळी ।
भल्या मनुष्याची टवाळी । नष्ट करिती ॥ १६
जो कर्मापासुनी चेवला । तो चि हांसे सुशीलताला ।
कितेक लोक भरला । अधर्माकडे ॥ १७
यदें जाणत्यान ऐसें न करावें । जाणोनि सन्मार्गी भरावें ।
सारासारविचारानें तरावें । सुशीनावें ॥ १८

इति श्री दासबोधे । गुरुशिष्यसंवादे । विवेकलक्षणनिरूपण नाम समास १

## ५३३ ]

पोथी–पत्रसंख्या ७६ अपूर्ण [१५०

सत्त्वबोध नावाचा ग्रंथ. अपूर्ण त्यात हि मधून मधून दहा बारा पत्रें नाहींत च.

## ५३४ ]

गळाठा [१००–२००

( १ ) चतु श्लोकी भागवत, ७ श्लोक, ( २ ) ऋषिपंचमी, ( ३ ) शके १७०८ तील गावगत एकदर मालाची नोंद, ( ४ ) हरगुजी रंगाचा उंच मोती दाणा । हा तुकारामाचा अभंग, ( ५ ) पंचीकरणाचे कागद, ( ६ ) तुकाराम, शेकडाराम, चूडामणिसुत, कबीर, नामदेव, मोरेश्वरसुत काशी, गोसावीनंदन, केशव यांची किरकोळ पदपदावें, कांहीं ज्योतिषाचे कांहीं व्याकरणाचे कागद वगैरे.

## ५३५ ]

लहान बाड–पृ स. १६ [१००

या बाडात फक्त श्रीसमर्थ कृत सुचित करुनि अंत करण । आतां ऐका राजकारण । हा ३३ ओव्यांचा समास आहे. हा समास प्रासंगिक कवितेंत इतरत्र छापलेला आहे.

५३६ ] कागदपत्रें [ १४५-२३८

या पुडक्यांत १९ सनदापत्रें आहेत. त्यांत जुनें असें एक पत्र शके १६१७ तील ' भगवंतस्वरूप उद्धो गोसावी ' यांना आहे व बाकीचीं १६७३ पासून तों १७१० पर्यंतचीं आहेत. १६९० च्या पूर्वींचीं गोविंद गोसावी यांच्या नांवचीं आहेत व नंतरचीं अनंत गोसावी यांच्या नांवचीं आहेत.

यापुढें केव्हां तरी कोणी, श्रीसांप्रदायिक कागदपत्रांचे आणखी खंड काढील, त्या वेळीं हीं पत्रें प्रसिद्ध होतील. या पत्रांपैकीं टेंभुर्णीच्या देशमुख-देशपांड्यांचें १७०९ तील अनंतस्वामी यांना एक पत्र आहे, तें प्रेक्षणीय आहे. लांब रुंद कागद असून अक्षर मोठें, सुंदर, किरयाणारलें आहे.

येथें प्रमाणें इंदुरशोधन मठांतील संग्रह आहे. तो आतां हातावेगळा होणार म्हणून मन मोठें कष्टी होत आहे. कां, कोण जाणे ! वास्तविक हलकें वाटावें, तों हें उलटें जड वाटत आहे. तथापि अशा

भारावलेल्या मनःस्थितींत

तो प्रसंग, तें चांगपुरचें स्थान, तें मारुतीचें स्थान, त्या डोंगराच्या रांगा, तो गांवांतील मठ, मठांतील त्या श्रीरामाच्या मूर्ति, हा बाड संग्रह, त्यांत व्यक्त होणारें श्रीउद्धवांचें अंतरंग आणि या सर्वांचें अधिष्ठान श्रीसमर्थांचे चरण यांचें स्मरण करीत, गेल्या सहावीस वर्षांत झालेल्या श्रीरामदासी संशोधनाचा हा पहिला खंड आज आपण येथें पुरा करून पुढील खंडाच्या उपक्रमा लागूं.

१८५५ आश्विन शु. १५



श्रीराम

# श्री रामदासी संशोधन

## प्रथम खंड



# सूची

( अंक पानांचे आहेत, जेथें पृष्ठांचे आहेत त्यांच्या मागें पृ. अक्षर आहे )

## आ

इ



ई



उ

## थ



## द

ध



न

प

फ



ब

## भ

## ष



## स

ह

—:※※:—

## पुरवणी



